# महानुभावांचा आचारधर्म

लेखक
विष्णु भिकाजी कोलते
नागपूर.




१९५८

अरुण प्रकाशन : मलकापूर ( वऱ्हाड )

मूल्य ६ रुपये

# अनुक्रमणिका.

— :०: —

# आधारग्रंथ व त्यांची संक्षेपचिन्हे.

| | |
|---|---|
| ऋद्धपुरवर्णन ( संपादक, य. खु. देशपांडे ) | ऋ. व. |
| अन्यव्यावृत्ति | अ. व्या. |
| असतीपरी | अ. प. |
| असतीपरीचा गुढा | अ. प. गुढा |
| आचार | आ. |
| आचारमालिका | आ. मा. |
| आचारस्थळ | आ. स्थ. |
| आचारबंद | आ. बं. |
| उद्धरण | उद्ध. |
| उद्धवगीता ( सं. कोलते ) | उद्ध. गी. |
| गोविंदप्रभुचरित्र | गो. प्र. च. |
| दर्शनप्रकाश | द. प्र. |
| दृष्टांतस्थळ ( सं. नेने. ) | दृष्टांत |
| नामाचे दहा ठाय | |
| प्रसादसेवा | |
| भगवद्गीता | गीता |
| महानुभाव तत्त्वज्ञान | महा तत्त्व |
| मूर्तिज्ञान | |

| | |
|---|---|
| लक्षणस्थळ | ल. स्थ. |
| लक्षणबंद | ल. बं. |
| लीळाचरित्र ( सं. नेने ) | ली. च. |
| विचार | वि. |
| विचारमालिका | वि. मा. |
| विचारस्थळ | वि. स्थ. |
| विचारबंद | वि. बं. |
| सह्याद्रिवर्णन | स. व. |
| ज्ञानेश्वरी | ज्ञाने. |
| ज्ञानप्रबोध | ज्ञा. प्र. |
| शोधनीचा आचारपाठ | शो. आ. पा. |
| शोधनीची आचारमालिका | शो. आ. मा. |
| शोधनीचा विचारपाठ | शो. वि. पा. |
| शोधनीची विचारमालिका | शो. वि. मा. |
| स्मृतिस्थळ ( सं. वा. ना. देशपांडे ) | स्मृ. स्थ. |

# दोन शब्द.



'महानुभावांचा आचारधर्म' हे पुस्तक अभ्यासकासमोर ठेवतांना आज अतिशय आनंद होत आहे. इ. स. १९४९ च्या ऑगस्ट महिन्यामध्ये 'महानुभाव तत्त्वज्ञान' हे पुस्तक मीने प्रसिद्ध केले. वस्तुतः त्याच पुस्तकात हा आचारधर्माचा विभाग अंतर्भूत व्हायचा होता. पण त्यामुळे पृष्ठसंख्या अतिशय वाढली असती. म्हणून तात्त्विक भाग तेवढाच आधी प्रसिद्ध केला. त्यावेळी मागे राखून ठेवलेली आचारधर्माची प्रकरणे पुन्हा व्यवस्थित लिहून आज या पुस्तकाच्या स्वरूपात अभ्यासकासमोर ठेवीत आहे. 'महानुभाव तत्त्वज्ञान' या माझ्या पुस्तकाचे जे स्वरूप होते तेच याहि पुस्तकाचे आहे. त्यात मी महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचे उद्घाटन केले, यात त्यांच्या आचारधर्माचे उद्घाटन केले आहे. एखाद्या अर्थाविषयी जेथे महानुभावीय महंतातच मतभेद आहेत तेथे अधिक सयुक्तिक व म्हणून ग्राह्य मत कोणते याचा क्वचित् ऊहापोह केलेला असला तरी माझे स्वतःचे मत मीने कोठेहि दिलेले नाही. स्वतंत्र मतप्रतिपादनापासून माझी लेखणी म्या संयमाने दूर ठेवली आहे. ही माझी भूमिका असल्यामुळे आज जगात विद्यमान असलेल्या अनेक धार्मिक सांप्रदायातील कोणाच्याहि आचारधर्माशी

## दोन शब्द.

महानुभावांच्या आचारधर्माची मीने तुलना केलेली नाही. ते कार्य स्वतंत्र आहे. मी ते यापुढे करीन. या पुस्तकात तें केलेले नाही हे नमूद करणे अवश्य वाटते.

प्रस्तुत पुस्तक लिहिण्यासाठी मी केलेल्या अभ्यासाचा उल्लेख 'महानुभाव तत्त्वज्ञाना'च्या 'हृद्गतात' आलेलाच असल्यामुळे त्याची पुनरुक्ति या ठिकाणी करीत नाही. त्या माझ्या अभ्यासाला मदत करणाऱ्या सर्व महानुभाव महंतांचे मी पुन्हा आभार मानतो, मागील प्रमाणेच याहि पुस्तकाच्या वेळी महंत श्री. मुरलीधरशास्त्री आराध्य महानुभाव (भुसावळ) आणि महंत श्री. दत्तराज पाचराउत महानुभाव (रितपुर) या महात्म्यांनी मला अतिशय मोठ्या व मोकळ्या मनाने मदत केली. पुस्तकाचे संपूर्ण हस्तलिखित त्यांनी वाचून पाहिले व आवश्यक त्या उपयुक्त सूचना केल्या. त्याबद्दल मी त्यांचा विशेष ऋणी आहे. तत्त्वज्ञानाप्रमाणे आचारधर्माचेहि लेखन करण्याला श्री. बाळकृष्णशास्त्री महानुभाव (माहूर) यांची प्रेरणाच कारणीभूत झाल्यामुळे आभार मानतांना त्यांचा विसर पडणे कसे शक्य आहे ?

धंतोली, **नागपूर**<br>१९ ऑगष्ट १९४८

**विष्णु भिकाजी कोलते.**

## विषयानुक्रमणिका.



# महानुभावांचा आचारधर्म

## प्रकरण १ ले

## विषय – प्रवेश

जे इष्टानिष्ट प्रकाशकु : ज्ञान होय निष्कलंकु
पुनरावृत्ति-संसार-मोचकु : दैववशें
तै तयाचेनि विचार उजळे : आचारवृत्तिचेनि पाखाळे
कर्मअकर्मा पासोनि चोखाळे : जीवात्मा हा ( ज्ञा. प्र. ६२ - ६३ )

### प्रास्ताविक

अच्युतपदप्राप्ति करून घेऊन तेथे ईश्वराचा आनंद निरंतर उपभोगत राहणे हेच जीविताचे साध्य होय. हा ईश्वराचा आनंद देवतांच्या अंतर्यांग व बहिर्यांग साधनांनी प्राप्त होत नाही. त्यासाठी ईश्वराचे ज्ञान व प्रेम हेच काय ते दोन उपाय आहेत. ज्ञान हा ईश्वराचा बहिर्यांग आहे तर प्रेम हा त्याचा अंतर्यांग आहे. देवतांच्या अंतर्यांगाप्रमाणे ईश्वराच्या प्रेमाचा अथवा भक्तीचा मार्ग हा सुखकर आहे. त्यात प्रेमी जीवाला अथवा भक्ताला शारीरिक कष्टादिकांचा आचार करावा लागत नाही. ईश्वराचे प्रेम झाले म्हणजे भक्त सहज उद्धरला गेलाच म्हणून समजावे. ज्ञानमार्गाचे तसे नाही. देवतांच्या बहिर्यांगाप्रमाणे ईश्वराचा बहिर्यांगरूप असलेला त्याचा ज्ञानमार्ग अत्यंत कष्टकर आहे. कारण ज्ञान झाल्यानंतर त्याला आपल्या मळकर्मांचा नाश करण्यासाठी अत्यंत खडतर असा असतीपरीचा आचार पाळावा लागतो. त्याच्या या आचारधर्मांचाच या पुस्तकात आपणाला विचार करायचा आहे.

### असतीपरीचे महत्त्व

ईश्वराचे ज्ञान हा अच्युतपदप्राप्तीचा एक उपाय असून ते मोचक आहे हे खरे, ( ज्ञान मोचक : वि. मा. १ ) पण जीवाला ईश्वराचे ज्ञान

झाले म्हणजे तो सर्वस्वी उद्धरला गेला असे मात्र नाही. ज्ञान मिळाल्यानंतर त्याने सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरले पाहिजे, अनुसरल्यानंतर याच देही अपरोक्षज्ञान प्राप्त होईपर्यंत अथवा दुसऱ्या जन्मात परमेश्वराचा पुनःसंबंध होऊन मग अपरोक्षज्ञान मिळेपर्यंत असतीपरीचा आचारधर्म पाळला पाहिजे. पण नुसते अपरोक्षज्ञान झाल्याने संपले असे नाही. त्यानंतर त्याने परमेश्वराच्या सान्निध्यात त्याच्या सेवादास्याने आणि परमेश्वराच्या असन्निधानात (उद्ध. ३५, ३६) बहुरूपतेने व बहुकामतेने (वि. १२९) आपल्या अशेष कर्मांचा नाश करून सामान्यज्ञान मिळवले पाहिजे; मग परमेश्वर--प्रवृत्तीने आपल्या प्रत्येक मळाचे स्वतंत्र रीतीने, याप्रमाणे सर्व मळांचे क्षाळण करून विशेषज्ञान मिळवले पाहिजे. तदनंतर कृपास्पदीचे दुःख अनंत काळ भोगल्यावर परमेश्वराच्या कृपाशक्तीने मुळविद्येचा छेद करून घेऊन त्याला मायापारंगत व्हावे लागते. (उद्ध.५४--५७). त्यानंतर त्याच्या अनुभव—अज्ञानाचा नाश व्हावा लागतो आणि मग कुठे ईश्वर त्याला आपल्या स्वरूपात रममाण करतात. (उद्ध. ६१). भक्तालाहि हे सर्व करावेच लागते. पण त्याच्या बाबतीत त्याला परमेश्वराचे निरंतर सन्निधान असल्यामुळे या सर्व गोष्टी आपोआप म्हणजे त्याला फारसे प्रयास न पडता, सिद्ध होतात. (भक्ताचे सकळही सन्निधानी चरितार्थ होए : उद्ध. १६). पण ज्ञानियाला मात्र या सर्व गोष्टी स्वतः शारीरिक कष्ट सोसून, आचार करून पार पाडाव्या लागतात. त्याशिवाय त्याचे उद्धरण होऊ शकत नाही.

## असतीपरीच्या ज्ञानाची आवश्यकता

यासाठीच परमेश्वरमार्गीच्या ज्ञानी साधकाला असतीपरीचे म्हणजे आचारधर्माचे ज्ञान यथार्थ असले पाहिजे. एरवी, परमेश्वरापासून त्याला बोध झाल्यानंतर तो अनुसरून विरक्तीने राहू लागला, पण त्याला त्या विरक्ताचरणाचे योग्य ज्ञान नसले तर त्याची ती सर्व विरक्ति व्यर्थ होण्याचा संभव आहे. कारण, इतर पंथियांची विरक्ति आणि महानुभावियांची विरक्ति

१. 'सृष्टीमध्ये अवतरौनि परमेश्वरे श्रीचक्रधरे स्वस्वरूपादि सकळ पदार्थांचे अशेष विशेष निरूपिलेः परि नसुद्धेनि ज्ञाने उद्धरण नाही म्हणौनि अस्तीपर निरुपिली' (ल. बं. अप. लापिका).

यात बराच फरक आहे. महानुभाव विरक्तांच्या आचारधर्मांत 'परमेश्वर शास्त्री एवं वा नाही : पर्याय नाही : अभावी भावरूप फळ नाही : अकरणी प्रत्यवायो नाही' ( आ. मा. ११९ ). तथापि प्रत्येकवेळी आचरणाचा यथा-योग्य विधि त्याला ठाऊक पाहिजे. कारण 'जो जेथिचा विधि तो तेथे तैसाचि व्हावा की' ( शो. आ. मा. २४ ). यासाठी आचरत्या पुरुषाला विधिनिषेधाचे ज्ञान यथार्थ असले पाहिजे. नुसत्या विरक्ताला ते नसते. म्हणून त्याजकडून वारंवार विधिभंग होतो; गोमटी क्रिया न घडता बहुधा दोषरूप क्रियाच घडतात. उदा : स्मरण करीत असतांना एखादा भिक्षु पाहिला तर हर्षित होऊन त्याचे क्षेम विचारण्यासाठी त्याने चार पावले पुढे गेले पाहिजे. त्यामुळे त्याच्या ठिकाणी भेटीचा गुण लागून तो अंतः-करणात स्मरणाच्या ठिकाणी अधिक रममाण होऊ शकतो. पण ज्याला या विधीचे ज्ञान नाही तो आपल्या विरक्तीच्या आवेशाने स्मरणातच दंग होतो. भिक्षूच्या भेटीसाठी तो पुढे होत नाही. त्यामुळे त्याला त्या स्मरणाचे जितके गोमटे व्हायचे तितके न होता उलट विधिभंगाचा दोष मात्र त्याच्या पदरी पडतो. आचारधर्मांचे यथार्थ ज्ञान नसल्याचा हा परिणाम होय. याचसाठी ज्ञानावाचून म्हणजे आचारधर्मांच्या ज्ञानावाचून नुसत्या वैरा-ग्याचा काही उपयोग नाही. ( ज्ञानेवीण वैराग्य ते काई करावे बापेया : आ. २२१ ).

या कष्टप्रद ज्ञानमार्गांत ज्ञानियाला परमेश्वराचा पुनःसंबंध होऊन अप-रोक्ष प्राप्त झाल्यापासून तो ह्मस्वरूपी रममाण होईपर्यंत त्याला कोणता आचार करावा लागतो याचे सविस्तर वर्णन 'महानुभाव तत्वज्ञान' या ग्रंथात केलेले आहे ( म. त. ४४७ ते ४९९ पहा ). ईश्वराचे ज्ञान झाल्या-नंतर ज्ञानियाला पुनःसंबंध होऊन अपरोक्ष मिळेपर्यंत जो आचारधर्म पाळावा लागतो त्याचे दिग्दर्शन या ग्रंथात करावयाचे आहे. या आचार-धर्मालाच 'असती परी' असे पारिभाषिक नाव श्रीचक्रधरस्वामींनी दिलेले आहे.

१. ज्ञानेवीण वैराग्य म्हणजे विधीनिषेधाचे ज्ञान नाही : तेणेवीण वैराग्य अप्रयोजक : ज्ञानेवीण चर्या नाही...... क्षेमालागी पावले दोन चार तोंड पघळूनि जावे तै गुण फावे : रमणरूप...... ( आ. रथ. २२१ )

## असतीपरी म्हणजे काय ?

'असती' म्हणजे असण्याची अथवा वागण्याची 'परी' म्हणजे रीत. अर्थात्, वागण्याच्या विशिष्ट पद्धतीला 'असती परी' असे नाव आहे. वस्तुत: 'असती परी' हा शब्द अतिशय व्यापक आहे. त्यात राजेलोकांच्या, प्रधानांच्या, सेवकांच्या व सर्वसामान्य कर्मराहाटीतील जनतेच्या आचारधर्मांचा जसा समावेश होऊ शकतो तसाच देवताविषयक आचारधर्मांचा म्हणजे त्यांच्या युगधर्मांचा आणि बहिर्यागाचाहि समावेश होऊ शकतो. देवतांच्या आचारधर्मांप्रमाणेच परमेश्वरविषयक आचारधर्मांचाहि त्यात अंतर्भाव होतो. तथापि श्रीचक्रधरस्वामींनी आपल्या ब्रह्मविद्याशास्त्रात प्रस्तुत 'असती परी' हा शब्द परमेश्वरविषयक आचारधर्माविषयीच वापरलेला आहे हे लक्ष्यात ठेवले पाहिजे. तेव्हां 'असती परी' म्हणजे साधकाने कशा रीतीने असावे, अर्थात् कोणता आचार पाळावा व कोणता पाळू नये याविषयी साधनदात्या परमेश्वराने सांगितलेला आचारधर्म.

हा आचारधर्म केवळ ज्ञानमार्गियासाठी आहे यात शंका नाही. अन्यमार्गांतील पुष्कळ साधक अत्यंत खडतर असा आचारधर्म पाळतात. पण मुळांत त्यांना परमेश्वराचे ज्ञान नसल्यामुळे त्यांचा सगळाच मार्ग चुकलेला असतो. ह्या चुकीच्या मार्गांनी परमेश्वर कसा प्राप्त होईल ? त्यासाठी त्या विरक्तांना पूर्वी परमेश्वराचे ज्ञान झालेले असले पाहिजे. एरवी त्यांची ती विरक्ति व्यर्थ होय. ( आ. २२१ ). काही साधकांच्या ठिकाणी ज्ञान असते पण त्यांना वैराग्य आचरता येत नाही. उलट काहींना वैराग्य चांगले आचरता येते पण मुळात त्यांना परमेश्वराचे ज्ञानच नसते. 'दात असति तेथ चणे नाही : चणे असति तेथ दात नाही' ( आ. २२० ). पण ही दोन्ही जिथे असतील तेथेच भोजनक्रिया उत्तम घडू शकेल. त्याप्रमाणे ज्ञान व वैराग्य या दोहोंचा मेळ ज्यांच्या ठिकाणी असेल त्यांनाच ईश्वरप्राप्ति होऊ शकेल. भर्तृहरी हा श्रेष्ठ विरक्त होता. पण त्याला ज्ञान नव्हते. 'भर्तृहरी वैराग्य आत : परी ज्ञान नाही' ( शो. आ. पा. २१ ). त्यामुळे

१. 'परी असीजे म्हणौनि अस्तीपर : कुपरी नसीजे ...... असती परी हा व्यासि शब्द ...... असती परी म्हणजे ऐसीया परी असावे म्हणौनि निरूपिले' ( ल. स्थ. अप. १. )

त्याला ईश्वरप्राप्ति होणे शक्य नव्हते. सारांश, आचरत्या पुरुषाला परमेश्वराचे ज्ञान असलेच पाहिजे. तरच तो मोक्षमार्गाचा साधक यथार्थपणे होऊ शकेल. ज्ञानमार्गावरून आक्रमण करीत असतांना ज्ञानियाला जेणेकरून ईश्वराचे प्रेम प्राप्त करून घेता येईल असे काही उपाय परमेश्वराने सांगितले आहेतच. त्या उपायांच्या आचाराची पद्धति कोणती, या गोष्टीचा सविस्तर निर्णय या आचारधर्मातच अंतर्भूत झालेला आहे.

## ज्ञानानंतर अनुसरणाची आवश्यकता

हा आचारधर्म ज्ञानियासाठी आहे असे वारंवार म्हटले आहे खरे. पण याचा अर्थ, जीवाला परमेश्वराचे ज्ञान झाल्यानंतर तावडतोब तो या आचारधर्माप्रमाणे वागू लागतो असे नाही. ज्ञान झाल्यानंतर त्याने सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरले पाहिजे. हा अनुसरलेला ज्ञानी म्हणजे परमेश्वरमार्गीचा खराखुरा साधक होय. ज्ञान झाल्यानंतर सगळेच ज्ञानी परमेश्वराला अनुसरतात असे नाही. काही जण अनुसरतात तर काही अनुसरत नाहीत ( मग एकु अनुसरेति: एकु ननुसरेतिः उद्ध. २२ ). ज्ञानानंतरहि परमेश्वराला न अनुसरणारेच फार असतात. अनुसरणारा मात्र हजारातून एखादाच असतो.

अच्युतपद प्राप्त करून घेण्यासाठी परमेश्वराचे अनुसरण करण्याची आवश्यकता श्रीचक्रधरस्वामींनी वारंवार प्रतिपादन केलेली आहे. कारण जो अनुसरला त्याला ईश्वरप्राप्ति झालीच म्हणून समजावे. ( अनुसरलेयाचा देवो: आ. मा. २०२ ) म्हणूनच 'अनुसरण : त्याग : प्राप्ती सारखीच' ( शो. वि. पा. ८ ) असे म्हटले आहे. अधोमुख असलेल्या अनंत जीवापैकी एखादा जीव अनुसरणाच्या रूपाने परमेश्वराकडे पाहील तर परमेश्वर त्याचा सहज उद्धार करतात ( साधे हो जीव ऐसे अधोमुख असतिः परमेश्वरु ऐसे वरिपडौनि पांति असति: एकाधा एकु ऐसी वरौती वास पाहील तरि ऐसाचि काढिजैल : आ. २१). याशिवाय 'पांडेया एथ अनुसराल तरि ऐसेचि काढीजैल' ( आ. २१४ ); 'हां गाः एथ शरण आलेया काइ मरण असे' ( आ. २१६ ); 'भोजेया: एथ अनुसरीजे : ना

१. 'जेतुकेया ज्ञान तेतुके अनुसरती ऐसे नाही : अनुसरती ते मनुष्याणां सहस्रेषु' ( ल. स्थ. उद्ध. २२ )

तरी ऐसेया अधोपरीचेया वृक्षा होइजैलः मग अनंत काळ दुःख भोगिजतचि असीजैल' (आ. २५६); 'बाइ: एथिचेया होइजे तै चुकेती' (आ. २५७); 'अनुसरलेयाचिया दोनिचि घडिया पुरेति' (आ. २८२); 'हां गा : जन्माचीया काइ अनुपपात्ति पडिलिया असेति, ऐसी अनंते जन्में वाया गेली : म्हेळिये जन्म दीधले : मोळिये जन्म दीधले : सिवणेया दीधले : रुभणेया दीधलेः मा हे एक जन्म एथ दिजो का : मा काइ होइल ते पाहिजो' (आ. २८८); 'अनुसरलेयाते निरोध न बधीति' (आ. मा.-१९६); 'भोजिया : अनुसरणावीन जीवास ऐसे अनंत दुःख असती' (शो. वि. ९); 'तैसे नव्हे की गा : एथ अनुसरे तितुका वाचे' (शो. वि. १०); 'द्रव्य संपती ईश्वर न पवीजे : पुत्र संपती ईश्वर न पवीजे : सुहृदसंपती ईश्वर न पवीजे : विद्यासंपती ईश्वर न पवीजे' 'हे सकळही परित्यजुन सर्वभावी अनन्य होऊन ईश्वरा, शरण रिगीजे : तेणे ईश्वर पावीजे' (शो. वि. पाठान्वय २८; २९). या सर्व वचनावरून अनुसरणाचे महत्त्व किती आहे ते सहज कळून येईल. यासाठी परमेश्वरज्ञान झाल्यानंतर साधकाचे प्रथम कर्तव्यकर्म म्हणजे परमेश्वराला अनुसरणे हे होय. हे जो करील त्यालाच मोक्षमार्गाचा दरवाजा खुला होईल; इतरांना नाही.

नुसते वैराग्य ज्याप्रमाणे मोक्षदायक नाही त्याप्रमाणे नुसते ज्ञानहि मोचक नाही. 'सृष्टीमध्ये जेतुले जीव करी तेतुलेनि काइसेनिही मुंचेना : एक वाचौनि' (वि. २६७); 'ज्ञान मोचक' (वि. मा. १); 'सर्वत्र ज्ञान मोचक की' (शो. वि. पा. ३०). असे श्रीचक्रधरस्वामींनी म्हटले त्याचा अर्थ इतकाच की मुक्तिसाठी प्रथम ज्ञान असलेच पाहिजे. ते असले तरच पुढच्या आचाराचा उपयोग. नुसते ज्ञान मोचक असते तर सर्वच ज्ञानी सहजच उद्धरले गेले असते. पण तसे नाही. ज्ञानानंतर जीवाकडून परमेश्वरानुसरण घडलेच पाहिजे. ज्ञान ही मोक्षमार्गाची पाहिली पायरी असे म्हटले तर अनुसरण ही त्यापुढील दुसरी पायरी होय. ती चढल्याशिवाय

१ 'एक वाचौनि म्हणजे ज्ञान : अनुसरण : म्हणजे ज्ञानपूर्वक अनुसरणावाचौनि ...... नसुद्धे ज्ञाने ही ना ......एवं ज्ञानयुक्त आचरण आन अनुसरण तेंणे मुंचन होय ऐसे सांगितले' (वि. बं. २६७)

म्हणजे ज्ञानियाने अनुसरण केल्याशिवाय त्याला मुक्ति नाही हे स्पष्ट आहे. आणि ज्याचे अनुसरण लेखी लागले तो विजयी झालाच म्हणून समजावे. (जयांचे अनुसरण लेखीं लागे तेणे जिंकीले : शो. आ. पा. १७० )

## अनुसरण म्हणजे काय ?

'ज्ञान झाल्यानंतर सर्वसंगपरित्याग करून, एखाद्या लहान लेकराप्रमाणे पूर्णपणे परमेश्वराधीन होणे आणि त्याने सांगितलेला आचार-त्याच्या सगळ्या आज्ञा पाळणे हे अनुसरण होय. ( एथ अधीनू होइजे : एथौनि भणितले कीजे ते अनुसरण : आ. २८३ ). अनेकदा, लेकरू आईच्या आधीन असते पण तिचे ऐकत नाही. दायंबा परमेश्वराची सेवा अत्यंत मनोभावाने करीत असे; पण अधीनत्वाचा मनोधर्म त्याच्या ठिकाणी नव्हता. अनुसरलेल्याच्या ठिकाणी अधीनत्व व वचनपरिपालन ह्या दोन्ही गोष्टी अवश्य पाहिजेत. निषेधावरून आपले मन काढून ते ईश्वराच्या ठिकाणी लावणे आणि सगळ्या विधींचे पालन करणे हे खरे अनुसरण होय. कित्येक ज्ञानी परमेश्वराला नाममात्र अनुसरतात. पण ( संग्रहरूपाने किंवा इतर बलवत्तर कारणासाठी ) कर्म, धर्म, विधि आणि विषय आचरीत असतात. अनुसरणासाठी या सगळ्या गोष्टींचा त्याग केलाच पाहिजे (कर्मः धर्मः विधि : विखो : परित्यजौनि परमेश्वरा शरण रिगावे : आ. ५६). कर्मे म्हणजे विकल्परूप व व्यवसायरूप कर्मे. ज्या कर्मामुळे देवतावर परमेश्वरबुद्धि येते ती विकल्परूप कर्मे होत. म्हणजेच देवतांचे बहियोंग ( आ. १६२; आ. मा. १७३ ); किंवा काही प्राप्त व्हावे म्हणून केलेल्या नवसादिक पुण्यक्रिया; व्यवहाररूप कर्मे म्हणजे उपजीविकेसाठी केलेले व्यापार, ज्योतिष, वैद्यक वगैरे कर्मे. ही विकल्परूप व व्यवहाररूप कर्मे अनुसरण करतांना सोडून दिली पाहिजेत. कर्माप्रमाणेच अनुसरतांना ज्ञानियाने द्वादश धर्मांचाहि त्याग करणे अवश्य आहे. (१) देशधर्म-देशातील विशिष्ट रीतिरिवाज (२) ग्रामधर्म. (३) जातिधर्म. (४) कुळधर्म. (५) वर्णधर्म-वर्णानुसार प्राप्त झालेले आचार. (६) आश्रमधर्म. (७) पुराणधर्म-पुराणात सांगितलेले

१ 'सर्वस्वे अधीन लेकरू : परी म्हणितले न करी : आन दायंबा परमभावे दास्य करीती : परि मनोधर्म नाही : निषेधावरूनि मन काढूनि ईश्वरी लाविजे ते अधिनता : आचरे ते म्हणितले करणे ' ( आ. स्थ. २८३ )

आचार; जयंत्या, संक्रांत, व्यतिपात वगैरे. (८) आगम धर्म–हठयोग, शाक्तसंप्रदाय, नवचंडी, अघोरकर्म वगैरे. (९) प्रवृत्तिधर्म. (१०) निवृत्तिधर्म–अन्यमार्गी संन्यासी वगैरेंचे. (११) युगधर्म; आणि (१२) राज्यधर्म. या शिवाय विधिविषयांचाहि त्याग आवश्यक आहे. 'विधि' म्हणजे कर्मराहाटीतील विधि. उदा: यजनयाजन, अध्ययन-अध्यापन, दानप्रतिग्रह, स्नानसंध्या, अघमर्षण, श्राद्धपक्ष, पर्वणी वगैरे. आणि 'विषय' म्हणजे पंचेंद्रियांचे उपभोग्य पदार्थ. उदा: अष्टभोग, स्त्रीपुरुषसेवन वगैरे 'राग : द्वेष : काम : क्रोध : मद : मत्सर : यांचा त्यागु यांचि नावे संन्यासु' (आ. १७७) असल्यामुळे अनुसरत्या ज्ञानियाने या षड्रिपूंचाहि त्याग करणे अत्यवश्य होय. या सर्वांचा संन्यास करून ज्ञानियाने परमेश्वराधीन व्हावे व त्याचे म्हणणे ऐकावे हेच परमेश्वराचे खरे अनुसरण होय. अनुसरणापूर्वी जो जे जे कर्म, जे जे धर्म, जे जे विधी व जे जे विषय उपभोगीत असेल ते ते सगळे त्याने सोडून दिले पाहिजेत. अशा रीतीने परमेश्वराला जो अनुसरेल त्याला परमेश्वर प्राप्त झालाच म्हणून समजावे. (अनुसरलेयाचा देवो : आ. मा. २०२)

जीवाने अनुसरण केले, सर्वसंगपरित्याग करून तो भिक्षुक बनला म्हणजे परमेश्वर त्याच्या अनुसरणाचा तात्बडतोब स्वीकार करतात असे नाही. अनुसरणानंतर दोन घटका गेल्यावर मग त्या अनुसरणाचा स्वीकार करतात. कारण, जीवबुद्धि चंचल व क्षणभंगुर असल्यामुळे अनुसरणानंतरहि ती लागलीच पालटण्याचा संभव असतो. म्हणून परमेश्वर दोन घटका वाट पाहतात व मग अनुसरणाचा स्वीकार करतात. अर्थात्, अनुसरणानंतर दोन घटकापूर्वी जर त्याची अनुसरणवासना बदलली तर तो प्रमादी होत नाही. कारण त्याच्या अनुसरणाचा स्वीकार झालेला नसतो. अनुसरल्यावर ज्ञानियाला शास्त्राभ्यास करून परमेश्वराची 'अस्तिपरी' (आचार) आचरावी लागते व मग तो पुनःसंबंधाला पात्र होतो. पण एखादा ज्ञानिया अंतःकरणपूर्वक अनुसरून दोन घटकानंतर त्याला तात्बडतोब मृत्यु आला तरी परमेश्वर त्याच्या अनुसरणाचा व त्याचा स्वीकार करून त्याला पुनःसंबंधाला पात्र करतात. एरव्ही आचारधर्म पालन करणाऱ्या अनुसरलेल्या ज्ञानियाला मिळणारे सगळे श्रेय त्याच्या पदरात पडते. 'अनुसरलेयाचिया दोनच घडिया पुरती : आ. २८२)' (महा. तत्त्व. पृ. ४२८-४३०)

एखाद्या वेश्येने शरीराविक्रय करून विषयकर्दमात लोळत लोळत आपला सगळा जन्म घालविला असला तरी, शेवटी जर ती एकाच पुरुषाला धरून राहिली तर, प्रतिव्रतेला प्राप्त होणारी सगळी फळे तिलाहि मिळतात. इतकेच नाही, पण ती शेवटी त्या पुरुषाबरोबर सती गेली तर सतीला प्राप्त होणारी फळे तिला मिळतात. आयुष्याचा शेवटचा भाग का असेना, पण तो पातिव्रत्य धर्माने घालविला म्हणजे जर एवढे गोमटे होते तर बोधवंताने सर्व जन्म विषयव्यवहारात घालवून शेवटच्या एकदोन घटिका जरी तो परमेश्वराला शरण गेला म्हणजे अनुसरला तरी परमेश्वर त्याचा स्वीकार करतात. ( सामान्य स्त्रीएचा दृष्टांत. ६१ )

## त्यागाचे चार प्रकार

ज्ञानानंतर सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरणाऱ्यांचे प्रामुख्याने तीन प्रकार आहेत. १ मळत्यागी. २ अनिष्टत्यागी; आणि ३ स्वतेव त्यागी. ( एकु मळत्यागिया : एकु अनिष्टत्यागिया : एकु स्वतेव जाए तेन्हेळी सांडी : आ. २४९ )

(१) **मळत्यागी** : परमेश्वराचे ज्ञान झाल्याबरोबर आपले सर्वस्व 'मळ' मानून, त्याचा तात्काळ संपूर्ण त्याग करून परमेश्वराला अनुसरणारा पुरुष 'मळत्यागी' होय. उदा: म्हाइभट हे मळत्यागी होते. मळत्यागाचाच दुसरा एक प्रकार 'मळवत्' त्याग होय. ( मळवत् त्यागु तो निर्गुण : आ. मा. १०९ ). भांडारेकर हे मळवत्त्यागी होते. कारण, श्रीचक्रधर-स्वामीकडून त्यांना बोध होताक्षणीच ते सर्वस्वाचा त्याग करून त्यांना अनुसरले व त्यांच्या मागे गेले. भांडारेकाराच्या घरच्या मंडळींनी त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण 'हे इतले दीस तुम्हापासी होते : आता जेयाचे तेयापासि जात असे' असे त्यांना सांगून ते श्रीचक्रधरस्वामी-बरोबर निघून गेले. ( ली. च. एकांक २७ ).

असा मळत्याग व मळवत्त्याग सत्त्वप्रधान पुरुषांनाच घडतो विशेषतः पूर्वसंस्कारानुसार ज्याच्या ठिकाणी ईश्वरविषयक सत्त्व उत्पन्न झाले आहे त्या पुरुषाला तर मुळापासून म्हणजे वयाच्या आठव्या वर्षापासूनच

१. '**एकासी उपक्रमात नावडे** ...... तरि उपक्रम म्हणजे आठा वर्षांपासौनि पुढे' (आ. बं. २४९).

हा त्याग घडतो. त्याला तेव्हांपासूनच इतर कोणत्याहि गोष्टी आवडत नाहीत. हा अर्थात् सर्वोत्तम त्यागिया होय. इतर सत्त्वप्रधान पुरुषांना नीतिनियमानुसार रजतम उद्भवतात; नाही असे नाही. उदाःगृहस्थाश्रमातील सात्विक पुरुषाला गृहस्थधर्मानुसार विषयसेवन घडते, मुलांना सुधारण्यासाठी तो त्यांच्यावर रागावतो, प्रसंगी त्यांना मारतोहि. पण राजसपणा किंवा तामसपणा हा त्याचा मूळ स्वभाव नव्हे. त्याचा मूळ स्वभाव सात्विकतेचाच असतो. अशा सात्त्विक पुरुषाला परमेश्वराचे ज्ञान होताक्षणीच तो सर्वस्व मळवत् मानून त्याचा त्याग करतो. ' प्रथम ज्ञान होत क्षेवी : ईश्वर मायबाप गोसावी : उमटत क्षेवो जीवी : सवेचि निघो लागे ' ( ज्ञा. प्र. ६६ ). अशा पुरुषालाच मळत्यागी म्हणतात. या मळवत् त्यागाला सात्विक त्याग व निर्गुण त्याग अशीहि नावे आहेत. ( राजस : तामस : सात्त्विक त्यागु : आ. मा. ९८; मळवत् त्यागु तो निर्गुण : आ. मा. १०९ )

**(२) अनिष्टत्यागी** : अनिष्टत्यागिया पुरुष स्वभावतःच राजस प्रकृतीचा असतो. त्याला ज्ञान झाल्यावरहि तो परमेश्वराचे चिंतन करतो ते रजोगुणाने, म्हणजे परमेश्वराच्या आत्यंतिक आवडीने. तसे चिंतन करता करता त्याला स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक या चतुर्विध साधनाची गोडी संचरते. शिवाय अष्टभोगांची तर त्याला स्वभावतःच आवड असते. पण ज्ञानामुळे त्याला हे अष्टभोग ' अनिष्ट ' वाटतात, म्हणून तो त्यांचा त्याग करतो. मळत्यागियाला त्यांची मुळात आवडच नसते; तर अनिष्टत्यागियाला ती असते. तरीहि, परमेश्वरज्ञान झाल्यावर, त्यांचा उपभोग घेणे त्याला 'अनिष्ट' वाटते म्हणून त्यांचा तो त्याग करतो. उदाः नागदेवाचार्य हे अनिष्टत्यागिये होते. आपल्या पूर्वायुष्यात ते अत्यंत व्यसनी होते. पण श्रीचक्रधरस्वामींची भेट झाल्यावर त्यांची वृत्ति पालटत चालली. स्वामींच्या ६ व्या भेटीत त्यांना बोध झाला ( स्मृ. स्थ. १ ). पण ते स्वभावतःच राजस प्रकृतीचे असल्यामुळे त्यांना अष्टभोगादि सर्वस्व मळवत् वाटले नाही. पण विचारांती त्यांची अनिष्टता त्यांना पटली, म्हणून बोध झाल्यावर काही दिवसांनी श्रीचक्रधरस्वामींची पुन्हा भेट

१ ' एक आवडूनि अनिष्ट म्हणौनि सांडी ' ( आ. स्थ. २४९ ).

झाली तेव्हां सर्वसंगपरित्याग करून ते त्यांना अनुसरले. ( ली. च. उत्त. १ ).

**(३) स्वतेवत्यागी :** 'स्वतेवत्यागी' पुरुष तामस प्रकृतीचा असतो. त्याला सगळ्या पदार्थांची आवड असते, इतकेच नाही तर लोभ असतो. त्याला परमेश्वराचे ज्ञान झालेले असले तरी लोभामुळे तो व्यवहारात व स्त्रीपुत्रादिकांच्या पाशात अडकून पडतो. त्यांचा त्याग करणे त्याला स्वतःला शक्य होत नाही. ज्या निमित्तामुळे म्हणजे ज्या जडचेतन पदार्थामुळे तो लोभात सापडलेला असतो ते जडचेतन पदार्थ, ते निमित्त पदार्थ नष्ट झाल्यानंतर त्याला त्याग घडतो व मग तो परमेश्वराला अनुसरतो. कर्मवशात् त्याची बायकामुले मरण पावतात; आप्तसंबंधिये त्याला सोडून जातात; त्याची द्रव्यसंपत्ति चोराचिलटाकडून व राजाकडून हिरावून घेतली जाते आणि त्याच्या घरादारावर गाढवाचा नांगर फिरतो. म्हणून त्याला त्याग 'घडतो'.' आणि संपत्ती गेलिया जीवी : मानी विष होते पल्लवी : ते हरोनि मज गोसावी : तै दीधले जीवदान ॥ ऐसेनि देहभावे : जेणे त्यजिले अवघे ' ( ज्ञा. प्र. १६८, १६९ ) म्हणजे निमित्तापगमामुळे ज्याला त्याग घडतो त्याला 'स्वतेवत्यागी' असे म्हणतात. उदाः ब्राम्हणगावची राणाइसा नावाची स्वामींची एक शिष्या होती. तिला स्वतेव त्याग घडला होता. स्वामींची भेट झाल्यावर अनुसरणाची वासना तिच्या मनात उत्पन्न झाली. तिने मनात विचार केला की, ब्राम्हणगावला आपल्या मालकीचा कापूस आहे. तो मी कातीन. त्याच्या सुतापासून काही वस्त्रे वगैरे तयार करीन आणि मग स्वामींना अनुसरीन. पण ज्या दिवशी तिने असा मनोरथ केला त्याच दिवशी तिच्या घराला आग लागली. तीत कापूस जळून गेला. तेव्हां, अनुसरणाच्या आड येणारे निमित्त ईश्वरकृपेनेच नष्ट झाल्यामुळे तिने ताबडतोब स्वामींना अनुसरण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणे ती अनुसरली. ( ली. च. भार्ग. ४ ).

१ **'एक लोभिया : मोकलू न सके : मग निमित्तापगमी त्याग वासनेचा'** ( आ. स्थ. २४९ ).

२ श्री. नेने यांनी प्रसिद्ध केलेल्या लीलाचरित्राच्या पाठात ही लीळा नाही. इतर अनेक पोथ्यातून ती 'राणाइसा कापूसदहनी अनुसरण' या आदीखाली आढळते.

## पुरूरव्याचे उदाहरण

निमित्तापगमामुळे मनुष्य संसारापासून निवृत्त होऊन त्यागी कसा बनतो याचे कर्मरहाटीतील पुरूरव्याचे सुंदर उदाहरण आहे. उर्वशी ही शापामुळे मृत्युलोकात येऊन पुरुरव्याची भोगपत्नी झाली होती. पुरूरवा नागव्या स्थितीत दृष्टीस पडताच तिचा शाप संपून ती स्वर्गाला जायची होती. याची जाणीव उर्वशीने पुरुरव्याला करून दिली होती. म्हणून,नागव्या अवस्थेत आपण उर्वशीला दिसता कामा नये यासाठी तो अतिशय काळजी घेत होता. पण शापाचा शेवट होण्याची वेळ येताच त्याच्या शयनगृहात विजेचा लख्ख प्रकाश पडून उर्वशीला पुरूरव्याचे नग्न दर्शन झाले. आणि तत्क्षणी उर्वशी पुरूरव्याला सोडून स्वर्गाला जायला निघाली. पुरूरवा व उर्वशी दोघेहि परस्परावर अत्यंत अनुरक्त होते. त्यातहि पुरूरव्याने तर आपले जीवितसर्वस्व उर्वशीला अर्पण केले होते. असे असताहि ती त्याला सोडून जायला तयार झाली. तिच्या विरहाने व्याकुळ होऊन तिची मन-धरणी करीत करीत पुरूरवा त्या नग्नावस्थेतच तिच्या मागोमाग निघाला पण तिने त्याच्याकडे ढुंकूनहि पाहिले नाही. विरहाग्नीने त्याचे सर्वांग संतप्त झाले होते खरे. पण उर्वशीची ही निर्दय उपेक्षावृत्ति पाहून राजाचा विवेक जागृत झाला. तो म्हणाला: " मग म्हणे राजन्यमौळि : जऱ्ही सर्वस्वे अनुसरली : तऱ्ही स्त्री एकि आपुली : कहणी न म्हणावी " (उद्धव. गी. ७५०) आणि मग स्त्रियांच्या ठिकाणी असलेले सर्व दोष त्याच्या ध्यानात आले. लाळ, मळ वगैरे दुर्गंधीने भरलेल्या हाडामासांच्या पोतडीला स्वरूपसुंदर स्त्री समजून विषयासक्त पुरूष तिच्या ठिकाणी रममाण होतो ही त्याची केवढी विषयांधता ! या ज्ञानाने पुरूरव्याची विरहव्यथा नाहीशी होऊन तो पूर्णपणे त्यागी बनला. त्याच्या त्यागाच्या आड येणारे उर्वशीचे 'निमित्त' देवांनी काढून घेतल्यामुळेच त्याला हा त्याग घडला म्हणून पुरूरव्याचे उदाहरण हे निमित्तापगमी अथवा स्वतंत्वत्यागी पुरुषाचे उदाहरण असल्याचे दिसून येईल. काही जण निमित्तापगम झाल्यावर म्हणजे जडचेतन पदार्थ नष्ट झाल्यावर देखील लोभामुळे ते पदार्थ पुन्हा मिळवण्याचा प्रयत्न करतात. पण शेवटपर्यंत त्यांना काहीच मिळत नाही; म्हणून लोभ सोडून देऊन ते परमेश्वराला अनुसरतात व त्याच्या सेवा-

दास्यात आपले जीवित अर्पण करतात. हेहि स्वतेवत्यागियेच होत.

वर सांगितल्याप्रमाणे काही पुरुषांच्या निमित्तांचा म्हणजे जडचेतन पदार्थांचा नाश कर्मवशात् होतो. पण ज्यांनी परमेश्वराची कणव उरवलेली आहे त्यांच्या निमित्तांचा नाश तर परमेश्वर मुद्दामहून घडवून आणतात. शिरसाळा जातीचा गुळगुळीत गोटा असतो. त्याच्या लिंगप्रतिमादि वस्तु उत्तम होतात. पण या शिरसाळ्यावर 'कानवाथर' म्हणजे काळया दगडाचा अत्यंत घट्ट व काठिण असा थर असतो. त्यावर कितीहि टाक्या मारल्या तरी तो फुटत नाही. त्याच्यावर खैराचे कोळसे ठेवून आधी त्याला तापवतात, मग त्यावर कुळथ्याचे पाणी शिंपडतात. तेव्हां कुठे तो टाकीने फुटतो व त्याच्या आत दडून बसलेला शिरसाळा बाहेर पडतो. तो कानवाथर ज्याप्रमाणे शिरसाळयाला घट्ट चिकटून असतो आणि म्हणून देवतादिकांच्या लिंगप्रतिमाकडे त्याचा उपयोग होऊ शकत नाही त्याचप्रमाणे मुळात त्यागी वृत्तीच्या पुरुषाला त्याचे आप्तेष्ट इतके चिकटून असतात की, त्यांच्या लोभाने त्यांचा त्याग करून त्याला ईश्वरानुसरण घडत नाही. अशा पुरुषाने परमेश्वराची कणव जोडून ठेवली असेल तर परमेश्वर स्वतः त्याच्या त्या आप्तेष्टांचा व द्रव्यसंपत्तीचा नाश करतात व त्याला त्यांच्या मोहातून कायमचे सोडवतात. (कानवाथराचा दृष्टांत. २९) 'यस्यानुग्रहमिच्छामि तस्य वित्तं हराम्यहम्' या न्यायाने परमेश्वरानेच त्यांच्या निमित्तांचा नाश केल्यामुळे त्यांना त्याग घडून अनुसरण घडते. या पुरुषांना ईश्वरकणवेचे स्वतेवत्यागिये म्हणतात.[2]

**(४) कुष्ठिवासनेचा :** त्यागियांचाच आणखी एक प्रकार आहे. त्याला 'कुष्ठिवासनेचा त्यागी' असे नाव आहे. या कुष्ठिवासनेच्या त्यागियाचे शरीर कुष्ठादि रोगांनी जर्जर झालेले असल्यामुळे त्याचे आप्तसंबंधिये त्याला हाणून देतात म्हणून हा देवाला अनुसरतो. कोण्या एका व्यापा-

१. **'दुसरे : आणिक उद्यम करी : आणि तेहि करिता न मिळे शेवटपर्यंत : मग सांडी'** (आ. स्थ. २४९)

२. 'कानवाथराचेनि दृष्टांते जे तया जडचेतना पदार्थासी आन पुरुषासी अंतर पाडिती : तरी अपूर्व कैसे मिळो देती : सतेव जाए तेव्हेळी सांडी : तो निमित्तापगम ईश्वर पाडिती : जयाची कणव तयासीच' (आ. स्थ. २४९).

त्याला कुष्ठ (कोड) रोग झाला होता. म्हणून त्याचे सोयरेधायरे त्याची किळस करीत असत. त्याच्या बापाभावाला त्याची शिसारी येत असे, इतकेच नाही तर तो थुंकला म्हणजे प्रत्यक्ष त्याची बायकामुलेहि त्याचा कंटाळा करीत. कुणालाच तो आपणाजवळ असावासे वाटेना. सगळेच जण त्याचा तिरस्कार व आबाळ करीत. त्याच्या मायाबहिणी तर त्याला म्हणायच्या की, तू अजून मरत का नाहीस; एकदाचा लौकर मरशील तर बरे होईल. ही बोलणी ऐकून त्या व्यापाऱ्यालाहि आपल्या आयुष्याचा उबग आला. 'मी लौकर मरीन तर बरे' असे त्याला वाटू लागले. पण मरण कुणाच्या हातचे थोडेच आहे ? शेवटी गावाबाहेर असलेल्या दुबळेश्वराच्या देवळात तो आला आणि 'देवा, यापुढे आता तू माझा आणि मी तुझा' असे म्हणून देवळाच्या दारवंठ्यावर डोके ठेवून तो निजला. हा बाहेर गेलासे पाहून पाठोपाठ त्याचे आतेष्ट आले. पण 'यापुढे तुम्ही माझे नाही आणि मीहि तुमचा नाही' असे निश्चयाने सांगून त्याने त्यांचा आसरा कायमचा तोडला आणि दुबळेश्वराचा आसरा जोडला. याचा परिणाम असा झाला की, त्याच्या आतेष्टांपैकी त्याला तेथे कोणी खापरात अन्न आणून देई, कुणी त्याच्यासाठी तेथे पाण्याची घागर भरून ठेवी, तर कुणी त्याला जुने वस्त्र पांघरायला देई. सारांश, त्या कुष्ठरोगियाने आतेष्टांचा त्याग करून देवतेचा आश्रय घेताच त्याला 'दृष्टी' खायला प्यायला मिळू लागले व 'अदृष्टी' पुढे त्या देवतेने आपले फळहि त्याला दिले (कुष्टीयाचा दृष्टांत, ५२). अशा रीतीने शरीर रोगांनी पिडल्यामुळे आतेष्टाकडून ज्याची आबाळ होते त्याने त्यांचा त्याग करून परमेश्वरानुसरण जर केले तर त्याला 'कुष्ठिवासनेचा' त्यागी असे म्हणतात. स्वतेवत्यागियापेक्षा हा कुष्ठिवासनेचा त्यागिया हीन होय. कारण, स्वतेव त्यागियाचे सर्वस्व नष्ट झालेले असले तरी शरीर चांगले असते. पण कुष्ठिवासनेच्या त्यागियाचे तर शरीरहि जर्जर झालेले असते. त्यामुळे त्याच्या मनात असले तरी त्याला कशाचाच उपभोग घेता येत नाही, की काही करता येत नाही. आणि त्यामुळेच तो देवाला अनुसरतो.

तथापि कुष्ठिवासनेच्या त्यागासाठी प्रत्यक्ष शरीर रोगजर्जर असलेच पाहिजे असे नाही. त्याशिवायहि एखाद्याच्या ठिकाणी हा त्याग संभवतो. 'देमती असीजे ऐसे कुष्ठियाचा धर्मी' (ली. च. उत्त. ११३) या

श्रीचक्रधरस्वामींच्या वचनावरून हे स्पष्ट होते. देमाइसा नावाची एक बाई पैठणजवळील पिंपळगाव येथे राहत असे. ती विधवा होती. तिच्या पोटी एक मुलगा होता तोहि मरून गेला. जवळ द्रव्यसंपत्ति काहीच नव्हती. ती आपल्या माहेरी भांडीधुणी करून राहत असे व काळ कंठीत असे. गुरू केल्यावाचून जर आपण मेलो तर आपणाला सद्गति मिळणार नाही असे तिला कळल्यावरून ती पैठणातील वामदेव नावाच्या सुप्रसिद्ध साधूकडे गुरूपदेश घेण्यासाठी गेली. पण तो उघडा नागडा असलेला पाहून त्याच्याविषयी तिच्या मनात संशय उत्पन्न झाला. तेव्हां ती दुसऱ्या एका सत्पुरुषाकडे गेली. पण तोहि विलासी वृत्तीचा असल्याचे तिच्या लक्षांत आले. तेव्हां ती श्रीचक्रधरस्वामींकडे आली. त्यांच्यापासून तिने अनुग्रह घेतला. पुढे स्वामींनी तिला आपल्या घरी परत जाण्यास सांगितले. तेव्हां ती म्हणाली ' मी आपल्या सर्वस्वाचा त्याग करून आपणाकडे आले; आणि आपण तर मला काही अपूर्व उपदेश न करताच परत पाठवीत आहा. ' यावर श्रीचक्रधरस्वामींनी तिला उत्तर दिले ' बाई, अशा कोणकोणत्या गोष्टींचा त्याग करून तू आमच्याकडे आलीस ते तरी सांग. तुला एक मुलगा होता तो आता मरून गेला. लेण्यालुगड्याची हौस करण्यासारखीहि तुझी घरची स्थिति नाही. आपल्या आई-बापाच्या घरी स्वयंपाकपाणी करतेस म्हणून तुला घासभर खायला तरी मिळते. तेव्हां तू त्याग केलास कशाचा ? आईबापाच्या घरी भाकरी भाजण्यापेक्षा आमची आज्ञा पालन करणे हे कमी प्रतीचे आहे की काय ?' हे उत्तर ऐकून देमाइसा ओशाळली. तिने विचारले ' मग मी आता कोणत्या रीतीने आपली आज्ञा पाळू ?' स्वामींनी सांगितले ' असीजे ऐसे कुष्टियाचा धर्मी ' ( ली. च. उत्त. ११३ ).

यावरून देमाइसा ही ' कुष्ठिवासनात्यागी ' होती असेच स्वामींनी सुचविले आहे. आणि तेच बरोबर आहे. तिचा त्याग ' मळवत् ' होता असे म्हणावे तर प्रश्न असा की, अशा कोणत्या गोष्टी मळवत् मानून त्यांचा तिने त्याग केला ? कोणत्याच नाहीत. बरे, तिचा त्याग ' अनिष्ट त्याग ' होता असे मानले तर एरवी इष्ट असलेल्या अशा कोणत्या गोष्टी आता अनिष्ट वाटल्यामुळे ती स्वामीकडे आली ? कारण, तिचा इष्ट असा पुत्र पूर्वी कधीच मरून गेला होता. याच कारणामुळे तिच्या त्यागाला ' स्वतेव

त्याग ' असेहि म्हणता येत नाही. कारण स्वामीकडे येण्यापूर्वी तिला गोवणारे असे कोणतेच जडचेतन पदार्थ तिच्या जवळ नव्हते. ( दृ. स्थ. ५३ ). म्हणून स्वामींनी तिच्या त्यागाला कुष्ठिवासनेचा त्याग समजून तदनुसार तिलं आचार करायला सांगितला आहे. तेव्हां, कुष्ठिवासनेच्या त्यागासाठी शरीर व्याधिजर्जर असलेच पाहिजे असे नाही.

## असतीपरीचा मुद्रितार्थ

यापैकी एका किंवा अनेक रीतींनी सर्वसंगपरित्याग करून जो परमेश्वराला अनुसरतो त्याच्याच साठी श्रीचक्रधरस्वामींनी ' असती परी ' अथवा ' आचारधर्म ' सांगितलेला आहे. अर्थात् , परमेश्वरज्ञान प्राप्त झाल्यानंतर जो परमेश्वराला अनुसरून आचारधर्माचे प्रतिपालन करील त्यालाच या देहीं किंवा पुढील देहीं परमेश्वराचा पुनःसंबंध होऊन अपरोक्षज्ञान लाभेल. किंबहुना, अनुसरणाच्या कल्पनेतच असतीपरीचा भावार्थ अंतर्भूत झालेला आहे, आणि म्हणूनच अनुसरणाचे महत्त्व विशेष आहे. परमेश्वराच्या पूर्णपणे आधीन होऊन त्याची आज्ञा परिपालन करणे व त्याने सांगितलेला आचार पाळणे म्हणजे अनुसरण, हे आपण पाहिलेच ( आ. २८३ ). परमेश्वराने सांगितलेली असतीपरी याहून वेगळी नाही. ' विकारविकल्पशून्य : स्वभावमात्रे : निरालंबी : देवतास्मरणे : जो जन्म क्षेपी : तेयासी परमेश्वरू आपुला संबंधु देति ' ( अ. प. १–६ ). याचा भावार्थ असा की, अनुसरलेल्या पुरुषाने विकारविकल्पशून्य होऊन, स्वभावाला मात्रा देऊन, इतर कुणाचाहि आश्रय न घेता केवळ ईश्वराधीन राहून त्याचे स्मरण करीत करीत आपला जन्म कंठावा म्हणजे परमेश्वर त्याला पुनःसंबंध देतात. विकारशून्य होण्यासाठी त्याने आपल्या इंद्रियधर्मांचे नियमन केले पाहिजे; विकल्पशून्य होण्यासाठी त्याने आपले संकल्पविकल्पादि मनोधर्म व रागद्वेषादि जीवधर्म यावर नियंत्रण ठेवले पाहिजे. क्षुत्पिपासा, शीतोष्ण, भयनिद्रा, मलमूत्र हे देहधर्म ताब्यांत आणले म्हणजे स्वभावालां मात्रा दिली जाते. अशा रीतीने विकारविकल्पशून्य होऊन व स्वभावाला मात्रा देऊन त्याने परमेश्वराव्यतिरिक्त इतर सर्व जडचेतन पदार्थांचा आश्रय सोडून निरालंबी व्हावे व परमेश्वराचे स्मरण करीत करीत जन्मजीवित कंठावे. हा असतीपरीचा मुद्रितार्थ लक्षात

आणला म्हणजे परमेश्वरानुसरणाच्या कल्पनेत सगळा आचारधर्म अंतर्भूत झालेला असल्याचे सहज लक्षात येईल.

## विधि-निषेधांचे पालन

असतीपरी आचरणे म्हणजे परमेश्वराने सांगितलेल्या विधि-निषेधांचे योग्य रीतीने पालन करणे; त्याची आज्ञा पाळणे होय. अनुसरणाच्या कल्पनेत परमेश्वराचे आज्ञापालन हे अंतर्भूत आहेच; नव्हे, त्यात तीच गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. परमेश्वराची आज्ञा सन्निधानात असलेल्या लोकांनाच पाळता येते आणि इतरांना पाळता येत नाही, असे नाही. ज्यांना परमेश्वराचे प्रत्यक्ष सन्निधान लाभले नाही अशा साधकासाठी वचनरूप परमेश्वर आहेच ना ! 'वचनरूप परमेश्वर तो आपणापासी असताचि असे :' ( शो. आ. मा.२३). या वचनरूप परमेश्वराची आज्ञा पाळायची म्हणजे त्या वचनाप्रमाणे वागायचे; त्यातील विधि-निषेध पाळायचे. हे जो योग्य रीतीने करील त्यालाच धर्म होईल, इतरांना नाही. ( आचरे तेयाचा धर्मु : आ. ५२ )

## विधि आचरावेत

विधि-निषेधासंबंधी परमेश्वराच्या स्पष्ट आज्ञा आहेत. परमेश्वराने जे करायला सांगितलेले आहे तो ' विधि ' होय; आणि जे करू नये म्हणून सांगितलेले आहे तो ' निषेध ' होय. अर्थात्, परमेश्वराने सांगितलेला विधि अवश्य आचरला पाहिजे. ( तुम्हासि येथून म्हणितले ते करणीय : आ. २५४ ). तो न आचरला तर विधिभंग होतो. यासाठी जे करायला सांगितले आहे ते वेळच्या वेळी आणि निषेध चुकवून केले पाहिजे.

विधींचे प्रकार दोन आहेत. (१) नित्य विधि; आणि (२) निमित्त विधि. दररोजच्या आचरणाचा विधि तो नित्य-विधि होय आणि प्रसंगोपात्त उपस्थित होणारा विधि तो निमित्त-विधि होय. अटण-विजन, भिक्षा-भोजन, स्मरण-प्रसादसेवा आणि निद्रा या गोष्टी नित्या विधीत अंतर्भूत

१. ' आचरिता म्हणजे निषेधा नातळे : विधीते न लंघी ' (आ. स्थ. ५२ ).
२. ' येथून म्हणजे परमेश्वरे असतीपरीचेनि वचने : म्हणीतले म्हणजे विधि : निषेध चुकवूनि जिये समयीचे जे करणे ते करावे ' (आ. स्थ. २५४)

होतात; तर संग, सांघात, भेट व शुश्रूषा यांचा निमित्तविधीत समावेश होतो. हे दोन्ही प्रकारचे म्हणजे नित्य व नैमित्तिक विधी योग्य रीतीने आचरायचे म्हणजे ज्या वेळचा विधि त्याच वेळेला आणि त्याच रीतीने करायला पाहिजे. 'जो जेथिचा विधि तो तेथ तैसाचि व्हावा की' ( शो. आ. मा. २४ ) अशी आज्ञा स्वामींनी केलेलीच आहे. विधि उचित काळी व उचित रीतीने केला तर परमेश्वराला संतोष वाटतो, त्यामुळे आचरत्या पुरुषाला योग्यता लागते, त्याच्या ठिकाणी आचाराची दक्षता येते आणि परमेश्वराजवळ त्याची कणव उरते.[1] पण योग्य विधि उचित काळी न केला तर परमेश्वर त्या विधीची उपेक्षा करतात. तो साधकाच्या लेखी लागत नाही. उलट त्या विधीमुळे जर दुसरा विधि टाकला असेल तर विधि-भंगाचा दोष लागतोच. आळसामुळे किंवा कंटाळा आल्यामुळे जो साधक कोणतीच क्रिया करीत नाही त्यालाहि विधिभंगाचे दोष लागतातच.[2]

## इतर क्रिया सारासार विवेकाने

परमेश्वराने करायला म्हणून स्पष्टपणे सांगितलेले विधि आणि वार-लेले निषेध याव्यतिरिक्त इतर क्रियांची योग्यता, त्या क्रिया कराव्या किंवा नाही हे साधकाने आपल्या मनाने सारासार विचार करून ठरवावे.[3] उदा : श्रीचक्रधरस्वामींनी एकदा देमाइसाला घोड्यावर बसायला सांगि-तले; पण परमेश्वराचा अपमान होऊं नये म्हणून तिने घोड्यावर नुसता आपला हात ठेवला ! पण ती त्यावर बसली नाही. ( ली. च. भा. ३. पा. ६८ ). उद्धवदेव हे श्रीकृष्णाचा आज्ञाभंग करून श्रीकृष्णाकडे परत आले होते. कारण त्यांना श्रीकृष्णाचा वियोग सहन होत नव्हता. या दोन्ही ठिकाणी परमेश्वराचा आज्ञाभंग असला तरी तो परमेश्वरासाठीच

**१. 'केलेया दृष्टी यश : अदृष्टी तोष : योग्यता : दक्षता : कणवहि उरे'** ( आ. स्थ. २५४ )

२. 'विधिरूप क्रिया तरी होय : परि समयोचित नव्हे : ऐसी जरी केली तरी तियेतव उपेक्षिति : तियेतव उपस्थित उचित क्रियेचा विधिभंग होय : आन केली क्रिया लेखी न लगे : मग आलस्ये उबगे कवणीच क्रिया न करीति तो विधिभंग सांगावाच न लगे' ( आ. बं २५४ ).

**३. 'परमेश्वरे म्हणितले ते म्हणितल्या आत : वारिले ते अनिष्टा आत : या वेगळे ते चातुष्टया आत'** ( आ. स्थ. २५४ ).

केलेला असल्याने त्यामुळे दोष लागला नाही. ( बाई : श्रीउद्धवदेवो आज्ञाभंग करौनि आले तरि काई तेयासि अविधि जाला : मा ईश्वराची आज्ञा ते ईश्वराचि कारणे भंगिली की : वि. २७७ ).

परमेश्वराच्या वचनानुसार एक विधि करीत असतांना दुसरा विधि उपस्थित झाला आणि तो थोर असला तर तो दुसरा विधि आचरावा. परमेश्वराचे अनुष्ठान विधिभावातीत असल्यामुळे त्यांत विशिष्ट विधि विशिष्ट क्रमानेच केले पाहिजेत असे नाही. ( हे विधिभावातीत अनुष्ठान : वि. ५३ ). नित्यविधि करीत असता नैमित्तिकविधि उपस्थित झाला तर तो आचरायला हरकत नाही. नव्हे, तोच आचरणे अधिक इष्ट असते. अर्थात्, त्यामुळे पहिला विधि ठाकतो. हाहि विधिभंग नाही. उदा : नित्याटण करीत असतांना जवळीक लाभत नाही. जवळिकेची संधी आली आणि ती स्वीकारली तर नित्याटणाचा विधि ठाकतो. भिक्षान्नभोजनाचा नित्यविधि करतांना एखाद्याच्या भेटीत त्याच्या प्रीतीला विषय होतांना ( त्याला आनंद वाटेल असे वागतांना ) अन्नाचा काला करता येत नाही. गुरुसुहृदाशी प्रीतिविषय होऊन जर इंद्रियार्थरस सेवन केला तर परिच्छेद ठाकतो आणि तो न घेतला तर विपरीत केल्यासारखे होते. अशा वेळी कसे आचरण करावे ते विवेकपूर्वक आपले आपण ठरवावे.

## विधि करिता विधि स्फुरे

हे ठरवण्यासाठी साधकाला फारसे प्रयास पडतात असे नाही. विधिनिषेधांचे यथार्थ ज्ञान त्याला झालेलेच असते. त्यामुळे एक विधि आचरीत असतांना दुसरा विधि उपस्थित झाला तर कसे आचरण करावे हे त्याला स्वभावतःच कळते. हा उपस्थित झालेला दुसरा विधि नैमित्तिकच असतो. त्यावेळी काय करावे हे त्याला कळते. ( विधि करीता विधि स्फुरे : आ. २४४ ). उदा : स्मरण चालू असतांना जर थकलाभागलेला भिक्षुक आला तर त्याची श्रमनिवृत्ति करावी, ( आणि भेटीची वचने पाळावी ) हे त्याला त्याच्या आचारतपश्चर्येनेच स्फुरते. आणि ही श्रमनिवृत्ति हिंसा चुकवून करावी हेहि स्फुरते.

१ 'जैसे श्रमनिवृत्ति करावी आन हिंसा चुकवावी' (आ. स्थ २४४).

## निमित्तविधि थोर

आचरत्या पुरुषांनी एक गोष्ट लक्षात ठेवावी की नित्यविधीपेक्षा निमित्तविधि थोर असतो. उदा: स्मरण हा नित्यविधि होय. पण त्यापेक्षा भेट किंवा श्रमनिवृत्ति हा निमित्तविधि थोर आहे. स्मरण चालू असतांना साधकाला पदार्थसंपादन करून विघ्न करावेसे इतरांना वाटते. स्मरणासारखा श्रेष्ठ नित्यविधि त्या विघ्नांचा नाश करू शकत नाही, पण श्रमनिवृत्तीच्या निमित्तविधीने मात्र त्यांचा नाश होतो. दुसरे असे की, निमित्तविधीमधे स्मरणाचा नित्यविधि अंतर्भूत होतो; पण स्मरणात निमित्तविधि मात्र येत नाही. अशा निमित्तविधीत दास्य हा विधि सर्वश्रेष्ठ आहे. इतका की त्यामुळे मुक्ति मिळू शकते. म्हणूनच श्रीचक्रधरस्वामी भक्तजनाकडून आपले दास्य दररोज एक प्रहरभर तरी करवून घेत असत. पण हे परमेश्वरावताराच्या सन्निधानीच शक्य होते. साधिकरणी पुरुषांना फक्त वचनरूप परमेश्वराचे दास्य करता येते. पण ते करीत असतांना साधकांनी एवढेच लक्षात ठेवावे की परमेश्वर ज्याप्रमाणे दास्यासारखा निमित्तविधि एक प्रहरभरच करवीत त्याप्रमाणे साधिकरणी पुरुषांनी निरूपण, श्रवण, मनन, चर्चा, स्मरण वगैरे एकेक विधि एकेक प्रहरच करीत असावे. म्हणजे असे की, एकेक प्रहर जरी स्मरण केले तरी साधक पुन:संबंधाला पात्र होतो. याचा अर्थ एवढाच की हे सर्व विधि एकसारखे करीत राहून निमित्तविधींची उपेक्षा मुळीच होता कामा नये. अष्टौप्रहर स्मरण हे केव्हाहि उत्तम; पण त्यातच मग्न राहिल्याने उपस्थित झालेला निमित्तविधि जर टाकला, म्हणजे आचरला गेला नाही तर ते योग्य नाही. कारण निमित्तविधि हा थोर होय. त्याची उपेक्षा होऊ देऊ नये.

१. ‘ स्मरणापासोन निमित्तविधि थोर : का : ते करताच विघ्न आले की : तरि निमित्तविधि हा आगर : निमित्तविधि आत स्मरण अनुषंगिक आति परि येरात नाही ’ (आ. स्थ. २४४).

२. ‘दास्यमोचक हे अतिव्याप्ति ··· तो दास्यरूप व्यापार गोसावी प्रहर दीस कराविती ······ एणे न्याये प्रहरच दी निरूपण करावे : प्रहरच दी ऐकावे ’······ (सदर).

## निमित्तविधीने अविधीचा नाश

निमित्तविधीची उपेक्षा न होऊ देण्याचे दुसरे एक महत्त्वाचे कारण असे की, त्यामुळे अविधीचा नाश होतो. ( विधी अविधि परिहरे : आ. २४५ ). जी क्रिया केल्याने जीवाला दुःख प्राप्त होऊन ईश्वराला खंति येते ती क्रिया अविधीची होय. आचरत्या पुरुषाने एकदा अविधि क्रिया आचरायला सुरवात केली म्हणजे तो हळूहळू मोठ्या अविधि क्रिया आचरायला लागून कठियाच्या दृष्टांतातील कठियाप्रमाणे धर्मभ्रष्ट होतो. ( अविधि अविधीते प्रसवे : अविधीतव पुरुष धर्मापासौनि जाय : आ १६४ ). अविधि अनेक प्रकारांनी होतात. अनिष्ट सेवा केल्याने, हिंसा केल्याने कथनाने, विपरीत बुद्धीने, द्रव्यसेवेने, स्त्रीसंभोगाने, विकल्पाने, अधिक वृत्ति आचरल्याने, कीर्तीची अपेक्षा केल्याने, देवतांना विरोध केल्याने वगैरे वगैरे—अनेक कारणामुळे अविधी होतात. पण नित्यविधीप्रमाणेच निमित्तविधीहि योग्य रीतीने आचरले तर त्या निमित्तविधींमुळे अविधींचा नाश होतो. म्हणून निमित्तविधींची उपेक्षा करू नये.

विदेशी राहून नित्यविधि आचरतांना अविधि निष्पन्न झाला तर आर्त, निर्वेद, अनुताप, प्रसादसेवा या निमित्तविधींचे आचरण करावे म्हणजे अविधींचा नाश होईल. विदेशात आचरत्या पुरुषाचे हेच संग-सांगाती होत.[1] त्यांची सेवा हाच त्यांचा तेथील निमित्तविधि होय. विषयग्रस्त पुरुष किंवा ज्यांना वारंवार अविधि निष्पन्न होतो असे अविधीने खाल्लेले पुरुष यांना तर स्मरणहि नीट रीतीने होत नाही. म्हणून त्यांनी जितके स्थान, प्रसाद, भिक्षु, वासनिक, सेवक, भजक, भावाळू वगैरे पुरुष आठवतील तितके आठवावे. असे केल्याने त्यांना स्मरणाचा नित्यविधि योग्य तऱ्हेने होऊ शकेल. उदा : महदाइसा द्वारावतीला गेली. स्वामींनी ओटेगोटे नमस्कारायला सांगितले त्यामुळे तिला आत्मज्ञान झाले; याच कारणामुळे भटोबास पंचाळेश्वर डावलून आले त्यावेळी स्वामींनी त्यांना बोल लावला ( ली. च. उत्त. ५२ ). सारांश, ओखटे चुकवून गोमटे घडवण्याचे सामर्थ्य 'स्थान' या निमित्तविधीत आहे. अशा प्रकारे समर्थ

१. 'तरि विदेशी निमित्तविधि कैचा : आर्त : निर्वेद : अनुताप : प्रसादसेवा हे सांगात दिधले परमेश्वरे' ( आ. स्थ. २४५ ).

निमित्तविधि आचरल्याने आविधीचा नाश होतो.

## विधिभंगाने मरणाला शरण

या कारणासाठी आचरत्या पुरुषांनी ' येथूनि म्हणीतले ते करणीय ' ( आ. २५४ ) म्हणजे परमेश्वराने सांगितलेले विधि उत्तम रीतीने पाळणे श्रेयस्कर होय. विधिनिषेधाचे ज्ञान नसल्यामुळे, तसेच उबग आल्यामुळे, अर्थात् आळसामुळे वगैरे ज्यांच्याकडून विधी पाळले जात नाहीत त्यांच्याकडून विधिभंगाचा दोष होतो हे आपण पाहिलेच. हळूहळू असे पुरुष ' मरणाला शरण ' जाण्याचा म्हणजे प्रमादी होण्याचा किंवा आत्मघात करण्याचाहि संभव असतो. ( पोरा जीवा येथूनि म्हणीतले ते न होववे : मग मरणा शरण जाये : आ. २२२ ). कित्येक पुरुष सत्त्वाच्या उत्कर्षामुळे अधिकवृत्ति आचरतात. नेमून दिलेले विधी त्यांना कमी वाटतात म्हणून ते विधिबाह्य (विधिपेक्षाहि अधिक) क्रिया आचरतात. तो विधिभंगच होय. यामुळे तेहि शेवटी मरणाला शरण जाण्याचा संभव असतो. तेव्हा अधिकवृत्ति हाहि विधिभंग असून तो मरणाला कारणीभूत होतो हे विसरता कामा नये. ( कान कायी बहुडिये जाय : परि अधिकवृत्तितव गेला : शो. आ. पा. १४७ ). तेव्हा यथायोग्य रीतीने विधी पाळणे हाच उत्तम मार्ग होय.

## निषेध आचरू नयेत

आचरत्या पुरुषाने जसे परमेश्वराने सांगितलेले केले पाहिजे तसेच त्याने वारलेल्या गोष्टी म्हणजे निषेध कधीहि आचरता कामा नयेत. ( येथूनि वारिले ते न कीजे : आ. २५३ ). निषेधांचे आचरण करणे हा परमेश्वराच्या आज्ञेचा भंग होय. त्यामुळे निषेध आचरणाऱ्याला याच देही दुःख प्राप्त होऊन परलोकात नरक प्राप्त होतात. या आज्ञाभंगाची दुःखे चुकत नाहीत. म्हणून साधकाने निषेधाचरण कधीच करू नये. अर्थात्,

१. ' महदाइसा द्वारावतीये गेली : तेणे आत्मज्ञान जाले : आन ओटे गोटे नमस्करणीय म्हणितले म्हणोन : आन पंचाळश्वर आदर्शनी भटासि सिक्षापण केले म्हणोन : ऐसे स्थान सामर्थ्यवंत : वोखटे चुकवावया आन गोमटे घडवावया ' ( आ. स्थ. २४५ ).

२. ' वारिले केलेया दृष्टी दुःख : परत्री नरक ' ( आ. स्थ. २५३ ).

पूर्वी वर्णन केल्याप्रमाणे परमेश्वराची आज्ञा परमेश्वराप्रीत्यर्थच मोडली गेली तर गोष्ट वेगळी!

## निषेधांचे चार प्रकार

निषेधांचे मुख्य प्रकार चार[1] आहेत. ( १ ) अनिष्ट; ( २ ) अविधि; ( ३ ) हिंसा; आणि ( ४ ) अन्यधर्म. 'अनिष्ट' म्हणजे भोजनासाठी विहित सांगितलेल्या पदार्थाव्यतिरिक्त इतर पदार्थ. उदा: मीठ, मिरची वगैरे. यांच्या सेवनेमुळे पुनःसंबंधाला अंतराय होतो. (प्र. ४ पहा.) 'अविधि' म्हणजे ज्या क्रियेने जीवाला दुःख होते व ईश्वराला खंति येते अशी क्रिया. याचे वर्णन मागे ( पा. २१ पहा ) आलेच आहे. 'हिंसा' म्हणजे पचनपाचन करतांना होणारी सूक्ष्म जंतूंची हिंसा व इतर हिंसा. आणि 'अन्यधर्म' म्हणजे देवतांची क्रिया पाहून समाधान वाटणे, ही अन्यधर्मपर क्रिया होय. देवतांचा धर्म आचरणे हा तर उघडउघड विकल्प-प्रमादच होय. हे चारहि प्रकारचे निषेध आचरत्या पुरुषांनी कधी आचरू नयेत.

## निषेधाचरणाचे फळ

निषेधाचरणाने परमेश्वराच्या आज्ञेचा भंग होतो व त्याचे इहलोकात व परलोकात प्रायश्चित्त भोगावेच लागते. ते चुकत नाही. उदा: श्रीदत्तात्रेय प्रभूंनी सहस्रार्जुनाला वर देऊन गो, ब्राह्मण व स्त्री यांची हत्या न करण्याची आज्ञा केली. पण त्या आज्ञेचा भंग त्याने केला. त्यामुळे परशुरामाने, म्हणजे एका देवताविग्रहाने त्याचा वध केला, हे लौकिक दुःख झाले; आणि परशुरामाशी भांडतांना ज्या अनेकांचा वध सहस्रार्जुनाने केला त्यांच्या हिंसेमुळे त्याला अनंत नरकांची साधने जोडली[2]. दुसरे उदाहरण यादवांचे. मद्य द्रव्याचे सेवन करू नका असे वारंवार सांगितले असूनहि प्रभासतीर्थी असतांना यादवांनी परमेश्वराच्या आज्ञेचा भंग केला. त्यामुळे ब्राह्मणाचा शाप होऊन शेवटी सगळया यादवांचा, प्रत्यक्ष श्रीकृष्णाच्या मुलांचाहि नाश झाला.

१. '**अनिष्ट : अविधि : हिंसा : अन्यधर्म**' ( सदर ).

२. '**श्रीदत्तात्रेय प्रभु गोसावी सहस्रार्जुना वर दिधला : तो परशरामे कैसा वाधिला :** ...... तेणे ईश्वराज्ञा भंगिली म्हणोन...तेच दृष्टी दुःख जाले: आन युद्ध करिता स्वपरघात केले तयाचेनि नरक जाले' ( आ. बं, २५३ ).

इतकेच नाही तर गोत्रजांच्या वधामुळे त्यांना नरक घडले. म्हणून निषेधाचरण कधीहि करू नये.

## समर्थासाठी आचारधर्म

परमेश्वरप्राप्तीचा विधिनिषेधात्मक असा हा आचारधर्म जो पाळायचा तो अर्थात् फक्त समर्थ पुरुषांनीच पाळायचा. (समर्थो धर्ममाचरेत् : आ. मा. ११२). शरीर निरोगी असले तरच अटण–विजन; भिक्षा-भोजन इत्यादि नित्यविधि; तसेच भेट, चर्चा वगैरेसारखे नैमित्तिक विधि आचरता येतील. दुबळ्या किंवा रोगजर्जर शरीराच्या साधकांना हे शक्य नाही. म्हणून त्यांना विधि-परिपालनाच्या बाबतीत सवलत दिलेली आहे. (अशक्तासि विधि नाही : आ. मा. २८). आजारी असलेल्या पुरुषाने अटण-विजन वगैरे करण्याचा प्रयत्न केला तर त्यामुळे आजार बळावून त्याच्या शरीराचा शेवट होण्याचा संभव असतो. मग कुठला धर्म आणि कुठले काय ? 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्' (कुमारसंभव. सर्ग ५. ३३) ही कालिदासोक्ति या बाबतीत अक्षरशः खरी आहे. म्हणून दुबळया किंवा आजारी पुरुषाने आचारधर्म कडक रीतीने पाळण्याचा अट्टाहास करू नये. पण याचा अर्थ, साधकांनी आपले शरीर पुष्ट ठेवावे असा मात्र नाही. स्वभावांना मात्रा देऊन ते सुकवणे केव्हाहि चांगले. पण त्याहि स्थितीत धर्माचरणाचे सामर्थ्य मात्र साधकाच्या ठिकाणी असलेच पाहिजे हे विसरता कामा नये.

## मृत्युपर्यंत प्रयत्नशीलता

परमेश्वराने सांगितलेला विधिनिषेधात्मक आचारधर्म कठिण वाटण्याचा संभव आहे. आणि त्याबद्दल आश्चर्य वाटायला नको. सुखसाधनांनी कुठे परमेश्वर प्राप्त होत असतो का ? अर्थात् नाही. केवड्याचे काटे बोचतील म्हणून भ्याले तर मग त्याच्या पानातील गर्भात असलेला उन्मादक सुगंध भ्रमराला कधी भोगता येईल काय ? उपासाचे कष्ट सहन

१. 'आन वारली क्रिया जरी घडली तरी जैसे **कुमरांसि यादवासि दृष्टी आयुष्य : भविष्य राज्य तुटले : परत्री गोत्रवधाचे नरक जाले : ...... म्हणौनि ईश्वरे वारीले ते न करिता दृष्टी अपयशः दैन्य : शारीर मानसिक दुःख देहघात : परत्री नित्यनरकाचे बीज न घडे ?**' (आ. बं. २५३).

करून चकोर जर धरणे धरून बसणार नाही तर चंद्रकिरणांचे पारणे त्याला कसे घडणार ? क्षीरसमुद्र घुसळण्याचे अपरिमित श्रमसायास देवांनी केले म्हणूनच त्यांना अमृत प्यायला मिळाले ना ? तेव्हां कैवल्य-निधान प्राप्त करून घ्यायचे असेल तर आपल्या शरीरसुखाचा बळी साधकाने द्यायलाच पाहिजे. त्यासाठी त्याने कष्ट केलेच पाहिजेत. आणि हे कष्ट अगदीच आटोक्याबाहेरचे आहेत असेहि नाही. ' कराल तरि होईल की गा : ' ( आ. मा. १७७ ) असे स्वामींनीच सांगून ठेवलेले आहे. आचारधर्म साधकाने मृत्युपर्यंत आचरायचा असतो. तेव्हां, मरण येईपर्यंत तो आचरण्याचे प्रयत्न साधकाने करीत राहिले पाहिजे हे ओघानेच आले. ' असे तव करी : पडे तव धावे ' ( आ. मा. १७६ ) हा तर सामान्य नियम आहे: तो लक्षांत घेऊनच ' पडे तव धावावे : मरे तव करावे ' ( आ. मा. १९० ); ' घड तुटे तव धावावे : देह पडे तव करावे : परि जीवे न सोडावे ' ( आ. मा. २१७ ) असे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे.

## परमेश्वराचे साह्य

एकदा अनुसरलेल्या पुरुषानें प्रयत्नपूर्वक आचार करायला सुरुवात केली की मग परमेश्वर देखील त्याला साह्यभूत झालाच म्हणून समजावे. ' पुरुषप्रयत्नी दैवाचे साह्य ' ( आ. १०२ ); ' पुरुष जेतुल जेतुला प्रयत्न करी तेतुल तेतुले दैव साहाय्याते करी ' ( आ. मा. ११७ ); असा नियमच आहे. म्हणून ' पुरुषे आपुले करणीये करौनि असावे : मग दैवे करावे ते दैवचि करील ' ( आ. मा. ११६ ). साधकाने आपले कर्तव्यकर्म मात्र प्रयत्नपूर्वक नीट रीतीने आचरीत राहिले पाहिजे. त्यात कुचराई होता कामा नये.

## साह्य कुणाकुणाचे ?

निष्ठापूर्वक आणि प्रयत्नपूर्वक विधि आचरायचा म्हणजे त्या विधीचा आदि, मध्य व अंत यांचा काळजीपूर्वक विचार करून मग त्याप्रमाणे

१. ' अयत्न म्हणजे क्रियेचा आळापी आदि : मध्य : अवसान : विचारून कीजे तो प्रयत्न ' ( आ. स्थ. १०२ ).

मन:पूर्वक आचरण करावे. असे केले तरच त्या विधीच्या परिपालनासाठी परमेश्वराचे साह्य होते.

विधि आचरतांना साधकाला प्रत्येक बाबतीत खास परमेश्वराचेच साह्य होते असे नाही. कधी देवतांचे, कधी मायेचे तर कधी खास ईश्वराचे साह्य होते. उदा : परमेश्वराप्रीत्यर्थ नैमित्तिक विधि आचरायचा असला तर पूजाद्रव्ये किंवा पदार्थ वगैरे पाहिजे असतात. हे साधकाला मिळवून देण्याच्या कामी अनुकूल देवतांचे त्याला साह्य होते. ( पुरुषु आपले करणीय म्हणौन प्रवर्ते तेया द्रव्याची शते मीळती : आ. ६२ ). अर्थात् साधकाला ही द्रव्याची शते स्वनिष्ठ क्रियासाठी मिळत नाहीत तर परमेश्वराच्या निमित्तविधीसाठी आणि तेहि तो प्रत्यक्ष त्या विधीच्या आचरणाला तयार होईल तरच मिळतात; एरवी नाही. परमेश्वराचा प्रसाद प्राप्त करून देण्यात, तसेच उचित पुरुषांची भेट किंवा अनुचित पुरुषांचा वियोग घडवून आणण्यातहि मायेचे साह्य होते. ( संयोग : वियोग : साह्य : इये तीन्हीं माया करी : आ. मा. २५१ ). शास्त्र, तसेच एखादा अपूर्व विधि घडवून आणण्यात मात्र परमेश्वराचे साह्य होते.

## प्राक्तनानुसार साह्य

पदार्थ, प्रसाद, वगैरे प्राप्त करून देण्यात देवतांचे व मायेचे साह्य होते, याचा अर्थ परमेश्वराकडून ते मिळत नाहीत असा नाही. उलट परमेश्वराकडून तर सगळे काही मिळत असते. पण पुरुषाचे एकंदर प्राक्तन पाहून

१. '**शते म्हणजे पैकेयाचिये ठाउनि शतेवेन्ही विधीकारणे मिळती दैवाचेनि कडे : निमित्तविधी तर एसनी पात्रता आणि स्वनिष्ठी तरि ऐसा अपात्र जे आपजविलेयाहि न मिळे**' ( आ. स्थ. ६२ ) 'तरी दैव म्हणितल्या अनुकूल देवता लाभाति : का : जे पदार्थविषयी देवतांचे साह्य बोलिले असे' ( आ. बं. ६२ ).

२. '**पदार्थांविषयी देवता : प्रसादाविषयी मायेचे साह्य : तथा उचित पुरुषाची भेट तेहि तियेचेचि : शास्त्र अपूर्व विधि तेथ ईश्वर**' ( आ. स्थ. १०२ ).

३ 'मा तरी शते मिळती तिये कवणासी : आन ज्यास न मिळती तो कवण : ना येथ पूर्व प्रसादातुल वंचकत्वाचे संस्कार जाणावे' ( आ. बं. ६२ ).

म्हणजे पूर्वी त्याच्याकडून घडलेल्या भजनादि क्रिया पाहून त्याच्या योग्यते-प्रमाणे त्याला साह्य करण्यासाठी परमेश्वरच देवतांना आज्ञा करतात. त्या आज्ञेनुसार देवता त्याला साह्य करतात. विशेष भजनक्रिया ज्याच्याकडून घडली असेल त्याला तर सगळ्याच बाबतीत ईश्वरच साह्य करतात. उदा: दुष्काळात त्याला ते स्वत: अन्न मिळवून देतात. आपला प्रसाद म्हणजे फुटा, दुटी, दाढ, नख, केशकलाप, माळ, तांबूल इत्यादि त्याला ते आपल्या हाताने देतात. त्याला ते स्वमुखाने शास्त्र सांगतात. इतकेच नाही तर त्याला ते पुनःपुन्हा सांगून दृढ करवून घेतात. नागदेवाच्या बाबतीत परमेश्वराने त्याला सगळे साह्य स्वतःच केले होते की नाही ? तितकी श्रेष्ठ भजनक्रिया ज्याच्याकडून घडली नसेल त्याला मात्र पदार्थ वगैरे मिळ-वून देण्यासाठी ते देवतांना सांगतात, संयोग-वियोग घडवून आणायला मायेला आज्ञा करतात, आणि शास्त्रनिरूपणादि अधिकरणद्वारे घडवून त्यावेळी आपण सावध राहून, अवधान राखून त्याला ते शास्त्र स्वतः उमटवतात.

## परिच्छेदातहि साह्य

साधक निष्ठापूर्वक आचार करण्यासाठी विकारविकल्पशून्य होऊन स्वभा-वांना मात्रा वगैरे देऊन परिच्छदे करू लागला म्हणजेहि त्याला परमेश्वराचे, अर्थात् त्याच्या आज्ञेने अनुकूलच नव्हे तर प्रतिकूल देवतांचेहि साह्य होते. परिच्छेद केल्यामुळे इंद्रियांचा निरोध होतोच. हे विरोध साधकांनी प्रयत्नपूर्वक सहन केले पाहिजेत. त्यामुळे त्यांना विशेष योग्यता लागते (... निरोधु साहिलेया अधिका योग्यता होए : दक्षता होए : आ.मा. ९६ ). निरोध सहन करायचे ते अगदी निमुटपणे. त्यांची वाच्यता इतरांच्याजवळ करणे योग्य नाही. ( आपुले निरोध आणिका द्योतविजेति तेही एक करवणेचि की गा : आ. मा. १८७ ). निरोधांचे प्रदर्शन किंवा वाच्यता न करता ते निष्ठापूर्वक सहन करायला सुरवात केली म्हणजे त्यांना ते बाधत नाहीत. ( अनुसरले-याते निरोधु न बधीति : आ. मा. १९६ ). कारण ते सहन करण्यासाठी परमेश्वराज्ञेने त्याला अनुकूल व प्रतिकूल देवतांचेहि साह्य होते. ( परिच्छेदी प्रवर्तलेया पुरुषाचे सकळहि निरोध नेणो कोणाचि निरपौनि फेडी: आ. मा. १०१)

## भौतिक संकटात साह्य

अनुसरलेला पुरुष आचार करायला लागला म्हणजे त्याला ऊनवाऱ्यापासून, अर्थात् पंचमहाभूतांचा किंवा इतर कोणत्याच प्रकारचा उपद्रव परमेश्वर होऊ देत नाहीत. एखादे भौतिक संकट त्याजवर आले तर ते ऐकून किंवा पाहून त्याला एक तर त्याची भीतीच वाटत नाही, बरे भीति वाटू लागली तरी त्या भातीच्या ठिकाणी परमेश्वरसाह्यामुळे ती व्यग्र होत नाही. आणि तिथे व्यग्र होऊन तो भयभीत झाला तरी परमेश्वर त्याला तदनंतर त्या भितीपासून कोणताहि उपद्रव होऊ देत नाहीत. ( न भीयावे साधे हो : तुम्हावरि वाजत वारा धरिजैल : आ. १०४ ). उत्तम चर्यावंताला परमेश्वरसाह्य विशेष असल्यामुळे तो मुळी भीतच नाही. मध्यम चर्यावंताला थोडीशी भीति वाटते, पण त्या भीतीशी परमेश्वर त्याला व्यग्र होऊ देत नाहीत. कनिष्ठ चर्यावंत भीतीशी व्यग्र होतो; पण परमेश्वर त्याचे त्या भीतीपासून किंवा त्या संकटापासून संरक्षण करतात.

## देश-काळ-वर्तमानाचे साह्य

आचरत्या पुरुषाला भौतिक संकटात ज्याप्रमाणे परमेश्वराचे साह्य होते त्याप्रमाणे परमेश्वराच्या आज्ञेने त्याला देशकालवर्तमानाचेहि साह्य होते. म्हणजे, विशिष्ट देशाचे, विशिष्ट काळाचे, तसेच तेथील वर्तमान परिस्थितीचेहि साह्य होते. अर्थात् या गोष्टी त्याच्या आचरणाला अनुकूल राहतात. तो विदेशात असला तरी त्याला कशाचीहि उणीव पडत नाही. तो अविद्यकांच्या मधे ( म्हणजे संबंधियामधे ) राहत असला तरी त्याला त्यांच्यापासून उपद्रव होत नाही. तसेच त्याला देहाचे रोग वगैरे बाधत नाहीत. हेच देशकाळवर्तमानाचे साह्य होय. ( देशकालवर्तमानाचे साह्य अति : आ. २६४ ).

१. ' वारा म्हणजे पंचभूतनिमित्त उपद्रवो ' ( आ. स्थ. १०४ )

२. ' तोचि त्रिविध : एक वाराच वाजो नेदिजे : दुसरा वाजिनला तरी व्यग्रता नाही : तिसरे उत्तर काळी उपद्रव नाही ' ( सदर ).

३. ' देश म्हणजे विदेशादिक : मा तेथचेचि प्रदेश विशेष : काळ म्हणजे प्रात:काळ : मध्यान्हकाळ सायंकाळ : ऋतुकाळ : दुष्काळ : सुकाळ : वर्तमान म्हणजे तुरकाचे मान :...'देहीचे रोगादिक'(आ.स्थ. २६४).

## इतर प्रकारचे साह्य

याशिवाय आणखी इतर प्रकारांनीहि परमेश्वर साधकाला नेहमी साह्य करीत असतात. त्याच्या चर्याचरणाला असलेले अडथळे ते दूर करतात; किंवा जेणेकरून ते अडथळे दूर होतील असे मार्ग त्याला स्फुरवितात. चर्येचा विधिक्रमहि त्याला सुचवतात. क्वचित् त्या आचरत्या पुरुषाला 'अमुकअमुक झाले तर काय करावे' हे निश्चित ठाऊक नसते. त्याला त्या बाबतीत संदेह असतो अशा वेळी परमेश्वर त्याला उचित शास्त्र स्फुरवून त्याचे संदेह दूर करतात; किंवा ज्या पुरुषाकडून त्याचे संदेह दूर होतील अशा पुरुषाशी त्याची भेट घडवून आणतात. सारांश, त्याची अनिष्टे नाहीशी करून त्याला इष्टक्रियेकडे लावण्याला परमेश्वर त्याला सर्वतोपरी साह्य करतात.

अनुसरण-वासनिक आणि अनुसरलेला आचरता पुरुष यांनाच परमेश्वर याप्रकारे साह्य करतात असे नाही, तर जो 'मार्गवेधाचा पुरुष' परमेश्वरमार्गाकडे वेधलेला पुरुष असेल त्यालाहि ते साह्य करतात. त्याने स्थानप्रसादिकांना वंदन केले तर त्याला तत्संबंधिक साह्य करतात. इंद्रभटाला असेच साह्य केले होते. अनुसरलेल्याकडून अशक्ताची सेवा होत असतांना जर आनुषंगिक रीत्या काही निषिद्ध क्रिया घडली तर ती क्रिया या विधीतच सामावून घेतात. सारांश, परमेश्वरमार्गाचे अनुसरण, आचार वगैरे मनःपूर्वक करण्यांचा ज्याने ज्याने कृतनिश्चय केला असेल त्याला त्याला परमेश्वर पूर्णपणे साह्य करतात. त्याच्यावर आकाश कोसळत असले तर ते देखील थोपवून धरतात. ( धर्मांचिया चाडा रायाची राणी का न ये : परिपडिते आकाशु धरीजैल : आ. १०३ ).

१. 'व्याप्तीचेनि अर्थे तरी चर्येसी अडणी पडो नेदिती : ··· **स्फुरविती** म्हणजे जेणे प्रकारे ते अडणी परिहरे ऐसी स्फूर्ति तयासी स्फुरविती : **संदेही पडो नेदिती : अनिष्टी न घालिती**' ( आ. बं. १०३ ).

२. '**वासनीकासिहि : एक वचन प्रतिपाळी तयाहि** : तरि तोचि कवण : ना तो मार्गवेधाचा : ··· **प्रसाद नमस्करी त्यासि** : तरि तोचि कवण : ना इंद्रभटासि प्रसाददान केले तेव्हेळीचे विधान : **अशक्तालागी काढा आणू जाता**' ( सदर ).

## साधनवंतांचा अभिमान

परमेश्वर जसे आचरत्या पुरुषांना साह्य करतो तसाच तो त्यांचा अभिमानहि घेतो. किंब्हुना त्यांचा त्याला अभिमान असतो म्हणूनच त्यांना साह्य करून नाना प्रकारच्या संकटापासून त्यांचे तो संरक्षण करतो. ज्या दिवसापासून साधनवंत साधन आचरायला सुरवात करतो त्या दिवसापासून मायापुरस्थ परमेश्वर त्याचा अभिमान घेतो 'मायापुरस्थ परमेश्वर' अभिमान घेतो असे म्हणण्याचे कारण हे की, अव्यक्त परमेश्वर तर निरभिमानच असतो. व्यक्त परमेश्वरहि निरभिमान असतो. पण जीवोद्धरणव्यसनामुळे तो देवत्व स्विकारतो. म्हणजे, जीवाला साधन देणे, त्याचा अभिमान घेणे, त्याचे साधन चारित करणे वगैरे तो स्वीकारतो. अर्थात् साधनवंताचा अभिमान घेण्याच्या प्रवृत्तीचा व्यक्त परमेश्वराने स्वीकार केलेला असतो, म्हणून तो अभिमान घेतो. ( हे तरी निरभिमानू : परि आपुलेया लागुनि साभिमानियांचे साभिमानू : आ. मा. ३७ )

## भक्तिभावानुसार अभिमान

तथापि, परमेश्वर सगळ्या साधनवंतांचा सारखाच अभिमान घेतो असे नाही. एखादा राजा आपल्या नोकराचा अभिमान घेतो; आणि म्हणून त्याच्या शेतातील काड्याकुड्यांना कुणी हात लावला तर हाच त्यावर इलाज करतो. नोकराविषयीचा जर राजाला इतका अभिमान तर अर्थात्, आपल्या प्रीतीतील माणसांचा केवढा अभिमान असेल हे सांगायला नको. त्याप्रमाणे परमेश्वर सामान्यत: सर्वच साधनवंतांचा अभिमान घेतो. पण त्यांतहि दर्शनीयापेक्षा वेधवंतांचा, वेधवंतापेक्षा बोधवंतांचा, त्यापेक्षा अनुसरलेल्या भिक्षुकांचा म्हणजे ज्ञानियांचा;[१] आणि त्याहिपेक्षा भक्तांचा अभिमान अधिक घेतो. श्रीचक्रधरस्वामींना श्रीप्रभूंच्या चरणांनी अंकित झालेले सगळेच धूळिकण पवित्र वाटत पण त्यातहि श्रीप्रभूंच्या सेवादास्याला

१. **जे पाइकाचीये शेतीची काटी :** म्हणजे रायासि आपुलेया पाइकाचेया शेतीची काटी उपलक्षणे जड पदार्थाचाहि सामान्य न्यूनपक्षे अभिमान उपजे ··· **मग स्नेह : प्रीति तेथ हे नांतयैंक**' ( वि. बं. २४७ ).

उपयोगी पडलेल्या वस्त्राला चिकटलेले धूळिकण विशेष पवित्र वाटत.[1] त्याप्रमाणे सगळ्याच साधनवंतांचा परमेश्वर अभिमान घेत असले तरी परमेश्वराच्या सेवादास्याला विशेष वेचलेले जे असतील त्यांचा तो विशेष अभिमान घेतो. अर्थात्, ज्याचा जसा अधिकार असेल, परमेश्वरप्रीत्यर्थ ज्याने जसा त्याग केलेला असेल तसा, म्हणजे त्या अधिकारानुरूप परमेश्वर त्याचा अभिमान घेतो.

## अभिमान घ्यायलाच पाहिजे

आचरते पुरुष हे उघडे नागडे असतात, त्यांना धड वस्त्रप्रावरण नसते, वस्त्रे असली तरी ती फाटकीतुटकी असतात, शरीराच्या बाबतीतहि त्यांच्या ठिकाणी दैन्य असते. त्यामुळे त्यांना इतरेजनाकडून उपद्रव होण्याचा संभव असतो. सामान्य लोक त्यांचे दैन्य पाहून त्यांना हटकतात, वाकुल्या दाखवतात व इतर रीतींनीहि उपद्रव करतात.पण त्या साधकांचा अभिमान परमेश्वराने घेतलेला असल्यामुळे उपद्रव करणारांना देवाकडून शिक्षा होते आणि म्हणून तदनंतर त्यांच्याकडे वाकड्या दृष्टीने कोणी पाहत नाही. ( ये ऐसी उघडी नागिवी दिसत असेति : परि यांची वास कवणाहि पाहो नये : याही एकु अभिमानिये अति : ते जरी क्षोभले होईल तरी या काइ करिती : आ. १२२ ).

## अभिमान मायेच्या ओळगणीला

अनुसरलेल्याचा अभिमान 'ईश्वर' घेतो म्हणजे प्रत्यक्ष ईश्वरमूर्ति घेते असे नाही, तर ईश्वरावताराची मायेची ओळगणी घेते. अनुसरलेल्यांना संयोग, वियोग, साह्य वगैरे ही ओळगणीच घडवून आणते. त्याप्रमाणे अनुसरलेल्यांना कुणी उपद्रव दिल्यास त्यामुळे अभिमानाने क्षुब्ध होऊन ती मायेची ओळगणी उपद्रव करणारांना त्रास देते. अनुसरलेल्या पुरुषांचा

१. 'बाई हे श्रीप्रभूचे रज की : तरि येर गात्रातुल काइ रज नव्हे चरणांकित : परि तया वस्त्राचा अंगीकार सेवेचा म्हणौनि थोर : तैसा जया वासनिकाचा अंगीकार : जया भिक्षुकाचा अंगीकार तो वासनिक थोर : तो भिक्षुक थोर : जेणे जेतुके ईश्वराकारणे सांडीले तो भिक्षु थोर : तो वासनिक थोर ' ( वि. स्थ. २४७ ).

अभिमान मायेची ओळगणी घेते याचे कारण असे की, त्या पुरुषाच्या ठिकाणी परमेश्वराच्या ज्ञानाप्रेमाचा अंश असतो. परमेश्वरावताराचा ज्या वस्तूंना संबंध झालेला आहे तेथे आपले सामर्थ्य निक्षेपून त्या स्थानांचा जर आभिमान माया घेते तर ज्या पुरुषांच्या ठिकाणी परमेश्वराच्या ज्ञानाचा किंवा प्रेमाचा अंश आहे त्यांचा अभिमान ती का घेणार नाही ? तथापि, संबंधी पदार्थांप्रमाणे अनुसरलेल्यांच्या ठिकाणी माया आपले सामर्थ्य निक्षेपते असे मात्र नाही.

सारांश, आपला अभिमान मायेच्या द्वारा परमेश्वराने घेतलेला आहे, तो आपला संरक्षण करणारा आहे, इतकेच नाही तर आपल्या आचारात आपल्या प्राक्तनाप्रमाणे सर्वतोपरी साह्य करणाराहि तो आहे हे लक्षात घेऊन साधकांनी आपला आचार निष्ठापूर्वक करायला प्रवृत्त झाले पाहिजे. आपणच जर प्रयत्न केला नाही तर परमेश्वर तरी साह्य करणार कोठून ? असा हा आचारधर्म कोणता तेच आता विस्ताराने पहायचे आहे.

१. 'यांही एकं अभिमानियें म्हणजे ईश्वरी तरी अभिमान नाही : म्हणौनि तया खालौते तेचि होय : म्हणजे ··· ओळगणी अभिमानिये तेच होय' (आ. वं. १२२).

प्रकरण १ रे

# विकारशून्यता



याचिया अवस्था : विषय–भोगु सांडिजे सर्वथा
साहिजे आंगव्यथा : देहदमनाची ॥
ऐसेया चर्या पवित्र : करावे शरीर यंत्र
मग होईल प्रेमपात्र : तो चैतन्यनाथु ॥ (उद्ध. गी. ४१०, ४११)

## विकार : जीवाचा धर्म

जीवाच्या ठिकाणी असलेल्या अनेक दोषांचे मूळ त्याच्या स्वरूपीच्या विकारात आहे आणि म्हणून आचरत्या पुरुषांनी प्रथम या विकाराची शून्यता करण्याचा आचार श्रीचक्रधरस्वामींनी सांगितलेला आहे. पदार्थांच्या संबंधाने आपल्या ठिकाणी जी विकृति निर्माण होते तिला विकार असे म्हणतात. आपल्या मूळ अवस्थेत चलबिचल उत्पन्न होणे–निराळेपण निर्माण होणे याला विकार[1] असे नाव आहे. विकार हा जीवस्वरुपीचाच धर्म आहे. (महा.तत्त्व.पा. २७ पहा). म्हणूनच 'जीवु विकारा वेगळा केंव्हेळाही जालाचि नाही' (आ. ४६); 'वानरिया : हा पेंड धिकारे घेतला गा' (शो. आ. ४७); 'जीवाचा ठायी हा ठाव केंव्ही सुक्षम विकार आसत : ते आपुले आपणया परि देखति ना' (शो. आ. ४८) असे श्रीचक्रधरस्वामींनी वारंवार सांगितले आहे.

१. 'विकार म्हणजे इंद्रियार्थसंबंधे अन्यथा होणे याते विकार बोलिजे' (लं. स्थ. अ. प. १).

## इंद्रियधर्म

जीवाच्या स्वरूपातील हा विकार त्याच्या इंद्रियांचा धर्म आहे. ( विकारु हा इंद्रिय धर्मु : आ. ५८ ). कारण इंद्रियादिभावामुळेच तो उपजतो. जडचेतन पदार्थांच्या संबंधाने जीवाची इंद्रिये आनसारखी होतात हाच विकार. वास्तविक पाहता, विकाराच्या वेळी मनच विकरते. पण ते इंद्रिय धर्माच्या द्वारा विकरते. उदा: एखाद्या स्त्रीला पाहून मन विकरणे. हा विकार मनाच्या ठिकाणी उत्पन्न झाला खरा, पण तो पाहण्याच्या इंद्रियधर्मा-मुळे झाला. म्हणजे, पाहणे हा डोळ्याचा स्वभाव आहे, पण साभिलाष नजरेने पाहणे हा विकार होय. पाहणे, ऐकणे, स्वाद घेणे, सुगंध घेणे व स्पर्शसुख अनुभवणे हे सगळे इंद्रियांचे स्वभावधर्म होत. यांच्या द्वारा मन विकरते म्हणूनच विकार हा जीवधर्म असला तरी त्याला इंद्रियधर्म असे म्हटले आहे.

## विकाराची व्यापकता

एखादा पदार्थ प्रत्यक्ष समोर असला म्हणजेच त्याच्याविषयी विकार उद्भवतो असे नाही; तर पूर्वी पाहिलेल्या, ऐकलेल्या किंवा अनुभवलेल्या पदार्थांच्या स्मरणाने देखील विकार उद्भवतो. तसेच इंद्रियाचा विषय नस-लेल्या पदार्थाविषयीहि विकार उद्भवतो उदा: काडी हा कोणत्याच इंद्रियाचा प्रत्यक्ष विषय नाही-म्हणजे उपभोग्य पदार्थ नाही. तरी देखील काडी पाहताच ती हातात घ्यावीशी वाटते, हा एकप्रकारचा विकारच आहे. ( हाती काडी धरीजे हाही आदिकरुनि एकु विकारुचि की गा : आ. ४९). हा लहानसा विकार असला तरी त्यापासूनहि तीनचार तरी दोष होतात. उदा: हातात काडी धरणे हा विकारदोष; काडी उचलल्यामुळे सूक्ष्म जंतूंची हिंसा होणे हा हिंसा-दोष, काडी पडलेली असतांना परमेश्वराचे

१. 'पदार्थसंबंधे इंद्रिये अनसारखी होते असती : म्हणौनि विकार इंद्रियधर्म : विकरे मन परि इंद्रियादिभावे : यातव इंद्रियधर्म म्हणीजे : देखणे : ऐकणे : चवी स्वाद घेणे : परिमळ घेणे हे इंद्रियांचे धर्म' ( आ. स्थ. ५८ ).

२. 'काडी कव्हणा इंद्रियाचा विखो नव्हे : परि वायाच धरो आवडे : येतुल्याचि नावे विकार' ( आ. स्थ. ४९ ).

अव्यक्त स्वरूप तादात्म्याने त्या ठिकाणी रममाण झालेले असते, पण ती काडी उचलल्याने त्या अव्यक्त स्वरूपाचा रमता आश्रय मोडल्यासारखे होते; ती काडी विशिष्ट रीतीने पडलेली होती ही व्यक्तिमंत ईश्वराची प्रवृत्ति ती काडी उचलल्यामुळे मोडली गेली आणि एका व्यक्तिमंत ईश्वराची प्रवृत्ति मोडणे म्हणजे अनंत व्यक्तावतारांची प्रवृत्ति मोडणे होय[1]. उदाः श्रीचक्रधरस्वामींनी आकारलेला सालीचा हत्ती महदाइसेने मोडल्यामुळे तिने श्रीचक्रधराची व म्हणून अनंत अवतारांची प्रवृत्ति मोडली होती. ( ली. च. उत्त. २७० ). लहानशी काडी उचलण्याच्या साध्या विकाराने जर इतके दोष होतात तर मोठ्या विकारांनी किती दोष होत असतील याची कल्पनाच करणे बरे.

गादी-उशीला चांगली गवसणी घालणे; पायात चांगल्या वाहणा घालणे; चांगले अंगवस्त्र घालणे; दात चांगले उटणे; डोळे स्वच्छ पुसणे; एखादी गोष्ट किंवा वस्तु कौतुकाने पाहणे वगैरे गोष्टी इंद्रियांचे प्रत्यक्ष विषय नाहीत. पण ते लहानमोठे विकारच आहेत[2]. एखाद्या प्रसंगाकडे कौतुकाने पाहत राहणे हा तर फार मोठा विकार आहे. प्रसंगी त्यामुळे प्राणावरहि बेतते. उदा : सूर्यास्ताच्या आत जयद्रथाचा वध करीन, नाही तर अग्निकाष्ट भक्षण करीन अशी अर्जुनाची प्रतिज्ञा होती. ती त्याला पूर्ण करता आली नाही म्हणून तो अग्निप्रवेश करीत होता. ते कौतुकाने पाहण्यासाठी जयद्रथ त्याठिकाणी गेला. म्हणूनच त्याचा मृत्यु त्यावेळी होऊ शकला. एखाद्या प्रसंगाकडे धर्मसंबंधाने पाहण्यास हरकत नाही[3]. उदाः सान्निधानात परमेश्वराची श्रीमूर्ति, त्याच्या लीळा, चेष्टा, पूजावसर वगैरे,

१. ' आन हिंसा सूक्ष्म जंतूंची : आन अव्यक्त स्वरूप तादात्मक होऊनि स्वरूपी रमत असे : तो आश्रयो मोडिला हा दोष : आन व्यक्तमंत अनंत अवतारांची प्रवृत्ति भंगली महदाइसाचेनि न्याये : ऐसे च्यारि दोष होती ' ( आ. स्थ. ४९ ).

२. ' गवसनी बरवी : वाहना करवती : दुधिया : काठी : पायपुसी : जोगवटा : ओडियाना : नितळ थिगळ दात उटी : डोळेपुसी : चोखट अंगवस्त्र :··· हाती काडी धरी हा शेवट विकाराचा ' ( आ. स्थ. ४९ ).

३. ' कौतुक कव्हणीच न पाहावे : का पा : मरण पावेल : यथा पूर्वी दायंबा : यथा जयद्रथ अग्निप्रवेशी अर्जुनदेवाचा : म्हणौनि धर्मव्यतिरिक्त काहीचि न पाहावे : दृष्टादृष्टी दोष होईल ' ( सदर ).

असन्निधानात देखील अधिकरणाजवळ असतांना घडून आलेले पूजावसर, धर्म-प्रसंग, श्रेष्ठांच्या अपूर्व भेटी, अधिकरणाचे निरूपण वगैरे; या धर्मरूप क्रियाकडे कौतुकाने पाहणे हा विकार नव्हे. पण त्याशिवाय इतर गोष्टीकडे कौतुकाने पाहणे हा मात्र फार मोठा विकार आहे. विकाराचा विषय चांगलाच पदार्थ असतो असे नाही. शौच्याला बसतांना मागे वळून नरक पाहणे हाहि एक प्रकारचा विकारच आहे. ( बाहिरी बैसलेया परतौनि पाहिलेया अमेध्यो विकारू : आ. मा. १७२ ).

## विकारशून्यता करावी

एवंगुणविशिष्ट विकार आचरत्या पुरुषाने ' शून्य ' म्हणजे नाहीसा केला पाहिजे यात शंकाच नाही. कारण त्यामुळे इतर अनेक दोष स्वाभाविकपणेच जीवाच्या माथी पडतात. एकदा जीव विकरला म्हणजे तो कोणकोणती पापे करील काही सांगता येत नाही. ( विकरला जीव काय एक नांगवी बाई : शो. आ. २७ ). एका विकारामुळे दुसरा विकार उद्भवतो; (विकारे विकार प्रसवे : शो. आ. मा. ८ ); इतकेच नाही तर त्यामुळे परमेश्वरावतारावरील ईश्वरत्वबुद्धि जाऊन विकल्पदोषहि निर्माण होतो. (विकार विकल्पाते अपजवी : शो. आ. मा. १२); आणि आचरत्या पुरुषाच्या ठिकाणी विकल्प उत्पन्न झाला तर मग तो मोक्षमार्गावरून कायमचाच घसरला म्हणून समजावे. सारांश, विकारामुळे जीव धर्मापासून भ्रष्ट होतो. ( विकारे पुरुषु धर्मापासौनि जाए : आ. मा. ११ ). आणि म्हणूनच विकारशून्य होणे अत्यंत आवश्यक आहे. ' विकारू विखो न सेवावा ' ( आ. मा. २२१ ) म्हणजे विकाररूप विषयाची सेवा करू नये, अशी स्पष्ट आज्ञा श्रीचक्रधरस्वामींनी केलेली आहे तिचे कारण हेंच.

## विकारशून्यता म्हणजे नियमन

पण जीवाचा स्वभावधर्म असलेल्या या विकाराचा पूर्णपणे नाश होणे शक्य आहे काय ? अर्थात् नाही. कारण, जीव विकारावेगळा कधी होऊच शकत नाही. ( आ. ४६ ). ज्याच्या ठिकाणी विकार मुळी उद्भवतच नाही असा जीव सापडणेच अशक्य आहे. जीवाच्या ठिकाणी हा विकारदोष मूळापासूनच आहे. किंबहुना तसे आहे म्हणूनच सृष्टि-

रचनेच्या वेळी जीव बिकरून नवीन नवीन मळ तयार करू शकला व शेवटी स्थूळदेहधारी होऊ शकला. जीवस्वरूपीचा दोष असलेल्या या विकाराचा नाश करता येणे शक्य नाही; पण त्याच्या कार्यांचा नाश करता येणे मात्र शक्य आहे. ( ये दशे कार्यसंन्यास आति : परि कारणसंन्यास नाही : आ. ५० ). विकाराची शून्यता करण्याला सांगण्यातहि त्यांचे नियमन करायला सांगणे हाच श्रीचक्रधरस्वामींचाहि भावार्थ आहे. विकाराचे नियमन कसे करावे हे लक्षात येण्याला विकार उद्‌भवून तो वाढीला कसा लागतो हे पाहिले पाहिजे.

## विकाराची चतुर्विध चाल

जडचेतन पदार्थांच्या दर्शनाने जीव अनारिसा होतो, त्याच्या मनात विकार उत्पन्न होतो, हे नुसत्या दर्शनाचे कार्य. त्यानंतर, तो पदार्थ आपणाला मिळावा असा उल्लेख तो करतो. हा प्रथमोल्लेख म्हणजे 'आशंसा' होय. उल्लेख वारंवार करून त्या पदार्थांच्या ठिकाणी अंतःकरणाने रसरूप होणे ही त्यापुढील दुसरी पायरी होय. तिला 'प्रशंसा' म्हणतात. जडचेतन पदार्थाचा उल्लेख करून त्याच्याशी रसरूप झाल्यानंतर त्या पदार्थाकडे उपभोगाच्या दृष्टीने विशेष नजर लावून पाहणे ही अभिमुखता होय. या तिसऱ्या पायरीला 'टेकणे' असे म्हणतात. यानंतरची पायरी म्हणजे त्या पदार्थांचा प्रत्यक्ष संयोग-उपभोग. ही 'सेवा' होय. हा उपभोग संपला म्हणजे त्या पुरुषाची इंद्रिये तात्काळ पण तात्पुरती निवृत्त होतात. क्षणिक तृप्तीमुळे ती विराम पावतात. या स्थितीला 'निवृत्ति' असे नाव दिले आहे. ( संबंधी विकार : विकारी रसु : रसी अभिमुख : सेवा : निवृत्ति : आ. ४ ). या अनुभवाच्या गोडीमुळे काही काळानंतर तोच

१. '**कार्यसंन्यास आति म्हणजे रजस्तमाचे कार्य नेमणे असे : न्यास म्हणजे निरसन असे परि आत्यंतिक कारणाचा नाही**' ( आ. स्थ. ५० ); '**शून्यता म्हणजे अत्यंताभावो : मग कारणाचा तव उच्छेद नाही म्हणौनि कार्य सवरावे**' ( ल. स्थ. अ. प. १ ).

२. '**चतुर्विध चाली विकाराची : पहिले दर्शन : मग आशंसा : मग प्रशंसा : मग टेकणे : सेवा हा कळस : इतुलेनि उरी नाही ⋯ निवृत्ति म्हणजे इंद्रिये विरामाते पावती : हे तेधवाचाचि काळ : मग वासना चौगुणा उठी**, ( आ. स्थ. ३ ).

विकार त्याच्या मनात चौपटीने निर्माण होतो. सारांश आशंसा, प्रशंसा, टेकणे व सेवा ही विकाराची चतुर्विध चाल होय.

सृष्टिरचनेच्या वेळी प्रत्येक मळ रचण्याच्या उल्लेखापासून तो तो मळ पूर्णपणे तयार होऊन त्यात जीव तादात्म्य पावेपर्यंत ही विकाराची चतुर्विध चाल प्रत्ययाला येते. ‘ अधमति, अधगति व अधरति ’ यातील मति, गति व रति या शब्दात तीच चाल थोड्याफार फरकाने सूचित झाल्याचे दिसून येईल. पदार्थसंयोगाने जीव विकरतो म्हणजे प्रथम विकारवंत जीव विकृत होतो. जीव विकरतो म्हणजे त्याचे मन विकरते. ते भोगाचे उल्लेख करते ( आशंसा ). त्यामुळे त्याची इंद्रिये विकरतात. हळूहळू इंद्रियकाठिन्य निर्माण होते. आणि इंद्रिये विकरली म्हणजे त्याचा सगळा देह विकरतो. त्यामुळे तो पुरुष ( किंवा स्त्री ) आपल्या देहाची लीसपूस करू लागतो. स्वच्छ रहावे, वस्त्राचित्रादिकांनी देह शृंगारावा असे त्याला वाटते, हा देहाचाच विकार आहे. सारांश, पदार्थसंबंधाने जीव अनारिसा होतो, त्याचे कार्य मनाच्या ठिकाणी प्रगट होते. विकरलेल्या मनाचे कार्य इंद्रियांच्या ठिकाणी प्रगट होते आणि विकरलेल्या इंद्रियांचे कार्य देहाच्या ठिकाणी प्रगट होते. आशंसा, प्रशंसा, टेकणे व सेवा या सगळया प्रकारांच्या बाबतीत किंवा यातील प्रत्येक प्रकाराच्या बाबतीत वरील प्रकारचा कार्यकारण संबंध अवश्यंभावी रीतीने दिसून येतो. राजस विकारांच्या बाबतीतच हे होते असे नाही, तर तामस विकारांच्या बाबतीतहि आशंसा–प्रशंसादि चतुर्विध चाल असतेच. आणि या चालीतील प्रत्येक घटकाच्या बाबतीत जीव-मन–इंद्रिये–देह यांचा परस्पर कार्यकारण संबंध असतो.

विकार हा जीवस्वरूपीचा दोष असल्यामुळे स्थूल देहातील जीव याप्रमाणे विकरतो यात आश्चर्य काहीच नाही. जीव विकरण्याची ही आशंसारूप किंवा उल्लेखरूप प्रथम क्रिया सगळया ज्ञानियांच्या बाबतीत दिसून येते. भक्ताच्या बाबतीत मात्र ती दिसत नाही. कारण प्रेमसंचार होताक्षणीच त्याचे विकार उच्छेदले जातात. ( उद्ध. १५ ). बोधसंचाराने

१. ‘ देहासि उपजे त्यास कारण इंद्रिये असती : इंद्रियासि उपजे त्यास कारण मन असे : मनासि उपजे त्यास कारण जीव असे : जीवाचे कार्य मनाचा ठाइ वर्ते : मनाचे कार्य इंद्रियाचा ठाइ वर्ते : इंद्रियाचे कार्य देहाचा ठाइ प्रगटे ’ ( आ. बं. ३ ).

ज्ञानियाचे विकार उच्छेदत नाहीत. म्हणून पदार्थसंयोगाने-दर्शनाने तो विकरणे हे स्वाभाविकच आहे. पण याच्या पुढील पायऱ्या मात्र त्याने अवश्य चुकवल्या पाहिजेत. हीच त्याची विकारशून्यता होय. विकाराच्या कार्याचा संन्यासहि हाच होय.

## कोमळज्ञानियाला देवतांचे विघ्न

अशी विकारशून्यता न केली तर पुरुष धर्मापासून त्वरित भ्रष्ट होतो. कारण त्याला धर्मभ्रष्ट करण्यासाठी 'विषय' नामक स्त्रीदेवता नेहमी टपलेल्याच असतात. ज्ञानियाला त्या विघ्न करण्याची संधीच पाहत असतात. (कोमळज्ञानी विखो विघ्न: आ. १६; महा.तत्त्व. पा. ४५०, ४५१, पहा). आचरत्या पुरुषाने विषयरूप जड पदार्थाचा आशंसारूप उल्लेख केला तर त्या तो क्षम्य मानतात. कारण तो जीवमात्राला स्वाभाविक आहे. पण त्याने त्या पदार्थाचा रसरूप उल्लेख केला म्हणजे मात्र त्याला विघ्न संपादन करण्यासाठी देवता तो पदार्थ त्या ज्ञानियासमोर ओढवून आणतात; तो जेणे करून त्याच्या सन्मुख येईल किंवा आणला जाईल असे करतात. अशा रीतीने त्या त्या पदार्थांचा व ज्ञानियाचा त्या देवता योग घडवून आणतात. मग त्याच्या सेवनेसाठी तो पुरुष अभिमुख होतो. तेव्हां आपल्या माणसाकडून आग्रह करून तो पदार्थ देवता त्याला द्यायला लावतात. उदा: आंबा खाण्याचा रसरूप उल्लेख केल्यानंतर भिक्षेच्या वेळी आपल्या माण-

१. शाब्दज्ञानियाला विषय देवता केवळ जडपदार्थद्वाराच विघ्न करतात; चेतन पदार्थाच्या द्वारा नव्हे. कारण, चेतन पदार्थाची म्हणजे स्त्रीची पुरुषाला स्वभावतःच आवड असते त्यामुळे स्त्रीविषयक उल्लेख पुरुष वारंवार करीतच असतो. अशा वेळी देवतांनीहि, रसरूप उल्लेख होताक्षणीच, त्या पदार्थाचे संपादकत्व केले तर मग एकहि जीव उद्धरणार नाही ! दुसरे असे की, देवता आपणाकडून स्त्री पदार्थ ज्ञानियाला संपादन करू शकत नाही. स्त्रीपुरुषांच्या मनांत विषयाचा प्रसव निर्माण झाला म्हणजे एक दुसऱ्याकडे आपणहून जातो. पण असा प्रसव नसतांना स्त्री पुरुषाकडे किंवा पुरुष स्त्रीकडे जाणे शक्य नाही. तसेच, ज्या पदार्थाच्या द्वारे देवता विघ्न करतात ते विषयरूपच पाहिजेत. इतर पदार्थद्वारा त्या विघ्न करीत नाहीत. उदा: हिंसेच्या द्वारा त्या विघ्न करीत नाहीत. कारण जीवाकडून नेहमी सानी हिंसा होतच असते. अशा स्थितीत हिंसेच्या द्वारा मुद्दाम विघ्ने केली तर जिवांचा उद्धार होणार कसा ?

साकडून त्याला त्या देवता आंबा देवावितात. आपल्या निरक्तवृत्तीमुळे तो ज्ञानिया तो पदार्थ घ्यायला लाजला तर देवता आपल्या माणसाकडून त्याला आग्रह करवून तो पदार्थ त्याला देवावितात. मग तो ज्ञानिया त्या पदार्थाचे सेवन करतो. ती सेवना त्याला विघ्नरूप होते. हे टाळण्यासाठी ज्ञानियाने प्रशंसा, टेकणे व सेवना ही विकाराची कार्ये नष्ट करणेच आवश्यक आहे. नाहीतर, देवतांनी विषयरूप जडपदार्थांच्या द्वारे केलेल्या विघ्नामुळे त्याच्या धर्माची हानि होते; अर्थात् त्याला मालिनत्व येते. ते पदार्थ त्याला पुनः-पुन्हा सेवन करावेसे वाटतात व अशा रीतीने तो धर्मभ्रष्ट होतो.

रसरूप झाल्यावर देवता वरील प्रकारे विघ्न संपादन करतात हे खरे, पण अगदी कोमल चर्यावंत जो असेल त्याच्या बाबतीत प्रथम रसरूप उल्लेख मात्र त्या क्षम्य मानतात. त्याने रसरूपतेचा दुसरा उल्लेख केला म्हणजे त्याला त्या देवता विघ्न संपादन करतात.पण दृढ चर्यावंत ज्ञानियाच्या बाबतीत त्याचा पहिलाहि रसरूप उल्लेख क्षम्य मानीत नाहीत. त्याने तो उल्लेख करताक्षणीच त्याला त्या विघ्न संपादन करतात.

## काही अपवाद

जे ज्ञानी आपले उल्लेख रसरूप होऊ देत नाहीत त्यांना मात्र देवता विघ्न करू शकत नाहीत. उदा : विकार उत्पन्न करणाऱ्या पदार्थांच्या सान्निध्यातहि जे त्या पदार्थांची शारीरिक तर काय पण मानसिकहि सेवा करीत नाहीत असे 'विषयवीर'; परमेश्वराच्या वियोगात केवळ त्याच्या स्थानप्रसादभिक्षुवासनिकादि साधनातच सुख मानणारा 'साधनविरही' (दृष्टांत ८७); परमेश्वरवियोगात त्याच्या पदार्थांनीहि ज्याला सुख मिळत नाही असा 'कोमल विरही' (दृष्टांत ८८); आणि चंदन तसा चिखल

१. '**देवतेचा संपादकत्वी तीन प्रकार : रसरूप उल्लेखाचिया अपराधा ओढवूनि मेळवी : अभिमुखतेसि पुढीला करवी आग्रहे संपादवी : याहि परते बुद्धयुत्पादकत्व : मग तो पुरुष आपणया आपण घे**' (आ. स्थ. १६).

२. '**एकासी द्वितीय उल्लेखी अपराध : एकासी प्रथम उल्लेखी**'''मा तरि द्वितीय उल्लेखी विघ्न होये ते कोमळ चर्यावंतासी : त्यास रसरूप एक उपसाहाती : दुसरा उल्लेखी ओढवूनि मेळवीती : आन दृढचर्यावंतास रसरूप उल्लेख पहिलाच होता देवता विघ्न करिती : त्यास उपसाहाणे नाही' (आ. बं. १६)

मानणारा, ज्याची पदार्थबुद्धीच नष्ट झालेली आहे असा ' जरठ विरही ' ( दृष्टांत ८९) चर्याजरठ ज्ञानी पुरुष;मनुष्यमात्र होऊन राहिलेला 'देहसंस्था' पुरुष; ईश्वराच्या भीतीने सगळे दोष क्षाळण करून सगळे विधि आचरणारा ज्ञानी आणि प्रयत्निया पुरुष; हे सर्व ज्ञानिये आपला विकाराचा उल्लेख कधीच रसरूप होऊ देत नाहीतं. त्यांना देवता विघ्न करीत नाहीत. ( क्वचित् प्रयत्निया पुरुषाने असावध राहून आपला उल्लेख रसरूप होऊ दिला तर देवता त्याला विघ्न करतात ). एखाद्या जीवाला परमेश्वर लीळेने जन्माला आणून ज्ञान देतात. उदा : वैराग्यदेव; कित्येकांना लीळेचे आयुष्य देऊन राहवितात, म्हणजे त्याची आयुष्यमर्यादा संपली असली तरी त्याचे आयुष्य वाढवितात. उदा : नागदेवाचार्य. काहींना भोगभूमीतून मुद्दाम कर्मभूमीत आणून ज्ञान देतात; कित्येक आभाराच्या पुरुषांना ते अधिकरण करतात. या चार प्रकारच्या शाब्दज्ञानियांना तर मुळी रसरूप उल्लेख कधी होतच नाहीत. यांनाहि देवता विघ्न करीत नाहीत. क्वचित् त्यांचे उल्लेख रसरूप झालेच तरी ते परमेश्वरकणवेचे ज्ञानी असल्यामुळे देवता त्यांना विघ्न करीत नाहीतं. याव्यतिरिक्त सगळ्या शाब्दज्ञानियांना त्या विघ्न संपादन करतात. कारण ते आपले विकाराचे उल्लेख रसरूप करतात. यासाठीच विकाराचे पुढील सगळे उल्लेख निग्रहाने मोडून काढून ज्ञानियाने विकारशून्य झाले पाहिजे.

१. ' विषयाविरास विघ्न न घडे : त्याचपरी तीही दृष्टांतीचे विरही पुरुष : त्यासहि ना घडे : तथा चर्याजरठा विकार न उपजे : तैसे देहसंस्थाही : तैसीच ईश्वराभेणे म्हणितल्या सकळ चर्याविधी दोष क्षाळून करी : ऐसाही जो पुरुष त्यासही ना घडे : मग प्रयत्निया पुरुष उपजला उल्लेख सवेंचि मोडी म्हणौनि त्यासही ना घडे : आन असावधपणे न मोडी तर रसरूप जालेया त्यास विघ्न होय ' ( आ. बं. १६ ).

२. ' मग जयास लीळावशे जन्मवून ज्ञान देती तो सांगितला : आन दुसरा आयुष्य नसता राहावीला प्रयोजने : त्याचपरी भोगभूमींचा कर्मभूमी आणौनि ज्ञान देवौनि सांगितला : आन जेणे आभार जोडिला अधिकरण करून प्रतिष्ठिला : इत्यादि पुरुषी रसरूप उल्लेख उपजेचि ना : ऐसाहि उपजलाचि तरी देवतासि विघ्न करू नये : त्यासि ईश्वरकणवेचे जाणणे असे म्हणौनि ' ( सदर ).

## देवता कुणाला विघ्न करीत नाहीत ?

शाद्बज्ञानियांना देवता विघ्न करीत नाहीत, याची काही उदाहरणे आपण पाहिली. आणखी काही उदाहरणे या परिच्छेदात पहावयाची आहेत. यासंबंधीचा सामान्य नियम असा की, आचरता पुरुष विषयरूप पदार्थापासून जितका दूर पळेल तितक्या प्रमाणात देवता त्याला विघ्न करू पाहतात. एकदा विघ्न केल्यावर ज्ञानीया आपणहून ते पदार्थ सेवन करू लागला तर मात्र त्या पुन्हा विघ्न करीत नाहीत. कारण मुद्दामहून पुन्हा विघ्न करण्याची त्यांना जरुरीच वाटत नाही. ( पुरुषु जव जव पळे तव तव विखो पाठी लागे : पुरुषु पाठी लागे तव तव विखो पळे : आ. १९ ).

## विषय कुणापासून दूर पळतात ?

आचरता पुरुष स्वतः विषयाच्या पाठीमागे लागला असतांना देवतादेखील त्याला तो पदार्थ संपादन करीत नाहीत याला अनेक कारणे असतात. (१) पूर्वसृष्टीत प्रमादानंतर ज्यांनी स्वतः आत्यंतिक निग्रह करून परमेश्वराची कणव जोडलेली असते, किंवा स्वतः निग्रहपूर्वक विषयांचा परिच्छेद करून इतराकडूनहि करवला असतो, अथवा स्वतः परिच्छेद न करता केवळ इतराकडूनच करवलेला असतो त्यामुळे ज्यांनी परमेश्वराची कणव जोडलेली असते अशा पुरुषांना या सृष्टीत स्थानदोषाने किंवा प्रकृतिस्वभावाने एखाद्या विषयरूप पदार्थाची इच्छा झाली तरी देवता, त्या कणवेच्या जाणिवेमुळे त्याला तो पदार्थ संपादन करीत नाहीत. (२) काही निमित्तापगमी पुरुष असतात. पूर्व प्रमादात इतरांच्या अनुसरणाचा अडथळा नाहीसा करून त्यांनी परमेश्वराची कणव जोडलेली असते. त्यामुळे देवता त्यांना या सृष्टीत विषयरूप निमित्तापासून दूर ठेवतात. स्थानकालादिकांच्या सामर्थ्याने त्यांचे मन जर विषयाकडे गुंतून राहिले तर त्या पदार्थांचा नाश करून देवता त्यांचे संपादकत्व होऊ देत नाहीत.

१. 'पुरुष पाठी लागे त्याचे भेद : एक कणवेचा : दुसरा कणव होऊन निमित्तापगमाचा : तिसरा पडलेया धूळ न लगे : चवथा विघ्नत्व सरले तो : पाचवा स्वनिष्ठ इंद्रियार्थरस विखो सेवी तो : सहावा क्षोभाचा : सातवा तुटलिये कणवेचा: ऐसे सात पुरुष ये पक्षी वाखाणिले असति ' ( आ. बं. १९ ).

कित्येक पुरुष, पूर्वसृष्टीत प्रमादानंतर भिक्षूंना अत्यंत अनुकूल झालेले असतात. त्यामुळे त्यांनी अशी कणव जोडलेली असते की तिच्यामुळे या सृष्टीत त्यांना मनासारखी बायकामुले नसतात. म्हणून ते त्यांचा त्याग करतात व अशा रीतीने विषयपदार्थ त्यांच्या जवळून दूर पळतात. (३) काही 'पडल्या धुळीचे' (शेवटचे प्रकरण पहा) अतिशय चर्यावंत पुरुष असतात. पूर्वप्रमादात यांनीहि कणव जोडलेली असते. अशा पुरुषांनी आपली चर्या सोडून विषयरूप पदार्थांचा उल्लेख केला, आपणहून तो पदार्थ सेवन करण्याची इच्छा धरली तर देवता त्यांना त्या पदार्थाचे संपादकत्व होऊ देत नाहीत. याचे एक कारण असे की ते स्वतःच निष्ठावंत असल्यामुळे त्यांचे शरीर मालिन व कृश झालेले असते. त्यामुळे लोक त्यांना विषयपदार्थांचे संपादन करीतच नाहीत. अशा रीतीने त्यांच्यापासून विषय दूर पळतात. (४) काही पुरुषांच्या बाबतीत देवतांचे 'विघ्नत्व सरलेले' असते; म्हणजे प्रथम त्याला देवतांनी विघ्न संपादलेले असते म्हणून त्यांनी विषयरूप पदार्थांचे सेवन् केलेले असते. पुढे ते स्वतःच त्या पदार्थांच्या सेवनेला तयार होतात. म्हणून देवतांनी विघ्न करण्याची गरजच राहत नाही. अशा पुरुषापासून विषय दूर पळतात याचा अर्थ इतकाच की ते कितीहि विषयसेवनात रंगले तरी त्यांना पूर्ण तृप्ति मिळत नाही. हेच त्यांच्या बाबतीत विषयाचे पळणे होय. (५) स्वनिष्ठ इंद्रियार्थ पदार्थांची सेवा करणाराला पाहिजे त्यावेळी विषयरूप पदार्थ मिळतातच असे नाही. ते पदार्थ पाहिजे त्यावेळी न मिळणे म्हणजे त्याच्यापासून विषयाचे पळणे होय. (६) काही पुरुष 'क्षोभाचे' असतात. पूर्वसृष्टीत प्रमादानंतर ईश्वराला किंवा गुरूला दुसरा कोणी तरी पदार्थ संपादन करीत असता यांनी आडकाठी केलेली असते व परमेश्वराचा क्षोभ जोडलला असतो. त्यामुळे या सृष्टीत त्यांनी स्वतः काही पदार्थांची इच्छा केली आणि ते इतराजवळ ते पदार्थ मागायला लागले तर ते लोक त्यांची चांगली कानउघाडणी करतात. अर्थात् त्यांना ते पदार्थ देत नाहीतच. हेच विषयाचे पळणे होय. आणि (७) काही पुरुष 'तुटलेल्या कणवेचे' असतात. परमेश्वराची कणव यांनी जोडलेली असते पण ती मधेच तुटलेली असते; म्हणून त्यांना इच्छिलेले पदार्थ मिळतात पण ते अगदी

नीरस, बासट वगैरे. त्या पदार्थांचे सेवन करावेसे त्याला वाटत नाही आणि अशा रीतीने विषयरूप पदार्थ त्यांच्यापासूनहि दूर पळतात.

## विकाराचा वेडेपणा

एखाद्या गोष्टीचा प्रथमोल्लेख उपजणे हे स्वाभाविक असले तरी त्या प्रथमोल्लेखासरशी कार्य करायला प्रवृत्त होणे हे वेडेपण होय. यालाच कार्य-वेडेपण म्हणतात. वेडा माणूस आपल्या मनात एखाद्या विकाराचा उल्लेख झाल्याबरोबर त्याप्रमाणे कार्य करायला लागतो. त्या उल्लेखाशी तात्काळ रसरूप होऊन तो आपल्या शरीराच्या तत्सदृश चेष्टा करायला लागतो. ( वेड्याचे विकार बाहेर प्रगटती : आ. ४७ ). उलट शाहणा माणूस, मनात प्रथमोल्लेख झाला तरी तो उल्लेख रसरूप होऊ देत नाही. आणि रसरूप झाला तरी वेड्या माणसासारखा इंद्रियाच्या वावग्या चेष्टा करीत नाही. आचरत्या पुरुषानेहि आपल्या मनातील विकाराचे उल्लेख बाहेर प्रगट होऊ देऊ नयेत. त्याला विकाराचा उल्लेख झाला तरी तो पुढील कार्याला येऊ देऊ नये. त्याशी त्याने रसरूप होऊ नये.

## विकाराचा नाश वैराग्याने

अशा रीतीने विकारशून्य होण्याचे मुख्य साधन वैराग्य हे होय. 'विकार वैराग्ये नासे' म्हणजे नियमित होतो, असे स्वामींनीच म्हटले आहे. (शो. आ. मा. २). आणि वैराग्य म्हणजे तरी काय ? 'इहामुत्रफलोपभोगविरागो वैराग्यम्' ( आ. ३४) अशी वैराग्याची व्याख्या आहे. 'इह' म्हणजे मनुष्यलोक आणि 'अमुत्र' म्हणजे यक्षिणीपासून तो चैतन्यपर्यंत देवतांचा परलोक. या दोन्ही लोकात मिळणाऱ्या फळांची आसक्ति नाहीशी होणे म्हणजे वैराग्य. आचरत्या पुरुषाच्या ठिकाणी देवताविषयक परलोकीच्या फळाची आसक्ति नसतेच. पण त्याने इहलोकींच्या देखील फळांची आसक्ति सोडली पाहिजे. या ऐहिक फळात आपली बायको, मुलेबाळे, आप्तेष्ट, द्रव्यसंपत्ति इत्यादिकांचा समावेश होतो. या सर्वांचा त्याग करणे म्हणजे खरेखुरे वैराग्य होय. अशा वैराग्यानेच विकारशून्यता होऊ शकते.

१. 'तरी इह म्हणीतल्या मनुष्यलोक : आन अमुत्र म्हणीतल्या परलोक : तोच यक्षर्णीपासौनि चैतन्यपर्यंत : तयाची जीये फळे त्यांचे उपभोग : त्यांच्या विषयी विराग···मग विरागाचा अतिशयो ते वैराग्य' ( आ. बं. ३४ ).

## मोचक वैराग्य कोणते ?

परमेश्वराव्यतिरिक्त इतर देवतासाधनवंतांची विरक्ति हे खरे वैराग्य नव्हे. शाब्दिक दृष्ट्या त्याला वैराग्य म्हणता आले तरी ते मोचक मात्र होऊ शकत नाही. परमेश्वरज्ञान झाल्यानंतर त्या परमेश्वराच्या प्राप्तीप्रीत्यर्थ केलेले वैराग्य तेच खरेखुरे मोचक वैराग्य होय. ( ज्ञान : भक्ति : वैराग्य : एके मोचके : एके अमोचके : वि. मा २९ ). कित्येक आचरते पुरुष 'इह' म्हणजे स्थानप्रसादादिक व 'अमुत्र' म्हणजे पुनःसंबंध, इत्यादिकांच्या प्राप्तीसाठी सहेतुक क्रिया करतात. ही सहेतुकताहि परमेश्वरसाधनात नको. या सहेतुकतेविषयी अनावड उत्पन्न होऊन निर्हेतुक क्रियेला लागणे हे खरे वैराग्य होय. काही मोक्षमार्गींचे साधनवंत इहलौकिक प्रतिष्ठा प्राप्त व्हावी म्हणून वैराग्य आचरतात. पण 'स्तुतिपर वैराग्य न करावे' ( आ. मा. १४७ ) असे स्वामींनी स्पष्टच सांगितलेले आहे. असे स्तुतिपर वैराग्य करणे म्हणजे लोकात प्रतिष्ठा मिळवण्यासाठी वैराग्याचा देखावा करण्यासारखे किंवा वास्तव वैराग्य असले तरी ते मिरवण्यासारखेच नाही काय ? आणि खोटे वैराग्य करणे किंवा खरेखुरे वैराग्य असूनहि ते मिरवणे हा तर विकाराचाच एक प्रकार आहे. ( जीवासि वैराग्य मिरवु आवडे हाही एकु विकारुचि : आ. ४५ ). अनंत पापांचे मूळ असलेल्या ज्या विकाराचा नाश करण्यासाठी वैराग्य आचरावयाचे तोच विकार जर त्या वैराग्यामुळे उफाळून बाहेर पडू लागला तर मग त्या वैराग्याचा उपयोग काय ?

## कीर्तिकठियाची स्थिति

स्तुतिपर वैराग्य करणारांची अवस्था कीर्तिकाठियाप्रमाणे होते. कोण्या एका गावी एक पुजारी राहत होता. तो आपल्या देवस्थानाची–देवतेची नव्हे-फार शुश्रूषा करायचा. ते देवस्थान तो दररोज झाडत असे, तेथे संडासंमार्जन करीत असे. हे पाहून गावातील लोक त्या पुजाऱ्याची खूप स्तुति करू लागले. 'पुजारीबोवा, तुम्ही करता हे फार उत्तम करता' असे ते म्हणत. या स्तुतीने फुगून जाऊन तो पुजारी त्या देवालयाची दररोज अधिकाधिक शुश्रूषा करू लागला. कारण त्यामुळे त्याला कीर्तिलाभ होत असे. त्याच्या या क्रियेमुळे त्याला देवताफळ न मिळता केवळ कीर्ति मिळाली. तद्वत्, ईश्वरमार्गातील जे अनुसरलेले पुरुष केवळ कीर्तीचे वैराग्य

करतील त्यांना कीर्ति मिळेल, पण परमेश्वर मिळणे शक्य नाही. म्हणून असे कीर्तिपर वैराग्य काय कामाचे ? ( कीर्तिकठियाचा दृष्टांत. ९५ ).

नागदेवाचार्यांनी ' कीर्तीचे तरी वैराग्य चांग ' ( स्मृ. स्थ. ४४ ) असे म्हटले याचे कारण इतकेच की निदान कीर्तिपर वैराग्य केल्याने तरी एरवी घडणारे इंद्रियार्थपदार्थसेवनाचे दोष कमी होऊन पुढे ती निर्दोषता वाढीला लागेल व आचरता पुरुष खरे वैराग्य करू लागेल. कीर्तिपर वैराग्य हे ईश्वरप्राप्ति करून देणारे आहे असा त्यांचा भावार्थ नाही.

## वैराग्य म्हणजे तारेवरील कसरत

खरेखुरे वैराग्य म्हणजे एकप्रकारे तारेवरील कसरत आहे. तारेवर कसरत करणारा माणूस कसरत करतांना आपल्या देहाकडे पाहत नाही आणि सभेतील लोकाकडेहि लक्ष्य देत नाही. तो आपल्या कामात दंग असतो. तद्वत्, वैराग्य करणाराने स्वतः समाधान मानून स्वतःच्या शरीराकडे पाहू नये किंवा लोकाकडे, म्हणजे लोक काय म्हणतात या गोष्टीकडेहि लक्ष्य देऊ नये. त्याने केवळ वैराग्याचरणात निमग्न असावे. आपल्या कार्यात गुंगून कसरत करणाराला शेवटी सभेचे लोक ज्याप्रमाणे वस्त्रालंकारांचे दान देतात त्याप्रमाणे निष्ठेने वैराग्य आचरणाराला परमेश्वर साह्य करतात. पण आपल्या कामात दंग न होता कसरत करणारा अधोविकाराने आपणाकडे आणि विपरीत बुद्धीने सभेच्या लोकाकडे पाहत राहिला तर तो तारेवरून कोसळून खाली पडलाच म्हणून समजावे. तद्वत्, सहेतुकपणे जो वैराग्य करील व मिरवील त्याला वैराग्यहि साधणार नाही आणि मोक्षप्राप्तीत परमेश्वर साह्यहि करणार नाही. ( वर्तेचा दृष्टांत. ९२ ).

वैराग्यामुळे साधकाला कोणत्याहि पदार्थाची आवड राहत नाही. एखादा पदार्थ मिळाला तरी त्याला आनंद नाही आणि न मिळाला तरी दुःख नाही. इतकेच काय पण एखाद्याने धर्मबुद्धीने त्याला एखादा पदार्थ दिला तरी त्याला त्याविषयी आवड नको. त्याने तो पदार्थ धर्मबुद्धीने मिळाला म्हणून तो आवडीने सेवन करावयाचा असे नाही. तसे करणे हे

१. ' मिरवणे : ते यथा वर्तेवरील : आपणायेउते आन सभेयेउते न पाहे ' ( आ. स्थ. ४५ ).

वैराग्य नव्हे. स्थानप्रसादादि पदार्थाविषयीहि अशी लागलेपणाची आवड त्याला नको. तरच साधकाला खरे वैराग्य प्राप्त झाले असे म्हणता येईल.

## वैराग्यासाठी त्यागाची आवश्यकता

सारांश, विकारशून्यतेसाठी आचरत्या पुरुषाने खरेखुरे वैराग्य करणे अवश्य आहे. विरक्ति म्हणजे निवृत्त होणे. इहलौकिक फळामधे स्त्रीपुत्र, आप्तेष्ट, द्रव्यसंपत्ति वगैरेंचा समावेश होतो हे आपण पाहिलेच आहे. या सर्वांपासून पूर्णपणे निवृत्त होणे म्हणजे वैराग्य. अर्थात्, वैराग्य आचरणासाठी आचरत्या पुरुषाने या सर्वांचा त्याग करणे अवश्य आहे. इतकेच नाही तर विकार उत्पन्न करणाऱ्या जडचेतन पदार्थांचे सेवन करणे हेच सगळ्या अनर्थांचे मूळ असल्यामुळे त्या सर्वांचा त्याने तावडतोब असंबंध म्हणजे त्याग करणे अवश्य आहे. ( जेणे संबंधे विकारु उपजे तेयाचा असंबंधु कीजे : आ. १३ ). त्यासाठी त्याने प्रथम आपल्या देशाचा त्याग करावा. ( स्वदेशसंबंधु त्याज्य... आ. १ )

## स्वदेश-संबंध त्याज्य

ज्या देशात आपण राहत आहोत किंवा राहत होतो, ज्या देशात आपण आहारविहार केले, देणे-घेणे केले तो स्वदेश होय. अनुसरलेल्या पुरुषाने अशा स्वदेशाचा त्याग केला पाहिजे. उदा: एखादा मनुष्य पंजाबमधून किंवा भोगभूमीतून महाराष्ट्रात अनुसरणासाठी आलेला आहे. त्याने नेहमीसाठी पंजाबचा किंवा भोगभूमीचा त्याग अवश्य केला पाहिजे. हेतु हा की त्या ठिकाणी त्याने पूर्वी आहारविहार केलेले असल्यामुळे त्या स्थानांच्या दर्शनामुळे पुन्हा त्याचे मन द्रवेल, आणि तो आहारविहारांच्या स्वाधीन होईल. अनुसरणानंतरहि आचरता पुरुष आपल्याच देशात राहिला तर त्याचे पूर्वचरित्र मोठ्याने बोलून दाखवून तेथील लोक त्याच्या वैराग्याला व अनुसरणाला हासतील. त्यामुळे तो वैराग्य सोडण्याचा संभव आहे; म्हणूनहि स्वदेशाचा त्याग अवश्य करावा. त्या देशाचा नुसता शारीरिक त्याग करायचा इतकेच नाही तर दुरून मनात त्याने त्याची आठवण

१. ' स्वदेश म्हणजे जिये देशी होता : जेथ दिधले घेतले : आहार विहार केले : तो स्वदेश त्यागावा ' ( आ. स्थ. ).

देखील कधी काढायची नाही. एखादे वेळी शास्त्रानिमित्त किंवा एखाद्या अपूर्व त्यागियाच्या निमित्त स्वदेशात जावेच लागेल तर काम संपताच तेथून ताबडतोब निघून यावे. तेथे वसति करून राहू नये.

आधीच महाराष्ट्रात असलेल्या पुरुषाने अनुसरण केले तर त्याने स्वदेशाचा त्याग करायचा म्हणजे महाराष्ट्र देश सोडून दुसरीकडे जायचे असे मात्र नव्हे. कारण 'महाराष्ट्री असावे' (आ. २४) असे श्रीचक्रधर-स्वामींनी मुद्दामहून सांगितले आहे. त्याने अनुसरणानंतर आपल्या आहारविहाराचा व उद्योगधंद्याचा विशिष्ट प्रांत सोडून देशाच्या शेवटी, जिथे आपणाला कोणी ओळखणार नाही अशा ठिकाणी जावे व आचारधर्माचे अनुष्ठान करावे. सारांश, जिथे जिथे म्हणून आपली ओळखी असेल, उद्योग-धंद्याच्या निमित्ताने जिथे जिथे आपण वारंवार गेलो असू तो सगळा स्वदेशच म्हणायचा. आचरत्या पुरुषाने त्याचा त्याग करणे अवश्य आहे. या आचरत्या पुरुषात स्त्रीचाहि समावेश होतो. म्हणजे अनुसरलेल्या पुरुषाप्रमाणे अनुसरलेल्या स्त्रियांना देखील हा आचारधर्म लागू आहे.

## स्वग्रामसंबंध त्याज्य

ज्या कारणासाठी स्वदेशाचा त्याग करणे अवश्य आहे त्याच कारणासाठी आचरत्या पुरुषाने स्वग्रामाचा त्याग करणे अवश्य आहे. (स्वग्रामसंबंधु त्याज्य आ. १). 'स्वग्राम' म्हणजे आपण ज्या गावी निरनिराळ्या कारणानिमित्त राहिलो, जिथे जेवणखाण व आहारविहार केले, ज्या ठिकाणी अष्टभोग उपभोगले व सकौतुक विनोदक्रीडा केल्या ती सर्व गावे स्वग्रामच होत. अशा सगळ्या गावांचा आचरत्या पुरुषाने सर्वस्वी त्याग करायला पाहिजे.

१. 'तयाचा त्याग करावा म्हणितल्या तयां देशा गावा न वचावे हे काई म्हणावे असे परी दूरौनिही अंत:करणे नाठवावे' (आ. वं. १).

२. 'वाचौनि संबंध पहिलेच त्यजिला असे परी मागौती शास्त्राकारणे परतला : अथवा एकाधेया अपूर्व त्यागाकारणे जाय तरी··· तेणेही त्याग करावा : तेथ राहावा न करावा' (सदर).

३. 'स्वग्राम म्हणजे जिये जिये गावी होता : जेथ खादले : जेवले : भोगिले : अनुसरले : जेथ जेथ विहरण वर्तन केले तो गाव सांडावा' (आ. स्थ. १).

या दृष्टीने ज्या ज्या गावात आपले कोणी ओळखीपाळखीचे माणूस असेल, आहारविहाराचे स्थान असेल, विनोदक्रीडेचे पात्र असेल त्या त्या गावाचा त्याग इष्ट होय. त्या सर्वांचा अंतर्भाव 'स्वग्रामा'तच केला पाहिजे.

## काही अपवाद : कोणी त्याग करू नये ?

'स्वदेशसंबंध त्याज्य' व 'स्वग्रामसंबंध त्याज्य' हा अनुसरलेल्या पुरुषासाठी सामान्य नियम आहे खरा. पण त्याला काही अपवादहि आहेत. उदा: (१) अनेक अनुसरलेल्या पुरुषांच्या हितासाठी भटोबासाप्रमाणे स्वदेश न सोडता आपल्या गावापाशीच राहणे अयोग्य नाही[1]. (२) परमेश्वरसेवेनिमित्त स्वदेशात किंवा स्वग्रामात राहायला हरकत नाही[2]. (३) मार्गाच्या किंवा पंथाच्या निमित्ताने स्वदेशात किंवा स्वग्रामात राहणे निषिद्ध नाही. उदा: एखादा अनुसरलेला पुरुष स्वदेशाचा त्याग करीत असतांना मार्गावर काही संकट आले तर मार्गाला संकटातून सोडवण्यासाठी ते संकट नाहीसे होईपर्यंत त्याने स्वदेशस्वग्रामाचा त्याग करू नये[3]. (४) आपण स्वदेश-स्वग्राम त्याग केल्याने मार्गावर जर कांही अनिष्ट कोसळत असेल तरीहि त्यांचा त्याग करू नये. उदा: रामदेवरायाची बायको कामाइसा ही जर स्वग्राम सोडून आली असती तर मार्गावर राजाचे आक्रमण झाले असते. त्यात अनेकांचा नाश झाला असता. त्यामुळे कामाइसाला नित्यनरक घडले असते. अशावेळी तिने स्वग्रामत्याग न करणेच इष्ट[4] होते. 'अल्पे अनिष्टे बहुत अनिष्ट परिहरे तरी परिहरीजे' (आ. १०८) याचे हे सुंदर उदाहरण आहे. (५) तसेच स्वदेशात किंवा स्वग्रामात राहून शास्त्राभ्यास करणे अत्यवश्य

१ 'भटोबासासारिखा अधिकरण बहुतांचिया हेतु स्वग्रामसमीपत्वे राहे तरी तयासि बाधा नाही' (आ. बं. १).

२. 'श्रीप्रभूबाबाचिये सेवेलागी अंगिकरिती : ऐसिये क्रियेसि आन तैसीया पुरुषासि स्वदेश स्वग्रामाचा बाधा नाही' (सदर).

३. 'त्याग करावया उत्कंठीत जाला : तव मार्गाची अडणी थोर ऐसी ओढवली असे : ते तयाचेनि परिहरत असे : ते अडणी फिटे तो त्याग न करावा' (सदर).

४. 'कामाइसाचेनि न्याये त्याग करता थोर प्रसवे रायास मार्गाचे हनन घडेल म्हणून भटोबासी तया वारिले : ऐसिये क्रियेचे तयास त्याग करोचि नये : नित्य नर्क घडतील म्हणौनि' (आ. बं. १).

असेल तर स्वदेशत्याग करू नये. पण आपले शास्त्राध्ययन पूर्ण होताच, कार्य सिद्धीला जाताक्षणीच त्याने त्यांचा त्याग अवश्य केला पाहिजे.

## संबंधिये त्याज्य : संबंधिये कोण ?

स्वदेश व स्वग्राम यांच्याप्रमाणेच संबंधियांचाहि संबंध त्याज्य होय ; इतकेच नाही तर तो विशेष त्याज्य होय. (संबंधियांचा संबंधु तो विशेषता त्याज्य : आ. १ ). संबंधी म्हणजे सगळ्या प्रकारचे नातेवाईक. आपण ज्यांच्यापासून जन्माला आलो, आपल्यापासून जे जन्माला आले, सगळा पितृपक्ष=पित्याचे वडील, आजोबा, भाऊ, बहीण; तसेच सगळा मातृपक्ष= त्याचे आप्तेष्ट, सोयऱ्यांचे सोयरे, त्यांच्या स्नेहातील इतर मंडळी या सर्वांचा अंतर्भाव संबंधियांत होतो. अर्थात्, अतिशय दूरचा नातेवाईकच नव्हे तर त्याचे व आपले स्नेहीसोबती हे सगळे संबंधीच होत. या सर्वांचा त्याग करणे आचरत्या पुरुषाचे कर्तव्यकर्म होय.

## त्यांच्यामुळे धर्महानि

कारण या संबंधियांच्या सान्निध्यात असतांना आचारधर्म नीट रीतीने पाळला जाऊ शकत नाही; आचार आचरण्याचा अधिकार राहत नाही. ( संबंधी अधिकारु नाही : आ. २ ). जे निषेध चुकवावयाला पाहिजेत ते चुकवता येत नाहीत आणि जे विधि पाळायला पाहिजेत ते पाळता येत नाहीत.त्यांच्या सान्निध्यात आचरत्या पुरुषाला प्रेमाचे उपाय करता येत नाहीत, शास्त्राध्ययन करता येत नाही, की मोक्षाचे कोणतेच उपाय यथायोग्य रीतीने आचरता येत नाहीत. त्याला नित्यनैमित्तिक विधीहि करता येत नाहीत. इतकेच नाही तर ते आपण आचरावेत अशी वृत्तीच त्याच्या ठिकाणी राहत

१. ' महारवाड्यास गोसावी जो पाठविला त्याचा अर्थ सिद्ध जोपर्यंत होए तव तेणे पुरुषे स्वग्रामस्वदेश त्यजोच न ए ' (आ. बं. १ ).

२. **संबंधियांचा संबंध म्हणजे लेकरूवे : बाळ : मातापिता : सोयरी धायरी : गोत्रज कुटुंब यांचा संबंध विशेषे सांडावा** ' ( आ. स्थ. १ ); **' संबंध म्हणजे आपण जयापासोनि जाला : आपणापासोनि जिये जाली : मग राउळीची : मग विहुळाची : मातृपक्ष : पितृपक्ष : इतुल्यांचा संबंधाचि : परि आपलविती जिये स्नेहाची शरीरसंबंधिये तिये विशेष '** (आ. स्थ. २ ).

नाही. कारण त्या संबंधियांच्या सुखदुःखांनी त्याच्या मनात विक्षेप उत्पन्न होतो. इतकेच काय पण त्यांच्या दर्शनानेदेखील आचारधर्माविषयी अदक्षता ( निर्बळता ) उत्पन्न होते. म्हणून या सगळ्या संबंधियांचा आचरत्या पुरुषाने त्याग करावा. मनात त्यांचे स्मरणदेखील करू नये. धनकोला पाहताच ऋणको जसा पळतो किंवा ऋणको धनकोला जसा टाळतो त्याप्रमाणे त्याने आपल्या संबंधियांना टाळले पाहिजे. कोणत्याहि निमित्ताने त्याने त्यांचा संबंध ठेवला तरी त्याला अनिष्ट होऊन त्याच्या धर्माची हानि झाल्यावाचून राहणार नाही.

## काही उदाहरणे

उदाः युधिष्ठिर हा वेधवंत होता. परमेश्वराची आज्ञा मोडून आपल्या नातवाला–परीक्षितीला–राज्याभिषेक करण्यासाठी तो कलियुगात सात दिवस राहिला. पण त्यामुळेदेखील त्याला स्वर्गाला जाता जाता नरकाचे दर्शन झालेच[3]. अनिष्टत्यागी पुरुषांना असे वाटते की, आपण आपल्या मुलाबाळांचा संसार नीट करून देऊ व मग अनुसरण करू. पण त्या संबंधियांच्या स्नेहामुळे एक तर त्यांना लौकर अनुसरण घडतच नाही किंवा ते अनुसरलेले असले तर थोर अनिष्ट उपजते. उदाः डखले व चांगदेवभट हे पेणोवेणा माहूरला श्रीदत्तात्रेयप्रभूच्या दर्शनाला निघाले. रस्त्यात दाउलवाडी गावाला डखले यांची एक मुलगी राहत होती. त्या वात्सल्यामुळे एक दिवस ते तिच्या गावी राहिले. पण त्यामुळेच ते श्रीदत्तात्रेयाच्या दर्शनाला जाऊ शकले नाहीत. ( ली. च. भा. २. पा. ३७ ). तीच गति

**१. ‘ अधिकार नाही म्हणजे धर्मास अर्हता नाही ... नित्यविधी निमित्य विधी : भलतिये क्रिये सत्वची नुपजे : याचिये सुखीये दुखीये मन विक्षेपे : हे वेगळे करूनि नसुद्धेनि दर्शनेचि अधिकार नाही : ’** ( आ. स्थ. २ ).

**२ ‘ जैसे दंदा ऋणभेणे पळीजे तैसे संबांधिया भेणे पळावे : विशेषतः संबंध त्याज्य म्हणजे दुरौनिहि त्याते अंतःकरणे नाठवावे ’** ( आ. स्थ. १ ).

**३. ‘ युधिष्ठिरा निरयदर्शन हे संबंधे केले ’** ( सदर ).

**४. ‘ डखले : चांगदेवभट्ट श्रीदत्तात्रयप्रभूच्या दर्शना न वचतीचि हे संबंधे केले : भूतानंदा कोल्हापुरा न वचति हे संबंधे केले ’** ( सदर ).

भूतानंदाचीहि झाली. तिला स्वामींनी कोल्हापूरला पेणोवेणा, मध्ये न थांबता जायला सांगितले. ती निघाली. पण मध्ये नेवाशाला आपल्या मुलीला भेटण्यासाठी थांबली. तेथे मुलीचा हात भाजल्यामुळे आधी तिच्या शुश्रूषेसाठी आणि मग तिच्या बाळंतपणासाठी तिला थांबावे लागले. म्हणून ती कोल्हापूरला जाऊ शकली नाही. ( ली. च. उत्त. १६२ ). कित्येक सतेवत्यागी पुरुष आपले संबंधिये मेले असले तरी अनुसरणानंतर नवीन संबंधिये निर्माण करतात. त्यांच्या स्नेहपाशात ते अडकतात व पुढे त्यांच्या मृत्यूमुळे आत्यंतिक वियोग झाला म्हणजे त्यांना अनिवार दुःख होते. उदा: अहीर देशांतील एका म्हातारीचे सगळे आतेष्ट मरून गेले होते. त्या अनुतापाने ती महाराष्ट्रात गंगातीराला आली. एका ब्राह्मणाच्या ओसरीत राहून भिक्षा मागून काळ कंठू लागली. पुराण वगैरे ऐकायलाहि ती जात असे. आपल्या मृत लेकरांच्या आठवणीमुळे ती त्या ब्राह्मणाच्या मुलाबाळांनाहि आपल्या ओसरीत येऊ देत नसे; नव्हे त्यांच्याकडे ती पाहातहि नसे. पुढे काही दिवसांनी त्या मुलांची आई मेली. तेव्हां त्या ब्राह्मणाने तिला विनंती केली की ' आई, मी आता अन्नधान्य मिळवून आणीत जाईन! तू आम्हाला शिजवून घालीत जा. ' तिने ते कबूल केले. पुढे लौकरच तो ब्राह्मणहि मेला. तेव्हां त्याच्या मुलांचा सांभाळ तिलाच करावा लागला. दळण--कांडण करून, भरडा करून ती त्यांना पोसू लागली. अशा स्थितीत कुठला तिचा धर्म आणि कुठले काय? आणि पुढे तर ती मुलेहि मेली. मग तिच्या दुःखाला अगदी सीमा राहिली नाही! ( अहीरदेशींचीए म्हातारीएचा दृष्टांत. ९१ ). याचसाठी अनुसरलेल्यांनी पुन्हा नवीन संबंध जोडू नयेत.

कित्येक अनिष्ट व सतेव त्यागियांचे आपल्या संबंधियात इतके लक्ष असते कीं, अनुसरल्यानंतर देखील ते त्यांचे चिंतन करतात. आपल्याप्रमाणे आपले संबंधियेहि परमेश्वराला अनुसरतील तर मग आपण सगळेच एके ठिकाणी राहू व एकमेकांच्या उपयोगी पडू; या भावनेने ते त्या संबंधियांना मार्गात आणण्यासाठी म्हणून जातात. पण ते येत नाहीत. कारण त्यांची मने इतरत्र गुंतलेली असतात. ती आपणाबरोबर येत नाही-

१. ' अहीरदेशीची म्हातारी हे संबंधे केले ' ( सदर ).

तसे पाहून त्या अनुसरलेल्या पुरुषांना अत्यंत दुःख होते. त्यांना पश्चात्तापहि होतो. त्या संबंधियांना आणण्याचा प्रयत्न करण्यात लागलेला वेळ परमेश्वरसेवेवाचून व्यर्थ गेला याबद्दल त्यांना तीव्र खेद होतो. उदा : नागदेवाचार्य परमेश्वरसेवेसाठी उमाइसाला आणू गेले होते. पण ती आपल्या इतर स्नेहपाशात गुंतली होती. वैजोच्या बायकोचे बाळंतपण करण्याची तिला अधिक चिंता होती. त्यामुळे नागदेवाचे म्हणणे तिने ऐकले नाही. ती आली नाही ! म्हणून नागदेवाचार्यांना झालेल्या दुःखाला पारावार नव्हता. ( ली. च. उत्त. ४६३ ).

संबंधियांना प्रत्यक्ष आणायला जाणे तर दूरच राहो पण त्यांना आणण्याचा मनातल्या मनात विचार केला तरी परमेश्वरसेवेला अंतरण्याचा प्रसंग येतो. उदा: पद्मनाभीदेवाने मनात असाच विचार केला होता की आपले सगळे संबंधिये जर अनुसरतील तर आपण येथेच राहून त्यांची सेवा करू; त्यांच्यासहित परमेश्वरसान्निध्यात राहू. त्याचा हा मनोरथ ओळखून श्रीचक्रधरस्वामींनी त्याचे जाडीपोते हिसकावून घेऊन त्याला हाणून दिले. त्यामुळे तो ईश्वरसन्निधानाला अंतरला ( ली. च. भा. ३. पा. ३० )

यासाठीच, अनुसरलेल्या पुरुषाने संबंधियांचा संबंध विशेष त्याज्य मानावा. त्याने त्यांची झाडपूस ( चौकशी वगैरे ) करू नये, ममता धरू नये. नाहीतर युधिष्ठिराप्रमाणे अनिष्ट होईल. नवीन संबंधी निर्माण करून तेथे मन गुंतवू नये; नाहीतर अहीरदेशातील म्हातारीची गत होईल. उत्तम कार्यासाठी निघाले असता संबंधियांची भेटहि घेऊ नये; नाहीतर डखले चांगदेव आणि भूतानंद त्यांच्यासारखे अनिष्ट जोडेल उत्तम वस्त्रे वगैरे देण्याच्या निमित्तानेहि संबंधियाकडे जाऊ नये; कारण त्यामुळे पुढील उत्तम लाभ हातातून निसटण्याचा संभव असतो. ईश्वराज्ञा नसतांना त्याने संबंधियांना मार्गात आणण्याचाहि प्रयत्न करू नये; नाहीतर नागदेवाचार्याप्रमाणे त्यांच्यावर पश्चात्ताप करण्याची पाळी येईल. तसेच इष्ट क्रिया जोडीत असतांना संबंधियांची ममता मनात येऊ देऊ नये. नाहीतर पद्मनाभी-

१. ' **उमाइ आन्हानी सेवाभावो कथन : हे संबंधे केले** ' ( आ. स्थ. १. )
२. ' **पद्मनाभीदेवो मनोरथ : संबंधियाचेनि स्नेहे इतुले मेले : नागवले :** ( आ. स्थ. १ ).

देवाप्रमाणे परमेश्वराला व त्याच्या इष्ट क्रियेला अंतरावे लागेल. तेव्हां संबंधियांना संबंध कोणत्याहि निमित्ताने का होईना, अनुसरलेल्या पुरुषाने ठेवता कामा नये.

सारांश, ज्याला आत्यंतिक मोक्ष मिळवायचा आहे अशा साधकाने आपल्याजवळ आपली स्त्री व इतर संबंधिये यांना मुळीच ठेवू नये, त्यांचा सांभाळ करण्याची ब्याद आपल्यामागे लावून घेऊ नये. त्यांचा त्याने पूर्णपणे त्याग करावा. खुंटामुळे व दाव्यामुळे ज्याप्रमाणे गुराला हालता चालता येत नाही त्याप्रमाणे स्त्री आणि संबंधिये यांच्यामुळेहि साधकाला स्वतंत्रपणे आचार करता येत नाही. त्याचे स्वातंत्र्य नष्ट होते. म्हणून त्यांचा त्याने त्याग करावा. ( मुक्तीची चाड आणि तेवींचि खुंटदावे सांभाळणे : आ. ६६ ).

हे केवळ चेतन संबंधियामुळेच होते असे नाही तर जड स्थानांच्या संबंधामुळेहि होते. म्हणून स्वग्रामाप्रमाणेच संबंधियांच्या निवासस्थानांचाहि त्याग करणे अवश्य आहे. त्या ठिकाणी ते संबंधी पुरुष राहत नसले तरी त्या स्थानांच्या दर्शनाने त्या संबंधियांचे स्मरण होऊन मनात जाड्य उत्पन्न होते. त्यामुळे विधिपालनात दक्षता राहत नाही. काही संबंधी पुरुष विवेकी व सदाचारसंपन्न असतात. त्यांच्या दर्शनाने व सन्निधानाने ममता–विकार वगैरे निर्माण होऊ शकत नाहीत. कित्येक संबंधिये निष्ठुर अंतःकरणाचे असल्याने त्यांच्यामुळेहि ममता निर्माण होत नाही, तथापि त्यांचा संबंध त्याज्य नाही असे नाही. कारण, त्यांच्यामुळे ममता वगैरे उद्भवत नसली तरी मनात एक प्रकारचे जाड्य उत्पन्न होतेच! आणि त्यामुळे अनुसरलेला पुरुष धर्माचरणात दक्ष राहू शकत नाही. म्हणून त्यांचाहि संबंध त्याज्यच होय.

१ ' **खुंट म्हणजे स्त्री : दावे म्हणजे संबंधिये ... खुंट ढळोचळो नये तैसे स्त्रियेचेनि स्नेहे गतीचि नाही** ' ( आ. स्थ. ६६ ).

२. ' **अधिकार नाही म्हणजे अतिव्याप्ती : भलत्या पदार्थाचेनि** म्हणजे जडचेतन पदार्थाचेनि संबंधे अधिकार नाही : **ते आपुले काही न करी : जाड्यचि उपजे आभाळवत्** ' ( आ. बं. २ ).

## संबंधामुळे अनेक दोष

संबंधियांच्या संबंधामुळे शास्त्राभ्यास व विधिनिषेधाचे आचरण योग्य रीतीने होत नाही, इतकेच नाही तर त्याज्य म्हणून सांगितलेल्या संबंधियांचा संबंध ठेवल्याने आज्ञाभंगाची अयोग्यता लागते; आणि त्यांच्या सान्निध्यात केलेले आचरण लेखी लागत नाही. क्वचित् जीवाने जोडलेल्या कणवेमुळे संबंधियांच्या सान्निध्यात असतांना परमेश्वर त्याला बोध देऊन शास्त्राभ्यासासाठी महारवाड्यात म्हणजे एखाद्या संबंधियाच्या स्थानी पाठवतात हे खरे. पण तेथे आपले कार्य सिद्ध होईपर्यंतच आचरत्या पुरुषाने रहावे. कार्य सिद्ध होताक्षणीच ते संबंधी व ती स्थाने सोडून त्याने बाहेर निघालेच पाहिजे. तसा तो न निघाला तर त्याला आज्ञाभंगाची अयोग्यता लागते व पूर्वीचे त्याचे शास्त्र हळूहळू अदक्षतेमुळे नाहीसे होते; म्हणजे तो ते विसरतो. कारण, तेथे राहिल्याने अधिक शास्त्राभ्यास करण्याकडे त्याचे लक्ष लागत नाही. त्याने बळेच लक्ष घातले तरी शास्त्रवचनांचे अर्थ त्याच्या लक्ष्यात राहत नाहीत व तदनुसार आचरण तर मुळीच घडत नाही. संबंधियांच्या व त्यांच्या स्थानांच्या सान्निध्याचे सामर्थ्यच असे असते.

स्वदेश, स्वग्राम व संबंधिये या तीन त्यागात स्वदेशाचा त्याग करणारा पुरुष हा श्रेष्ठ आचारवंत होय. कारण स्वदेशत्यागात स्वग्रामत्याग व संबंधियांचा त्याग सहजच अंतर्भूत होतो. स्वदेशत्याग न करता केवळ स्वग्रामत्याग करणारा पुरुष मध्यम होय. त्याच्या त्यागात फक्त संबंधियांचाच त्याग अंतर्भूत होतो. आणि स्वग्रामाचाहि त्याग न करता केवळ संबंधियांचाच त्याग करणारा पुरुष हा कनिष्ठ होय. तो लौकर आपलवला जाण्याचा संभव असतो.

## विकारशून्यतेसाठी विषयत्याग

विकारशून्यत्वासाठी म्हणजे विकार उत्पन्न होऊ नये, म्हणून किंवा विकाराच्या चतुर्विध चालीपैकी आशंसेव्यतिरिक्त इतर उल्लेख निर्माण होऊ नयेत म्हणून स्वदेश, स्वग्राम व स्वसंबंधिये यांचा त्याग करण्याची जितकी आवश्यकता आहे तितकीच किंबहुना त्याहूनहि ज्यास्त विषयपदार्थांचा त्याग करण्याची आवश्यकता आहे. विषय म्हणजे उपभोग्य पदार्थ. शब्द,

स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचेंद्रियांचे मुख्य उपभोग्य विषय होत. शब्द हा कानाचा, स्पर्श हा सर्व शरीराचा, रूप हा डोळयांचा, रस हा जिव्हेचा आणि गंध हा घ्राणेंद्रियाचा म्हणजे नाकाचा उपभोग्य विषय आहे. विकार-शून्यतेसाठी या सर्वांचा त्याग आचरत्या पुरुषाने केला पाहिजे. 'विषय' शब्दाचा अर्थ असा व्यापक असला तरी स्थूल मानाने 'स्त्रीपुरुषांचा संभोग' याच अर्थाने हा शब्द नेहमी वापरला जातो. त्या दृष्टीने विचार केला असता आचरत्या पुरुषांनी स्त्रियांचा आणि आचरत्या स्त्रियांनी पुरुषांचा त्याग करणे अवश्य आहे. संबंधियांच्या त्यागामध्ये स्त्रीपुरुष संबंधियांचा समावेश होतोच. पण त्यात सर्वच संबंधिये संभोगाच्या दृष्टीने विकार निर्माण करणारे असतात असे नाही. उदा: आईच्या बाबतीत असा विचार मनाला शिवणे देखील सहसा शक्य नाही. पण तिचा त्याग सांगितलेला आहे तो आचरत्या पुरुषाने तिच्या वात्सल्याच्या पाशात गुंतून धर्माला अंतरू नये म्हणून. पण स्त्रीपुरुषसंभोगाच्या दृष्टीने आचरत्या पुरुषांनी, केवळ संबंधीच नव्हे तर सर्व स्त्रियांचा आणि आचरत्या स्त्रियांनी केवळ संबंधीच नव्हे तर सर्वच पुरुषांचा त्याग करणे अवश्य आहे. कसे व का तेच आता पहावयाचे आहे.

## विषय संबंध त्याज्य आहे का ?

सर्वसामान्य दृष्टीने विचार केला असता स्त्रीपुरुषांचा विषयभोग हा पापरूप नाही. ( बाइ : पाप तरी नव्हे : आ. ८ ). कारण त्यामुळे उपभोग घेणाऱ्या स्त्रीपुरुषापैकी कोणालाहि दुःख होत नाही. त्यामुळे त्यांच्या पिंडस्था दुखवल्या जात नाहीत. उलट त्यांच्या इंद्रियांना, देहाला व पिंडस्थांना सुख प्राप्त होते. त्यांना तुष्टि व पुष्टि लाभते. अर्थात्, ती दोघेहि एकमेकांना अनुरूप किंवा अनुकूल मात्र असायला पाहिजेत. तरच त्यांच्या मनाला तुष्टि देहाला पुष्टि आणि इंद्रियांना रस म्हणजे गोडी मिळू शकेल. पण एखाद्या पद्मिनीच्या नशिबी एखादा हत्तिसारखा स्थूल पुरुष आला

१. पाप नाही म्हणजे जीवासि दुःख : पिंडस्था खेद तै पाप होआवे की : हे दोन्ही नाहीति ... समाधानचि असे म्हणौनि पाप नाही' ( आ. स्थ. ८ ).

तर त्यांच्या यंत्रारूढतेमुळे तिला तुष्टि नाही, मग पुष्टि कुठली ? सारांश, गाईचे तूप सेवन केल्याने जशी तुष्टिपुष्टि येते त्याप्रमाणे अनुरूप स्त्रीपुरुषांचा संभोग हा त्यांना तुष्टिपुष्टिकारक होऊन सुखश्रेय प्राप्त करून देणारा असतो. ( जाती विखो एकु आति : तो सेविलिया तुष्टि : पुष्टि : रस : श्रेय इये त्याऱ्ही होति : जैसे गोघृत : वि. १९२ ). अशी अनुरूप व परस्परानुकूल जोडपी यथायोग्य रीतीने परस्परांचा उपभोग घेऊ लागली तर भक्त आणि योगी पुरुषाप्रमाणे तीहि अगदी निरोगी राहतात. ( भक्त : योगिया : विषया या तिन्ही धातुसाम्य आति : वि. १९६ ). भक्त आणि अनुसरलेले ज्ञानी आपले आहारविहार नियमित प्रमाणात करीत असतात म्हणून आणि योगी अष्टांगयोगसाधन आचरतो म्हणून त्यांचे धातुसाम्य राहून ते निरोगी असतात. विषयी पुरुषाचे धातुसाम्य असण्याचे कारण असे की, तो सर्वसाधनासहित उत्तम रीतीने विषयोपभोग घेतो. अनुरूप व अनुकूल स्त्री, तुष्टिपुष्टिदायक आणि ऋतुमानानुकूल अन्नोदके, सुखसंवर्धक अनुलेपन इत्यादि साधने सज्ज करून जो विषयोपभोगाला प्रवर्तती आणि आतृप्ति विषयसेवन करतो त्याचे शरीर रोगरहित असणारच ! पण श्वान-शूकराप्रमाणे हीन रीतीने उपभोग घेणाऱ्याच्या शरीरातील धातुसाम्य मात्र बिघडते व ते रोगी बनतात. विषयसेवनाने पुरुष क्षीण होतो म्हणतात ते अशा हीन रीतीने उपभोग घेणारांच्या उदाहरणावरून. एरवी योग्य रीतीने व सकळ साधनासहित उपभोग घेणाराचे शरीर नेहमी निरोगी व तेजःपुंज राहते. सारांश, मुळात विषयसेवन पापरूप नाही.

## कलियुगात हीन विषयोपभोगच फार

पण अशा प्रकारे यथायोग्य रीतीने विषयसेवन करणारे आहेत कुठे ! याच दृष्टीने ' कलियुगी विखो आति : परि विषया नाही '(वि.९७);

१. ' जाति विखो म्हणजे तज्जातीय सेविलेया मना तुष्टि ; देहा पुष्टि इंद्रिया रस : जीवासि श्रेय होय. ··· तरी श्रेय कैसे : ना जीवासी दुःख नाही : पिंडस्था खेद नाही : येणे अंशे समाधान आति ' ( वि. स्थ. १९२ ).

२. ' भक्त : मग अनुसरला ··· धातुसाम्य म्हणजे तीन्ही गुण वातपित्तादिक : योगीया म्हणजे अष्टांगयोग : विषया जो पदार्थ जिये काळी जेतुला जैसा सेवावा तो तैसा सेवी ' ( वि. स्थ. १९६ ).

म्हणजे कलियुगात सुंदर स्त्रियासारखे चेतन उपभोग्य पदार्थ पुष्कळ आहेत पण त्यांचा यथाकाळ, धैर्याने व कामशास्त्रानुसार उपभोग घेणारे जाणते व रसिक पुरुष मात्र नाहीत, असे म्हटले आहे. कलियुगातील राजे, महाराजे विलासमग्न आढळतात खरे; पण त्यांचा विषयोपभोग म्हणजे केवळ आपले इंद्रियकाठिन्य नाहीसे करण्यापुरता आहे. ( हे राये मंडळीक आदिकरौनि सकळही निरोधु परिहारिये की गा : वि. ९७ ).वस्तुत :उपभोग कसा घ्यावा ते त्यांना कळतच नाही. हे चातुर्य फक्त श्रीकृष्णचक्रवर्तीच्याच ठिकाणी होते. ( बाइ : विखो तो श्रीकृष्णचक्रवर्तीचि भोगो जाणेति : वि. ७९ ).

## विषयोपभोगातील काही दोष

अशा या मुळात चांगल्या असलेल्या विषयोपभोगात काही स्वाभाविक उणिवाहि आहेत. स्त्रीपुरुषांची अनुरूपता व अनुकूलता या जगात क्वचित् आढळते. हजारातून एखादेच असे जोडपे असायचे. त्यांनाहि विषयोपभोगाचे बाह्य साहित्य मिळतेच असे नाही. अशा परिस्थितीत त्यांना आतृप्ति उपभोग कसा मिळणार? आणि या सर्व गोष्टी असल्या तरी संभोगक्रियेतील काही नैसर्गिक उणिवामुळे स्त्रीपुरुषांचा विषयोपभोग लांच्छित झालेला आहे. यातील एक महत्त्वाची उणीव अशी की, अनुरूप स्त्रीपुरुषांच्या देहधर्मामुळे ती क्रिया लौकर आटोपते किंवा त्यांना ती आटोपावी लागते. त्यामुळे त्या क्षणकाल यंत्रारूढतेमुळे त्या दंपत्याच्या इंद्रियांचा कंडु तात्पुरता शमन पावतो खरा, पण त्यांना अंतःकरणात पूर्ण सुख व समाधान वाटत नाही. या अतृप्तिमुळे त्यांची मने नेहमी उदास राहतात. ( जाति विखो सेविलेया इंद्रियकाठिन्य निवर्ते : परि अंत:करणाचे काठिन्य न निवर्ते : वि. १९३ ). अनुरूप स्त्रीपुरुषांच्या संभोगसुखातहि ही एक मोठीच उणीव आहे.

## उष्टा विषयोपभोग

दुसरे असे की, विषयोपभोगाची खरी मौज यंत्रारूढ होण्यात नाही.

**१. ' विखो असे म्हणजे भोग्य पदार्थ आति परी भोक्ता विषया नाही : ते का : ना जो पदार्थ जिये काळी जेणेसी जैसा भोगावा ते ज्ञानची नाही : धैर्य नाही जाणतेयाहि हे काळ का ऋतु ' ( वि. स्थ. ९७ ).**

बाह्य हावभावांनी, शृंगारचेष्टांनी, विलासविभ्रमांनी, कलकूजितांनी विश्रंभालापपूर्वक हास्यविनोदांनी एकमेकात रसरूप होऊन जाणे हा विषय-सेवनाचा खरा मार्ग होय. ( विखो तो हावभावीचि भोगो सरे : वि. १९४ ). स्वर्गादि देवलोकातील देवतांच्या विषयोपभोगात ही बाह्य रमणरूपताच विशेष असते. त्यांचा उपभोग मानसिक असतो आणि तोच श्रेष्ठ होय. ( स्वर्गी इंद्रादिकांचा ठाइ विषय मानसिक विखो : वि. मा. ८९ ). एकमेकावर यंत्रारूढ होऊन भोग भोगणे हा हीन विषयोपभोग होय. आणि सामान्यतः सर्वच मनुष्यप्राणी अशा रीतीने उपभोग घेत असल्यामुळे त्यांचा तो भोग देवादिकांना अगदी तुच्छ वाटतो. श्वानशूकरांचा भोग जसा आपणाला हीन प्रतीचा वाटतो तसा आपला यंत्रारूढतेचा भोग देवांना तुच्छ वाटतो. ( जैसा तुम्हा श्वानशूकराचा विखो तैसा इंद्रादिका तुमचा : वि. मा. ९१ ).

यंत्रारूढ होऊन उपभोग घेणे म्हणजे वारंवार उष्टा विषय सेवन करण्यासारखे होय, हा त्यातील आणखी एक दोष आहे. विवाहित पत्नी असली तरी प्रथम संभोगानंतर ती उष्टीच होते. तिचा वारंवार उपभोग घेणे म्हणजे आपल्या थाळ्यातील अन्न एक वेळ जेवून तसेच ठेवणाऱ्या व मग पुनःपुन्हा येऊन तेच अन्न खाणाऱ्या कुत्र्यासारखी ही स्थिति आहे. आणि परस्त्रीचा उपभोग घेणे हे तर त्याहिपेक्षा अधिक उष्टे सेवन करण्यासारखे आहे. कारण ती स्त्री तिच्या पतीने आधीच वारंवार उष्टावलेली असते. स्वतःचे काय किंवा दुसऱ्याचे काय उष्टे अन्न खाणे हे जसे किळसवाणे वाटते तसेच विचारवंताच्या दृष्टीने आपल्या किंवा परस्त्रीचा यंत्रारूढ होऊन वारंवार उपभोग घेणे हे किळस आणण्यासारखे नाही काय ? पण इंद्रियांच्या आधीन होऊन मनुष्यजीव नेहमी तेच करीत असतात हा त्यांचा केवढा अधःपात !

१. '**थाळाचे अन्न जेवीत जेवीता ठेविजे : मग नावा एका पुढती जेवीजे"** तरी हे व्यवस्था यथायुक्त मनुष्याची नव्हे : एवं श्वानदेहीची वर्ते ' ( वि. बं. १९४ )

२. ' जयाचा तेणे उष्टा केलाचि असे : तो आपण सेविलेया दुसरेयाचा उष्टा म्हणौनि अत्यंत उष्टा : म्हणौनि परस्त्री अभिलाष करो नये ' ( सदर ).

## विषयसंबंध त्याज्य, पापरूप व धर्मात अदक्षता

मुळात पापरूप नसलेला पण विवेकी पुरुषांच्या दृष्टीने हीन असलेला असा हा स्त्रीपुरुषसंबंध आचरल्या पुरुषाच्या दृष्टीने सर्वस्वी त्याज्य होय. कारण त्यामुळे तो धर्मभ्रष्ट होतो. ( बाइ : पाप तरि नव्हे : परि धर्मापासौनि ऐसा निर्पौनि काढी : आ. ८ ). दुसऱ्याहि एका अर्थाने असा संबंध पापरूप होय. सर्वश्रेष्ठ परमेश्वरावतार श्रीचक्रधरस्वामींची जाणीव असूनहि अमेध्यतुल्य विषय सेवन करणे हे पापरूपच नव्हे तर काय ? हा एक प्रकारचा नरकच होय. हे निषेधाचरण होय. श्रीकृष्णाच्या मागे त्याच्या सोळा हजार स्त्रिया भिल्लांनी पळवल्या व उपभोगल्या. एक वेळ श्रीकृष्णचक्रवर्तींच्या पत्नी असलेल्यांनी पुढे भिल्लांशी संभोग करावा व मुले व्यावी यापेक्षा त्या स्त्रियांची दुसरी अपकीर्ति ती कोणती ? ( शो. आ. मा. ५५ ). सारांश, श्रीचक्रधरपरमेश्वराची जाणीव असूनहि विषयसंभोगात रममाण होणे हा थोर नरक होय; आणि म्हणून ही क्रिया पापरूपच मानावी लागते. दुसरे असे की, विषयांधतेमुळे पुरुषाकडून अनेक पापे घडतात. त्यांची चाल वाढत वाढत शेवटी नित्यनरकापर्यंत जाऊन पोचते. याहि अर्थाने विषयसंभोग पापरूप आहे. शिवाय विषयाक्रियेमुळें आचरता पुरुष धर्मापासून निरपून काढला जातो. कारण त्यामुळे धर्माचरणाच्या बाबतीत त्याच्या ठिकाणी अदक्षता उत्पन्न होते. म्हणून परमेश्वरस्मरण, अप्राप्तीचे दुःख वगैरे कोणताच आचार त्याला आचरता येत नाही.

## जड-विषयसेवेने अंतराय

स्त्रीसेवनेच्या बाबतीतच नव्हे तर कोणत्याहि जड विषयाच्या म्हणजे उपभोग्य पदार्थांच्या बाबतीतील हा सामान्य नियम आहे की, पुरुष जितका जितका त्याचा अधिकाधिक उपभोग घेईल तितका तितका धर्माचरणात तो दुबळा होतो. ( पुरुषु जेतुल जेतुली विषयसेवा करी तेतुल तेतुला धर्मी निबळ जाय : आ. ७ ). एक किंवा अनेक विषय वारंवार सेवन केल्याने

१. ' श्रीकृष्ण चक्रवर्तीचे अर्धांग पावौनि भिलाची लेकरूवे वीजिती यापरते आणीक एक नरक असती बाई : तैसे श्रीचक्रधर जाणौनि अमेध्यतुल्य विखो सेविजे यापरते आणीक एक नरक असती ' ( आ. स्थ. ८ ).

चढत्या प्रमाणात त्याला दुबळेपणा येतो. जडविषयाच्या सेवनेने मनुष्य प्रमादी होत नाही, पण त्याच्या पुनःसंबंधाला त्यामुळे अंतराय होतो. अर्थात् जडपदार्थांचे सेवन तो जितके जास्त करील तितका त्याला पुनःसंबंध मिळायला अधिक अंतराय पडेल. कारण जडविषयांच्या सेवनेने आचरता पुरुष विहिताचार पाळण्यात अदक्ष होतो व उदासीन राहतो. एखादी विधिरूप क्रिया उपस्थित झाली तर ती करण्याविषयी त्याला इच्छाच होत नाही. इच्छा झाली तरी आळसामुळे ती तावडतोब न करता तो ती पुढे ढकलतो. आणि ती फार वेळ पुढे ढकलली गेली तर आपला साधनदाता परमेश्वर किंवा आपला गुरु रागावेल म्हणून ती केव्हांतरी कशीबशी पार पाडतो. जड विषय सेवनेने धर्माचरणात अदक्षता निर्माण होते ती ही अशी.

## विषयप्रमादियाला सृष्टिशून्य

जडपदार्थांच्या निरंतर सेवनेने जर इतकी अदक्षता येते तर चेतन पदार्थांच्या म्हणजे स्त्रीच्या उपभोगाने व सेवनेने किती येत असेल याची कल्पना करावी ! पौष्टिक पदार्थ खाऊन सहा महिन्यात मल्लाला जी शक्ति येते ती त्याने एकदा विषयसंभोग केल्याने निघून जाते. एखादा ब्रह्मचारी घोडा चुकून एखादे वेळी घोडीवर यंत्रारूढ झाला तर त्याच्या मागच्या पायातील बळ जाते. मागाहून चांगला खुराक दिल्याने त्याला पुन्हा ताकद येते खरी, पण ती पूर्वीइतकी नाही. ( ब्रह्मचारी घोडेयाचा दृष्टांत : ७८ ). तद्वत् एकच वेळ जरी अनुसरलेल्या पुरुषाने स्त्रीसेवन केले तरी तो प्रमादिया होतो. त्याने आतापर्यंत शारीरिक व मानसिक निरोध करून जोडलेली दक्षता व योग्यता ती सर्व जाते ; आणि त्याला ही सृष्टि शून्य होते ( महा. तत्त्व. पा. ४४० ). त्याने उपरति करून अधिकवृत्तीचे आचरण केले तर देह-

१. धर्म म्हणजे चर्या अंतर्बाह्य : निर्बळता म्हणजे अदक्षता : विधि उपस्थित जालेया हाव नुपजे : उपजली तरी करिता आळस : नावा एका करीन म्हणे : ना करिता गोसावी कोपती म्हणौनि करी ' ( आ. स्थ. ७ ).

२. ' मल्लाचे सा मासाचे बळ पोसावणीचे एक वेळ विखो सेवलेया गेले : आन घोड्याचे पाय गेले तेही एकच वेळ अवचटीं सुटला म्हणौनि ··· आन असिकेन जन्में देहदमनें मानसिकें निरोधें जे जोडिली योग्यता दक्षता ते एकेचि वेळे जाय ' ( सदर ).

विद्या, समानवृत्तीचे आचरण केले तर देवतादि फळे होतात हे खरे; पण या सृष्टीत त्याला मोक्ष मात्र मुळीच मिळू शकत नाही. त्यादृष्टीने तो कायमचा दुबळा झाला म्हणायचा. आणि त्याने वारंवार स्त्रीसेवन केले तर त्याला इंद्रियार्थाचे इतर नरक होतात ते वेगळेच. याच कारणासाठी विषयसंबंध त्याज्य होय.

## विषयसंबंध गड्ड्यात घालणारा

जडविषयांच्या सेवेनेहि मनुष्य गड्ड्यात कसा पडतो हे पाहण्यासारखे आहे. आचरत्या पुरुषाने जड विषयाचे का असेनात पण वारंवार उल्लेख केले तर तो विषयाशी रसरूप होऊन व अभिमुख होऊन शेवटी सेवनाहि करतो. जड विषयांचा उपभोग घेतल्याने पुढे त्याला एखाद्या स्त्रीचे दर्शन झाल्यावर तिच्याशी संभाषण वगैरे करून मग त्या स्त्रीचा उपभोग घ्यावासा वाटतो व त्यामुळे तो प्रमादिया होऊन कायमचा खड्ड्यांत पडतो. तेथे त्याला दुःखाशिवाय काहीच मिळत नाही. ( विषयसंबंधमात्रे जिवु काइ गा जातु असे : परि सेवितसांता तिये एकी गडदरा घाली : जेथ काइसेनिही उसंत नाही : आ. ६ ).

विषयाशी निरंतर सन्मुख झाल्याने, अर्थात्‌च, पूर्वी परमेश्वराशी जी सन्मुखता होती ती नाहीशी होते. विषयाशी तो वारंवार सन्मुख होतो हाहि दोषच होय. त्यामुळे त्याला अपकीर्तीचे दुःख भोगावे लागते. स्त्रीच्या विषयाने एकदा पुरुष आंधळा झाला म्हणजे तो वाटेल ती कुत्सित क्रिया करतो. त्या विषयात एकसारखा गुंतून पडतो. त्या विषयसंबंधाने संतति झाल्यास तिच्या मोहपाशात अडकतो. पुढे, स्त्रीच्या व मुलांच्या सुखस्वास्थ्यासाठी धनसंपत्ति गोळा करतो. एकंदर व्यवहारात तो कायमचा गुंततो. आणि विषयप्रमादी बनल्यामुळे पूर्वी अनुसरणकाळी जी आगंतुक व अनारब्ध कर्मे कुंठली होती ती मोकळी होऊन त्यांचा प्रवाह पुन्हा चालू होतो, म्हणजे विषयसेवेने तो कर्मप्रवाहाच्या गुंत्यात देखील गुंतून राहतो. विषयांध होऊन त्याने परस्त्रीचा अभिलाष केला तर त्याची अत्यंत अपकीर्ति होते; क्वचित् त्याचे डोळे काढले जातात. इतकेच नव्हे तर त्याच्या प्राणावरहि

१. ' उल्लेख आवर्तिता उल्लेखासि ये : तो आवर्तिता बाधासि ये : मग स्त्रियेचे दर्शन : स्पर्शन : संभाषण करी ' ( आ. स्थ. ६ ).

घेतते. यापरते दुःख ते कोणते ? एखाद्या वेश्येच्या मागे लागल्याने अपकीर्ति होऊन द्रव्यहि जाते आणि द्रव्य संपताच ती वेश्याहि त्याला सोडून जाते. त्याला रोग झाले किंवा त्याचा हातपाय तुटला तर त्याची शुश्रूषा करायला ती थोडीच राहणार ? अशा अनंत प्रकारांनी विषयी पुरुष खड्ड्यात पडतो. आणि शेवटी नरकाचा वाटेकरी बनतो. म्हणूनच ‘ विखो अनंता तापासि आश्रयो : नरकासि हेतु ’ ( आ. मा. ९७ ) असे म्हटले आहे.

**विषयाचे सामर्थ्य**

अशा या विषयाचे सामर्थ्य अमर्याद आहे आणि म्हणूनच तर त्याचा संपूर्णतया त्याग करण्याची आवश्यकता विशेष आहे. इंद्रिये व मन यांना आपलवणारा म्हणजे मोहून टाकणारा जो जो पदार्थ असेल तो तो विषय होयें. इंद्रियांना रस पुरवणारे मीठ, भाजी वगैरे पदार्थहि विषयातच अंतर्भूत होतात. तथापि प्राधान्याने विषय म्हणजे स्त्रीपुरुषांचा संभोग, हे आपण पाहिले. हा विषय ‘ बापुडा ’ म्हणजे शोच्य, रंक किंवा दीनदुबळा नाही; तर तो समर्थ, सबळ आणि पुरुषार्थसंपन्न असतो. एखाद्या जड किंवा चेतन पदार्थाच्यां ठिकाणी पुरुष पूर्णपणे रममाण झाला म्हणजे तो पदार्थ त्या पुरुषाला ‘ विषय ’ होतो. त्या विषयरूप पदार्थाच्या ठिकाणी इतके सामर्थ्य असते की त्या पुरुषाचे मन तो विषय नेहमी आपल्या सन्मुख दंडायमान ( सतत ) ठेवतो. त्यामुळे तो पुरुष त्या विषयाचे निरंतर स्मरण व निदिध्यसन करतो. त्यासंबंधीचे नानाविध उल्लेख त्याच्या मनात नेहमी एकसारखे येत असतात. त्या पदार्थाच्या दर्शनानेहि त्याला वेध उपजतो, त्याचे सेवन केले तर त्याचे मन शांत होते व इंद्रिये संतुष्ट होतात. कारण त्यापासून त्या इंद्रियांना रस मिळतो; आणि म्हणून पिंडस्था

१. ‘ हा गडदरा सामान्य : थोर तो आणिक : तोचि कैसा : ना तेणे निमित्ते डोळे काढिजति : सीस जाये : देहिका मरणी दुःखाते पावे : दासी धांगड अंगिकरी : मागुते घरा टाकी ऐसे होये : हातपाय जाति ’ ( आ. स्थ. ६ ).

२. ‘ विखो म्हणजे इंद्रिया मनाते आपलविता जेतुला पदार्थ : इंद्रियार्थ रस : मीठभाजी आदिकरूनि ’ ( आ. स्थ. ५ ).

३. ‘ बापुडा म्हणजे शोच्य : दीन : रंक नव्हे : समर्थ : सबळ : पुरुषार्थाचा ’ ( सदर )

पोसल्या जातात. म्हणूनच त्या पदार्थाच्या ठिकाणी इतके सामर्थ्य असते की, त्या पुरुषाला तो विषयपदार्थ नेहमी आपल्या सन्मुख करून ठेवतो. उदा : स्त्रीसेवनामुळे अंतःकरणाला क्षणिक का होईना पण तुष्टिपुष्टि मिळते. म्हणून पुन्हा स्त्री दृष्टीस पडताच किंवा तिच्या नुसत्या स्मरणाने किंवा चिंतनानेहि तो तिच्या सेवेला अभिमुख होतो. त्याची इंद्रिये चाळवली जातात. इतके सामर्थ्य ' विषया ' च्या ठिकाणी आहे.

## सर्वतोमुख विषय

या सामर्थ्यसंपन्न विषयाची व्यापकताहि तशीच आहे. एखादा उपभोग्य पदार्थ प्रत्यक्ष सेवन करणे किंवा स्त्रीशी यंत्रारूढ होऊन तिचा उपभोग घेणे म्हणजेच काही विषय नाही. त्या विषयपदार्थांच्या दर्शनाची आवड असणे, त्याजजवळ जाण्याची, बसण्याची, संभाषण करण्याची, त्याने दिलेले पदार्थ घेण्याची आवड असणे हाहि विषयच होय. महदाइसेने अनुसरणापूर्वी कित्येक वर्षेपर्यंत दादोसाची सेवा केली होती. श्रीचक्रधरस्वामींच्या मते महादाइसेने ही विषयसेवाच केली होती. (' महात्मेयाची सेवा केली ते तुम्ही वीखयाची सेवा केली ' ली. च. उत्त. ५०० ). कारण विषय हा एकमुख नाही. तो एकाच मार्गाने प्रगट होतो असे नाही. तो सर्वतोमुख आहे. त्याची द्वारे अनंत आहेत. तो केव्हां, कुठून, कशा रीतीने प्रगट होईल हे सांगणे कठिण आहे. ( बाइ : विखो तो काइ एकमुख : वीखो तो सर्वतोमुख की : ली. च. उत्त. ५०० )

## आला विखो पाये हाणावा

याचसाठी कोणताहि उपभोग्य पदार्थ दृष्टीस पडला की त्याला लाथाडून टाकावे. ( आला विखो पाये हाणावा : आ. मा. ५८ ). त्याविषयी मनात विकार उद्भवू देऊ नयेत. प्रथमोल्लेख निर्माण झाला तरी पुढील उल्लेख चुकवून त्या पदार्थांची सेवना अवश्य टाळली पाहिजे. नावडत नावडतहि

१. का पा देखिलेया ऐकिलेया वेध उपजत असे : सेविलेया देहा पुष्टि : मना तुष्टि : इंद्रियासि रसु : जिवासी श्रेय होत असे : म्हणौनि बापुडा नव्हे : सेवित साता म्हणजे आवृत्ति सेविलेया मोहरा न करीं : म्हणजे आपुले सन्मुखा करी ' (आ. स्थ. ५)

तो पदार्थ सेवन करू नये. पण तसे केले तर मग तो पदार्थ 'विषय'रूप होऊन राहायला फारसा वेळ लागत नाही. तो त्याला इतका आवडू लागतो की पुढे त्याने त्याचा त्याग करण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी तो सफल होत नाही. त्या विषयाचा त्याग करणे त्या पुरुषाला अशक्य होते. ( नावडतु नावडतु सेवी : तोचि आवडौनि ठाके : मग सांडिताही न संडे : आ. ४ ).

कित्येक पुरुषांची प्रकृतीच अशी असते की त्यांना काही पदार्थ आवडत नाहीत. स्वभावतःच त्यांना त्या पदार्थांची गोडी नसते. कित्येकांना परमेश्वराची आवड उत्पन्न झाल्यामुळे इतर पदार्थांविषयी अरुचि निर्माण होते. काही पुरुष असे असतात की त्यांना पदार्थांची आवड असते, त्यांना ईश्वराविषयी स्वाभाविक प्रेमहि नसते, पण परमेश्वरमार्गावर थोडीफार श्रद्धा असल्यामुळे ते आचारधर्म प्रयत्नपूर्वक पाळण्याची शिकस्त करतात. म्हणून हळूहळू त्यांना इतर पदार्थांची अनावड उत्पन्न होते. या सर्व पुरुषांना पदार्थ पाहताच विकृति उत्पन्न होते. त्यांची इंद्रिये त्या पदार्थांची अरुचि घेतात आणि म्हणून शरीराला त्यांचा कंटाळा वाटतो. अशा पुरुषांनी नावडत नावडत एखाद्या पदार्थाचे चारदोनदा सेवन केले तर त्यांना तोच पदार्थ आवडू लागतो; आणि पुढे असा एक काळ येतो की त्या पदार्थावाचून त्यांचे चालतच नाही. म्हणून अत्यंत श्रेष्ठ अशा वीतरागी आचरत्या पुरुषांनीहि निषिद्ध पदार्थ नावडत नावडतदेखील सेवन करू नयेत. स्त्रियांच्या निरंतर सान्निध्यात राहून आपले इंद्रियदमन करणारा श्रेष्ठ पुरुष म्हणेल की एखाद्या स्त्रीच्या भिडेसाठी आपण एक वेळ तिचा उपभोग घेतला तर आपले वैराग्य थोडेच नष्ट होणार आहे? एकवेळ तिचा उपभोग घेतल्यावर आपण पुन्हा नैष्ठिक ब्रह्मचर्याने राहू. पण हे त्याच्याकडून होणे शक्य नाही.

एखाद्या नवोढेला आधी नवरा आवडत नाही. माहेराहून सासरी जायला ती तयार नसते; तरीहि तिचे आइबाप तिला बळेच पाठवतात.

१. 'नावडे म्हणजे मनास विकृति : इंद्रियासि अरुचि : देहासी कंटाळा: नावडे तीन परी : प्रकृतीसी नावडे : एक प्रयत्ने नावडे : एक ईश्वराचिया आवडी नावडे : मग सेवू आदरी तेव्हेळी तेचि आवडे ऐसे होय' (आ.स्थ.४)

२. 'जैसे प्रथम काळी धाकुटिये कुमारीसि वरैत नावडे : सासुरिया बोळविता रडे : तयाचा अनुभव लाहे : आन तोचि आवडौनि ठाके '(सदर)

त्यावेळी ती रडत रडत नवऱ्याच्या घरी जाते. तेथे पतीच्या सान्निध्यात राहते. त्यामुळे तिला पतीच्या सान्निध्यसुखाची चटक लागते. तसेच एखाद्या पुरुषाला कोणतीच स्त्री आवडत नाही. पण एखाद्या चतुर कामिनीने त्याच्यावर बलात्कार केला तर आधी नावडत नावडत तो तिचा उपभोग घेतो आणि मग हळूहळू त्याला तिच्या ठिकाणी गोडी वाटू लागते. चेतन पदार्थाप्रमाणेच जड पदार्थांचेहि असेच आहे. नावडत नावडत मद्यमांस सेवन करायला सुरवात केली की पुढे त्या पदार्थांचे व्यसनच लागते. इतके की ते सोडण्याचा प्रयत्न केला तरी सुटत नाही.

क्वचित् एखादा जडचेतन पदार्थ नावडीने सेवन करावा लागतो. याला अनेक कारणे घडून येतात. आपण त्या पदार्थाचे सेवन केले तर इतरांना इष्टप्राप्ति होईल या चाडेने; एखाद्या अधिकाऱ्याच्या, श्रीमंत गृहस्थाच्या अथवा सोयऱ्याधायऱ्याच्या भिडेने; क्वचित्, हा पदार्थ आपण सेवन न केला तर लोक आपला घात करतील या भीतीने; एखाद्याने तो पदार्थ चाखलेला असतो, त्याच पुरुषाबरोबर जर आपण तो पदार्थ स्वीकारला नाही तर त्या पहिल्या पुरुषाला दैन्यावस्था येते, त्याची ती दैन्यावस्था चुकवण्यासाठी; तसेच 'उं, हा एवढासा पदार्थ एकदा घेतल्याने आपले काय बिघडणार आहे—आपणाला त्यामुळे सवय थोडीच लागणार आहे ?' या तुच्छतेच्या किंवा अतिविश्वासाच्या भावनेला बळी पडून पुरुष एखाद्या पदार्थाचे नावडत नावडत सेवन सुरू करतो. ते मग इतके वाढते की पुढे तो पूर्णपणे त्याच्या आधीन होतो. मग तो स्वतः तर त्या पदार्थाचा उपभोग घेणे सोडीत नाहीच पण इतरांनी जरी त्याला वारंवार सांगितले तरी सोडीत नाही.

त्या नवोढा स्त्रीला एकदा पतीच्या रतिसुखाची गोडी लागली म्हणजे ती त्यासाठी आईबापांना सोडून राहते, इतर कुणाचीच ती पर्वा करीत

१. 'तैसाच पुरुषासी स्त्रियेचा बलात्कार नावडत नावडत जालेया तोचि विखो आवडौनि ठाके' (आ. वं. ४)

२. 'तरी का सेवी : चाडा : भीडा : दाटलेपणे : पुढीलाचे दैन्य फेडावेया : विरामाचेया अलेखिया सेवी : मग प्रकृति अथवा वासने नावडत होते : अथवा प्रयत्ने ईश्वरीचिया आवडी नावडत होते ते पाठी आवडौनि ठाके' (आ. स्थ. ४).

नाही. त्याप्रमाणे अनुसरलेल्या पुरुषाला ईश्वराच्या प्रेमामुळे, धर्माच्या चाडेमुळें, विरक्तिमुळे व सात्त्विकतेमुळे निषिद्ध पदार्थांचे सेवन मुळीच आवडत नाही. पण वर वर्णन केल्याप्रमाणे नावडत नावडत का होईना तो ते पदार्थ सेवन करू लागला म्हणजे त्याला त्यांच्या ठिकाणी गोडी लागते. त्यामुळे तो आपल्या सत्त्वगुणाची, विरक्तीची, धर्माची, चाडभीड न बाळगता खुशाल त्या जडचेतन पदार्थांच्या सेवनेत रमून जातो. इतकेच काय पण त्यासाठी शेवटी तो परमेश्वराला देखील दूर लोटतो. म्हणून आचरत्या पुरुषाने कोणत्याहि कारणाने नावडत नावडत का होईना पण त्याज्य पदार्थांचे सेवन चुकूनहि करू नये. ते पदार्थ त्याने प्रथमपासूनच लाथाडावेत. तसे न केल्यास तो परमेश्वराला दुरावेल व तो अनधिकारी होईल हे काय सांगायला पाहिजे ?

## विषयपदार्थांचे दर्शन घेऊ नये

यासाठी विषयपदार्थांचे नावडत नावडत सेवन तर काय पण त्यांचे दुरून दर्शन देखील आचरत्या पुरुषाने घेऊ नये. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचेंद्रियांचे पाच विषय आहेत. यांपैकी प्रत्येक विषय मनुष्याला आपलवतो. म्हणून यांपैकी कोणत्याहि विषयाला आचरत्या पुरुषाने साक्षी राहू नये, म्हणजे त्यांच्या जवळ जाऊ नये; इतकेच नाही तर त्या पदार्थांना दृष्टीने पाहू देखील नये. [2] ( विषया साक्षी न ठाकावे : आ. १५ ). उदा : एखाद्या घरी गाणे चालले असेल तर ते ऐकू नये. एखाद्या दुकानात चांगले

१. ' तयाचा अनुभव लाहे आन तोचि आवडौनि ठाके : मग मायबापाते दुरावी : परि जीवे न संडी : तैसे पुरुषास ईश्वरीचिया आवडी : धर्माचेया चाडा : विरामाचेनि पुरतेपणे : सत्वाचेनि लाठे विषयाची नावडी असे : मग सेवित सेविता देवाधर्माते दुरावी : परि विखो न संडे : म्हणजे आपणेया आपण न त्यजे : परि आणिके सांडविता न संडे : तेणेविण गमेचि ना : अनधिकार होऊनि ठाके ' ( आ. स्थ. ४ ).

२. ' विखो म्हणजे पाचा इंद्रियांचा : तोच रस : रूप : गंध : स्पर्श : आलाप : मग मनाते आपलविता जेतुला पदार्थ ... साक्षी म्हणजे जवळिके जाणे : दृष्टी देखणे : ऐकणे : परिमळ घेणे : केलेया सेवनेची वासना उपजे : सेवनेसि टेके : आपजड रिगे : विकत घेऊनि खावे ऐसे उपजे ' ( आ. स्थ. १५ ).

खाद्यपदार्थ ठेवले असतील तर त्या दुकानाजवळून कधी जाऊ नये व ते पदार्थ दृष्टीला पडू देऊ नयेत. कारण, दृष्टीला पडले तर ते सेवन करण्याची वासना त्या आचरत्या पुरुषाच्या मनात उत्पन्न होते व मग तो त्या वासनेशी रसरूप होऊन पुढे लागलीच त्याचे सेवनहि करण्याचा संभव असतो. तो पदार्थ फुकट न मिळाला तर विकत घेऊन खावा किंवा भोगावा असे त्याला वाटते. अशी पदार्थसेवनेची वासना उत्पन्न झाली म्हणजे सामान्यतः सगळ्या आचरत्या पुरुषांना 'विषय' नामक प्रतिकूल देवता बिघ्न संपादन करतात; म्हणजे कोणत्यातरी रीतीने तो पदार्थ त्याला मिळवून देतात. पुरुषांपैकी जो सावध पुरुष असेल तो त्या प्राप्त पदार्थाला पायानें लाथाडून दूर सारतो. असावध असेल तो त्या पदार्थाचे सेवन करतो. तेवढ्यानेहि वासना तृप्त न झाली तर पैसे देऊन तो पदार्थ आणखी विकत घेतो. कारण एकदा तो सेवनेला टेकला की मग देवता पुन्हा त्याला त्या पदार्थाचे संपादकत्व करीत नाहीत.

## सेवनेच्या वासनेबद्दल अयोग्यता

हे सर्वसामान्य आचरत्या पुरुषाविषयी झाले. पण पदार्थदर्शनानंतर सेवनेची वासना उद्भवली तरी (१) नवा त्याग करून विदेशाला निघालेला कोमळ चर्यावंत; (२) बोधामुळे नव्हे तर परमेश्वराच्या वेधामुळे ज्याने त्याग केलेला आहे असा अनुसरलेला; (३) कणवेचा व आभाराचा; आणि (४) दृढ चर्यावंत; या चार पुरुषांना देवता विघ्न संपादन करीत नाहीत. म्हणजे त्या पदार्थांचा व आचरत्या पुरुषाचा योग आपण स्वतः घडवून आणीत नाहीत. सेवनेची वासना निर्माण झाल्यावर या चार पुरुषांनी तो पदार्थ विकत घेऊ म्हटले तर त्यांच्याजवळ पैसाहि नसतो. अर्थात् ते सेवना करीत नाहीत. तथापि सेवनेची वासना केल्याबद्दल त्यांना अयोग्यता मात्र लागते. वेधवंत असून अनुसरलेल्याला ही अयोग्यता लागत नाही; कारण तो ज्ञानी नसतो. नव्या कोमळ चर्यावंताची व कणवेच्या पुरुषाची अयोग्यता परमेश्वर उपसाहतात, पोटात घालतात. आणि दृढ चर्यावंताची अयोग्यता अनुतापाने नष्ट होते. ही अयोग्यता देखील लागू न देण्यासाठी विषयपदार्थांच्या जवळ न जाणे, त्यांचे दर्शनहि न घेणे हाच उत्तम मार्ग होय. सारांश, ज्या ज्या पदार्थांमुळे आपणाला विकाराचा उपद्रव

होण्याचा संभव आहे त्याचा पूर्ण त्याग–असंबंध करणे हेच उचित होय. ( आपणेया उपद्री उठी तेयाचा असंबंधु कीजे: आ. मा. १२ ). ‘ विषया पात्र न होआवे ’ ( आ. ४२ ); ‘ विषयाचा संगु न करावा ’ ( आ. मा. १६३ ); ‘ विषयांची निवृत्ति होआवी ’ ( आ. मा. १३९ ); ‘ विकारु विखो न सेवावा ’ ( आ. मा. २२१ ) इत्यादि वचनात श्रीचक्रधरस्वामींनी जीवोद्धरणाच्या तळमळीने वारंवार केलेल्या आज्ञा आचरत्या पुरुषांनी नेहमी डोळ्यासमोर ठेवून त्यांचे अखंड पालन केले पाहिजे.

## गायन-वादन निषिद्ध

पंचेंद्रियांच्या उपभोग्य विषयामधे गायनवादनाचाहि अंतर्भाव होतो. श्रवणाचा विषय असलेले गायनवादन आचरत्या पुरुषांनी ऐकू नये. कारण तो विषय अंतःकरणाला आपलवणारा असतो. ( गीतु विखो: आ. मा. १७१ ). हरिणाला पकडण्यासाठी ‘ पारधी घाट वाये : साधावया गौरी गाये ’ तो घाट वाजवतो व गौरी प्रकाराचे गाणे म्हणतो. त्या गायनवादनाचे श्रवण करण्यात नादलुब्ध हरिण गुंगून जातो आणि नेमका त्याचमुळे तो पारध्याच्या जाळयात सापडतो आणि शेवटी प्राणाला मुकतो. यावरून दिसून येईल की, गायनवादनासारखा मारक विषय दुसरा कोणताच नाही. म्हणून आचरत्या पुरुषांनी त्याचे श्रवण करू नये. केल्यास त्यामुळे त्यांच्या अंतःकरणात राजस विकार उद्‌भवून ते सत्त्वभ्रष्ट होतील. ‘ सरी विगुंतले चित्त : म्हणौनि मुकला जीवीता : विखो नव्हे मारीता : तेणे पाडे ॥ म्हणौनि गीतध्वनी : यती नाइकावा कानी : रजसंचारे पुरुखा हानी : होए सत्त्वासि ’ ( उद्ध. गी. ३७२; ३७३ ) असे भास्करभट्ट बोरीकरांनी म्हटले आहे ते याचसाठी. दामोदर पंडितांना गाणे म्हणण्याची अतिशय सवय होती. ती लक्षात येताच ‘ पंडिता आजि लागौनि तू गीत गावो नको गा : गोसावी वारीले असे : गीत विखो म्हणौनि ’ ( स्मृ. स्थ. ८९ ) असा नागदेवाचार्यांनी त्यांना प्रतिबंध केला होता तोहि याच कारणामुळे.

१. तथापि, एके दिवशी विजनात पंडितबास अत्यंत निर्वेदपूर्वक गाणे गात असतांना नागदेवाचार्यांनी ते ऐकले. त्यातील निर्वेदामुळे त्यांचेहि अंतःकरण भरून आले. तेव्हां “ पंडिता आजिलागौनि तुज गीत गावेया अनुज्ञा गा : गोसावी म्हणितले असे ‘ ये भिंती विकारू होआवा तरि देमतीये गीत गाता विकारू होआवा ’ [ पुढे

## स्त्री म्हणजे मत्त द्रव्यांचा राजा

पण विकार उत्पन्न करणाऱ्या सगळ्या विषयांचा राजा स्त्री होय. ( स्त्री भणिजे मत्त द्रव्याचा रावो गा : आ. ९ ). त्यामुळे तिचा असंबंध करण्याची आचरत्या पुरुषाने विशेष दक्षता बाळगली पाहिजे. स्त्रीसेवनेने अनुसरलेला पुरुष धर्मापासून लौकर निरपून काढला जातो याचे कारण हे की स्त्री हा उन्मत्त करणारा पदार्थ आहे, नव्हे उन्मत्त करणाऱ्या सर्व पदार्थांत ती श्रेष्ठ होय. स्त्री म्हणजेच उन्मत्त करणाऱ्या द्रव्यांचा राजा. उन्मत्त करणाऱ्या द्रव्याच्या सेवनेने मनुष्य माजतो, त्यामुळे तो धर्म विसरतो, अदक्ष होतो. इतकेच नाही तर तो निषिद्धाचरणहि करतो. स्त्रीच्या तर नुसत्या दर्शनानेहि पुरुषाला उन्माद चढतो. उन्मत्त करणारी इतर द्रव्ये प्रत्यक्ष सेवन केली तरच माज आणतात; पण स्त्री नुसत्या दर्शनाने माज आणते. ( आणिके द्रव्ये सेविलेया माजवीति : स्त्री दर्शनमात्रेचि माजवी : आ. ९ ). जी नुसत्या दुरून झालेल्या लवमात्र दर्शनाने माज आणते तिचे संपूर्ण दर्शन झाले तर ती किती माज आणील ! नुसत्या दर्शनाने माजवणारी स्त्री आपल्या संभाषणाने व त्याहिपेक्षा आपल्या स्पर्शाने मनुष्याला अतिशय उन्मत्त करून सोडीत असेल यात शंकाच नाही.

तशात, स्त्रियांच्या ठिकाणी पुरुषापेक्षा आठ पटींनी अधिक तीव्र कामवासना असते. ( स्त्रियासि अष्टगुण कामु : वि. १९९ ). स्त्री आपणहून उपभोगाला सहसा प्रवृत्त होत नाही; पण एकदा जर ती प्रवृत्त झाली तर मग काहीहि झाले तरी आपली कामवासना तृप्त करून घेतल्यावाचून त्यापासून ती निवृत्त होत नाही. ( स्त्री सहसा प्रवर्ते ना : प्रवर्तली तरी निवर्ते ना : वि. १९८ ). आपल्या कामपूर्तीसाठी मग ती ब्राह्मणाची मुलगी असली तरी आईबापाची, कुळाची किंवा जनतेची किंचित् देखील लाज-

चालू. ] यैसी श्रुति उच्चारूनि भटोबासी अनुज्ञा दीधली " ( स्मृ. स्थ. ९० ). अर्थात्, गाणे म्हटल्याने किंवा ऐकल्याने ज्यांच्या ठिकाणी विकार उद्भवणार नाही अशा अत्यंत दृढ चर्यावंतांना निर्वेदपर गाणी म्हणायला व ऐकायला आचार्यांनी सवलत दिली आहे, असे दिसून येईल.

१. ' दर्शनमात्रे माजवी ते संपूर्ण दर्शने कैसी जिवू देईल ते नेणिजे… न देखता नुसते स्पर्शेंच माजवी ते बोलल्या बोलविल्या कैसे न माजवी ' ( आ. स्थ. ९ ).

लज्जा न बाळगता खुशाल एखाद्या कोळयाचे घर निघायला ती कमी करीत नाही. ( दीक्षीतकन्येचा दृष्टांत. ५२ ). स्त्री नुसती कामुकच असते असे नाही तर ती अविद्यात्मकहि असते. ( स्त्रिया अविद्यात्मका : वि. २०० ). त्यामुळे तिच्या ठिकाणी एकप्रकारचा लागटपणा किंवा लोभीपणा निर्माण होतो. या गुणामुळेच ती आपल्या जवळील जडचेतन पदार्थ हातचे जाऊ देत नाही. आपल्या पुरुषाला ती सोडीत नाही आणि दुसऱ्याच्या स्वाधीन होऊ देत नाही. ती स्वभावाने अतिशय आग्रही किंवा हट्टी असते ( स्त्रियांचा स्वरूपी आग्रहो एकु आति : वि. २०१ ). राजहट्ट आणि बालहट्ट याप्रमाणे स्त्रीहट्टहि पुरुषाला पुरवावाच लागतो, याचे मुख्य कारण तिचा हा स्वभावधर्म होय. यामुळेच कधीकधी तिच्या नवऱ्याच्या प्राणावरहि बेतते. सीतेच्या कांचनमृगाच्या हट्टामुळे रामाला संकटात पडावेच लागले की नाही ? महादेव नावाच्या[1] आदिभैरव विद्यावंताने आपल्या स्त्रीच्या आत्यंतिक हट्टामुळे तिला विद्या दिली. पण त्या विद्येच्या भरात तिने त्यालाच ठार मारले. विद्याभर निघून जाताच मात्र ती पतीबद्दल शोक करू लागली. हा निरर्थक हट्टाचाच परिणाम नव्हे तर काय ? हट्टाप्रमाणेच कपट करणे हाहि स्त्रीचा स्वभाव आहे. ( स्त्रियांचा स्वरूपी कपट एक आत : शो. वि. ३२; ली. च. उत्त. ४२२ ). या अनेक दोषसमुच्चयामुळेच ' हे कपटाची कसवटी : अनृत्याची माहावटी : ना हे उकलली पुटी : क्रोध–भुजंगाची ।। हे पापाची उत्तरवेठ : नरकाची राजवाट : मुक्तिचे वज्रकपाट : कामिनी हे '( उद्ध.गी.७५५,७५६ ) असे उद्धवगीतेत म्हटले आहे.

## राजस विकारवंत

स्त्रीचे दर्शन झाल्याबरोबर पुरुष उन्मत्त होत असल्यामुळे पुढे तिच्या प्राप्तीसाठी व उपभोगासाठी तो नाना पातके करून शेवटी प्राणावरहि संकट ओढवून घेतो. दिव्याची ज्योत पाहताच पतंगाला रजोगुणाचा उन्माद

1. ' आन आदि महादेवी ''' तरि आदि म्हणजे आठातुले महादेव : तयाची विद्या भ्रतारास होती : ते आग्रह घेऊनि तयाचीयें स्त्रिये मागितली : आन विद्येचे भरते आलेया आपुला पुरुष वधिला : मग भरते गेलेया प्रिय प्रिय करौनि रडो लागली ' ( वि. वं. २०१ ).

चढून तो तिच्यावर एकदम झडप घालतो आणि त्यातच त्याचा मृत्यु होतो. 'अन्यथाज्ञानालागी : वरि घालिजे पतंगी : आगिचिया झीगिमीगि : देखौनिया' ( उद्ध. गी. ३४० ). एवढा धडधाकट व बलसंपन्न हत्ति, पण तो हत्तिणीबरोबर रममाण होत असतांना इतका दुबळा होतो की त्यावेळी त्याजवर कितीहि घाव केले तरी ते तो मुकाट्याने सहन करतो व त्यामुळे शेवटी तो प्राणालाहि मुकतो. 'जगी अदट्ट : गजराजु तो ।। तो जुझारा गडे : पाइ भारशांखळ काढे : तोहि करणिये पडे : तरि घाओ न धरी' ( उद्ध. गी. ३५९ ). स्त्रियांच्या स्वरूपसौंदर्यांच्या, विलासविभ्रमांच्या, कटाक्ष-प्रक्षेपांच्या जाळ्यात पुरुष गोवला गेला म्हणजे त्याचीहि अशीच स्थिति होते. आचरता पुरुष अशा परिस्थितीत भ्रष्ट झाल्यावाचून राहणे शक्य आहे काय ? 'म्हणौनि स्त्रियांचीया संगति : नाही उर्द्ध गति : न पारुखे संसृति : येणे जाणे ।। तैसा स्त्रियांचा संगु : करिता पुरुषा होए सत्वा भंगु' ( उद्ध. गी. ३४६; ३४७ ) असे भास्करभट्ट बोरीकर यांनी म्हटले आहे ते याच अर्थाने.

### श्रीकृष्णपुत्रांचे उदाहरण

द्वापर युगासारख्या सात्त्विक युगात, श्रेष्ठ मनुष्यदेहात, त्यातहि पर-मेश्वरावतार श्रीकृष्ण याची मुले यांनी श्रीकृष्णचक्रवर्तींची आज्ञा भंग करून नुसते मद्य घेतले तर त्यामुळे ते आपापसात लढून मरण पावले. हा साध्या मद्याचा प्रभाव; तर उन्मत्त करणाऱ्या द्रव्यांचा राजा जी स्त्री तिच्या सेवनाने केवढा मोठा घात होत असेल? त्यातहि कलियुगासारख्या हीन युगात पापरूप रजतमांनी ग्रासलेल्या पुरुषांनी जर स्त्रीसेवन केले तर त्यांच्या हातून अन-र्थांचे डोंगर होतील ! स्त्रीसेवनाने पुरुष अनेकांची वर्मे काढून त्यांना दुरुत्तरे करण्याला कमी करीत नाही; कित्येकांना तो निष्कारण उपसर्ग पोच-वितो; काहींचा अतिशय द्वेष करतो, प्रसंगी त्या स्त्रीसेवनापायी तो प्रतिकूल

१. 'द्वापरा सारखे युग : मनुष्यदेह सात्त्विकः गोसावियांचे कुमर : धायरे सोयरे : श्रीमुखीचे निरोपण कानी पडले ··· आन तेवेळीसीचि मत्तद्रव्य न सेवा गा म्हणितले : ऐसा एकी मत्तद्रव्य सेविले की तेणे असीका गोत्रा वध जाला : ऐकमेका जुंझौनि मेले : मग आता हीन युग : आन आताची मनुष्यदेहे हीने : पापरूपे : रजतमे ग्रासिली : आन मत्त द्रव्याचा राओ स्त्री सेविती त्यास केसना गोत्रवध घडेल' ( आ. स्थ. ६ ).

पुरुषांचा वध करायलहि मागेपुढे पाहत नाही. यामुळे तो अनंत दुःखांचा व नरकांचा धनी होतो. म्हणूनच 'विखो अनंता तापासि आश्रयो : नरकासि हेतु ' ( आ. मा. ९७ ) असे जे म्हटले आहे ते अगदी यथार्थ आहे. यासाठी आचरत्या पुरुषाने स्त्रीचे सेवनच नव्हे तर दर्शनहि चुकवावे. ते चुकवण्यासाठी जिथे कधी स्त्रीचा संपर्कसुद्धा लागणार नाही अशा अरण्याचा आश्रय करणेच योग्य आहे.

## ऋष्यशृंगाचे उदाहरण

स्त्रीच्या अगदी प्रथम दर्शनानेहि मनुष्याला विकार होऊन तो सत्त्वभ्रष्ट कसा होतो हे ऋष्यशृंगाच्या उदाहरणावरून चांगले लक्ष्यात येते. ( उद्ध. गी. ४१५ ते ४६६ पहा ). ऋष्यशृंग हा विभांडक ऋषीचा मुलगा होता. विभांडक ऋषीने त्याला जनसंमर्दापासून दूर एका सरोवरातील बेटावर पर्णकुटिका बांधून तपश्चर्येसाठी ठेवले होते. अगदी लहानपणापासून त्याला त्याने कोणत्याहि स्त्रीचे दर्शन होऊ दिले नाही. त्यामुळे स्त्री आणि पुरुष असा भेदहि त्याला ठाऊक नव्हता. पुढे दशरथांच्या राज्यात अवर्षण पडल्यामुळे पर्जन्यवृष्टि व्हावी या हेतूने दशरथाने यज्ञ करण्याचा विचार केला. त्यासाठी अत्यंत वीतरागी तपस्व्याची आवश्यकता होती. ऋष्यशृंगाकडूनच यज्ञ पार पाडावा असे सर्वांनी ठरवले. पण जनसंमर्दापासून दूर असलेल्या ऋष्यशृंगाला आणायचे कसे? ती जबाबदारी अयोध्येतील पात्रकळिका नावाच्या वेश्येने आपणाकडे घेतली. आपल्या अतिसुंदर आणि विलासचतुर अशा सखिजनासह, विभांडक ऋषीच्या अनुपस्थितीत ती ऋष्यशृंग ज्या बेटावर राहत होता तिथे गेली. तिथे तिने आपल्या नानाविध विलासांनी आणि नृत्यगायनादि क्रीडांनी त्याचे मन इतके वेधून घेतले की शेवटी ऋष्यशृंग पात्रकळिकेच्या पूर्णपणे स्वाधीन झाला. आणि तिच्या मागोमाग तो सहज अयोध्येत निघून आला. पूर्वी ज्याने स्त्री कधीहि पाहिली नव्हती अशा वीतरागी ऋष्यशृंगाची स्त्रीच्या पहिल्या भेटीत ही दशा झाली. ( ऋष्यशृंग स्त्रीपुरुषू ऐसा विभागुही नेणे : परि संबंधे पोराचे

१. ' एकाची वर्म बोलैल : एकासि नव्हते उपसर्ग रचैल : एकाचा कखावो भोगील : तो नित्यनरका कैसा न वचे ' ( आ. स्थ. ९७ ).

चैतन्य वेधले : आ. मा. १३ ). यावरून आचरत्या पुरुषांनी स्त्रियांचा संबंध टाळणे किती आवश्यक आहे हे कळून येईल.

## चित्रीची स्त्री न पहावी

याचसाठी स्त्रियांची चित्रेदेखील पाहू नयेत अशी आज्ञा श्रीचक्रधरस्वामींनी केलेली आहे. ( चित्रीची स्त्री न पाहावी : आ. १० ). सामान्यतः चित्रात चितारलेल्या स्त्रिया कोणीहि असल्या तरी त्या वस्त्रालंकारांनी, अवयवांच्या रेखीवपणाने, त्यांच्या चेहेऱ्यावरील भावप्रदर्शनाने व तारुण्याने अतिशय सुंदर व विकारी दिसतात. त्यांना पाहूनहि पुरुषाच्या मनात विषयवासना निर्माण होतेच. मग त्या स्त्रिया देवांगना असोत, कुंती रुक्मिणीसारख्या भक्त असोत किंवा राक्षसिणी असोत. त्यांच्या चित्रातील दर्शनानेहि विकार उद्भवतोच. पाहणारा पुरुष त्या विकाराशी रसरूपदेखील होतो. त्यामुळे स्त्रीसंभोगाची तीव्र इच्छा त्याच्या मनात उत्पन्न होऊन तो पात्र शोधायला लागतो. महा प्रयास पडले तरी या ना त्या रीतीने पात्र मिळवून त्या पात्राशी तो विषयसंबंध करतोच. स्त्रियांच्या नुसत्या चित्रात–सुद्धा इतके माजवण भरलेले असते! ‘ तैसा प्रमदाचा भडखंबा : पुताळियेचेनि मिसे कीजे उभा : तोहि खोची जिवाचा गाभा : देखतखेवो’( उद्ध.गी. ६० ). आणि म्हणूनच आचरत्या पुरुषांनी स्त्रियांची चित्रेहि पाहण्याचे टाळणे अत्यंत श्रेयस्कर होय.

तथापि, आचरत्या पुरुषांनी मार्गातील स्त्रियाशी सगळे व्यवहार बंद ठेवावे असा मात्र याचा अर्थ नाही. पण जेवढ्यास तेवढ्या प्रमाणात. प्रत्यक्ष धर्मकार्याव्यतिरिक्त स्त्रीवर्गाशी त्यांनी संबंध ठेवता कामा नये. ठेवला तर तो त्यांना विघातक होईल. तो पाहून जर लोक भकू लागले तर त्या निंदकांनाहि अनिष्ट उपजेल; इतर पंथातील लोक परमेश्वरमार्गातील लोकांना नष्टभ्रष्ट म्हणतील; त्यामुळे त्यांना पाप लागेल व त्याला आपण निमित्त झाल्यामुळे आपणालाहि पाप लागेल. यासाठी धर्मकार्याव्यतिरिक्त मार्गातील पुरुषाने स्त्रीशी व स्त्रीने पुरुषाशी दर्शन,स्पर्श,संभाषण वगैरे करता कामा नये.

१. ‘ चित्र ते मनुष्यापासि बरवे : अवयवशुद्ध : वस्त्र : अलंकार : भाव : तारुण्य : ऐसे जरी मनुष्य तरी कायी म्हणावे असे : चित्रीची स्त्री भीतरील मनोधर्मवास ’ ( आ. स्थ. १० ).

## ‘विषया’च्या आसनावरहि बसू नये

विकाराचा संपर्क टाळण्याच्या दृष्टीने आचरत्या पुरुषांनी ‘विषया’च्या म्हणजे विषयी व्यक्तीच्या एका आसनावर देखील बसण्याचे टाळावे. (विषयाचिये एकासनी न बैसावें : आ. १४ ). सामान्यतः कलियुगातील सगळेच पुरुष ‘विषयाराम’ म्हणजे विषयोपभोगात रममाण होणारे आहेत. त्या सर्वांना विषया ( विषयी ) शब्द लावणे योग्य होणार नाही. सर्वसाधारण--व्यवस्थेप्रमाणे वाजवी प्रमाणात विषयसेवन करणारे ते साधारण पुरुष होत. ते विषया नव्हेत. पण साधारण व्यवस्था उल्लंघून वाजवीपेक्षा जास्त प्रमाणात विषयोपभोग घेणारे पुरुष मात्र विषया[1] होत. त्यांचे तीन प्रकार आहेत. ज्यांच्या अंतःकरणात विषयोपभोगाची वासना निरंतर जागृत असते व जे बाह्य जडचेतन पदार्थांचाहि उपभोग पुष्कळ घेतात ते श्रेष्ठ विषया होत. मनातील वासना जरा कमी पण बाह्य पदार्थांचा उपभोग जास्त घेतात ते मध्यम विषया; आणि ज्यांच्या मनात विषयोपभोगाची वासना फार पण (मिळत नसल्यामुळे)बाह्य विषय पदार्थांचा उपभोग थोडा घेणारे ते कनिष्ठ विषया-पुरुष[2]. या तिन्ही प्रकारच्या विषयी पुरुषांच्या एकासनावर आचरत्या पुरुषाने, फार काय पण वासनिकानेसुद्धा बसू नये.

## आसनांचे तीन प्रकार

आसनांचेहि तीन प्रकार आहेत. घोंगडी, सतरंजी व लाकडी फळी. पैकी, घोंगडीच्या एकासनावर बसल्याने सगळ्यात जास्त दोष; त्यापेक्षा सतरंजीवर बसल्याने कमी; आणि लाकडी फळीच्या एकासनावर बसल्याने कनिष्ठ दोष लागतो. त्यातहि एकासनावर बसणे म्हणजे एकमेकांच्या हातापायांचा स्पर्श होईल इतक्या जवळ बसणे, हे अगदी त्याज्य. एक गुडघा मोडून व दुसरा उभा करून अर्ध्यासनावर उपट बसणे म्हणजे किंचित् दूरांतरावर बसणे, हा दुसरा प्रकार; आणि तिसरा प्रकार म्हणजे

१. ‘ विषया साधारण व्यवहाराते अतिक्रमौनि वर्ते तो : वाचौनि विखो सेवी तो नव्हे ’ ( आ. स्थ. १४ ).

२. ‘ तोचि त्रिविध : अंतरवासना आन बाह्य तो उत्तम : पदार्थ तो मध्यम : वासना तो कनीयस ’ ( सदर ).

आसनाच्या अगदी शेवटी बसणे. यापैकी कोणत्याहि रीतीने कोणत्याहि आसनावर विषयी पुरुषाबरोबर बसणे त्याज्य होय. एकासनावर बसून त्याच्याशी गोष्टी, आलाप वगैरे तर मुळीच करू नये. तसे केल्याने त्याचे हावभाव, विषयप्रीति वगैरे आपल्या ठिकाणी उतरण्याचा संभव असतो. तसे झाल्यास त्यामुळे आपल्या धर्माचरणाला हानी होईल.

व्यवहारात आचरत्या पुरुषांचा विषयी पुरुषाशी अनेक रीतींनी संबंध येण्याचा संभव असतो. उदाः प्रसंगी अशा विषयी वैद्याकडून औषधी वगैरे आणण्यासाठी त्याच्या घरी जावे लागते. किंवा, रोगी भिक्षुकाला पाहण्यासाठी तो विषयी वैद्यच त्याच्या घरी येतो. त्यावेळी लौकिकाचार म्हणून आसन घालून त्याला त्यावर बसवून आपणालाहि त्याजबरोबर बसण्याचा प्रसंग येतो. अशा वेळी त्याच्या एकासनावर बसण्याचे आचरत्या पुरुषाने मोठ्या कौशल्याने टाळले पाहिजे. वाजवीपेक्षा जास्त प्रमाणात शास्त्राभ्यासात रंगून गेलेला—आणि त्यामुळे नित्यनैमित्तिक विधि विसरणारा, परमेश्वराला विसरणारा-पुरुषहि विषयाच होय. ( हा गा हे तुम्हा विषयत्वेंचि लागौनि ठाकले मा : वि. २३६). त्याच्याहि एकासनावर बसण्याचे कोमळ ज्ञानियांनी टाळले पाहिजे. कनिष्ठ पुरुषाचे म्हणजे बोधवंताचे एकासन श्रेष्ठ पुरुषाने केले तर त्याच्या देखोवेखी हा श्रेष्ठ पुरुष मलिन होण्याचा संभव असतो. म्हणून श्रेष्ठ पुरुषाने कनिष्ठ पुरुषाच्या व कनिष्ठ पुरुषाने श्रेष्ठ पुरुषाच्या एकासनावर बसणे व वार्तालाप करणे हे कोणत्याहि दृष्टीने इष्ट नाही.

## विषयप्रमादियाचे एकासन त्याज्य

त्याचप्रमाणे अनुसरणानंतर विषयप्रमादी बनलेला ज्ञानी हाहि एका दृष्टीने विषयाच होय. त्याच्याहि एकासनावर आचरत्या पुरुषाने बसू नये. तशात विषयप्रमादिया असूनहि अतिरिक्त विषयसेवनाने तो अक्षरशः विषयीच बनला असेल तर त्याचा संपर्क टाळणे हेच इष्ट होय. मग त्याच्या एकासनावर बसून त्याच्याशी संभाषण वगैरे करणे तर दूरच राहिले.

१. ' आसनाचे तीन भेद : एकी घोंगड्यावरी : एकी जाडी सतरंजीएवरी : एकी लाकूड चिन्यावरी : घोंगडी थोर दोष : त्याहुनी जाडी साना : त्याहुनि लाकूडचिरा साना : घोंगडा तीन भेद : एक हातपाव लागे तैसे बैसणे : एक अर्धासनीचे उपट बैसणे : एक सेवटी '(आ. स्थ. १४).

शा विषयी विषयप्रमादियाइतका उपरतप्रमादिया मात्र त्याज्य नव्हे. सामान्यतः जातिचांडाळापेक्षा कर्मचांडाळ त्याज्य असतो. हा कर्मचांडाळ अतिशय कर्मनिष्ठ असल्यामुळे जातिचांडाळ देखील त्याच्या रस्त्यातून दूर होतात. कर्मचांडाळ म्हणजे जो जन्माने उत्तम वर्णाचा असूनहि हीन वर्णाच्या स्त्रीशी संभोग करून विटाळला तो. त्याच्या पंक्तीत जातिचांडाळ पुरुष देखील बसत नाहीत. मग इतरांची गोष्टच नको. त्याप्रमाणे आधीच विषयी पुरुषांना टाळणारे वासनिक हे विषयी विषयप्रमादियाच्या एकासनावर कधीच बसणार नाहीत; मग अनुसलेले पुरुष कुठले बसायला?

## पूर्वपरिचितांचे एकासन टाळावे

क्वचित् असे होते की, कर्मराहाटीत असतांना आपल्या ओळखीचे असलेले मित्रस्नेही वगैरे हेहि आपणाप्रमाणेच परमेश्वराला अनुसरतात. अशा अनुसरलेल्या पूर्व परिचितांच्या एकासनावर बसण्याचा व त्यांच्याशी वार्तालाप करण्याचा योग आला तर तोहि टाळावा. कारण, त्यांच्याशी वार्तालाप करतांना आपणाकडून त्यांची कर्मराहाटीची वर्मे वगैरे काढली जाण्याचा संभव असतो. ते पुरुष आता ज्ञानिये झालेले असल्यामुळे त्यांची वर्मे काढून त्यांचे अंतःकरण दुखवल्याने आपणाला अतिशय अयोग्यता लागण्याचा संभव असतो. तसेच त्यांच्याकडून आपली वर्मे काढली जाऊन आपण दुःखित होण्याचा व त्या कारणाने त्यांना अयोग्यता लागण्याचा संभव असतो. म्हणून त्यांच्या एकासनावर बसण्याचे आचरत्या पुरुषांनी अवश्य टाळले पाहिजे.

## जगात विषयवीर नाहीत

आचरता पुरुष परमेश्वराला शरण गेलेला असला तरी त्याला देवता विघ्न करू शकतात याचे कारण हेच की त्याच्या ठिकाणी 'विषयवीरत्व' नसते;

१. **'विषयाचीये एकासनी न बैसावे : का पा : विषयी म्हणजे कर्मचांडाळ : तरि कर्मचांडाळाचियें पांती जातिचांडाळ न बसती ··· तरी ब्राह्मण कैसे बैसती : तैसे विषयाचिये पांति वासनिक न बैसती ··· तरी अनुसरले ते काई बैसती'** (आ. स्थ. १४).

२. **'मागिली पदनाचे : राउळींविहिळींचे : लवेलागणीचे : स्नेहउपकाराचे भेटले तरि बैसका पडो नेदावी'** (सदर).

आणि त्याच्या विषयी देवतांना मत्सर वाटत असतो. तेव्हां या विषयनामक देवतांचा मत्सर नाहीसा करून त्यांचे विघ्न टाळण्यासाठी आचरत्या पुरुषाने विषयवीर व्हावे हाच उत्तम मार्ग आहे. या जगात 'नरवीर' पुष्कळच आहेत पण 'विषयवीर' मात्र नाहीत. मुळीच नाहीत असे नाही. विषयवीरहि आहेत. पण ते अगदीच विरळा. कारण विषयवीर नसते तर ते उद्धरले कसे गेले असते? नरवीर म्हणजे शूर पुरुष. अंतःकरणात शौर्य असून शूरत्वाचा बाह्य आचार करणारा तो उत्तम नरवीर. तो शत्रूचा पराभव करून आपले स्वतःचेहि मोठ्या कौशल्याने रक्षण करतो. कित्येक नरवीर स्वतःचे रक्षण करू शकतात पण शत्रूचा पराभव करू शकत नाहीत, ते मध्यम नरवीर. आणि काही तर शत्रूच्या आपण हाती लागू नये म्हणून त्याला झुकांडी देऊन लपून बसतात ते कनिष्ठ वीर होत. त्याचप्रमाणे अंतःकरणात विषयाविषयी पूर्णपणे विरक्ति असून बाह्याचरण करण्यात म्हणजे आचारधर्म पाळण्यात जो निपुण असतो तो उत्तम विषयवीर होय. तो स्वग्रामादिकांचा त्याग करून अटण करीत असतांना त्याला क्वचित् भेटीच्या निमित्ताने किंवा शुश्रूषेच्या निमित्ताने जड-चेतन विषयांची जवळीक झाली तरी त्यांच्या सान्निध्यातहि तो त्या विषयांची शारीरिकच नव्हे पण मानसिकहि सेवा करीत नाही. उत्तम विषयवीर असतो तो हा असा. जडचेतन पदार्थाविषयी मानसिक उल्लेख उपजले तरी त्यांचे सेवन चुकवणारा तो मध्यम विषयवीर आणि जडचेतनांचा संपर्क टाळण्यासाठी गिरिकंदरात जाऊन लपून बसणारा तो कनिष्ठ विषयवीर. या तिन्ही प्रकारचे विषयवीर फार थोडे आढळतात. नरवीर मात्र पुष्कळ आढळतात.

सामान्यतः जे नरवीर असतात ते विषयवीर नसतात. अनेक शत्रूंना धूळ चारणारा सेनापति बहुधा स्त्रियांच्या दृष्टिक्षेपांनीहि घायाळ होऊन तिच्या पायाशी शरण जातो. वियवीर असतात तेहि नरवीर नसतात. नरवीर असूनहि विषयवीर असलेला भीष्माचार्यासारखा अलौकिक पुरुष

१. 'वीर म्हणजे अंतरी शौर्य : बाह्यबल संबंधी असौनि शारीर मानसिक सेवा न करी तो उत्तमवीर : कार्य सवरी तो मध्यम : भेणे दकुंटा रिगे तो कनीयस :' (आ. स्थ. १७).

२. 'विषयवीर म्हणजे इंद्रियाते दळवटी : उमस वेवो नेदी : मन विषयाकडे जावो नेदी : तो विषयवीर : हा विरळा' (आ. स्थ. १७).

विरळाच. त्रेतायुगापासून तो आतापर्यंत नरवीर पुष्कळ झाले, पण विषयवीर फार थोडे झाले. आणि नरवीर असूनहि विषयवीर असलेले पुरुष तर अगदीच विरळा झाले.

## धर्मनष्ट आहेत पण विषयनष्ट नाहीत

'धर्मनष्ट' म्हणजे विषयोपभोगासाठी जातिकुळाला कलंक लावणारा व आपले धर्मकर्म बुडवणारा. उदा: एखादा ब्राह्मण निर्लज्ज होऊन महारिणीचा उपभोग घ्यायला लागला तर तोहि दीक्षितकन्येप्रमाणे धर्मनष्टच म्हणायचा. उलट ईश्वरप्राप्तीसाठी आपले विषयोपभोग सोडणारा पुरुष 'विषयनष्ट' होय. आज जगात धर्मनष्ट पुरुष पुष्कळ आढळतात; पण विषयनष्ट पुरुष मात्र विरळाचे. (धर्मनष्टु आति परि विषयनष्टु नाहीः आ. १८ ).

विषवीर पुरुष विषय नाहीसा करतो तो दोन रीतींनी. एक तर तो मनातील विषयरूप उल्लेख मोडून काढतो. विवेकाने त्यांना तो रसरूप होऊच देत नाही; म्हणजेच तो 'विषयाते नासी'! आणि दुसरा प्रकार म्हणजे परमेश्वराप्रीत्यर्थ दुःख करून शरीर कृश करून तो शोच्यत्व, रंकत्व, मलीनत्व व कुचैलधारकत्व इतके बाणवतो की त्याला पाहून स्त्रीच्या ठिकाणी रजोविकार उद्‌भवतच नाही. उलट तिला त्याची शिसारी येते. त्याला पाहून ती थुंकते. हा पुरुष म्हणजे 'विषयासी नासलो.' उदा: केसोबास प्रथम एका गावी एका देवळात गेले तेव्हां त्यांच्यावर भाळून एक स्त्री त्यांच्याकडे रजोवासनेने आली. त्यावेळी केसोबासांनी तिला युक्तीने टाळले. पुढे त्यांनी परमेश्वराप्रीत्यर्थ आचार आचरून आपले शरीर इतके कृश केले की दुसऱ्यांदा जेव्हां ते आपणहून त्याच बाईच्या घरी गेले तेव्हां त्यांना पाहताच तिला त्यांची शिसारी येऊन ती थुंकली ( स्मृ. स्थ. १०६ )

१. धर्मनष्ट म्हणजे कर्म सांडिले : जातिकूळ बुडविले : महारी चांभारीसी पडला : यथा कर्मचांडाळ : दीक्षितकन्या : विषयाचेया चाडा धर्माचे नष्टत्व करीते असती : परी ईश्वराचेया चाडा विषयाचे नष्टत्व करीते नाही ' (आ. स्थ. १८ ).

२. ' विषयनष्ट म्हणजे विषयाते नासी : आन विषयासि नासला : ते शोच्यत्व : ते रंकत्व : ते मलिनत्व : ते कुचिळत्व देखौनि विखो थुंकौनि परता पळे तो विषयनष्ट ' ( सदर ).

विषयनष्ट पुरुषांनी, अर्थात् परमेश्वरप्रातिसाठी विकारशून्य होऊ इच्छिणाऱ्या सर्व आचरत्या पुरुषांनी या दोन्ही रीतींनी विषयांचा नाश केला पाहिजे. विषयवीराचे वैशिष्ट्य स्त्रीसान्निध्यात देखील रसरूप उल्लेख होऊ न देण्यात आहे, तर विषयनष्टाचे वैशिष्ट्य आपणाला पाहून इतरांना विषयवासना निर्माण होऊ न देण्यात आहे. इतके कडकडीत वैराग्य अनुसरलेल्यांनी करावयाला पाहिजे.

## विषयत्यागासाठी जनसंबंध त्याज्य

सर्वसंगपरित्याग करून अनुसरलेल्या आचरत्या पुरुषाने विषयत्यागासाठी जनसंबंधाचा पूर्णपणे त्याग करणेच इष्ट होय. त्याने लोकाजवळ आपले श्रेष्ठत्व किंवा नष्टत्व आपण कधीच प्रगट करू नये. प्रगट केले तर लोक क्वचित् त्याच्यावर संतुष्ट होण्याचा किंवा क्वचित् रुष्ट होण्याचा संभव असतो. ह्या दोन्ही क्रिया त्याला विघ्नरूपच आहेत. म्हणून त्याने जनसंपर्क पूर्णपणे टाळावा हाच श्रेयस्कर मार्ग आहे. आपल्या नित्यनैमित्तिक क्रिया आचरत असतांना देखील लोकांचा तोषरोष त्याने ओढवून घेऊ नये. (तुष्टला जनु तरि विखो संपादील : रुसला तरी प्राणा घतैल : म्हणौनि उभयता जनसंबंधु त्याज्य : आ. २० )

त्याग करून अटण करीत असतांना आचरत्या पुरुषाने जर आपले वैराग्य विशेषत्वाने प्रगट केले तर लोकांना संतोष होईल. त्यामुळे त्याची नानाविध विषयरूप पदार्थांनी ते सेवा करतील. उदा: चासमाणकेश्वर येथे विद्याविनोद नावाचा बैरागी आपल्या कुटाळ विद्येने नाना चमत्कार दाखवीत असे. त्यामुळे लोक त्याला अनेक उपयोग्य पदार्थ अर्पण करीत. हे पदार्थ खऱ्या विरक्ताला विघ्नरूप होते. पण त्याच वेळी त्याने आपली जात वगैरे प्रगट केली तर काही लोकांच्या मनात तरी जात्याभिमानामुळे किंवा कुलाभिमानामुळे मत्सर प्रगट होण्याचा संभव असतो. तसे झाले तर ते लोक त्या आचरत्या पुरुषाचे बरेवाईट करायलाहि कमी करणार नाहीत. उदा: वरील विद्याविनोद बैराग्यानेच योग्याचा वेष घेऊन एका राजाला आपल्या भजनी लावले. पण पुढे त्याने आपली जात प्रगट केली तेव्हां राजाने त्याचे शिर धडापासून वेगळे केले. तसेच सद्धेतूने जरी त्याने आपले वैराग्य प्रगट केले तरी त्यामुळे काही लोक ज्याप्रमाणे संतोषतील त्याचप्रमाणे

काही उपद्व्यापी व मत्सरी लोक उगीचच त्याच्या वैराग्याची निंदाटवाळी करतील. यासाठीहि त्याने जनसंबंध टाळणे इष्ट होय. क्वचित् असे घडते की अटण करीत असतांना एखाद्या गावी तो थांबला आणि आपल्याजवळील काही विशेष गुणाच्या प्रभावामुळे त्याने काही लोकांचे भले केले, त्यांना द्रव्यसंपत्तीचा लाभ करून दिला तर बाकीच्या लोकांच्या मनात त्या आचरत्या पुरुषाविषयी मत्सर उत्पन्न होतो. त्यांना वाटते की याने अमुक लोकांचे भले केले, पण आपणाला काहीच दिले नाही; म्हणून ते त्याच्यावर रागावतात व प्रसंगी त्याचा प्राणहि घ्यायला कमी करीत नाहीत. उदा: काईदेव पंडित या नावाचे एक अनुसरलेले भिक्षु होते. त्यांच्याजवळ एक रस होता. एकदा ते भटोबासाचे शिष्य कृष्णभट यांच्याबरोबर जात होते. एका गावी साप चाऊन मेलेल्या माणसाला पुरण्यासाठी नेण्यात येत होते. ते पाहून काईदेव पंडित म्हणाले की 'या मेलेल्याला जर औषध दिले तर अजूनहि हा वाचण्याचा संभव आहे.' त्याचे ते शब्द त्या मृताच्या एका आप्ताने ऐकले. त्याने काकुळतीला येऊन व पाय धरून त्या मृताला वाचवण्याची विनंती काईदेवाला केली. तेव्हां त्यांनी तो आपल्या जवळील रस त्या मृताला जेथे सर्पदंश झाला होता तेथे चोळला. त्यामुळे विष उतरून तो माणूस जिवंत झाला. काईदेव पंडिताजवळील हा अपूर्व रस आपल्याजवळ असावा अशी कृष्णभटाला इच्छा झाली. म्हणून, सर्व लोक निघून गेल्यानंतर त्याने काईदेव पंडिताला म्हटले, 'तुम्ही यातला अर्धा रस मला द्या नाहीतर सगळाचा सगळा जाळून टाका.' शेवटी काईदेव पंडितांना आपल्या जवळील तो रस जाळून नाहीसा करावा लागला. दुसऱ्याचे बरे करण्यासाठी आपले श्रेष्ठत्व प्रगट केल्याने हे असे होते. क्वचित्, ज्या गृहस्थाचे एकवेळ भले केले, त्याचे पुन्हा जर न ऐकले तर तोच रागावतो. प्रथम संतुष्ट झाल्याने सेवा करणारा तो पुरुष आता निंदाटवाळी करायला तयार होतो. हे सगळे टाळण्यासाठी साधकाने आपले श्रेष्ठत्व-नष्टत्व प्रगट करू नये हेच उत्तम होय.

१. 'दुसरे अनुकूळ कीजे : मणीमंत्र औषधवस्त्रहि यथा कृष्णभट्ट : कार्यादेव पंडित त्याचे प्रतियोगीये रूसणे : तोचि द्विरूप : एका गोमटे कीजे तिये पांती आणीका न कीजे हेचि वैर : अकरणी फळदातृत्व' (आ. स्थ. २०).

लोकांचा संपर्क जर आपण केला, आपणच त्यांच्याकडे गेलो तर त्यांचे तोषरोष सहन करण्याची पाळी येते. पण लोक जर आपल्या संपर्काला आपणहून आले तर मात्र त्यांचा तोषरोष तितकासा विघ्नरूप होत नाही. येणारे पुरुष दर्शन घेताच काही विषयरूप पदार्थ आचरत्या पुरुषाला देतात; किंवा ते आर्त असल्यास त्यांना काही निरूपण ऐकवले आणि त्याने ते संतुष्ट झाले तरीहि काही पदार्थ ते देतात. हे पदार्थ फारसे विघ्नरूप होत नाहीत. कारण आपण इच्छा न करतांना लोकांनी ते आपणहून दिलेले असतात. तथापि एकंदरीत हा तोषरोष टाळण्यासाठी जनसंपर्क टाळावा हेच उत्तम.

## जाणत्यांना ' विषया ' मुळे दुःख

आपण लोकांच्याकडे न जाता लोक जर आपणाकडे आले आणि त्यांनी संतुष्ट होऊन काही विषयरूप पदार्थ आपणाला दिले तर आपल्या ज्ञानाने व जाणतेपणाने त्या पदार्थांचे असंत स्वरूप मनात आणून, तो पदार्थ आपणाला मिळाल्याबद्दल अनुताप, अनुशोच वगैरे चार प्रकारांनी दुःख करावे. कारण अशा विषयरूप पदार्थापासून जाणत्या पुरुषाला सुख कधीच होत नाही. ( जाणतेया विखो सुखाते नेदी : आ. २१ ). उलट त्याला त्यामुळे दुःख होते.

अशा जाणत्या पुरुषांचे तीन प्रकार आहेत. (१) पुरभजनाचे भक्त; (२) वस्तुभजनीयें विरहिये; आणि (३) जीवदेवताभजनीये. पैकी पहिल्या दोघांना प्राप्त विषयपदार्थांमुळे यत्किंचितहि सुख होत नाही. जीवदेवता-भजनियाला विषयपदार्थ प्राप्त झालाच तर तो ' आपणाला हा पदार्थ का प्राप्त झाला ' याचा विचार करून त्याबद्दल दुःख करतो. असे दुःख मानणारा, अर्थात् उत्तम आचार करणारा पुरुष, तोच वस्तुतः जाणता पुरुष होय; नुसता शाब्दज्ञानी जाणता नव्हे.

अज्ञानी पुरुषांना मात्र प्राप्त पदार्थांपासून सुख होते. अशा अज्ञानी पुरुषांचे मुख्य प्रकार दोन. (१) स्वतः नेणता म्हणजे ज्ञान झालेले नसल्या-मुळे जो नेणता राहिलेला आहे तो; आणि (२) जाणीव असून देखील ती

१. ' जनाचा संसर्ग आपण करी तेथ दोन्ही होती : आन आपला संसर्ग जन करी तेथ तैसा दोष नाही ' ( आ. स्थ. २० ).

बळेच आच्छादणारा, नेणता.[1] उदाः एखाद्या आचरत्या पुरुषाने विहित आहारापेक्षा चारदोन घास ज्यास्त खाल्ले आणि आपण ते ज्यास्त खाल्ले, याची जाणीव असूनहि त्याने त्याबद्दल दुःख न केले तर त्याने आपली जाणीव आच्छादली, तो जाणून नेणता झाला असेच म्हटले पाहिजे. स्वत: नेणते = अज्ञानी पुरुषांचेहि तीन प्रकार आहेत. (१) बोध न झाल्यामुळे नेणता, हा कर्मराहाटीचा पुरुष; (२) बोध असूनहि नुकताच मार्गात आलेला नवा पुरुष; आणि (३) शाद्बज्ञान असून आचारज्ञान नसलेला मलिन पुरुष. या नेणत्यांना प्राप्त पदार्थापासून सुख होते.

## जाणत्याचे चार प्रकार

जाणतेपणामुळे प्राप्त विषयपदार्थांबद्दल दुःख करणाऱ्यांचे दुसऱ्या एका दृष्टीने चार प्रकार होतात. (१) पहिला पुरुष : प्राप्त पदार्थांचे स्वरूप, तो पदार्थ सेवन केल्यावर, विचारपूर्वक लक्षात घेऊन त्याबद्दल पश्चात्ताप करणारा. हा सतेवत्यागिया असतो. उदा : पुरूरवा.[2] उर्वशी सोडून गेल्यावर मग, एकंदरीत स्त्री हा पदार्थच अत्यंत घाणेरडा 'ऐसा कृक्तिविळासी : स्त्री विचारिली मानसी : मग रावो उर्वसीयेसी : विरावला तो' (उद्ध.गी.७६४). अशा घाणेरड्या पदार्थांचे आपण विषयांध होऊन सेवन केले. याबद्दल त्याने पश्चात्ताप केला.(२) दुसरा जाणता पुरुषः पदार्थहीनत्व मनात न आणता आपल्या देहाची अनित्यता लक्षात घेऊन सेवलेल्या पदार्थांबद्दल दुःख करतो. उदाः अष्टभोग भोगून शेवटी सुळावर चढवला जाणारा पुरुष,[3] आपला देह आता सुळावर चढवला जाईल हे लक्ष्यात येताच पदार्थ सेवन केल्याबद्दल दुःख करतो. हा अनिष्टत्यागिया पुरुष होय. अष्टभोग भोगणे हे मुळातच वाईट, ते भोग कुत्सित होत, असा विचार याच्या मनात येत नाही; तर त्या भोगामुळे ईश्वर अंतरतो या दुःखाचा शूळ त्याला बोचतो. तो ते अष्टभोग भोगल्याबद्दल दुःख

१. 'जाणत्या सुख नाही : ततश्च येरा आति : तोचि द्विरूप : एक स्वतः नेणता : आन एक असून आच्छादिले' (आ. स्थ. २१).

२. 'जाणता एक पदार्थांचे स्वरूप विचारी : यथा पुरीरवा' (सदर).

३. 'एक देहाची अनित्यता देखे : यथा चोरासि सुळी देता अष्टभोग' (सदर).

करतो. ( ३ ) तिसरा पुरुष : मळत्यागी. ज्याला सर्प चावलेला आहे असा पुरुष ज्याप्रमाणे अष्टभोगाकडे लक्षच देत नाही त्याप्रमाणे परमेश्वराची आर्त लागल्यामुळे हा पुरुष भोगाकडे पाहतच नाही. (४) चौथा पुरुष, परत्रार्थांचा विचार करतो. विषयसेवनामुळे परमेश्वर अंतरतो याबद्दल तो दुःख करतो. हाहि अनिष्टत्यागी पुरुष होय. अशा पुरुषाला प्राप्त पदार्थामुळे मनात सुख वाटत नाही. म्हणून पदार्थांचे सेवन करावेच लागले तरी ते तो अगदी दुश्चितपणे करतो. त्यामुळे त्याच्या इंद्रियांना तृप्तिपुष्टि मिळत नाही. त्या पदार्थसेवनाबद्दल तो दुःख मानतो कारण त्यामुळे तितकाच परमेश्वर आपणाला अंतरला—परमेश्वरप्राप्तीत 'अंतराय' उत्पन्न झाला याचे त्याला वाईट वाटते. हे चारहि पुरुष अनुक्रमे जीवदेवताभजनीये, मनुष्यापासून खालील अवतारांचे वस्तुभजनीये; अवरदृश्यापासून सर्व देवावतारभजनीये आणि ज्ञानियाभक्ताच्या भजनाचे होत.

१. 'यथा सर्प लागलेया अष्टभोग' ( आ. स्थ. २१ ).

२. 'एक परत्रार्थ विचारी : एसणे गोमटे अंतरले' ( सदर ).

३. 'एयातव मानसिक सुख नाही : इंद्रिया न फवे यथा एकाधी रस सेवीजति दुश्चीतपणे न फवे म्हणौनि' ( सदर ).

# प्रकरण ३ रे

# विकल्पशून्यता

इंद्रियाचा चाकवरा : झणे भवसि गरगरा
विकल्पाचा अळयवारा : आपणया लागो नेदी ( उद्ध. गी. २०९ ).

## विकल्प म्हणजे काय ?

आचरत्या पुरुषाने ज्याप्रमाणे विकारशून्य होणे अवश्य आहे तसेच त्याने विकल्पशून्यहि होणे अवश्य आहे. 'विकल्प' म्हणजे विपरीत कल्पना, अर्थात्, अयथार्थ अथवा चुकीची कल्पना करणे. वस्तुस्थिति एक असतांना तिच्याविषयी खोटी समजूत करून घेणे हा विकल्प[1] होय. एखादा सत्पुरुष आचरणाने वाईट नसूनहि तो वाईट असल्याची व्यर्थ कल्पना करणे हे विकल्पाचेच उदाहरण होय. शास्त्रीय दृष्टीने पाहता 'अनीश्वरी ईश्वरबुद्धि' म्हणजे देवता, तीर्थ, प्रतिमा, जीव इत्यादि अनीश्वर पदार्थावर ईश्वरत्व कल्पिणे, त्यांना ईश्वर मानणे हा विकल्प होय.

अनीश्वर पदार्थावर ईश्वरबुद्धि ठेवण्यानेच विकल्प होतो असे नाही, तर चैतन्यापासून तो यक्षिणीपर्यंत देवतांचे धर्म मनात धारण करून त्यांच्या बहिर्यागादि क्रिया आचरणे हाहि विकल्प[2] होय. ( अपर धर्मांचे धारण घाते विकल्पु बोलिजे : आ. १६२ ). देवतांचे अंतर्याग व बहिर्याग धारण

१. 'विकल्प म्हणजे नाथिला विशेष कल्पी' ( ल. स्थ. अ. प. २ ).

२. 'अपर म्हणजे चैतन्य परंपरा कर्मभूमिवेन्ही : धर्म म्हणजे त्याची साधने : धारण म्हणजे आचरीजेति भीतर बुद्धि असोनि बाह्यकारे आचरण याच नावे विकल्प' ( आ. स्थ. १६२ ).

करणे म्हणजे आचरणे हे अपर धर्मांचे धारण होय. पर म्हणजे परमेश्वर; अपर म्हणजे परमेश्वरव्यतिरिक्त इतर पदार्थ, अर्थात् जीवदेवताप्रपंच, यांचे धर्म ते अपर धर्म होत. जाणुनबुजून अशा क्रिया करणे म्हणजे ईश्वर नसलेल्या पदार्थांना ईश्वर मानून त्यांचे आचार करणे हा विकल्पच नव्हे तर दुसरे काय ? ( अपेक्षापूर्वक अन्यधर्मांचा अंगिकारु याते विकल्पु बोलिजे : आ. मा. १७३ )

वरील प्रकारच्या विकल्पाला 'देवताजनित' विकल्प अथवा 'परत्र-विषया' विकल्प असे म्हणतात. त्याला परत्रविषया म्हणण्याचे कारण असे की त्यात पारलौकिक कल्पना मुख्य असते. कर्मराहटीच्या दृष्टीने परत्र असलेल्या ज्या देवता त्यांच्यासंबंधाने तो निर्माण होतो. आपण अमक्या देवतेकडे जावे, तमक्या तीर्थाला जावे, असे केल्याने देवताफळ होईल, ही क्रिया पापरूप व ती पुण्यरूप, असे देवतासंबंधिक विकल्प त्यात असतात म्हणून त्याला परत्रविषया म्हणतात. विकल्पाचा आणखीहि एक प्रकार आहे. एखादी वस्तु पवित्र किंवा अपवित्र मानणे, तिला मंगल किंवा अमंगल म्हणणे, एखाद्या व्यक्तीला श्रेष्ठ तर दुसरीला नीच लेखणे, ब्राह्मणाला उत्तम म्हणणे आणि मांगाचा विटाळ मानणे, छी छी, थू थू करीत एखाद्या व्यक्तिविषयी किंवा वस्तूविषयी मनात किळस आणणे अथवा विचिकित्सा करणे हीहि एक प्रकारची विकल्पक्रियाच होय. या विकल्पाला 'विटाळजनित' अथवा 'विचिकित्सारूप' विकल्प असे नाव आहे.

## विकल्प हा मनोधर्म

विकल्पाच्या वरील व्याख्यावरून एक गोष्ट लक्ष्यात येईल की विकल्प हा मनोधर्म आहे. विकार हा जसा इंद्रियांचा धर्म आहे तसा विकल्प हा मनाचा धर्म आहे. ( विकारु हा इंद्रियधर्मु : विकल्पु हा मनोधर्मु परित्य-

१. '**विकल्प परत्रविषया : अमुकेया देवा जावो : तीर्थां जावो : येणे फळ होय : येणे पाप : अमुके पुण्य**' ( वि. स्थ. १८१ ).

२. '**पवित्र : अपवित्र : उत्तम अधम : विटाळ येणे : प्रतिदेह होय**' ( वि. स्थ. १८१ ). '**विकल्प म्हणजे नाथिला विशेष कल्पी : तोचि द्विध एक विटाळजनित** ...... तथा विचिकित्सारूप **तो प्रेतदेहारंभक : दुसरा देवताजनित तो अन्यधर्मधारक**' ( ल. बं. अ. प. २ ).

जौनि परमेश्वरा शरण रिगावे : आ. ५८ ). जीवदेवतांना ईश्वर समजणे काय किंवा एखाद्या पदार्थाविषयी शुचिअशुचि कल्पना करणे काय या शुद्ध मानसिक क्रिया होत. क्वचित् विचिकित्सारूप विकल्प हा इंद्रियद्वारा निर्माण होत असल्यामुळे त्याला इंद्रियधर्म म्हणता येईल. परंतु वस्तुतः त्याहि ठिकाणी वावगी कल्पना करण्याचा 'मनोधर्म' असतोच हे विसरता कामा नये. आणि या दृष्टीने देवताजनित विकल्प व विचिकित्सारूप विकल्प हे दोन्ही मनोधर्मच होत. यांचा त्याग आचरत्या पुरुषाने अवश्य केला पाहिजे.

## विकल्पशून्यतेची आवश्यकता

पण इथे प्रश्न असा उपस्थित होतो की, जीवाला बोध होतो त्याच वेळी त्याची अनीश्वरपदार्थांवरील ईश्वरबुद्धि जाऊन खऱ्या परमेश्वरावतारावर त्याला ईश्वरत्वबुद्धि येते म्हणजे प्रतीति येते. आणि त्यानंतरच तो अनुसरतो. अर्थात्, बोधानंतर, किंवा अनुसरतांना त्याचा विकल्प नाहीसा झालेला असतोच. मग त्याची शून्यता करायला सांगण्याचे कारण काय ? याचे उत्तर असे की, बोध झाल्याबरोबर देवताजनित विकल्प नाहीसा झालेला असतो तरी जडचेतन पदार्थांच्या संबंधाने तो पुन्हा उत्पन्न होण्याचा संभव असतो. तो होऊ नये म्हणून विकल्पशून्यता करायला सांगणे अवश्य आहे. आणि दुसरे असे की, बोधाने 'देवताजनित' विकल्प नष्ट झाला तरी 'विचिकित्सारूप' विकल्प नष्ट होतोच असे नाही. तो नाहीसा करण्यासाठी आचरत्या पुरुषांनी विकल्पशून्य होणे अवश्य आहे.

## विकार आणि विकल्प

विकार आणि विकल्प या दोहोंचेहि स्वरूप आपण पाहिले आहे. पहिला इंद्रियधर्म आहे तर दुसरा मनोधर्म आहे. इंद्रियधर्म असलेला विकार हा जीवाचा स्वभाव असल्यामुळे तो पूर्णपणे नाहीसा कधीच होऊ शकत नाही. उलट विकल्प हा केवळ मनोधर्म असल्यामुळे तो पूर्णपणे नष्ट होणे शक्य आहे. त्यातहि महत्त्वाचा असा देवताजनित विकल्प हा तर

१. '**नव्हतेयाचा ठायी विशेष कल्पी : अनीश्वरी ईश्वरबुद्धि : मग पवित्र अपवित्र शुचि अशुचि विटाळ एवमादिक मनी कल्पी म्हणौनि विकल्प मनोधर्म**' ( आ. स्थ. ५८ ).

पूर्णपणे नष्ट होऊ शकतो यात शंका नाही. पण तो जसा नष्ट होऊ शकतो तसाच पुन्हा तो लागूहि शकतो. उदा: ज्ञानियाने आपले यथार्थ ज्ञान गमावले तर त्याला देवताजनित विकल्प होऊन तो जीवदेवतांच्या भजनी लागणे सहज शक्य असते. विकाराची स्थिति तशी नाही. तो पूर्णपणे कधीच नष्ट होऊ शकत नाही. आणि विकार उत्पन्न झाल्यावर देखील जीव पूर्वस्थितीवर येऊ शकतो. उदा: आचरत्या पुरुषाने विषयसेवन केले तर तो विषयप्रमादी होऊन पतित होतो खरा, पण त्याने जर पश्चात्तापपूर्वक प्रायश्चित्त केले तर तो नरकास जात नाही, त्याचे भलेच होते. केवळ प्रमादकीड त्याच्या ठिकाणी राहते एवढेच. जसे, ऊष्णत्व हा पाण्याचा विकार आहे. पाणी तापून ऊष्ण झाल्यावर कालांतराने तें थंड होते म्हणजे पूर्वस्थितीवर येते. पण तरीहि पाण्याच्या ठिकाणी उष्णत्वाचा वास येतोच. तद्वत् प्रायश्चित्ताने पूर्वस्थितीवर आलेल्या विषयप्रमादियाला प्रमादकीड लागतेच.

पण देवताजनित विकल्प करून जो विकल्पप्रमादी होतो त्याला पश्चात्ताप होत नाही. देवतेवरील त्याची ईश्वरबुद्धि जात नाही. अर्थात्, देवताजनित विकल्पाने एकदा जीव भ्रष्ट झाला म्हणजे तो पुन्हा पूर्वस्थितीवर येत नाही. दुधाचे एकदा दही झाले म्हणजे ते दही जसे पूर्वस्थितीवर येत नाही, अर्थात् त्याचे जसे पुन्हा दुधात रूपांतर होत नाही, तद्वत् देवताविकल्पप्रमादी हाहि पूर्वस्थितीवर येऊ शकत नाही. विकारप्रमादी येऊ शकतो.

## विकल्पाने कायमचा भ्रष्ट

असे असल्यामुळे विकल्पप्रमादी हा प्रमाद करताक्षणीच भ्रष्ट होतो. तसा विकारप्रमादी होत नाही. ( विकल्पसंचारमात्रे जाये तैसा विकारे न वचे : आ. १६१ ). विकल्पाचा अगदी पहिला उल्लेख होताबरोबर आचरता पुरुष भ्रष्ट होतो. प्रेमसंचारमात्रे म्हणजे प्रेमसंचार होताक्षणीच ज्याप्रमाणे भक्ताचे विकार, विकल्प व स्वभाव ही तिन्ही उच्छेदली जातात त्याप्रमाणे अनीश्वरावर ईश्वरबुद्धी येताक्षणीच पुरुष धर्मापासून जातो, तो विकल्प-

१. 'येर शब्दे लागला : शब्दे गेला : येथ वेगळेपण कहीचि नाही :··· अन्यथा दध्याकार : हे न घडे : का जे पूर्वरूपा येणे नाही म्हणौनि : यथा उष्णोदक: एक धर्म उपजे मग मागौता जाये' ( ल. स्थ. अ. प. १ )

प्रमादी बनतो. ईश्वराला ईश्वर मानून शिवाय इतरावरहि ईश्वरबुद्धि कल्पणे हाहि विकल्पच होय. विकल्पप्रमादी मेले म्हणजे धर्मापासून कायमचे गेले म्हणून समजावे. ' विकल्प करून ज्यांनी आपला बोध घालविला त्या पुरुषाची खंती ईश्वराला केवढी येत असेल याची कल्पनाच करवत नाही. देहपर्यंत बोध राखणाराचा परमेश्वराला जितका तोष होतो तितकीच विशेष प्रमाणात विकल्पमात्रे बोध घालविणाराची खंती येते. स्त्रीचे सगळे दोष क्षम्य समजले जातात, पण तिने पतिव्यतिरिक्त इतराकडे पति म्हणून ' पाहणे ' हा व्यभिचाराचा दोष अक्षम्य होय. पति तिचा तत्काळ त्याग करतो. त्याप्रमाणे अनुसरलेल्या पुरुषाचे सगळे दोष परमेश्वर पोटात घालतात. पण विकल्पदोषाबद्दल मात्र क्षमा न करता खंती घेऊन त्या पुरुषाचा तात्काळ त्याग करतात. त्यामुळे विकल्पप्रमादी धर्मापासून कायमचाच भ्रष्ट होतो.

## तितका विकाराने नाही

विकारप्रमादी मात्र विकल्पप्रमादियाप्रमाणे कायमचा भ्रष्ट होत नाही. इतकेच नाही तर तुरंगमाच्या दृष्टांतातील तुरंगमाप्रमाणे अकस्मात् त्याज-कडून जर स्त्रीसेवन घडले तर तो प्रमादी बनतो खरा, पण तेथेच थांबून त्याने अधिकवृत्तीचा आचार केल्यास तो वाया जात नाही. त्याला देहविद्या होऊ शकते. अनुतापपूर्वक प्रायाश्चित घेऊन त्याने आधिकवृत्ति केली म्हणजे झाले. पुनःपुन्हा विषयसेवन कराणारानेहि अनुतापपूर्वक ( प्रायश्चित्त घेतले ) व अधिक वृत्ति आचरली तर त्यालाहि देवतांची फळे होऊ शकतात. तथापि वारंवार विषयसेवन करणाऱ्यापेक्षा चुकून एखादे वेळी विषयसेवन केलेला

१. ' आणिकातेहि परि अल्पचि काळ : यथा प्रेमसंचारवत् : ईश्वरबुद्धि आली तो मेलाच की आन येर असे ' ( आ. स्थ. १६१ ).

२. ' जेणे बोध भ्राडिला त्याची खंती कैसी ते तेच जाणती : जैसे स्त्रियेचे अवघे अन्याय उपसाहति परि आणिकाची वास पाहे ते नुपसाहिजे : जेणे राखिला देहपर्यंत : तो जैसा त्याग जेणे केला ते पदार्थ ईश्वरी आर्पिले ' ( सदर ).

३. ' तैसा विकारे न वचे म्हणजे तो मागुती उपरती घे : वाचे : अथवा अल्पसेवनेचा न वचे : तुरंगमाचेनि दृष्टांते : अनुतापे : आधिक वृत्तिः बळासि ये तो आवृत्तिसेवना जाये म्हणौनि येरापासि हा नीका ' ( आ. स्थ. १६१ ).

पुरुष अधिक बरा. कारण वारंवार विषयसेवन करणारा पुरुष धर्मांच्या ठिकाणी इतका दुबळा होतो की त्यामुळे त्याच्याकडून अधिकवृत्ति सहसा होत नाही. त्यापेक्षा एकवेळ स्त्रीसेवन करणारा अधिक बळवान असतो. सारांश, विकार-प्रमादियाने अनुतापपूर्वक अधिकवृत्ति केल्यास त्याला इतर फळे होऊ शकतात. या प्रमादानंतर तो प्रेमाचे उपाय देखील जोडू शकतो. तसे विकल्पप्रमादियाच्या बाबतीत मात्र काहीच होऊ शकत नाही. म्हणून अनीश्वराला ईश्वर म्हणण्याचा देवताजनित विकल्प आचरल्या पुरुषाने चुकूनहि करता कामा नये.

## विटाळजनित विकल्प

विटाळजनित अथवा विचिकित्सारूप विकल्प हा विकल्पाचा दुसरा प्रकार होय. याचे स्वरूप आपण पाहिलेच. युगधर्मक्रियेव्यतिरिक्त एखाद्या वर्णाला उच्च लेखणे व दुसऱ्याला नीच लेखणे, एखाद्या वस्तूला पवित्र म्हणणे आणि दुसरीला अपवित्र समजणे, एखाद्या वस्तुविषयी मनात किळस उत्पन्न होणे, यामुळे हा विकल्प निर्माण होतो. यातहि त्या वस्तूच्या किंवा व्यक्तीच्या मूळ स्वरूपाविषयी विपरीत अथवा वावगी कल्पना करण्याचा सामान्यधर्म आहेच. वस्तुतः ब्राह्मणाला श्रेष्ठ मानायचे आणि मांगाला कनिष्ठ मानायचे कारणच नाही. विचारपूर्वक पाहिले तर दोघांचेहि मनुष्यदेहच असतात. आणि त्या देहात दोघांनाहि पापपुण्याची निष्पत्ति होऊ शकते. मग एक श्रेष्ठ व दुसरा कनिष्ठ का ? तसे मानणे ही वावगी किंवा विपरीत कल्पना—म्हणजे विकल्प होय. तसेच म्हटले तर पांडवांना लाक्षागृहात जाळण्यासाठी त्या लाक्षागाराला अग्नि लावणारा माणूस हा काण्व ब्राह्मण होता. त्याला श्रेष्ठ म्हणणे योग्य होईल काय ? उलट म्हाइ-भटासारख्या सुविद्य आणि सत्पात्र ब्राह्मणानेहि, एका मातंगाने आपणाला श्रीप्रभूचे दर्शन घडवले म्हणून ( श्रीगोप्रच. ९७ ) त्याला साष्टांग दंडवत घातले होते. या मातंगाला, तो एका विशिष्ट वंशात जन्मला म्हणून नीच म्हणणे हा मूर्खपणा होय.

१. ' **उत्तम** म्हणजे ब्राह्मण : आन **अधम** म्हणजे मातंग ऐसे म्हणे : परि तोहि मनुष्यदेही आन निष्पात्तिकारकाचि असे परि वृथा कल्पना करी : का जे लाखागृही काणव ब्राह्मणे अग्नि लावीला तो कैसा उत्तम ' ( वि. बं. १८१ ).

तसेच गाय व कुत्रा हे दोन्ही पशुच. इतकेच नाही तर दोघेहि अमंगल पदार्थ भक्षण करणार. पण त्यापैकी गाईला मात्र पवित्र म्हणायचे आणि कुत्र्याला अपवित्र समजायचे ही कल्पना वावगी आहे. श्रीचक्रधरस्वामींजवळ एक कुत्रे होते. त्याला ते डांगरेश असे म्हणत असत. एकदा काही कारणाने राग आल्यामुळे स्वामींनी आपल्याजवळील सर्व भक्तजनांना घालवून दिले. त्यांच्याबरोबर डांगरेशहि निघून गेला. पण त्याचे स्वामींवर इतके अनन्य प्रेम होते की त्याला त्यांचा विरह सहन झाला नाही. म्हणून त्याने जवळच्याच मोरीत तोंड खुपसून आपला प्राण सोडला. ( ली. च. उत्त. ३०५ ). एका दृष्टीने हा डांगरेश त्या भक्तजनांपेक्षाहि श्रेष्ठ होता असे खुद्द श्रीचक्रधरस्वामींनीच म्हटले आहे. ( तुम्हापसि वरि सुणे चांग जे एथचा वियोग साहो न शकेचि : शो. आ. १३ ).

याच दृष्टीने शुचि–अशुचि कल्पना करून विटाळ मानणे हाहि विचिकित्सारूप विकल्प होय. एखाद्या मातंगाचा किंवा ऋतुमती म्हणजे विटाळशीचा विटाळ मानणे हे आचरत्या पुरुषाच्या दृष्टीने चुकीचे आहे. विटाळशीचा विटाळ मानायचा तर मग ज्या आपल्या शरीरातून लाळ, शेंबूड, मळमूत्र इत्यादींचा प्रवाह अमंगलद्वारा वाहत असतो त्याचा म्हणजे स्वतःच्या शरीराचा विटाळ का मानू नये ? पण मळमूत्राची घाण ज्यातून वाहते त्या आपल्या शरीराचा विटाळ न मानता विटाळशीचा विटाळ मानणे ही विपरीत कल्पना होये. हा विचिकित्सारूप विकल्प होय यात शंका नाही. एकदा विटाळशी उमाइसा श्रीचक्रधरस्वामींना दुरून नमस्कार करीत असतांना त्यांनी मुद्दाम आपला अंगठा तिच्या कपाळाला लावला व ते थट्टेने म्हणायला लागले की ' एथचेया आंगुठेयासि वीटाळु केला : कैसा : आता हा आंगुठा काइ गएसि नेयावा लागैल की वाराणसी

१. ' पवित्र म्हणजे गाय : अपवित्र म्हणजे सुणे : एवं दोन्ही पशुदेहचि : आन अमंगळभक्षक : परि कैसी अन्यथा कल्पना करी ' ( वि. बं. १८१ ).

२. ' विटाळ : म्हणजे मातंगाचा तथा ऋतुमती स्त्रियेचा मानी : आन निरयदेही स्थावर शिंदींचा वृक्ष सदा पाणी वाहे तयाचा न मानी : आन आपुला देही लाळसेंबूड वाहे : अथवा मळमूत्र वाहती : अमंगळ द्वारे असती तयांचा विटाळ न मानी इत्यादि विचिकित्सारूप विकल्प ' ( सदर ).

नेइजैल: मलीनाथा नेइजैल की केदारा नेइजैल ' आणि शेवटी त्यांनी निरूपण केले 'बाई ये नवद्वारे : जैसा नाकी सेंबूड ए : डोळेया चीपूड : काना मळ : तोंडा थुंका ए : गुहिद्वारा मळ एति : ऐसी हे एकि धातु स्रवे : मग नीवर्ते : याचा वीटाळ धरू न ए : जरी धरिजे तरी प्रेतदेह होए' ( ली. च. उत्त. ३४७ ). यावरून विटाळशीचा विटाळ हा विचिकित्सारूप विकल्प होय हे स्पष्ट दिसते.

अशी पवित्रापवित्र, शुचि–अशुचि कल्पना करण्याच्या मूळाशी, आपण कोणी तरी श्रेष्ठ आहोत आणि म्हणून इतरांना कमी लेखीत आहोत अशी कल्पना गृहीत असते. अर्थात्, स्वतःला श्रेष्ठ मानणे म्हणजे सर्व जगाची, म्हणजे जगातील ज्ञानी, भक्त, इतकेच काय पण परमेश्वरावतार वगैरे यांची निंदा करण्यासारखे, त्यांना अपवित्र मानण्यासारखे आहे. अशी ही विचिकित्सारूप विकल्पाची क्रिया मनानें केली तरी प्रेतदेह होतो व त्याची दुःखे भोगावीं लागतात. मग ही क्रिया वाचिक होऊन पुढे कार्याला आली तर केवढे थोर दुःख भोगावे लागेल याची कल्पनाच करावी! एखाद्याला श्रेष्ठ व दुसऱ्याला कनिष्ठ लेखणे हा मानसिक विकल्प. तसे बोलून दाखवणे किंवा तो कनिष्ठ माणूस भेटला तर त्याला 'दूर हो' 'शिवशील' 'छी छी : थू थू' म्हणणे हा वाचिक विकल्प; आणि त्याला स्पर्श झाल्यास किंवा त्याची सावली वगैरे अंगावर पडल्यास स्नान करणे किंवा अंगावर गोमूत्र शिंपडून घेणे हा कायिक विकल्प होय. या विचिकित्सारूप विकल्पामुळे प्रेतदेह होतो. ( याचे सविस्तर वर्णन व विवेचन 'महानुभाव तत्त्वज्ञान' पा. ३४६ ते ३५२ मधे पहा ).

### आठ वर्षानंतर विकल्पसंचार

देवताजनित व विटाळजनित अशा दोन्ही प्रकारचे हे विकल्प मनुष्य-जीवाला तो आठ वर्षाचा झाल्यानंतर संचरतात. ( आठा वरुषा विकल्पु संचरे : वि. २६० ). याचा एक अर्थ असा की, मनुष्यजीव आठ वर्षाचा पूर्ण झाला म्हणजे तो लेपाधिकारी होतो. अगदी नवव्या वर्षाची पहिली घटका सुरू होताच याला कर्मनिष्पात्ति व्हायला लागते. तत्पूर्वी,

१. 'वासनेसवे एसणे पाप : ना : मी उत्तम म्हणितल्या सकळ सृष्टी भकीनला' ( वि. स्थ. १८१ ).

म्हणजे तो आठ वर्षांचा होण्यापूर्वी आपण अमुक देवाला जावे, त्या देवतेची यात्रा करावी, तमक्या तीर्थात स्नान करावे वगैरे जे विकल्प तो करतो त्यामुळे त्याला लेप वगैरे लागत नाहीत. आणि लहान असल्यामुळे त्याला मानापमान, शुचि अशुचि या कल्पनांचेहि लेप लागत नाहीत. ' संकल्प विकल्प बाळा : नाही पुण्य प्राप मळ : कर्म करिता फळा : नव्हे अधिकारी ॥ नाही मानापमानु : न म्हणे उत्तम हीन : सुचि असुचि हे विवंचना : करू नेणे ' (उद्ध. गी. ४७१, ४७२ ). आठ वर्षांनंतर मात्र विकल्पाचा संचार होऊन त्याची निष्पत्ति सुरू होते.

दुसरे असे की, आठ वर्षे पुरी होऊन नववे वर्ष लागताक्षणीच मनुष्य-जीवाला ' विकल्प ' संचरतो म्हणजे पार्थिव प्रतिमादिकावर त्याला ईश्वरबुद्धि येते. त्यावेळी त्याची देहाभिमानिनी देवता त्याच्या मनात हा अन्यथाज्ञानाचा विकल्प मुद्दाम निर्माण करते. नववे वर्ष सुरू होऊन या विकल्पसंचाराची वेळ येताच तो जीव जर निजलेला असला तर त्याला उठवून किंवा निदसुरा करून असा विकल्प ती देवता त्याजकडून अवश्यमेव घडवते. हा विकल्पसंचार ती देहाभिमानीन ब्रह्मांडीहून म्हणजे आपल्या स्थानाहून करते की कर्मभूमीत येऊन करते हे सांगता येत नाही. तसेच नववे वर्ष सुरू होताक्षणीच देवताचेष्टकत्वामुळे काही विशेष विकल्प कर-ण्याची बुद्धि उत्पन्न होते ती कशी होहि निश्चित नाही. पण आठ वर्षांनंतर विकल्प संचार होतो हे मात्र निश्चित. हा आठ वर्षांचा काळ जीव गर्भात आल्यापासून मोजायचा, गर्भाबाहेर आल्यापासून नव्हे.

## विकल्पशून्यता करावी

एवंगुणविशिष्ट विकल्प आचरल्या पुरुषाने आपल्या अंतःकरणात निर्माण होऊ देऊ नये. हीच त्याची विकल्पशून्यता होय. अर्थात्, त्यासाठी ज्या ज्या क्रियासुळे विकल्प निर्माण होण्याचा संभव असेल त्या त्या सर्वस्वी

१. जन्मला तिये दीहुनि आठ वर्षे देवा भजो म्हणे : ऐसे लेकरुपणे म्हणे ' ( वि. स्थ. २६० ). ' आधिला दीसी अन्यथाज्ञानरूप क्रिया आन मनोधर्म होता परि ते बुद्धि नाही म्हणौनि विकल्प नव्हे ' ( सदर ).

२. ' आठा वर्षा जे घडी भरली तेन्हेळीसीचि निजेलेयातेहि देवता चेष्टवुनि विशेषाते कल्पी ऐसी बुद्धि उपजे : ते कैसी ते नेणिजे:' …(सदर)

त्याज्य मानल्या पाहिजेत. ( विकल्पु स्फुरे तो अर्थु न कीजे : आ. १६९ ). देवताजनित विकल्पाची शून्यता करण्यासाठी जेणे करून आपल्या मनात देवतावर ईश्वरत्वबुद्धि येण्याचा संभव आहे त्या सगळया गोष्टी टाळल्या पाहिजेत. त्या कोणकोणत्या हे थोडक्यात पाहू. या दृष्टींने पाहता देवताजनित विकल्पाचे दोन पोटविभाग पडतात. एक॰ जडपदार्थांच्या संबंधाने होणारा देवताजनित विकल्प; आणि दुसरा चेतन पदार्थांच्या संबंधाने निर्माण होणारा देवताजनित विकल्प.

## जडपदार्थसंबंधाचा देवताविकल्प

ज्या जड पदार्थांच्या संबंधाने आचरत्या पुरुषांच्या मनात देवताजनित विकल्प निर्माण होण्याचा संभव असतो असे पदार्थ म्हणजे देवतांची तीर्थक्षेत्रे, तेथे किंवा इतरत्र असलेल्या देवतांच्या पार्थिव प्रतिमा, लिंगे, काष्ठापाषाणांच्या मूर्ति वगैरे. त्याचप्रमाणे चतुर्दशीच्या दिवशी किंवा इतर काळी देवताभक्ताकडून आपापल्या देवताप्रीत्यर्थ होणारी जाग्रणे, कीर्तने, दिंड्या, रामजयंती, शिवजयंती वगैरेसारखे महोत्सव इत्यादिकामुळेहि विकल्प उद्‌भवण्याचा संभव असतो. यासाठी अशी सगळी ठिकाणे आचरत्या पुरुषाने त्याज्य मानायला पाहिजेत.

## पुरुषोत्तमक्षेत्रा न वचावे

आचरत्या पुरुषाकडून अशी विकल्पस्थाने टाळली जावी म्हणूनच 'पुरुषोत्तमक्षेत्रा न वचावे' ( आ. मा. १३४ ); 'तुम्ही जात्रे क्षेत्रा न वचावे' ( आ. मा. १९ ) अशा स्पष्ट आज्ञा श्रीचक्रधरस्वामींनी केलेल्या आहेत. पुरुषोत्तम म्हणजे विष्णु देवता किंवा तिचे अवतार. अर्थात् पुरुषोत्तमक्षेत्राला जाऊ नये असे सांगण्यात कोणत्याहि देवताक्षेत्राला जाऊ नये हीच सर्वसामान्य आज्ञा अंतर्भूत झालेली आहे. अशा तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी गेल्यास तेथील देवतांच्या पूजाअर्चेसाठी उत्तम वस्त्रालंकार घालून आलेल्या स्त्रिया दृष्टीस पडून साधकाच्या अंतःकरणात विकार

१. 'तर जड ते कवण : मग तीर्थ इतरादिक : दिण्डी जाग्रण : जात : क्षेत्र एवमादिक येणे मागुते उपजे : हे पाप हे पुण्य : ऐसे म्हणे : हा देवताजनित विकल्प' ( ल. वं. अ. प. २ )

उद्‌भवण्याचा संभव असतो, हे एक; आणि शिवाय त्या तीर्थक्षेत्रांचा देवतांनी अभिमान घेतलेला असल्यामुळे तेथे त्यांची सामर्थ्ये प्रगट होतात. ती सामर्थ्ये पाहून आचरत्या पुरुषाच्या मनात त्या देवतावर ईश्वरबुद्धि निर्माण होण्याचा संभव असतो. देवतावर ईश्वरबुद्धि आली म्हणजे विकल्प होऊन तो पुरुष भ्रष्ट झालाच म्हणून समजावे. यासाठी जेथे जेथे देवतांनी अभिमान घेतलेल्या पाषाणप्रतिमादि असतील अशा सर्व तीर्थक्षेत्रांना आचरत्या पुरुषांनी कधीहि जाता कामा नये.

## पुराणे ऐकू नयेत

तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी यात्रेत सर्वत्र देवताप्रीत्यर्थ दिंड्या, जागरणे, कीर्तने वगैरे अहोरात्र चाललेली असतात; पुराणे प्रवचने सुरू असतात. तीर्थक्षेत्रातील यात्रेतच काय पण इतरत्रहि जेथे जेथे ह्या देवताभक्तीच्या क्रिया चालू असतील तेथे तेथे आचरत्या पुरुषाने जाऊ नये. कारण त्या क्रिया पाहून किंवा पुराण-प्रवचने कानावर पडून विकल्प संचरण्याचा संभव असतो. कधी कधी असे होते की अनुसरलेले पुरुष शास्त्रानिमित्त स्वदेश-स्वग्रामादिकात पुन्हा जातात; किंवा एखाद्या ज्ञातविरक्ताची मुद्दामहून भेट घेण्यासाठी जातात; किंवा संभावनिकाकडे जातात; क्वचित् एखाद्या अशक्त भिक्षूच्या सेवाशुश्रूषेनिमित्त त्यांना गावात अडकून रहावे लागते. आणि अशा वेळी तेथेच कुठेतरी जर पुराण सुरू झाले तर मग त्यांनी काय करावे ? पुराण ऐकायला गेले नाही तर लोक निंदा करतात आणि गेले तर देवतांची स्तुती कानावर पडून विकल्प संचरण्याचा संभव असतो. अशा स्थितीत त्यांनी काय करावे ?

## विशेषेकरून कोमळांनी

त्यांना उत्तम उपाय हाच की, ज्या पुराणाचे व्याख्यान चालू झाले असेल ते जर देवताचारित्रांनी भरलेले असेल तर त्या पुराणश्रवणाला त्यांनी मुळीच जाऊ नये. तथापि पुराणांतहि भागवत पुराणामधे परमेश्वरावतार श्रीकृष्णाची अनंत लीळाचरित्रे वर्णिली असल्यामुळे ते पुराण ऐकायला

१. ' विषयव्यवस्था करू जाणे त्यासि ऐको ये : पुराण : परि भागवत : येरासि विपरीत बुद्धि ये का विकल्प संचरे ' ( आ. स्थ. १५० ).

जायला हरकत नाही. पण भागवत पुराण का असेना ते कर्मराहाटीच्या पुराणिकाकडून सांगितले जात असतांना सगळयाच अनुसरलेल्या पुरुषांनी ऐकायला जावे असे मात्र नाही. जे कोमळ पुरुष असतील त्यांनी ऐकायला मुळीच जाऊ नये. दृढ पुरुषांनी ऐकायला जायला हरकत नाही. हेच निराळया शब्दात सांगायचे तर असे म्हणता येईल की आपल्या शास्त्र-ज्ञानामुळे ज्यांना 'विषयव्यवस्था' करता येईल त्यांनीच पुराण ऐकावे. विषयव्यवस्था करणे म्हणजे प्रत्येक गोष्टीचा आपल्या मनाशी समाधान-कारक निर्णय करणे. हे केवळ दृढ पुरुषालाच शक्य आहे, कोमळाला नाही. ( विषयव्यवस्था करो जाणे त्यास ऐंको ये: आ. १५० ).

## विकल्प-संचाराचा संभव कसा ?

कोमळ पुरुष भागवत ऐकायला गेल्यास, जरासंधाच्या भीतीने श्रीकृष्ण पळाला हे त्याच्या कानी पडताच श्रीकृष्ण परमेश्वर नसून जरा-संधच परमेश्वर आहे असे त्याला वाटून विकल्प संचरण्याचा संभव असतो. तसेच श्रीकृष्णाने १६ हजार बायका केल्या, त्यांना पुष्कळ मुले झाली, त्या अर्थी इतके विषयसेवन करणारा श्रीकृष्ण सामान्य जीव असला पाहिजे; त्याला शेवटी मृत्यु आला यावरूनहि तो जीवच असला पाहिजे, परमेश्वर नव्हे; त्यातहि त्याने सांदीपनीपासून विद्या अभ्यासल्या यावरून तो अज्ञानी असला पाहिजे असे वाटून विकल्प होण्याचा संभव असतो. पण दृढशास्त्र झालेला पुरुष असला म्हणजे या सर्व घटनातील यथार्थ प्रतीत होत असल्यामुळे त्याला विकल्प न संचरता उलट त्याची ईश्वरप्रतीति अधिक दृढ होते. तो नीट विचार करून ठरवतो की, पूर्वसृष्टीत अत्यंत ईश्वरपरायण असून प्रमादिया बनलेल्या जीवांची विषयव्यवस्था करण्यासाठी. त्यांनी जोडलेल्या कणवेनुसार त्यांना फळप्राप्ति करून देण्यासाठीच श्रीकृष्णाने

१. 'श्रीकृष्ण अवतारी जरासंधा भेणे पाठिरवण केले तरी जरासंध ईश्वर का न व्हावा ऐसी बुद्धी ये : सोळासहस्र अंत:पुर आठ पटमुख्या : एकेकी दहादहा कुमर ऐसा विखो सेविती तरी गोसावी जीव होती : भाल स्वीकरीली तरी जीव होती : ऐसी बुद्धि ये : का विकल्प संचरे : सांदिपनी पासौनि चौदा विद्या अभ्यासल्या तर गोसावी अज्ञान ऐसी बुद्धि ये कोमळासी म्हणौनि वासनिकासीहि पुराण ऐको न ये : ' ( आ. स्थ.१५० ).

काहींचे पुत्रत्व स्वीकारले, काहींचे शत्रुत्व स्वीकारले, तर काहींचे पतित्व स्वीकारले. ज्यांची विषयप्रेमाची वेल वाढायची आहे त्यांच्याशी विज्ञान-मूर्तिद्वारा त्यांनी विषयसंबध ठेवला वगैरे. दृढ पुरुषाला हे सगळे यथार्थ-त्वाने जाणता येते म्हणून त्याला श्रीकृष्ण हा जीव वाटत नाही–त्याला विकल्प संचरत नाही. अशा पुरुषाने पुराण ऐकायला हरकत नाही. कोम–ळाच्या ठिकाणी ही योग्यता, हे ज्ञान, सारासार विचार करण्याची ही शक्ति नसते म्हणून तो विकल्प प्रमाद तेव्हांच अंगवणे संभवू शकते.

क्वचित् इतर देवतावर्णनपर पुराण कानी पडल्यास, ती देवता म्हणजेच परमेश्वर होय अशी कोमळांची समजूत होण्याचा संभव असतो. पण दृढ पुरुषाला यथार्थज्ञानामुळे, ती देवता कितीहि समर्थ असली तरी ती पर-मेश्वराची केवळ एक शक्ति होय याची दृढ जाणीव असते, म्हणून तो विषयव्यवस्था करू शकतो. अशी विषयव्यवस्था करण्याचे सामर्थ्य ज्यांच्या ठिकाणी असेल त्या पुरुषांनी देवता–पुराणेहि ऐकायला हरकत नाही. तथापि त्यांनीहि ती टाळणे हेच सर्व दृष्टींनी अधिक श्रेयस्कर होय.

## चेतनपदार्थसंबंधांचा देवताविकल्प

देवताजनित विकल्पाचा दुसरा प्रकार चेतनपदार्थसंबंधामुळे निर्माण होतो. अन्य मार्गातील देवतासामर्थ्यसंपन्न पुरुषाचा संबंध आल्यास त्याचे ऐश्वर्य पाहून त्याच्यावर ईश्वरबुद्धि निर्माण होण्याचा संभव असतो. तोहि आचरत्या पुरुषाने अवश्य टाळला पाहिजे. जड पदार्थांच्या संबंधाने जो देवताजनित विकल्प उत्पन्न होतो तो हळूहळू व काळांतराने होतो; पण अन्यमार्गीय पुरुषांच्या, म्हणजे चेतनपदार्थांच्या संबंधाने तर कोमळ आचरत्या पुरुषाला देवतावर किंवा देवताभगतावर ईश्वरबुद्धि निर्माण होऊन तावडतोब विकल्प होण्याचा संभव असतो. याचसाठी देवतामार्गा-तील पुरुषांचा संबंध आचरत्या पुरुषाने टाळला पाहिजे. 'अन्यमार्गियांचा संसर्गु न करावा' (आ. मा. ७६); 'अन्यमार्गियांचिये गुंफे न वचावे'

१. '**अन्यमार्गिये पुरुष सामर्थ्यवंत यांचा संसर्ग हा थोर दोष** ··· तो कैसा : ना मनाते आपलवौनि झाकोळीत असे तैसा जड नव्हे : ते काळांतरे' (ल. वं. अ. प. २).

(आ. मा. ७७) अशा स्पष्ट आज्ञा श्रीचक्रधरस्वामींनी केलेल्या आहेत त्या याच कारणासाठी.

## तीन प्रकारांनी संबंध

अन्य मार्गातील जडचेतन पदार्थांशी अनुसरलेल्या पुरुषांचा संबंध येऊन देवताजनित विकल्प तीन प्रकारांनी होण्याचा संभव असतो. (१) एक तर त्यांच्यावर म्हणजे देवतावर ईश्वरबुद्धि निर्माण होऊन म्हणजे त्यांच्याच मुळे आपणाला पुण्य व पारलौकिक फळ मिळू शकेल अशी भावना झाल्यामुळे; किंवा (२) ऐहिक स्वार्थसंबंधाने म्हणजे विषयोपभोग प्राप्त व्हावेत म्हणून देवतांना नवस केल्यामुळे; किंवा (३) रोगशमनार्थ किंवा धनधान्यप्राप्तीसाठी देवतांना नवस वगैरे केल्यामुळे. क्वचित् केवळ लोकांना दाखवण्यासाठी, अर्थात् कीर्तीसाठीहि पुरुष अत्यंत कष्टकर अशी देवताकर्मे करतो. अनुसरलेल्या पुरुषांनी या सर्व गोष्टी त्याज्य समजून त्या कधीहि आचरू नयेत. एखादा वासनिक किंवा भिक्षुक आजारी पडला तर लागल्यास वैद्याला नमस्कार घालून बोलावून आणावे, पण देवतेला किंवा देवतेच्या भक्ताला नवस करू नये. काहीहि झाले तरी चातक फक्त मेघोदकच पितो, तो नदीडबक्यांना शरण जात नाही. त्याप्रमाणे आचरत्या पुरुषाला प्रसंगविशेषी नवस करायचाच असला तर त्याने तो ईश्वराला किंवा ईश्वराच्या स्थानप्रसादाच्या ठिकाणी करावा, देवतांच्या ठिकाणी कधीच करू नये. केल्यास त्यामुळे देवतेला शरण गेल्यासारखे होऊन त्याला विकल्पदोष तात्कालतोब होईल. शिवाय देवतेला केलेल्या नवसाने त्याला इष्ट फळ मिळेलच असे नाही. त्या जीवाने अर्जन केले असेल तरच देवता फळ देईल. जीवाने अर्जिल्याशिवाय त्याला काहीहि देण्याचे सामर्थ्य देवतांच्या ठिकाणी नसते. ते अनार्जितदातृत्व, अर्जन केलेले नसताहि, त्याच्या प्राक्तनात नसूनहि

१. ही दोन सूत्रे स्वामींनी स्त्रियासाठी म्हणून उपदेशिली असली तरी व्यापक अर्थाने ती पुरुषांनाहि लागू आहेत.

२. 'देवताजनित विकल्प : तोचि त्रिविध : एक फळालागौनि करी ईश्वरप्रतीति : एक विषयालागौनि : एक शांतिकपुष्टिक दृष्ट कर्म' (ल. स्थ. अ. प. २).

३. 'वरि वैद्या दंडवत घालावे परि देवतेसि ना : ऐसाही जरि तरी ईश्वरपैकीचे भेटो का : यथा चातक' (सदर).

त्याला काय वाटेल ते देण्याचे सामर्थ्य फक्त परमेश्वराच्या ठिकाणी आहे. तो चिंतामणि आहे, नव्हे त्यापेक्षाहि अधिक, सर्वसामर्थ्यशाली आहे. दुसरे असे लक्ष्यात आणावे की, देवतांच्याजवळ असलेली सामर्थ्ये ही सिद्धीस नेतो कोण? परमेश्वरच. ( त्रि. २७१ ). तेव्हां क्षुद्रदेवतांना शरण जाऊन त्यांना नवस वगैरे करण्यापेक्षा ते परमेश्वराला किंवा त्याच्या स्थानप्रसादादिकांनाच करणे योग्य व श्रेयस्कर नाही काय? सारांश, अशा सर्वसमर्थ परमेश्वराला सोडून कोणत्याहि कारणाने का होईना पण आचरत्या पुरुषाने अन्य मार्गातील जडचेतन पदार्थांशी संबंध येऊ देऊ नये.

## अनिष्टसेवा त्याज्य

अनिष्ट म्हणजे निषिद्ध म्हणून सांगितलेले सगळे पदार्थ, यांचे सेवन करता करता शेवटी मनात विकल्प संचरतो; त्यामुळे ईश्वरावरची ईश्वरबुद्धि जाऊन इतरावर ईश्वरबुद्धि येते. ( अनिष्ट सेवेतव विकल्पु संचरे : आ. १६३ ). याचे ठळक उदाहरण म्हणून निषिद्ध जो विकार त्याचे घेता येईल. प्रथम उल्लेखापासून तो अभिमुखतेपर्यंत आलेला ( कुयोगिया ) पुरुष विकाराला अभिमुख झाला तरी त्याबद्दल त्याच्या मनात दुःख होतेच; आणि म्हणून तो सेवनेला टेकत नाही. विकाराची सेवा न करताच तो मरण पावला तर परमेश्वर त्याचा स्वीकार करतात. पण विकाराची प्रत्यक्ष शारीरिक सेवा करणारा विषयी पुरुष मात्र कालांतराने विकल्प करतोच. कारण वारंवार विषयसेवा केल्याने त्याचे सत्त्व जाते, स्मरण जाते. विकाराची गोडी घेऊन त्याचेच स्मरण तो करू लागतो. यामुळे परमेश्वराविषयी व परमेश्वरपदार्थाविषयी त्याचे मत रिते होते. त्यात ते राहत नाही. स्थान-प्रसाद-भिक्षु-वासनिकांचीहि त्याची आवड नष्ट होते. शास्त्रार्थाची त्याला गोडी वाटत नाही. शेवटी ईश्वरावरील आवडबुद्धि जाते. कोणत्याहि प्रकारचे अनिष्ट करायला तो भीत नाही. असे अनिष्ट प्रसवता प्रसवता त्याच्या मनात विकल्पाचा संचार सहजे होतो.

१. ' देवती प्राक्तन असे तरी द्यावे : मा ईश्वर लीळावशेही देईल : आणि तो चिंतामणी ' ( ल. स्थ. अ. प. २ ).

२. ' अनिष्ट म्हणजे वारिले तेतुले अनिष्ट : सेवा म्हणजे केतुला एक काळ : म्हणौनि अनिष्ट सेविता विकल्प संचरे : विषयी गेला : सत्त्व स्मरण [ पुढे

चेतन पदार्थ प्रमाणे इतर निषिद्ध पदार्थांच्या सेवनेचा परिणाम देखील असाच होतो. उदाः निषिद्ध कांजी, भाजी अर्थात् इंद्रियार्थ, रस, मिष्टान्न वगैरे सेवन केल्याने त्यांचीच सवय लागते. पुढे असे होते की असे इंद्रियार्थ त्याला एखाद्याने न दिले तर त्यावर तो क्रुद्ध होतो. हा तमोरूप विकारच होय. मग जिथे जिथे हे पदार्थ मिळतील तिथे तिथे जायला हा कमी करीत नाही. संगसांघातासहित तीर्थयात्रेला गेल्याने असे पदार्थ पुष्कळ मिळतात. लोकांच्या संग्रहाने राहून तीर्थयात्रानुरूप क्रिया केल्याने लोक याला इंद्रियार्थ पदार्थ देतात. हा लिंगचिन्ह वगैरे धारण करतो. ते पाहून हा कोणी सत्पात्र असावा असे मानून लोक याला चांगले चांगले पदार्थ संपादन करतात. अशा पदार्थांची गोडी लागताच मग, हा पदार्थ वाईट, हा चांगला असे विचिकित्सारूप विकल्प तो करू लागतो. ते मनात बिंबल्यामुळे त्याचे सत्त्व, स्मरण वगैरे सर्व काही हळूहळू जाते. इतकेच नाही तर पदार्थ मिळवण्यासाठी ' परमेश्वर एकच आहे असे नाही, या तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी असलेल्या ह्या पाषाणप्रतिमाहि परमेश्वरच होत ' असे तो म्हणायला लागतो व त्यामुळे विकल्पप्रमादी बनतो.

असे विकल्प संचरणे हे जीवाच्या ठिकाणी असलेल्या विकाराचेच फळ होय. म्हणूनच ' विकार विकल्पाते आपजवी ' ( शो. आ. मा. १२ ) असे स्वामींनी म्हटले आहे. सृष्टिरचनेच्या वेळी प्रथम मायेने जीवस्वरूपीचा विकार कार्याला आणल्यावर जीव त्याशी रसरूप होऊन शेवटी ' मी-

चालू ] **जाए : आवडून तोच अर्थ अखंड आठवे : गोडीया अविधी मन रीते होय : गोडी नाही कवणाही अर्थाची : आन ईश्वराची गोडी काढे : चाड आर्ति काढे : अनिष्टा न भिये : त्याग दक्षता काढे : ऐसी कव्हणी एकी वेळी धर्मसहृदासी साधी : ऐसे अनिष्ट प्रसवता एकादीये वेळे विकल्प संचरे ऐसे होय '** ( आ. स्थ. १६३ ).

१. **' कांजी भाजी सेविता कवणी न सूये त्यावरी तमे : विपरीत घे : मग मिळे ते ते ठाये सेवी : तीर्थक्षेत्रा जाता सवासांगता जाये : संग्रहरूप क्रिया करी : सालिंगवृत्ति आश्रये : गोडी संचरे : हे नीके हे वाऊर नीवेडी म्हणौनि अनिष्ट सेविता विकल्प संचरे '** ( आ. स्थ. १६३ ).

२. **' अनिष्ट म्हणजे विकार : तो सेविता विकल्प संचरे : का जे विकल्पाचे मूळ विकार : येर तो त्याचे फळ '** ( सदर ).

चैतन्य आहे ' असा अन्यथाज्ञानाचा विकल्प त्याच्या ठिकाणी उद्भवतो. तोच शेवटपर्यंत म्हणजे यक्षिणीचा मळ तयार होईपर्यंत व तदनंतरहि कायम असतो. आठव्या वर्षानंतर तो बीजरूप विकल्प कार्याला येतो. (वि. २६० ). म्हणून विकल्पशून्यतेसाठी विकार व इतर अनिष्ट पदार्थांचे शारीरिक सेवन आचरत्या पुरुषाने टाळणे अत्यंत आवश्यक होय. शारीरिक दुःखाच्या वेळी मंत्रतंत्रांचा प्रयोग करणे हाहि विकल्पच होय. कारण ते देवतांना शरण जाणे होय. हिंसेमुळेहि असेच विकल्प संचरतात. म्हणून अनिष्ट पदार्थांचे सेवन सर्वतोपरी टाळावे.

## निर्विकल्प असावे

देवताजनित विकल्प नाहीसा करण्यासाठी आचरत्या पुरुषाने काय केले पाहिजे हे आपण पाहिले. आता विटाळजनित ऊर्फ विचिकित्सारूप विकल्प नाहीसा करण्यासाठी त्याने काय केले पाहिजे ते पाहू. पहिला उपाय हा की, विचिकित्सेमुळे निर्माण होणाऱ्या प्रेतदेहाच्या नाशासाठी जी निर्विकल्पता असणे आवश्यक असल्याचे सांगितले आहे ती आचरत्या पुरुषाने आपल्या अंगी बाणवली पाहिजे. अघोरपंथीय जोगी हा पूर्णपणे निर्विकल्प असतो. स्मशानासारख्या अमंगल जागी राहायला त्याला घाण वाटत नाही. मलमूत्राने अंग चोपडून प्रसंगी ते चाटण्याचीहि त्याला कधी किळस येत नाही. कारण, हे चांगले आणि ते वाईट या विषयीची त्याची भावना पूर्णपणे नष्ट होऊन तो निर्विकल्प असतो. आपल्या लहान मुलाच्या बाबतीत आईहि इतकीच निर्विकल्प असते. त्या मुलाचे अंग धूळमातीने नेहमीच भरलेले असते. त्याच्या नाकातून शेंबूड आणि तोंडातून लाळ एकसारखी गळत असते. मलमूत्र विसर्जन करून ते ते आपल्या हातापायाला सारवीतहि असते. पण अशा शेंबड्यालेंबड्या व गलिच्छ मुलाला आपल्या पोटाशी कवळून धरतांना त्याच्या आईला कधीच शिसारी येत नाही. त्याच्या बाबतीत तिच्या ठिकाणी निर्विकल्पता बाणलेली असते. आचरत्या पुरुषांच्या ठिकाणीहि अशी निर्विकल्पता कायमची बाणली पाहिजे.

एखादी गोष्ट पवित्र व दुसरी अपवित्र मानणे, एखाद्या वर्णाचा माणूस उच्च व दुसऱ्या वर्णाचा माणूस नीच मानणे वगैरे ही विकल्पाची लक्षणे

असल्याचे आपण पाहिले आहे. आचरत्या पुरुषाच्या ठिकाणी या लक्षणांचा संपर्कसुद्धा नको. अर्थात् भिक्षुमहंतांनी अंत्यजांना दूर लोटणे, त्यांना अस्पृश्य समजणे, त्यांचा विटाळचांडाळ मानणे हे चुकीचे आहे. विटाळशी उमाइसाला स्पर्श करतांना श्रीचक्रधरस्वामींना वाईट वाटले नाही; मातंगाच्या हातचा लाडू स्वीकारतांना त्यांना शिसारी आली नाही. या दृष्टीने श्रीगोविंदप्रभूचे आचरण विशेष लक्ष्यात घेण्याजोगे आहे. महारामांगाच्या घरी जाऊन खाण्यापिण्याला त्यांना काहीच वाटत नव्हते. म्हणूनच त्यांना श्रीचक्रधरस्वामींनीहि 'निर्विकल्प ( निर्गुण ) ब्रह्म' असे मोठ्या आदरभावाने म्हटले आहे. हीच वृत्ति आचरत्या पुरुषांनी आपल्या अंगी बाणवली पाहिजे. आचरता पुरुष जर महारामांगाचा विटाळ मानील तर त्याला प्रेतदेहारंभक अयोग्यता लागल्यावाचून राहणार नाही, हे काय सांगायला पाहिजे ! 'तुम्हा आवडी नावडी न होआवी' ( आ. मा. १७ ) या वचनानुसार वागल्याने हा विकल्प सहज नाहीसा होऊ शकतो.

### अहंतेचा त्याग

पण श्रेष्ठकनिष्ठता, पवित्रापवित्रता इत्यादि कल्पना आपल्या ठिकाणी उद्‌भवतात याचे मुख्य कारण जीवाच्या ठिकाणी असलेल्या अहंकाराच्या विकारात आहे. इतरांना कमी लेखून छी छी, थू थू करणे हे अहंतेचेच कार्य नव्हे तर काय ! किंबहुना असे करणे म्हणजे स्वतःला फार मोठे मानून सर्व सृष्टीवर 'भकण्या' सारखे होय. म्हणून विचिकित्सारूप विकल्पाची शून्यता करण्यासाठी आचरत्याने आपल्या ठिकाणचे अहंतेचे मूळ उपटून टाकले पाहिजे. ( अहंतेचे मूळ सकंदी उपडावें नाएका : आ. १७९ )

जीवाचे मूळ स्वरूप विकारवंत आहे त्यामुळे हा मूळातील विकार कधीच नाहीसा होऊ शकत नाही. सृष्टिरचना करतांना माया जीवाच्या ठिकाणी असलेला विकार कार्याला आणून त्याच्या ठिकाणी अहंकार उत्पन्न करते. हा अहंतेचा प्रथम अध्यास होय. सूक्ष्म प्रपंचाची रचना होईपर्यंत जीवाच्या ठिकाणी हा अहंकार=अहंपणाचा पहिला अध्यास असतो. आणि जीव स्थूळ प्रपंचात येऊन तादात्म्य पावला म्हणजे त्याच्या ठिकाणी अहंता

१. 'अहंता म्हणजे तादात्म्यावाचौनि नसुद्धा अध्यास : अहंकार उपजे ऐसी बुद्धी : सुखदुःखग्राहकत्व : तादात्मकता तें अहंता' (आ. स्थ. १७९ ).

उत्पन्न होते. कारण स्थूल प्रपंचाशी तादात्म्य असणे हीच अहंता होय. या अहंतेचे कार्य सुखदुःखग्राहकत्व होय.

यावरून एक गोष्ट लक्ष्यात येईल की, अहंतेचे मूळ जीवस्वरूपीच्या विकारात आहे. विकार हाच अहंतेचा कंद होय. तो उपटला जाणे शक्य नाही. त्या विकाराचा पालट करणे एवढाच 'सकंदी' उपटण्याचा अर्थ होऊ शकतो. परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते, त्याच्या वर्णात बदल होतो, पण त्यामुळे लोखंडाचे धातुत्व नाहीसे होऊ शकत नाही. त्याप्रमाणे विकाराची दोषरूपता नाहीशी करून तो गुणरूप करता येतो, पण तो पूर्णपणे नाहीसा करता येत नाही. विकाराचा पहिला उल्लेख हा अहंतेचा कंद होय. त्याशी रसरूप होणे हे अहंतेचे मूळ होय. त्याशी अभिमुख होणे हे अहंतेचे रोप होय. आणि त्या विकाराची असंत कार्ये ह्या अहंतारूपी वृक्षाच्या अनंत शाखा होत[1]. अशा अहंतेचे मूळ कंदासहित उपटायचे म्हणजे विकाराचा पहिला उल्लेख नष्ट करायचा. हाहि संपूर्णतया नष्ट होऊ शकत नाही, हे आपण पाहिलेच. म्हणून ज्या ज्या जडचेतन पदार्थांच्या संयोगाने हा प्रथमोल्लेख निर्माण होत असेल त्या त्या पदार्थांचा त्याग करणे, त्यांचा संबंध येऊ न देणे म्हणजेच अहंतेचा कंद उपटण्यासारखे होय.

याशिवाय, अहंता नाहीशी करण्यासाठी जीवाने आपले अधमत्व नेहमी लक्ष्यात आणावे. वस्तुतः सगळेच जीव अधम असतात. पण इतरांच्या अधमत्वाकडे लक्ष न देता आपल्याच अधमत्वाचा विचार वारंवार मनात आणवा. असे करणाऱ्याच्या मनात विकल्पाला थारा मिळणार नाही[2]. तोच पुरुष खरा ईश्वरपरायण होय. म्हणून आचरत्या पुरुषांनी आपला मोठेपणा न पाहता इतरांचा मोठेपणा मुखाने उच्चारावा. जो स्वतःला ज्ञातविरक्त म्हणवून घेतो तो वस्तुतः ज्ञातविरक्त किंवा मोठा नव्हे. पण स्वतः ज्ञातविरक्त असूनहि जो स्वतःला शोच्य, अधम, रंक, दीन म्हणवून घेतो

१. 'मग प्रथम उल्लेख तो कंद : रसरूपता हे मूळ : मग स्वरूपावरी उपलक्षे तो रोप : असदोत्तरे तीया शाखा' ( आ. स्थ. १७९ ).

२. 'जीव अवघे अधम : परी मी अधम ऐसे देखे तो उत्तम ··· तैसे आपणेयाते ज्ञातविरक्त म्हणे तो नव्हे : शोच्यता न्यूनता बोले तोचि होय उत्तम' ( सदर ).

तोच खरा ज्ञातविरक्त होय. अशा आचरत्या पुरुषाच्या अंतःकरणात विचिकित्सारूप विकल्प निर्माण होणे शक्य नाही.

### उपसंहार

यावरून लक्ष्यात येईल की, विकल्पाचेहि मूळ विकारातच आहे. अर्थात् विकारशून्यतेसाठी श्रीचक्रधरस्वामींनी जो जो आचार सांगितला तो तो सगळा विकल्पशून्यतेसाठीहि अवश्य होय. विकार आणि विकल्प या दोहोत विकल्प हा थोर दोष आहे. तो मुख्यतः ज्ञानाने नासतो. ( विकल्प ज्ञाने नासे : शो. आ. मा. १ ). तथापि तो पुन्हा उत्पन्न होऊ नये म्हणून त्याचे मूळ असलेला विकार हा आटोक्यात आणणे अवश्य आहे. या विकारविकल्पाच्या शून्यतेसाठीच सर्व आचारधर्म आहे असे स्थूल मानाने म्हणायला हरकत नाही. कसे ते क्रमाक्रमाने अभ्यासकाच्या लक्ष्यात येईलच.

प्रकरण ४ थे

# स्वभाव-मात्रा

तर स्वभावा अधीन : जीवा देहाचे वर्तन
तयाचे करविले दमन : ते येणे गुणे ( ज्ञा. प्र. १२२ ).

## स्वभावाला मात्रा

अनुसरलेल्या पुरुषाने विकाराचे नियंत्रण करून विकल्पाचा पूर्णपणे नाश केला पाहिजे असे आपण आतापर्यंत पाहिले. पण हे केव्हां घडून येऊ शकेल ? तर अनुसरलेला पुरुष आपल्या ' स्वभावां ' चे योग्य रीतीने नियंत्रण करील तेव्हां. अर्थात्, विकारविकल्पशून्य होण्यासाठी साधकाने ' स्वभावांना मात्रा देणे ' म्हणजे स्वभावावर नियंत्रण घालणे अत्यंत आवश्यक आहे. म्हणूनच ' असतीपरी ' मधे ' विकारविकल्पशून्य ' या सूत्रापुढे ' स्वभावमात्रे ' हे सूत्र श्रीचक्रधरस्वामींनी सांगितलेले आहे. ( ' विकारविकल्पशून्य ॥१॥ स्वभावमात्रे ॥२॥ निरालंबी ॥३॥ देवतास्मरणे ॥४॥ जो जन्म क्षेपी ॥५॥ '— अ. प.)

## स्वभाव म्हणजे काय ?

' विकार ' हा जसा इंद्रियांचा धर्म, ' विकल्प ' हा जसा मनाचा धर्म ( आ. ५८ ) तसा ' स्वभाव ' हा देहाचा धर्म आहे. मनुष्य जन्माला आल्यानंतर त्याच्या ठिकाणी इंद्रियांचा व मनाचा योग्य तो विकास जेव्हां होतो तेव्हांच विकाराचे व विकल्पाचे खरेखुरे कार्य सुरू होते. म्हणजे

इंद्रियांची व मनाची कार्ये, मनुष्य आपल्या आईच्या उदरातून बाहेर पड-ल्यावर बऱ्याच काळाने सुरू होतात. पण स्वभावाचे कार्य मात्र मनुष्य मातेच्या गर्भामधे येताच सुरू होते. सारांश, स्वभाव हे देहाबरोबरच जन्मतात. म्हणून त्यांचा सर्वस्वी त्याग करता येणे शक्य नाही व इष्टहि नाही. देहाचा व जीवाचा योग असल्यामुळे स्वभावांचा संपूर्ण त्याग केला तर मनुष्यजीवाला जगता येणेच शक्य नाही. कारण स्वभावांच्या अभावी देह वाचू शकत नाही. मग जीवाने दैवूराहाटीच्या क्रिया करायच्या तरी केव्हां? अर्थात्, त्यासाठी त्याला देहधारण करणे अवश्य आहे. आणि देहधारणासाठी स्वभावांची आवश्यकता आहे. म्हणूनच साधकाने आपले स्वभाव संपूर्णत्वाने नष्ट न करता त्यांना-परिमिततेची मात्रा देणे-ते आटो-क्यात आणणे योग्य होय. 'जेवीं वर्मीचा घाव : उरो नेदी जीवीताचा ठाव : आत्यंतिक मोडिता स्वभाव : तैसे होय ॥ म्हणौनि शारीर स्वभावा : दे युक्त मात्रेचा वोल्हावा : का जे येणे वीण स्वधर्मी जीवा : वाढी नाही' (ज्ञा. प्र. १२४–१२५). याच दृष्टीने 'स्वभावी वर्तीजे' (आ. मा. ६७) म्हणजे साधकांनी आपल्या स्वभावांचे योग्य प्रमाणात परिपालन करावे असा विधि मुद्दामहून सांगितला आहे.

स्वभाव आपणहून नष्ट होत नाहीत, इतकेच नाही तर परमेश्वर-साह्याने व पुरुषप्रयत्नानेहि ते नष्ट होऊ शकत नाहीत. म्हणून त्यांचे नियमनच इष्ट व शक्य आहे. आणि हे, केवळ युक्त देह धारण करणाऱ्या अनुसरलेल्या पुरुषानेच करावे. अयुक्त देह धारण करणारे—वेडेपिसे, मुके-बहिरे वगैरे यांना हे शक्य नाही. त्यांचे देह मनाइंद्रियांनी अयुक्त असतात. म्हणून त्यांना स्वभावांचे नियंत्रण करता येणे शक्य नाही. अर्थात्, युक्त-देही अनुसरलेला पुरुष असेल तोच आपल्या स्वभावांना मात्रा देऊ शकेल.

१. आणिक एक धर्म देखीला : तो तया सरिसा म्हणजे देहासमवेत जन्मला : तो अत्याज्य : स्वयं भावो यस्ज स स्वभाव : ' ( ल. बं. अ. प. ३ ). ' जो देहासवे उपजला : अत्याज्य : त्यजोंचि न सकीजे त्यजावेया शक्यचि नव्हे तो स्वभाव ' ( सदर ).

२. ' स्व शब्दे जीव : भाव शब्दे देह : ऐसा दोहींचा योग : देह वाचे तै जीव वाचे : म्हणौनि तयासि मात्रा देवविली ' ( ल. स्थ. अ. प. ३ ).

## अष्टस्वभाव कोणते

क्षुधा, पिपासा, मल, मूत्र, शीत, उष्ण, भय व निद्रा हे आठ स्वभाव किंवा देहधर्म होत.[1] यांचे नियमन कसे करायचे, म्हणजे यांना 'मात्रा' कशा द्यायच्या ते आता क्रमाने पाहू. पण जी मात्रा द्यायची ती मात्र रोग्याला द्यावयाच्या औषधीप्रमाणे अगदी नियमित, वाजवी प्रमाणातच द्यायची.यत्किंचितहि कमीज्यास्त होऊ देता नये.[2] या अष्टस्वभावापैकी 'क्षुधा' म्हणजे भूक ही सर्वांत महत्त्वाची आहे. किंबहुना एकदा क्षुधेला मात्रा दिली गेली म्हणजे इतर स्वभावांचे व विकाराचे अनायासे नियमन झालेच म्हणून समजावे. कारण या सगळ्यांच्या मुळाशी क्षुधा म्हणजे भूक आहे.ही भूक पोटात लागत असली किंवा भुकेच्या शांतीने पोट तृप्त होत असले तरी तिचे मूळ अधिष्ठान रसना म्हणजे जीभ हे होय. आणि याचसाठी साधकाने प्रथम आपल्या रसनेवर नियंत्रण घालणे आवश्यक होय.

## रसनेच्या नियंत्रणाचे महत्त्व

'रसाचे मूळपीठ' आणि 'इंद्रियांची उत्तरवेठ' म्हणजे उतारपेठ असलेली रसना (उद्ध. गी. १९४) जिंकण्याचे मुख्य कारण असे की, निरनिराळे विषय उपभोगणाऱ्या इंद्रियांना उपभोगतत्पर ठेवण्याचे काम 'रसना'इंद्रियच करीत असते. रसनेमुळे शरीराला आहार मिळतो, त्यामुळे इंद्रिये तुष्टपुष्ट होतात. आणि इंद्रियांना तुष्टिपुष्टि लाभली म्हणजे आपापल्या उपभोग्य पदार्थांसाठी ते तळमळत राहून त्यांच्या शोधार्थ स्वैर भ्रमण करीत असतात. 'म्हणौनि जितलिया रसना : पाये निगति योगसाधना : का जे विषयी योजावया मना : इयेचि रस आदी ।। तया रसाचिया तुष्टी : शरीरा चढे पुष्टी : इंद्रिये सळे होउनि अनिष्टी : चालिती जीवाते '(ज्ञा. प्र. ८०७, ८०८); 'देह पोसलिया रसे : होय इंद्रियाचिया ऐसे' (ज्ञा. प्र. १२३) असे विश्वनाथ पंडिताने म्हटले आहे ते याच अर्थाने.

१. 'स्वभाव आठ : आठांची चार द्वंद्वे : क्षुधा पिपासा : मलमूत्र शीतोष्ण : भयनिद्रा ' ( ल. स्थ. अ. प. ३ ).

२. 'मात्रा म्हणजे न्यून्याधिक नव्हे : मपित : यथा रस औषधवत् : तैसे एका सिताचे उणेपुरे न व्हावे ' (सदर.).

अष्टस्वभावांनी युक्त असलेल्या आपल्या शरीराची स्थिति 'पाणी-चोऱ्या' प्रमाणे आहे. या पाणीचोऱ्याला ('जलतस्करिणी' नावाचे एक प्रकारचे यंत्र) अनेक द्वारे असतात. त्यापैकी एक द्वार बंद केले तर पाणी दुसऱ्या द्वाराने वाहते. दुसरे बंद केले तर तिसऱ्या द्वाराने पाणी वाहते. सर्व द्वारे बंद केली तर पाणी वरून वाहते.तथापि त्याचे 'मुख्य' द्वार जर बंद केले तर मात्र पाणी वाहणे पूर्णपणे थांबते. त्याप्रमाणे आपल्या शरीरातील एक इंद्रिय रोधून धरले तर इतर कोणत्यातरी इंद्रियाच्या द्वारा स्वभाव प्रगट होतातच. पण मुख्य 'रसना' इंद्रिय जर रोधले तर मात्र सगळी इंद्रिये रोधल्यासारखी होऊन स्वभाव वाटेल तसे 'वाहू' शकत नाहीत. ते तात्काळ आटोक्यात येतात. (पाणिचोरियाचा दृष्टांत : ७०). आणि म्हणून 'सीरौनि संयमांचां दांडी : हे रसना घालिजे बांदौडी' म्हणजे नियमनाच्या बेडीत घालून आधी रसनेला बंदिवान केले पाहिजे. असे झाले म्हणजे 'तरि चोराकुळ होये देशधडी : इंद्रियांचे' (उद्ध. गी. १९९) इंद्रियरूपी चोरांचा हा समुदाय देशोधडीला लागेल, तो पळून जाईल. सारांश, विचारांच्या शस्त्राने हे जिव्हेचे सावज जर भोसकले, घायाळ केले, म्हणजे जिव्हेवर जर पूर्णपणे नियंत्रण घातले तर अनायासे इंद्रियांचे नियमन होऊन साधकाच्या हातात 'प्रबोधरत्न' सहज पडेल. (विचारांचेनि फरसे : जीव्हेचे सावज उससे : तरि प्रबोधरत्न अनायासे : हाता चढे : उद्ध. गी. १९८). पण इतर इंद्रियावर निग्रह ठेवून रसना जर मोकळी सोडली तर वस्तुतः कोणतेच इंद्रिय जिंकले जाणे शक्य नाही. मग त्याला इतर आचार कुठून करता येणार ? 'आघवीं इंद्रिए तर आळिली : आणि रसना मोकळी सोडिली : तव कोण्हीचि नाही जिंतिली : न जिणता रसु' पण तेच 'तो रस जिंतलिया साता : आपैसयाची न जिणता : अवघी इंद्रिये येती हाता : वैराग्याचिया' (ज्ञा. प्र. ८१२, ८१३). म्हणून स्वभावांना मात्रा देणे, त्यातहि क्षुधेला मात्रा देणे हे अत्यंत आवश्यक होय.

पण याचा अर्थ, क्षुधेचा स्वभाव 'पूर्णपणे' नाहीसा करायचा म्हणजे पूर्णपणे उपाशी राहायचे असा नाही. कारण तसे केल्यास देह जगूच शकणार नाही, हे आपण पाहिलेच आहे. आपल्या देहाचे अस्तित्व एका दृष्टीने क्षुधेच्याच आधीन आहे. म्हणून देह अस्तित्वात राहण्यापुरती क्षुधानिवृत्ति साधकाने केलीच पाहिजे. अर्थात्, यासाठी क्षुधेचे किंवा इतर सर्व स्वभा-

यांचे नुसते 'दमन' करणे, ते परिमित प्रमाणात सेवन करणे आवश्यक आहे. (तर स्वभावा अधीन : जीवा देहाचे वर्तन : तयाचे करविले दमन : ते येणे गुणे : ज्ञा. प्र. १२२). साधकाने आपल्या शरीराचे अत्यंत शोषण देखील होऊ देता कामा नये. कारण तसे झाल्यास त्याला परमेश्वराचे स्मरण नीट रीतीने करता येणार नाही. त्यामुळे त्याच्या सत्त्वाची व धर्माची हानि होईल, हे विसरता कामा नये. (आणि शोषलिया अति त्रासे : सत्त्वा हानि : ज्ञा प्र. १२३).

## आहारमात्रेचे प्रमाण

साधकाने आहाराला मात्रा द्यायची म्हणजे परिमित प्रमाणात आहार करायचा हे खरे. पण या प्रमाणाला काही निश्चित मर्यादा आहेत काय ? अर्थात्, आहेत. कोणत्याहि साधकाने दररोज जास्तीत जास्ती चार शेरापेक्षा अधिक आणि एक शेरापेक्षा कमी आहार घेता कामा नये. दररोज चार शेर आहार घेणाऱ्या साधकाला 'संपूर्णाहारी' असे म्हणतात. कारण जास्तीत जास्त प्रमाणातील संपूर्ण आहार तो घेत असतो. तीन शेर किंवा त्यापेक्षा जास्त, पण चार शेरापेक्षा कमी आहार घेणारा पुरुष तो 'पाऊण आहारी' होय. दोन शेर किंवा त्यापेक्षा अधिक, पण तीन शेरापेक्षा कमी आहार घेणारा साधक 'अर्धाहारी' होय. आणि एक शेर किंवा त्यापेक्षा अधिक, पण दोन शेरापेक्षा कमी आहार घेणारा साधक 'चतुर्थांशी' होय. एका शेरापेक्षा कमी आहार मात्र कुणीहि घेऊ नये. कारण स्मरणादि क्रिया नीट रीतीने होण्याइतपत देहधारण करण्यास कमीत कमी एक शेराचा आहार तरी अवश्य आहेच.

## फक्त भिक्षान्न सेवन करावे

पण हा आहार आचरत्या पुरुषाने मिळवायचा कुठून ? त्याने अन्नधान्यादिकांचा संग्रह करून पचन-पाचन करावे की काय ? छे छे, मुळीच

१. 'मात्रे पादाशन : तर मात्रा म्हणजे संपूर्ण आहार : पाद म्हणजे चवथा वाटा : अशन म्हणजे भक्षण : **तो उत्तम : अर्धा आहार तो मध्यम : पाउण आहार तो कनीयस** : एवं पर्यंत तीन शेर आन ती शेरावरूते नउ टाक या पासौनि चौशेरास नउ टाक उणे तरी तो पाऊण आहारचि : **संपूर्ण आहार तो संबंधातुले**' (ल. बं. अ. प. ३).

नाही. तसे करायचे म्हटले म्हणजे संसारातील सर्व उपाधि त्याच्यामागे लागल्याच म्हणून समजावे. इतर सांसारिकांचा सर्व काळ आपल्या उदरनिर्वाहाची सोय लावण्यात खर्ची पडतो. तसा परमेश्वरमार्गातील साधकाचाहि पडला तर मग त्याने नामस्मरणादि साधनांनी परमेश्वराची सेवा केव्हां करायची ? तेव्हां साधकाने धान्यसंग्रह करून पचनपाचन वगैरे करण्यापासून पूर्णपणे अलिप्तच राहिले पाहिजे. त्याने आपला आहार भिक्षा मागून मिळवावा. अर्थात् या दृष्टीने परमेश्वरमार्गातील साधकाचा भिक्षाविधि हा अत्यंत महत्त्वाचा विधि आहे.

## भिक्षा हे राज्य

भिक्षेला श्रीचक्रधरस्वामींनी ' राज्य ' असे म्हटले आहे. ( भिक्षा राज्य बाइ : आ. ९१ ). राज्यात राजा ज्याप्रमाणे सर्वाधिकारी आणि स्वतंत्र असतो त्याप्रमाणे भिक्षारूपी राज्यात भिक्षुक म्हणजे साधक पुरुष हा स्वतंत्र असतो. पचनपाचन करणाऱ्याला ज्याप्रमाणे इतरावर अवलंबून रहावे लागते त्याप्रमाणे भिक्षावृत्तीने निर्वाह करणाऱ्याला रहावे लागत नाही. तो कुणाचा बांधलेला नसतो. शिवाय, मागून आणलेल्या भिक्षान्नावर त्याचेच संपूर्ण सामित्व असते. हेहि राज्यच होय. आपल्या राज्यात राजा वाटेल त्या वेळी कुठेहि जाऊ शकतो. त्याप्रमाणे भिक्षुक हाहि स्वेच्छेने वाटेल त्याच्या घरी भिक्षेला जाऊ शकतो. या बाबतीत त्याच्यावर एखादे बंधन असले तरी ते त्याच्या स्वतःचे; इतरांचे बंधन त्याला नाही.

अशी ही भिक्षावृत्ति म्हणजे कामक्रोधादि रिपूंच्या दमनाचे व वैराग्याचे धडे देणारी पाठशाळाच होय. भिक्षेसाठी दुसऱ्याकडे आल्यागेल्यामुळे त्याला विनम्रतेचे पाठ आपोआप मिळतात. एखाद्याच्या घरी गेल्यावर तेथील गृहस्थ त्या भिक्षुकाची, त्याला काहीहि न देता, हातानेच बोळवण करतो. त्यामुळे तो सहसा गर्वोद्धत होत नाही. त्याला आपल्या योग्यतेची

१. ... ' मिनलेहि पदार्थ काही उणीव अथवा कवणाचे बंधन असे आन काई : म्हणे ना : तिये दोन्हीं नसुनं स्वातंत्री तिये अर्थी भिक्षेते राज्य म्हणीतले असे ... **राज्य ते स्वातंत्रिये** ... एवं राज्य ते स्वातंत्रिये भिक्षा मागून भोजन करणे यातेचि बोलिजे ' ( आ. बं. ९१ ).

जाणीव न ठेवता किंवा होऊ न देता पुरेशी भिक्षा मागावी लागते. ( जाणों नेदी योग्यता : ग्रही हात बोळावन करिता : आहार पर्याप्त : अटन करी : उद्ध. गी. ३४९ ). त्याला निराभिलाष राहून व रागद्वेष सोडूनच भिक्षा मागावी लागते. आणि यदृच्छेने जितके मिळेल तितक्यावर संतुष्ट व्हावे लागते. रसाचा कण कण मिळवतांना भ्रमर ज्याप्रमाणे स्वतःला शीण वाटू देत नाही त्याप्रमाणे अनेक घरातून भिक्षा मागतांना भिक्षुकाला कितीहि श्रम पडले तरी ते सहन करावे लागतात. ( ऐसा निराभिळाषु : सांडुनि रागद्वेषु : जया) अदृष्टवशे संतोषु : यदृच्छालाभे ॥ मेळविता कणुकणु : उपजो नेदी सीणु : ये अर्थी जाणु : मधुकरू जैसा ॥ उद्ध. गी. ३५१; ३५२ ). अशी ही भिक्षावृत्ति म्हणजे वैराग्याचे धडे शिकवणारी पाठशाळाच नव्हे काय ? तिचा आश्रय घेऊन स्वकष्टाने मिळवलेल्या त्या भिक्षान्नात भिक्षुकाला अमृताचा आस्वाद घ्यायला सापडला तर आश्चर्य नाही. ' भिक्षान्नी सवावो पळ अमृत आति : ' ( आ. मा. २१२ ) असे म्हटलेच आहे.

## भिक्षेची वेळ : तिसरा प्रहर

या भिक्षेच्या स्वतंत्र राज्यातहि भिक्षुकाला ' स्वनिष्ठ ' म्हणजे आपल्या स्वतःसाठी म्हणून काही नियम पाळावे लागतातच. ते आता क्रमाने पाहू. भिक्षावृत्तीत स्वातंत्र्य असले तरी साधकाने उठल्यासुटल्या किंवा वाटेल त्यावेळी भिक्षा मागावी असे मात्र नाही. आपल्या स्वभावानुसार आवश्यक तेवढा आहार दिवसातून एकच वेळा घ्यायचा असल्यामुळे साधकाने भिक्षा मागायची तीहि दिवसातून एक वेळ. आणि ही भिक्षा त्याने केव्हां मागायची ? सकाळी किंवा संध्याकाळी नव्हे, कारण त्यावेळी गावातील लोक आपल्या उपजीविकेच्या निरनिराळया कामधंद्यात गढून गेलेले असतात. विशेषतः या वेळी घरोघरी स्वयंपाकपाणी होत असून मुलाबाळांची, बायकापुरुषांची जेवणे चालू असतात. नेमके या वेळी भिक्षा मागण्यास जाणे चांगले नाही. कारण त्यामुळे गृहस्थांच्या भोजनकार्यात अडथळा आणल्यासारखे होते. शिवाय अशा वेळी भिक्षेला गेल्यास चांगले अन्न मिळण्याचा संभव असतो. तो टाळण्यासाठी आणि पचनपाचनाचा दोष आपल्या अंगी येऊ नये म्हणून शक्यतोवर भिक्षुकांनी तिसऱ्या प्रहरी म्हणजे दुपारच्या वेळी भिक्षेला जावे. ( तिसरा पाहारी भिक्षा कीजे : आ.

मा. ५३ ). कारण यावेळी गृहस्थांची जेवणे आटोपली असतात. दाराशी कुणी भिक्षुक आल्यास त्याला भिक्षा वाढण्यासाठी आवश्यक ती स्वस्थता यावेळीं त्यांना लाभलेली असते. जेवणे आटोपून उरलेल्या अन्नाची झाकपाक होत असते किंवा उरकलेली असते. यावेळी भिक्षेला गेल्याने त्या उरलेल्या अन्नातूनच भिक्षुकांना अन्न मिळते. उलट स्वयंपाकपाणी चालू असतांना भिक्षेला गेल्यास त्या घरातील मंडळीच्या तोंडचा घास काढल्यासारखे होते. म्हणून उत्तम उपाय हा की, गावातील जेवणे आटोपून चुली वगैरे विझल्यानंतरच भिक्षुकाने भिक्षेला जावे. तत्पूर्वी जाऊ नये. ( निर्धूम नगर जालेया भिक्षे रिगीजे : आ. मा. ५२ ). हे निर्धूमत्व अर्थात् सकाळच्या स्वयंपाकानंतरचे; सायंकाळचे नव्हे. कामविकार टाळण्याच्या दृष्टीने भिक्षुकाने रात्री भिक्षेला कधीच जाऊ नये. तिसऱ्या पाहारची वेळ हीच भिक्षेला सर्व दृष्टींनी सोयीची वेळ होय.

एखाद्या गावी चारदोन भिक्षुक संगसांघात करून अटनानिमित्त आलेले असतात. कधी कधी शेदोनशे भिक्षुकांचा मार्ग आलेला असतो. अशा वेळी, अर्थातच, आपण लौकर भिक्षेला जावे असे प्रत्येकाला वाटणे स्वाभाविक आहे. कारण, तिसऱ्या प्रहरी का होईना पण जो आधी जाईल त्याला लौकर व पुरेशी भिक्षा मिळण्याचा संभव असतो. मागाहून येणाऱ्यांना कदाचित् काहीहि मिळणार नसते. अशा स्थितीत आचरत्या पुरुषाने संयम करणे अवश्य आहे. भिक्षेच्या वेळेची वाट पाहात राहून, ती वेळ होताच लगबगीने सर्वांच्या आधी जाण्यामुळे त्याची लोलुपताच व्यक्त होते. अशी लोलुपता भिक्षुकाच्या ठिकाणी असणे इष्ट नाही. या दृष्टीने विचार केला असता जो सर्वांच्या पाठीमागून भिक्षेला जाईल तोच खराखुरा विरक्त पुरुष म्हटला पाहिजे. ( पाठी भिक्षे जाए तो विरक्तु : आ. मा. ५४ ).

## चारहि वर्णांच्या घरी भिक्षा

विजनात राहणारा भिक्षुक हा भिक्षेसाठी गावात शिरला म्हणजे त्याला अनेक वर्णांच्या लोकांची घरे लागतात. त्यापैकी त्याने भिक्षा मागायची ती कुणाच्या घरी ? की एखाद्या विशिष्ट वर्णांच्या लोकाच्या घरी ? यासंबंधी श्रीचक्रधरस्वामींनी ' चातुर्वर्ण्य चरेद्भैक्ष्यम् : या शास्त्रासि अनुसरीजे ' ( आ. ८१ ) अशी स्पष्ट आज्ञा सांगितलेली आहे. ब्राह्मण,

क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण आहेत. या सर्व वर्णांच्या घरी भिक्षा मागावी. त्यात त्याने हा ब्राह्मण, हा शूद्र असा भेदभाव करता कामा नये. तसे केल्यास तो आचरता पुरुष विचिकित्सारूप विकल्पाचा धनी होईल. 'ऐसा जो महात्म : तो सांगता निरोपम : चातुर्वर्णी भिक्षा नेम : हिंसारहित ।। तो यथाकाळी दिवसा : नगरात प्रवेशे सहसा : तो त्यजूनि सर्वदोषा : भिक्षा चहुवर्णी करी' (द. प्र. ५३१; ५३२) या ओव्यात दर्शनप्रकाशकर्त्यानेहि चहुवर्णी भिक्षेचाच अनुवाद केलेला आहे.

'चातुर्वर्ण्यं चरेद् भैक्ष्यम् : या शास्त्रासि अनुसरीजे' या वचनाचा स्पष्टार्थ असा की 'चारहि वर्णांमधे भिक्षा करावी असे जे शास्त्र किंवा धार्मिक नियम ते साधकाने अनुसरावे म्हणजे पाळावे.' तथापि बंदकारांनी याचा अर्थ थोडा निराळ्या रीतीने लावला आहे. 'चारहि वर्णांमध्ये भिक्षा करावी'... पण ती करतांना 'या शास्त्राला म्हणजे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितलेल्या विधिनिषेधाच्या नियमांना अनुसरावे; परमेश्वराने सांगितलेले विधिनिषेधाचे नियम पाळावे' असा अर्थ ते करतात. त्यांच्या टीकेचा भावार्थ असा की, इतर संप्रदायांच्या शास्त्रात देखील चातुर्वर्ण्य भिक्षा सांगितलेली आहे. पण त्या शास्त्रांचे अनुसरण परमेश्वरमार्गीच्या साधकाने करता कामा नये. याचे कारण असे की, परमेश्वरशास्त्राव्यतिरिक्त इतर शास्त्रांना विधिनिषेधांचे यथार्थ ज्ञान नाही. उदाः जोगी लोक चातुर्वर्ण्याबाहेरहि भिक्षा करतात. तशी महानुभावांनी करू नये. केल्यास त्यांना लोक पाणवठ्यावर येऊ देणार नाहीत, तेथे पाणी भरू देणार नाहीत. जोगी लोक हे एका विशिष्ट दर्शनाचे अनुयायी म्हणून जनतेला ठाऊक असल्यामुळे त्यांना पाणवठ्यावर येऊ द्यायला कोणी इनकार करणार नाहीत. परमेश्वरमार्गीच्या साधकाने त्यांचे अनुकरण करून चातुर्वर्ण्याबाहेर भिक्षा न करता

१. '**या शास्त्राशी म्हणजे इतर शास्त्रीहि चौवर्णी भिक्षा असे** परि ते विकल्पकवळीत : **त्यासी ना** : अनुसरावे : की जे त्यासि विधिनिषेधाचे आन हिंसेचे ज्ञान नाही म्हणौनि : **या ईश्वरशास्त्रासि अनुसरावे** : ईश्वरशास्त्री विप्रतिपत्तिपूर्वक सकळ निषेध चुकवावयाचे ज्ञान असे : यातव त्या अनुसरौनि भिक्षा करावी' (आ. बं. ८१).

चातुर्वर्ण्यातच भिक्षा करावी.

## घर न निवडता निर्हेतुक भिक्षा करावी

चातुर्वर्ण्य भिक्षा करीत असता नेमकी काही घरे निवडून तेथेच भिक्षा करू नये. भुंगा ज्याप्रमाणे 'साने थोर न निवडी' (उद्ध. गी. ३५०) त्याप्रमाणे भिक्षुकानेहि हे घर लहान, ते घर मोठे, येथे आपणाला सदन्न मिळेल, तेथे कदन्न मिळेल असा कोणताहि विचार न करता प्रत्येक घरी भिक्षा मागावी. (घर न निवडीत भिक्षा कीजे : आ. ८२). श्रीमंतांची मोठमोठाली समृद्ध घरे निवडून तेथेच भिक्षेसाठी जाणे हे निषिद्ध होय. तसे केल्याने उपरोक्त वचनाचाच भंग होतो असे नाही तर 'संपन्नाचिया घरा भिक्षे न वचावे' (शो. आ. मा. ३७) या परमेश्वराच्या आज्ञेचाहि भंग होतो व निषिद्धाचरणाचा दोष साधकाला लागतो. तसेच, त्या निमित्ताने प्रतिकूल देवतांना विघ्ने करायला संधी सापडते. कारण घराची निवड करतेवेळी काही रसरूप उल्लेख साधकाकडून होतातच. किंबहुना म्हणूनच तो घराची निवड करतो तेव्हां भिक्षेला जातांना मधले एखादे घर टाळून पुढे जाणे योग्य नाही. 'ओळी पाडिले डावलावे ना' (शो. आ. मा. ३६) म्हणजे क्रमाने आलेले कोणतेहि घर डावलून–टाळून पुढे जाऊ नये असे सांगितलेलेच आहे.

मधेच काही घरे टाकून पुढे गेल्याने, ज्या पात्राच्या ठिकाणी त्या घरातील लोकाकडून अन्नप्रवेशन व्हावे असा परमेश्वराचा हेतु असतो तो प्रतिबंधतो. ती भिक्षा आपल्या निमित्त होते– ईश्वरसेवेच्या हेतूने नव्हे.

१. 'दशविप्रामध्ये चातुर्वर्ण्य बोलिजे' असाहि एक अर्थ बंदकाराने दिलेला आहे. त्याचा सरळ अर्थ असा होतो की गौड, कान्यकुब्ज, सारस्वत, मैथिल व उत्कल हे पंचगौड ब्राह्मण आणि तामिळ, कर्नाट, गुर्जर, महाराष्ट्र व तैलंग हे पंचद्राविड ब्राह्मण यांच्याच घरी भिक्षा करावी. म्हणजे चातुर्वर्ण्यातील फक्त ब्राह्मण वर्णाच्याच घरी भिक्षा करायला श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे असा त्याचा अर्थ होईल. 'चातुर्वर्ण्य' या शब्दाचा हा संकुचित अर्थ स्वामींना अभिप्रेत असेल असे वाटत नाही.

२. '**हे घर साने : हे थोर : हे संभवाचे ऐसे दिसत असे : तरि या जावो : येरा न वचो ऐसे निवडावे ना : निवडिल्या आज्ञाभंग : प्रातिकूळा मिष होय**' (आ. स्थ. ८२).

अशा भिक्षेला सहेतुक भिक्षा असे म्हणतात. ती निषिद्ध मानलेली आहे. भिक्षा नेहमी निर्हेतुक असली पाहिजे. ( निर्हेतुक भिक्षा : आ. मा. २०३ ). आपल्या निमित्त सहेतुक भिक्षा केल्याने अन्नपचनादि दोष साधकाला लागतो. तो अन्नस्वीकार आपल्यासाठी झाल्यामुळे त्या अन्नाबरोबर झालेल्या मुंग्यांची सानी हिंसा घर निवडणाऱ्या त्या साधकाच्या माथी पडते. तसेच, त्याने घर निवडल्यामुळे आशेचा आश्रय केल्यासारखे होते. सदन्नाची त्याला गोडी लागू पाहते; कदन्नाने तो पुढे त्रासण्याचा संभव असतो वगैरे अनेक दोष त्याच्या पदरी येतात. ते येऊ नयेत म्हणून साधकाने घरे न निवडता निर्हेतुक भिक्षा करावी हेच उत्तम.

**गावेहि निवडू नयेत.**

ज्याप्रमाणे एका गावातील घरे निवडून भिक्षा मागू नये त्याचप्रमाणे एका प्रांतातील किंवा देशातील गावे देखील भिक्षेसाठी निवडू नयेत. म्हणजे, अमुक गाव श्रीमंताचे आहे, तेथे गेल्याने भिक्षा चांगली मिळेल अशी कल्पना करून त्याच गावात भिक्षेसाठी जाणे हे अयोग्य होय. कारण अशा रीतीने साधकाने अनेक गावातून एक गाव भिक्षेसाठी निवडले तर मग त्याच गावात भिक्षेसाठी विशिष्ट आळी, त्या विशिष्ट आळीतील विशिष्ट घरेच निवडण्याची प्रबल इच्छा त्याला झाल्यावाचून राहील काय ? अर्थात् नाही. आणि एकदा अशा रीतीने गाव, आळी, घर निवडून भिक्षा मागण्याची साधकाला सवय लागली की वर निर्देशिलेल्या अनेक दोषांचा तो धनी झालाच म्हणून समजावे. हे दोष टाळण्यासाठी व परमेश्वराची आज्ञा पाळण्यासाठी भिक्षुकाने गावें, आळी, घर वगैरे न निवडता चातुर्वर्ण्य भिक्षा करावी हाच सर्वोत्कृष्ट मार्ग होय.

१. '**ईश्वर हेतु ठाके : आपुला होय : पचनाचा दोष ये : मुंगिया येती आश आश्रयो : येतुले दोष होती : हे अदृष्ट : ना दृष्ट तरी भिक्षेसि सदन्नचि ये तेणे गोडी संचरे : का कदन्नचि ये तेणे त्रसे : का जे 'अदृष्ट साह्य नाही**' ( आ. स्थ. ८२ ).

२. 'घर न निवडावे ते येणेच उपलक्षणे गावहिं न निवडावे ··· **स्वदेश त्याग करूनि विदेशी असावे : कैसेया पा : निवडावे नाही : हे थोर हे साने : संभव असंभव : गावात रिगाला आन मागोचि आदरावे : येऱ्हवी न निवडी : हे गावात जाऊनि करील**' ( आ. वं. ८२ ).

## ओळखीच्या घरी जाऊ नये

घर न निवडता चातुर्वर्ण्य भिक्षा करीत असतांना आपणाला ओळख-णारांची घरे भिक्षुकाने टाळली पाहिजेत. त्याने तिकडे जाऊच नये. ( वोळ-खतेयाचेया घरा न वचावे : आ. ८३ ). कारण ते घर श्रीमंताचे असले तर तेथील लोक आपल्याला भिक्षा म्हणून सदन्न वाढतील. किंवा, ते घर दारिद्र्याचे असले तर तेथील लोक आपल्या ओळखीमुळे स्वतः उपाशी राहतील पण आपल्याला जवळ असेल नसेल ते घालतील. तसे त्यांनी न केले तर त्यांची त्यांना लाज वाटायला लागते. हा प्रसंग त्या दरिद्री लोकावर येऊ नये म्हणून साधकाने आपल्या ओळखीच्या घरी भिक्षा मागायला न जाणे चांगले.[1]

भिक्षुकाने ज्या कारणासाठी ओळखीच्या श्रीमंताच्या घरी भिक्षेसाठी जायचे नाही त्याच कारणासाठी त्याने, ज्या घरी त्याला आदराने भिक्षा वाढतात त्या ठिकाणीहि पुन्हा जाऊ नये. ( आदरे भिक्षा देती तया घरा न वचावे : शो. आ. मा. ३५ ). आदरपूर्वक वाढलेली भिक्षा ही सुग्रास अन्नाचीच असणार. अशी भिक्षा सहज मिळाली तर ती स्वीकरणीय ठरते. पण ती जिथे मिळते तिथे जाण्याची इच्छा बाळगणे ही लोलुपता होय. दुसरे असे की या आदराच्या पोटी त्या घरातील एखाद्या स्त्रीचे प्रेमहि असण्याचा संभव असतो. अशा घरी जाणे म्हणजे विषयोपभोगाला आमंत्रण देण्या-सारखेच ठरेल. म्हणून भिक्षुकाने अशा घरी दुसऱ्यांदा जाण्याचे अवश्य टाळले पाहिजे.

## तोरणमंडळाच्या घरी जाऊ नये

लग्नमुंजी आठांगुळे, बारसे, उष्टावण वगैरे सारख्या शुभकार्यासाठी ज्या घराला ‘ तोरण ’ बांधलेले असते तेथेहि भिक्षेसाठी जाता कामा नये. कारण तेथे सविकार पदार्थांची भिक्षा मिळते. आणि दुसरे असे की त्या मंगल

१. ‘ ओळखीचा ठाइ सोपस्कर अन्न ये : जर संभवाची तरी : निष्कंचने तरि : निरोध पडे : आपण उपवास करीति परी तया असे ते घालीती : ते नाही तरी साकडी पडे : लाज मानिती : उदासीनता होआवी ’ ( आ. स्थ. ८३ ).

कार्याला उत्तम वेषभूषा व केशभूषा करून आलेल्या स्त्रियांचे तेथे भिक्षुकाला दर्शन होते. क्वचित्, अशा शृंगारलेल्या स्त्रियांच्या हातूनच त्याला भिक्षा मिळण्याचा संभव असतो. त्यामुळे त्या भिक्षूला विकार होणे शक्य असते. म्हणून अशी तोरणाची घरे त्याने टाळावी. 'मंडळाचे' घर म्हणजे जेथे बरेच लोक जमून श्राद्धपक्ष वगैरे धार्मिक विधि आचरीत असतात तेथेहि भिक्षूने जाता कामा[2] नये. कारण अशा ठिकाणी गेल्याने त्याच्या मनात विकल्प निर्माण होण्याचा संभव असतो. ( तोरण मंडळाचेया घरा न वचावे : आ. ८४ ).

तोरणाची, मंडळाची, ओळखीची वगैरे घरे टाळणे हा भिक्षुकाचा नित्यविधि होय. तथापि, क्वचित् दुसऱ्या एखाद्या अशक्त भिक्षूसाठी, म्हणजे नैमित्तिक विधि प्राप्त झाल्यास अशा ठिकाणीहि भिक्षा मागायला हरकत नाही. पण ते फक्त नैमित्तिक विधिसंबंधानेच. एरवी नाही. त्यात घडलेले दोष नैमित्तिक विधिमधे सामावले जातात[3].

## मद्यमांसस्थाने भिक्षेला त्याज्य

आतापर्यंतच्या विवेचनावरून एक गोष्ट लक्षात येईल की वसतीसाठी भिक्षुकाला जी जी स्थाने त्याज्य म्हणून सांगितली आहेत ती सर्व भिक्षेसाठीहि त्याज्य होत. ज्या ठिकाणी गेल्यामुळे विकार किंवा विकल्प निर्माण होण्याचा संभव असतो अशा ठिकाणी साधकाने भिक्षेसाठी देखील जाता कामा नये. हिंसेची स्थानेहि त्याला वर्ज्य होत. 'मत्तद्रव्य' म्हणजे उन्माद आणणारे पदार्थ भिक्षुकाला निषिद्ध असल्यामुळे ( आ. ९; ली. च. उत्त. २६९ ) या पदार्थांचे सेवन किंवा क्रयविक्रय ज्या ठिकाणी होत असेल

१. 'तोरण म्हणजे जेतुले शुभकार्य : विवाह : मुंजी : अष्टांगुळे : बारसे : उष्टावन : इत्यादि : तेथ गेलिया पदार्थ ये आन लेइल्या नेसल्या स्त्रियांचे दर्शन होय' ( आ. स्थ. ८४ ).

२. 'मंडळ म्हणजे श्राद्ध : तेथ गेलेया विकल्पजनित अन्न ये म्हणौनि' (सदर).

३. 'स्वनिष्ठी नित्यकी निषेध : निमित्तकी विधि : का जे तेव्हा भेट जालिया : अथवा शुश्रूषे की संगाती : पदार्थेसी अन्वयो : परस्परे प्रितीचेनि वचने म्हणौनि : आन दोष तो विधी आत मोडत असे : भलतेही निमित्तकी विधी आत सामाये म्हणीतले' ( आ. वं. ८४ ).

त्या ठिकाणीहि त्याने भिक्षा मागू नये. 'तो महात्मा भिक्षा मागत : मद्य-मांस विवर्जित : विकार विकल्प घरे त्यजित : सत्य जाणा ' (द. प्र. ५६०) या ओळीत दर्शनप्रकाशकाराने भिक्षेसाठी वर्ज्य असलेल्या स्थानांचा थोडक्यात उल्लेख केलेला आहे. तो भिक्षुकाने नेहमी डोळ्यासमोर ठेवावा.

## एकाच मार्गाने परतू नये

वरील निषिद्ध स्थाने वगळून पण त्याव्यतिरिक्त घर न निवडता चातुर्वर्ण्य भिक्षेसाठी साधकाने गावात शिरतांना एका बाजूने आत शिरावे व दुसऱ्या बाजूने बाहेर निघावे. ( एकीकडौनि रिगीजे : एकीकडौनि निगीजे : आ. ८५ ). म्हणजे ज्या रस्त्याने तो आत जाईल त्याच रस्त्याने त्याने बाहेर येता कामा नये. त्याच त्या रस्त्यावरून पुनःपुन्हा जाण्यायेण्याचे त्याने टाळले पाहिजे. कारण, पुन्हा त्याच रस्त्याने आल्यास आधी दिसलेले जडचेतन पदार्थ पुन्हा त्याच्या दृष्टीस पडतात. त्यामुळे त्यांच्या विषयी त्याच्या मनात विकार उत्पन्न होण्याचा संभव असतो. त्याने पहिल्यांदा लोकांना उदास दृष्टीने पाहिले असते. पण पुन्हा त्या रस्त्याने गेल्यास पूर्वीचा उदास-पणा जाऊन थोडीशी ओळख होते. क्वचित्, हा अमक्यातमक्या संप्र-दायाचा भिक्षुक म्हणून लोक निंदास्तुतिहि करू लागतात. हे टाळण्यासाठी भिक्षुकाने आल्या रस्त्याने परत जाणे चांगले. एका रस्त्यावरून पुनःपुन्हा परत फिरण्याच्या निमित्तानेहि त्याने जाता कामा नये.

## एका घरी भिक्षा नको

भिक्षुकाने ज्याप्रमाणे एकाच रस्त्यावरून पुन्हा जाऊ नये त्याप्रमाणे त्याने दररोज एकाच घरी भिक्षा मागू नये. ( एकी भिक्षा न करावी : आ. मा. ५५ ). मधुकराप्रमाणे त्याने अनेक ठिकाणाहून आपले भिक्षान्न गोळा करावे. एकाच ठिकाणी नेहमी भिक्षा केली तर त्याच्या विरक्तीचा व शेवटी त्याचाहि त्यामुळे नाश होईल. ( माधुक्रिया वृत्ती : वर्त्तावे यती : एकि भिक्षा विरक्ती : नाशु होए : उद्ध. गी. ३४८ ). दररोज एकाच घरी भिक्षेसाठी गेले तर घर निवडल्यासारखे होऊन तदनुषंगिक सर्व दोष भिक्षुकाला लागतात

१. ' मागौते तेयाचि बिदी आलेया : ओळखी परिचयो : हा अमकीये मार्गीचा : सांडिल्या पदार्थांचे दर्शन श्रवण होय ' ( आ. स्थ. ८५ ).

हे एक; आणि दुसरे असे की त्यामुळे त्या घरातील जडचेतन पदार्थाविषयी आसक्ति निर्माण होऊन भिक्षुक धर्मभ्रष्ट व्हायला वेळ लागत नाही.

एकाच घरी भिक्षा न करण्याचे दुसरेहि कारण आहे. भिक्षुक एकाच घरी भिक्षेसाठी गेला तर त्या घराला म्हणजे तेथील लोकांना त्याला दररोज अन्न घालण्याचे साकडे पडते. गृहस्थ झाला तरी दररोज भिक्षुकाला अन्न कोण घालणार ? म्हणून भुंगा ज्याप्रमाणे लहानमोठे फूल न निवडता आणि एकाच फुलावर धाड न घालता दररोज निरनिराळया पण अनेक फुलामधून आपला रस गोळा करतो ( साने थोर न निवडी : ग्राहिया उपखा न पडी : पडो नेदी साकडी : सुमनासि : उद्ध. गी. ३५० ) त्याप्रमाणे भिक्षुकानेहि एकाच घरी भिक्षेला जाऊन तेथील गृहस्थांना साकडे घालण्यापेक्षा पुष्कळ घरी भिक्षा मागून आपला निर्वाह करावा हे चांगले.

## एका घरासमोर

एकाच घरी दररोज भिक्षा मागू नये इतकेच नाही तर गावात भिक्षेला गेल्यावर साधकाने भिक्षेसाठी एका घरासमोर फार वेळ उभे राहताहि कामा नये. भिक्षाशब्द उच्चारल्यावर त्याने एक क्षण ( २ मिनिटे २४ सेकंद ) तेथे उभे रहावे. तेवढ्या वेळात भिक्षा मिळाली तर ठीक, नाही तर लाग-लीच पुढे चालू लागावे. ( क्षण एकु उभेया राहिजे : मग निगौनि जाइजे : आ. मा. ५६ ). तसे न करता आशाळभूतपणाने एकाच घरापुढे फार वेळ रेंगाळत राहिले तर त्यामुळे भिक्षुकाचे भिक्षावृत्तीतील स्वातंत्र्य नाहीसे होऊन त्याचे निरालंबत्व भंग पावते. शिवाय त्याच्या त्या रेंगाळण्या-मुळे त्या घरमालकावर एक प्रकारचे अप्रत्यक्ष दडपण आणल्यासारखे, अर्थात्, त्याला साकडे घातल्यासारखे होते. असे कधीहि होऊ देऊ नये.

## दात्याच्या गुणदोषाकडे दुर्लक्ष

भिक्षा मागतांना आणखीहि एक गोष्ट भिक्षुकाने लक्ष्यात ठेवली पाहिजे. निषिद्ध स्थाने टाळून भिक्षेसाठी एखाद्या घरी गेल्यावर अनेकदा भिक्षा देणाऱ्याच्या ठिकाणी अनेक गुणदोष आढळून येतात. तेव्हां भिक्षु-काने काय करावे ? अशा वेळी त्याने त्या माणसाकडून दिली जाणारी भिक्षा मुकाट्याने स्वीकारावी. तिचा अनमान करू नये. त्याने त्या देणा-

त्याच्या गुणदोषाकडे लक्ष न देता, काणा डोळा करावा. कर्मराहाटीतील लोकांचे ते गुणदोष साधकाच्या दृष्टीने निषिद्धच असतात. त्यांच्या विषयी त्याने 'फाळुके झाडावे' म्हणजे दोषांचा–आणि गुणांचाहि त्याग करावा. त्यांच्या त्या गुणदोषांचे परिणाम ते भोगतील, आपणाला त्याचे काय, असे आपल्या मनाचे समाधान करून त्याने तेथील भिक्षान्न स्वीकारून पुढे जावे. ( आ. १२० )

## पात्रान्त व नगरान्त भिक्षा

भिक्षेला निघाल्यावर भिक्षुकाने फक्त 'पात्रान्त' भिक्षा मागावी. 'पात्रान्त' भिक्षा म्हणजे भिक्षा मागणाऱ्या आचरत्या पुरुषाला ( पात्राला ) त्याच्या आहारमात्रेप्रमाणे पुरे होईल इतकी भिक्षा. पूर्णाहारी साधकाला साधारणपणे चार शेर अन्न मिळाले म्हणजे त्याची 'पात्रान्त' भिक्षा झाली. कारण तेवढाच त्याचा नियमित आहार असतो. चतुर्थांशियाची 'पात्रान्त' भिक्षा एक शेराचीच राहील. सारांश, भिक्षुकाने आपल्या आहारापुरती भिक्षा करावी. पाचसात घरे मागून 'पात्रान्त' झाला म्हणजे त्या दिवशी पुढच्या घरी भिक्षा मागू नये. पण त्या पाचसात घरी पुरेशी भिक्षा न मिळाली तर त्याने 'पात्रान्त' भिक्षा मिळेपर्यंत 'नगरान्त' म्हणजे गावाच्या दुसऱ्या टोकापर्यंत भिक्षा करावी. तसे केल्याने त्याला पुरेशी भिक्षा बहुधा मिळेलच. तथापि, कधी कधी एखादे गाव लहान असल्यामुळे 'नगरान्त' भिक्षा मागूनहि 'पात्रान्त' भिक्षा मिळत नाही. अशा वेळी त्या भिक्षुकाने 'नगरान्त' भिक्षा झाल्यावर देखील एखाद्या घरी थोडी अधिक भिक्षा मागून घ्यायला काही हरकत नाही. ( नगरांतु का पात्रांतु : नगरांतु जाले आणि पात्रांतु नव्हेचि तरि आपजवीजे : आ. ८६ ). क्वचित् भिक्षुकाकडे दुसरा कोणी अशक्त किंवा दुर्बळ भिक्षुक आला तर त्याच्या निमित्ताने नगरांतापर्यंत भिक्षा मागावीच लागते. आणि तरीहि पुरेशी भिक्षा मिळत नाही. अशा वेळीहि एखाददुसऱ्या संपन्नाच्या घरी शब्द टाकून

१. 'नित्यविधी तरी पात्रांत···पात्रांत म्हणजे मात्रेचे' ( आ.स्थ. ८६ ).
२. 'एकाद्या दिवशी अवचटे पहिल्याच घरी आहार पर्याप्त भिक्षा होय : म्हणौनि का पात्रांत म्हणीतले' ( सदर ).
३. चवथे : निमित्तविधी नगरांत : अशक्त सुश्रूषा : भेटकाळ' ( सदर ).

पुरेशी भिक्षा मागून घ्यायला हरकत नाही.

नगरान्त भिक्षा मागूनहि पुरेसे अन्न मिळाले नाही तर सामान्यतः जितके अन्न मिळालेले असेल तेवढ्यावरच निर्वाह करणे हे अधिक चांगले. (ना तरी खुंट गिळिजे : आ. ८७). पण स्वभावानुसार पूर्ण मात्रा घेतल्याशिवाय ज्याला स्मरण नीट रीतीने करता येणे शक्य होत नाही त्यानेच, नगरान्त करूनहि पुरेशी भिक्षा न मिळाल्यास एखाद्यादुसऱ्या घरी अधिक अन्न मागून घ्यावे. इतरांनी या सवलतीचा उपयोग करू नये. निमित्तविधिसंबंधाने, घरी आलेल्या इतर भिक्षूसाठी, अशक्तासाठी वगैरे भिक्षा मागण्याचा प्रसंग आला आणि नगरान्त करून, तसेच एखाद्यादुसऱ्या चांगल्या घरी पुन्हा भिक्षा मागूनहि जर पुरेसे अन्न गोळा झाले नाही तर मग अशा वेळी एकदोन गावात भिक्षा मागून आणायला हरकत नाही. तथापि मुख्य गोष्ट ही की, पुरेशी भिक्षा पदरात पडली म्हणजे भिक्षा मागणे तावडतोब थांबवले पाहिजे.

## पाहिजे त्यापेक्षा जास्त मागू नये

याचे मुख्य कारण असे की, इतर पदार्थांप्रमाणे भिक्षान्नाचा देखील संग्रह करण्याची साधकाला सक्त मनाई आहे. म्हणून दुसऱ्या दिवसाचे भिक्षान्न आधल्याच दिवशी मिळवून ठेवणे शास्त्रविहित नाही. यासाठीच साधकाने एका दिवसाला आपल्याला पुरेल एवढेच अन्न मागावे. वाजवीपेक्षा जास्त मिळविता कामा नये. एखादेवेळी, आहारापेक्षा जास्त अन्न मिळवून आणले तर भोजन झाल्यावर ते शिल्लक राहते. मग एक तर ते वाया जाते किंवा दुसऱ्याला दिले जाते. पण असे करणे अगदी निषिद्ध आहे. भिक्षान्न असे नासू देऊ नये, इतकेच नव्हे तर ते सांडूहि नये. आपण मिळवलेली भिक्षा निमित्तप्रसंगाने आलेल्या अभ्यागताशिवाय किंवा अशक्ताशिवाय दुसऱ्या कुणाला देऊहि नये. या सर्व गोष्टी लक्ष्यात घेता भिक्षुकाने आपणाला लागेल एवढीच भिक्षा मागावी. तेवढी मिळाली की भिक्षा मागणे त्याने त्यादिवशी थांबवलेच पाहिजे. ( भिक्षान्न सांडू नये : कव्हणा देऊ नये : आपणा लागे तेचि मागिजे की : शो. आ. पा. ३४ ).

१.' पात्रांत म्हणजे मात्रेचे : नव्हेचि तरी आपजविजे : शेवटील का संभवाचे घरी शब्द घालीजे : लागे ते मागावे : यथार्थ उमटवावा' (आ.स्थ. ८६)

## भिक्षान्नाचा नाश निषिद्ध

भिक्षान्न हे जरी राज्य असले (भिक्षा म्हणजे राज्य बाई : आ. ९१) आणि त्यावर भिक्षुकाची जरी संपूर्ण सत्ता असली तरी त्या भिक्षान्नाचा त्याने वाटेल तसा नाश करावा हे मात्र योग्य नाही. भिक्षा मागून आणलेले अन्न कधी वाया जाऊ देऊ नये. त्यातील एक कणहि मुंगीकडून देखील नेले जाता कामा नये. ( आपुले सीत मुंगिये आदि करौनि नेवो नेदावे : आ. मा. २११). याचा अर्थ असा की, भिक्षान्नाचे शीत न् शीत भिक्षुकाच्याच उपयोगी पडले पाहिजे. ते यत्किंचितहि वाया जाता कामा नये. असे होण्याचा एकच उपाय आहे. तो असा की, भिक्षुकाने आपणाला व निमित्तविधिसंबंधाने आपल्या अभ्यागताला किंवा अशक्ताला वगैरे अवश्य असेल त्यापेक्षा एक कणहि जास्त भिक्षा मागू नये. अशी अधिक भिक्षा मागण्याचा त्याला मुळीच अधिकार नाही. (हा गा ऐसे अणू अणू सांडावे : ते कायी तुमचे दाई : आपणया लागे तेचि मागिजे की : आ. ९२ ).

आपल्या दायादाकडून आपल्या अधिकाराचे अन्नवस्त्र मागण्याचा अधिकार जसा दायादांना असतो तसा भिक्षुकांना नसतो. कारण भिक्षा घालणारे लोक हे काही भिक्षुकाचे दायाद नव्हत; ते त्याचे भाऊबंद नाहीत. तेव्हां त्यांच्या अन्नावर भिक्षुकाचा हक्क असतो असे कसे म्हणता येईल ? आपली चर्या चालवण्यासाठी भिक्षुकाने त्यांच्या जवळ भिक्षेची याचना करायची असते; हक्काने ती मागायची नसते. अशा स्थितीत गृहस्थाकडून वाजवीपेक्षा जास्त भिक्षा मागणे व ती वाया दवडणे हे केव्हांहि निंद्य होय. तसे केल्याने प्रस्तुत वचनाचा, त्याचप्रमाणे ‘ आपुले सीत मुंगिये आदिकरौनि नेवो नेदावे ’( आ. मा. २११ ) याहि वचनाचा भंग केल्याचा दोष पदरी येऊन त्याची अयोग्यता भिक्षुकाला लागते. भिक्षान्न हे अत्यंत थोर साधन आहे. ते अत्यंत पवित्र असते. ( हां गा : हे भिक्षान्न की : हे पवित्राचे पवित्र की : आ. मा. ६३ ). असे भिक्षान्न वाया घालवल्याने त्याची अवज्ञा केल्यासारखे होते. त्यामुळे तो भिक्षुक परमेश्वराची अनुकूलता गमावून बसतो. शिवाय त्याला ते अन्न देणाराला एरवी जे पुण्य लाभले असते

१. ‘ दायी नव्हती : का जे तिये धर्मे सूती : न्यायबळे दांडगेपणे घेइजे ते दायादाचे लक्षण ’ ( आ. स्थ. २१ ).

ते हिरावून घ्यायला तो भिक्षुक कारणीभूत होतो. कारण, ते अन्न त्या भिक्षूच्या पोटात न जाता वाया गेल्याने इतर कारणीहि लागत नाही आणि त्यामुळे त्या अन्नदात्याला एरवी जे पुण्य झाले असते त्यापासून तो आचवला जातो.

तथापि, केवळ ' पात्रान्त ' भिक्षा मागण्याची इच्छा असूनहि क्वचित् बाजवीपेक्षा जास्त भिक्षा पदरात पडतेच. उदा : भिक्षा मागतांना एखादे वेळी शेवटच्या घरी जास्त अन्न मिळते. ते वाढले जात असतांना पूर्वीची भिक्षा व ही भिक्षा मिळून आहारापेक्षा अधिक होईल याची नीटशी कल्पनाहि येत नाही. अशा रीतीने जास्त भिक्षान्न मिळालेच तर भिक्षुकाने आपल्या मात्रेपेक्षा अधिक असेल तेवढे अन्न काढून ठेवण्यास हरकत नाही. ते त्याने तसेच राखून ठेवावे व दुसऱ्या दिवशीच्या भिक्षान्नात मिळवून खावे. पण ही गोष्ट अपवादादाखलच करावी; नेहमी नव्हे.

**पात्रान्त भिक्षा न मिळाल्यास-**

नित्यविधीसाठी भिक्षा मागतांना एका गावातच भिक्षा मागणे चांगले. गावातील सगळी घरे मागूनहि पुरेशी भिक्षा न मिळाली तर एखाद्या चांगल्या घरी अधिक भिक्षा मागून घ्यावी. पण असे करूनहि जर पात्रान्त भिक्षा मिळालीच नाही तर भिक्षुकानें काय करावे ? त्याने ' खुंट गिळावा ' ( ना तरी खुंट गिळीजे : आ. ८७ ); म्हणजे आशा सोडून द्यावी, मौन धारण करावे व मिळालेल्या अन्नावरच निर्वाह करावा. त्याला दुसरा उपाय नाही.

तथापि, परमेश्वराला अनुसरून नुकतीच ज्याने ' चर्या ' म्हणजे आचार सुरू केला अशा नव्या भिक्षुकाला खुंट गिळणे अशक्य होते. तसा त्याने प्रयत्न केला तर त्याला तहानभुकेपासून फार उपद्रव होतो. त्यामुळे परमेश्वरचिंतनादि व्यापार, शास्त्रश्रवणादि विधी त्याजकडून मुळीच होत नाहीत. असे असल्यास त्या नव्या पुरुषाने आपणाला पुरेशी ( निश्चित मात्रेची ) भिक्षा मिळेपर्यंत गावात आणखी भिक्षा मागायला हरकत नाही. आणि पुन्हा भिक्षा मागूनहि त्याला त्या गावात पुरेसे अन्न न मिळाले

१. 'ऐसा जै आपजविलेया न मिळेचि तरी खुंट म्हणजे आशा तोडावी : उगयाचि मौने असावे ' ( आ. स्थ. ८७ ).

तर त्याने तो गाव सोडून दुसऱ्या गावाला जावे, तेथे भिक्षा मागावी आणि आपली आहाराची मात्रा पूर्ण करावी.

### खुंट का गिळावा लागतो ?

एरवी, सर्वसामान्य भिक्षूंनी नगरान्त करून, शिवाय एखाददुसऱ्या घरी पुन्हा भिक्षा मागूनहि त्याला पात्रान्त अन्न न मिळाले तर त्यांनी मात्र आशा सोडून मौन धारण करावे; अर्थात्, खुंट गिळावा. पण असा खुंट गिळण्याचा प्रसंग नेहमीच येतो असे नाही. दुष्काळ वगैरे असल्यामुळे गावातील लोकाजवळ अन्नाचा तुटवडाच पडला असेल तर खुंट गिळण्याची पाळी येते. तसेच, काही कारणामुळे एक गाव सोडून दुसऱ्या गावाला जो जात नाही त्याला अशा दुष्काळाच्या वेळी खुंट गिळावा लागतो. कारण, गावातील लोकाजवळ अन्नसामुग्री असेल तरच ती भिक्षुकाला मिळणार. पण त्यांच्याच जवळ अन्न नसले तर ते तरी भिक्षुकाला कोठून देणार ? (बाइ : तेयासि असे तव तुम्हासि असे : आ. ८८ ).

दुसरे असे की, क्वचित् लोकांच्या जवळ अन्नसामुग्री भरपूर असते पण भिक्षुकाला त्यांच्याकडून भिक्षा घातली जावी असे त्यांचे प्राक्तन नसते. म्हणून तेथे भिक्षुकाला भिक्षा मिळत नाही. तथापि गावातील सगळ्याच लोकांचे भिक्षा न घालण्याचे प्राक्तन असते असे नाही. म्हणून विशेषतः गावातील लोकाजवळ अन्नाचा तुटवडा असला तरच भिक्षुकाला खुंट गिळण्याची पाळी येते.

### शेवटी परमेश्वराचे साह्य

दुष्काळाच्या दिवसात कधी कधी असे होते की, पहिल्या दिवशी भिक्षा मिळत नाही, दुसऱ्याहि दिवशी भिक्षा मिळत नाही. त्यामुळे साधकांचा

१ ‘ येरा नवेया अधिकारीयासी न लभे : तेणे मिळे तव आपजवावे : एक वेळ म्हणौनि : उदासा न व्हावे : उपद्रव न उठी ऐसे टोकीले असे तै व्हावे की : न गमे तर तो गाव त्यजावा ’ ( आ. स्थ. ८७ ).

२. ‘ तयाचेनि संभवे या संभव : की जे तेथ पाठविला असे : तै तयांचे प्राक्तनानुरूप याही मिळे ’ ( आ. स्थ. ८८ ). ‘ दुसरे ··· अन्न जातीचे संभव तरी असती परी पात्री प्रवेशन व्हावे ऐसे प्राक्तन जर त्यास असे तर यासही तेच प्राप्त होय : अन त्यास जर ते प्राक्तन नाही तर यास कैचे ’ ( आ. बं. ८८ ).

साह्यकर्ता जो परमेश्वर त्याला साकडे पडते. तेव्हां परमेश्वर अशी घटना घडवून आणतो की निदान तिसऱ्या दिवशी तरी भिक्षुकाला अन्न मिळतेच मिळते. ( एकी दीं न मीळे : दोनि दीं न मीळे : तीसरा दीं न मिळोचि न ये : आ. ८९ ). अर्थात्, हे अन्न तो विज्ञानाने निर्माण करून देतो असे नाही. तर दुष्काळातहि काही संपन्न गृहस्थांच्या घरी अन्नसंचय असतोच. पण ते तो भिक्षुकांना वगैरे देऊन खर्च करू इच्छीत नाही. वरील प्रकारचे साकडे पडले म्हणजे परमेश्वर अशा संपन्न गृहस्थांचे कान पिळून[१], त्यांच्या मनात विवेकाची टोचणी निर्माण करून, आपल्या जवळचे अन्न आपण भिक्षुकांना घालावे अशी बुद्धि त्यांच्या मनात निर्माण करतो. त्यामुळे दुष्काळातहि भिक्षुकांना निदान तिसऱ्या दिवशी तरी अन्न मिळाल्यावाचून राहत नाही.

तिसऱ्या दिवशीहि अन्नवगैरे न मिळाले तर उत्तम चर्येचे पुरुष दीर्घ उपवास काढूनहि दिवस कंठू शकतात. कारण ते देहावर पूर्णपणे उदास झालेले असतात. तथापि अशा पुरुषांनाहि परमेश्वर उपवास पडू देत नाही, मग इतरांना पडू देत नाही यात आश्चर्य नाही. अर्थात् नम्रा भिक्षूला किंवा कोमळ चर्यावंतालाहि परमेश्वर उपवास पडू देत नाही. इतकेच नाही तर सामान्य वासनिकालाहि पडू देत नाही. कारण त्याला उपवास पडले तर त्याचा देवाधर्मावरचा विश्वास उडून जाईल. म्हणून ईश्वर त्याला उपवास पडू देत नाही. तिसऱ्या दिवशी तरी त्यांची तो व्यवस्था करतोच. अर्थात्, आपल्या उपवासाचे परमेश्वराला साकडे पडावे अशी कणवे[२] त्यांनी जोडलेली असते हे सांगायला नकोच.

## भिक्षा म्हणजे पारध

लोकांच्या जवळ अन्नसंभव असला तरी भिक्षुकाला पुरेशी भिक्षा मिळतेच असे नाही. शिकारीला गेलेल्याला पारध दररोज मिळतेच असे

१. '**कान पिळीति हे व्याप्ति :** तरी ज्याचे कान पिळीति ते जन असलेनि पदार्थे दुष्काळाचेनि भये यासी घालिता आपुले ऊणे होईल म्हणौनि न घालावयाची वासना धरती : तरि त्याचे कान पिळूनि सूविती ' ( आ. वं. ८९ ).

२. '**उपवास न पडती हे कणवेचे कार्य : शास्त्राभीतरील नव्हे**' ( आ. स्थ. ८९ ).

नाही. एखादे दिवशी मिळते तर दुसऱ्या दिवशी मुळीच मिळत नाही. एखादे दिवशी लहानशीच पारध मिळते. त्याप्रमाणेच भिक्षुकाला एखादे दिवशी पुरेशी भिक्षा मिळते, एखादे दिवशी मुळीच मिळत नाही तर एखादे दिवशी अत्यल्प मिळते. पारध्याला आज जी पारध मिळते ती उद्या मिळेलच असे नाही. तद्वत् भिक्षुकाला आज जे सदन्न किंवा कदन्न मिळेल तेच उद्या मिळेल असेहि नाही. म्हणूनच भिक्षेला पारध असे म्हणतात. ( भिक्षा म्हणजे पारध की गा : आ. ९० ). क्वचित् चारपाच दिवसातहि पारध मिळत नाही. त्याप्रमाणे कधी कधी भिक्षुकाला दोनतीन दिवसातहि भिक्षा मिळत नाही. परमेश्वर तिसऱ्या दिवशी तरी भिक्षा मिळवून देतोच. याचा अर्थ इतकाच की, भिक्षुकाला उपवास पडू नयेत इतके तरी तो देतोच. पण पुरेशी भिक्षा देतोच असे नाही.

वर निर्देशिलेल्या नियमानुसार भिक्षा मागतांना भिक्षुकाला जेवढे अन्न मिळेल तेवढ्यावरच त्यानें संतुष्ट राहिले पाहिजे. साधकाचा हाच धर्म आहे. साप ज्याप्रमाणे ' जे अदृष्टवशे : मिळे अनायासे : तेणेंचि संतोषे : धाला असे ॥ न मिळता आहारी : कही वोसि न धरी : निश्चित निर्व्यापारी होऊनि असे ' ( उद्ध. गी. ३३३; ३३४ ) त्याप्रमाणे संयमी आचरत्या पुरुषाने देखील मिळालेल्या कमीअधिक भिक्षान्नावर संतोष मानून आपल्या धर्माचे अनुष्ठान निष्ठापूर्वक चालविले पाहिजे.

## भिक्षान्नाशिवाय इतर पदार्थ घेऊ नयेत

साधकाने आपल्या आहारासाठी भिक्षान्नच सेवन करावे असा विधि असल्यामुळे, त्याव्यतिरिक्त इतर वेळी म्हणजे अटणात, विजनात किंवा देवळात वगैरे असतांना जर कुणी काही पदार्थ दिले तर ते सेवन करू नयेत हे अनुषंगाने आलेच. भिक्षा नेहमी निर्हेतुकतेने केली पाहिजे हें आपण पाहिले आहे. अर्थात्, भिक्षेला निघतांना, आपणाला अमुक पदार्थ मिळावेत असा हेतु किंवा अभिलाष साधकाने मनात ठेवू नये. विशिष्ट

१. ' पारधि म्हणजे मिळे न मिळे दोन्ही आति :''' एकदी पदार्थ मिनला : दुसरा दी मिळे ऐसे नाही : म्हणौनि पारध ' ( आ. स्थ. ९० ).

२. ' मिनलेयाही न सेवावे म्हणजे काळव्यतिरीके : अटणी : विजनी : देउळी : कव्हणी पदार्थ संपादी तरी तो इतराचा नीराकरावा ' (आ. स्थ. ९५).

पदार्थावर हेतु ठेवून तो भिक्षेला निघाला आणि भिक्षेत तो पदार्थ त्याला खरोखरच मिळाला तर तो विघ्नरूप आहे असे नक्की समजावे. तो त्याने कधीहि सेवन करता कामा नये. प्रथम तर त्याने असा इच्छित पदार्थ कुणी द्यायला लागला तर तो घेऊच नये. तो विषयरूप समजून लाथाडावा म्हणजे त्याचा तुच्छतेने त्याग करावा. ( आला विखो पाये हानावा : आ. मा. ५८ ). पण, मिळत असलेल्या अन्नाचा स्वीकार न करणे अयोग्य, या नियमानुसार जर त्याने तो पदार्थ घेतलाच तर त्याचे प्रत्यक्ष सेवन मुळीच करू नये. सारांश, भिक्षेव्यतिरिक्त इतरांनी दिलेले किंवा सहेतुक भिक्षेत मिळालेले पदार्थ साधकाने त्याज्य मानले पाहिजेत. ते त्याने एकदा जरी सेवन केले तरी त्यामुळे त्याला पुढे तशीच सवय लागण्याचा संभव असतो. उदा : महदाइसेला तुपाची सवय अशीच लागली. इतकी की, एकवेळ तर तूप मिळाले नाही म्हणून तिचे पोट दुखू लागले. त्यामुळे ती नेहमी तुपाचे कोंढळे आपल्याबरोबर वागवू लागली. वास्तविक, महदाइसेला शारीरिक दृष्टया तूप आवश्यक होते असे नाही. पण ते न मिळाले तर आपले पोट दुखेल अशी मानसिक भीति तिला वाटत असे. ( बाइ : मीनलेयाही न सेवीजे मग तैसीचि सवे होए : आ. ९५ ). म्हणून भिक्षेव्यतिरिक्त आलेले पदार्थ सेवन न करणेच श्रेयस्कर होय.

तथापि, भिक्षान्नाव्यतिरिक्त इतर वेळी परमेश्वरमार्गातील लोकांनी काही पदार्थ दिलेच तर ते घ्यावेत. ते सेवन करायलाहि हरकत नाही. पण शक्यतोवर ते पदार्थ त्याने निराळे सेवन करू नयेत. तर, इतर भिक्षान्नाबरोबरच ते खावे. भिक्षेच्या वेळीहि उचित असे पदार्थ मिळाले तर तेहि वेगळे सेवन न करता, भिक्षान्नाबरोबर सेवन करावे.

## नदीतीरी भोजन

भिक्षा मागून झाली म्हणजे मग साधकाने नदीच्या काठावर जाऊन तेथे भोजन करावे. ( भिक्षा मागौनि नदीचा तीरी भोजन कीजे : आ.

१. ‘ मिनलेयाही न सेवावे ते मानसिक : वाचौनि शारीर अनधिकारपर नव्हे : महदाइसावत् ’ ( आ. स्थ. ९५ ).

२. ‘ इतराचा नीराकरावा : येथच्याचा घ्यावा : परी वेगळा न सेवावा… भिक्षे उचितही आला तो वेगळा न खावा ’ ( सदर ).

मा. ५९ ). श्रीचक्रधरस्वामी एकाकी असतांना ‘ पाणीपात्र ’ भिक्षा करीत आणि मग नदीवर किंवा तळयावर जात, तेथे आपल्या पायाने खडकावर पाणी घालून तो घासूनपुसून स्वच्छ करीत, त्यावर आपल्या हातातील अन्न ठेवीत आणि मग त्यांची आरोगणा होत असे. ‘ तव गोसावी नदीसी बीजे केले : श्रीचरणे सीळातळा वरि उदक घातले : तीये सीळेवरि अन्न घातले : आरोगणा करीत असति: ’( ली. च. ए. १९ ); ‘ पाणीपात्र जाले... गोसावी तळा श्रीचरणे सीळातळावरि उदक घातले : श्रीकरीचे अन्न तेथे ठेविले...’ ( ली. च. ए. २७ ). या दोन्ही लीळावरून स्वामींची भिक्षेनंतर भोजनाची पद्धति कोणती ती दिसून येईल. तीच पद्धति आचरत्या पुरुषांनीहि पाळायला पाहिजे.

## भिक्षान्न काला करून खावे

भिक्षेच्या वेळी जे सदन्न किंवा कदन्न मिळालेले असेल ते एकमेकात कुसकरून–त्याचा काला करून मग खावे, वेगवेगळे खाऊ नये. ( घेइजे ऐसे कुसकरौनि येन्हे येरु परते : आ. ९६ ). सदन्न वेगळे सेवन केल्यास त्याच्या ठिकाणी गोडी उत्पन्न होऊन पुढे त्यामुळे चर्याभंग होतो. तसेच नुसते कदन्नच सेवन करीत गेले–वेगळे काढून खाल्ले तर त्यामुळे एकंदर चर्येचा वीट उत्पन्न होऊन साधकाकडून सगळी चर्या सोडली जाण्याचा संभव असतो. म्हणून सदन्न काय किंवा कदन्न काय वेगवेगळे सेवन न करता त्यांचा काला करून मग सेवन करावे.

भिक्षेच्या वेळी सदन्न मिळो की कदन्न मिळो, ते भिक्षुकाने स्वीकारले पाहिजे. त्याचा त्याने त्याग करू नये. सदन्नासाठी त्याने जाणूनबुजून संपन्नाच्या घरी जाऊ नये. ती सहेतुक भिक्षा होईल. अशी सहेतुक भिक्षा त्याज्य मानलेली आहे हे आपण पाहिलेच. तथापि एखादे वेळी उचित भिक्षेच्या वेळी तो संपन्नाच्या घरी गेलाच तर मग तेथे सदन्न मिळो की कदन्न मिळो ते त्याने घ्यावे. वायु ज्याप्रमाणे ‘ न म्हणे शिळे उन्ह : सदन्न का कदन्न : न करी विवंचना : प्राणु जैसा ’ ( उद्ध. गी. २७७ ); अथवा सर्प जैसा ‘ सुरसु विरसु आहारु : न म्हणे साना थोरु ’ ( उद्ध. गी. ३३२ ) त्याप्रमाणे सदन्न मिळाले की कदन्न मिळाले याची विवंचना न करता भिक्षुकाने मिळेल ते स्वीकारावे. पण आधी सांगितल्याप्रमाणे सदन्नाची सदोषता कदन्नाने मारावी

किंवा कदन्नाची सदोषता सदन्नाने मारावी व मगच ते सेवन करावे. याच-साठी भिक्षान्न नेहमी कालवून खाणे चांगले.

## तैल्यकाराचे उदाहरण

भिक्षान्न कालवून न खाल्ल्याचा परिणाम काय होतो हे तैल्यकाराच्या उदाहरणावरून चांगले दिसून येते. मुरारीमल्ल नावाचा एक भिक्षुक अतिशय विरक्त होता. एके दिवशी भिक्षा मागतांना त्याला ढेपेची भाजी मिळाली. ती इतर अन्नात न कालवता त्याने वेगळी खाल्ली. त्यामुळे ढेपेच्या भाजीची त्याला चटक लागली. जिथून त्याला ती भाजी मिळाली होती त्या तेलिणीच्या घरी तो दुसऱ्या दिवशी पुन्हा गेला. तेलिणीने त्याला भाजी दिली. तिसऱ्या दिवशी हा आणखी भाजी मागू लागला. तेव्हां ती तेलीण म्हणाली ' आणखी भाजी पाहिजे असेल तर बैस माझ्या घाण्यावर ' भाजीची चटक लागल्यामुळे मुरारीमल्ल खरोखरच तेथे राहिला. तेलिणीचा घाणा हाकू लागला आणि दररोज ढेपेची भाजी खाऊ लागला. हळूहळू त्या तेलिणीबरोबर तो संभोग करू लागला व पुढे त्याच ठिकाणी रममाण झाला. हा सगळा भिक्षान्न कालवून न खाल्ल्याचा परिणाम होय. तो टाळण्यासाठी साधकांनी भिक्षान्न नेहमी कालवूनच खाल्ले पाहिजे.

## नीरस अन्न खावे

आहारासंबंधीचा सर्वसामान्य नियम असा की साधकाने शक्य तोवर नीरस व विरस अन्नच खावे. नीरस अन्न म्हणजे मूळचाच ज्यात रस नाही असे भात, आंबील, चणे, तुरी वगैरे सारखे पदार्थ; आणि विरस अन्न म्हणजे मूळात ज्यात रस असतो पण तो आता निघून गेला आहे असे विटलेले किंवा शिळे पदार्थ. ( नीरसे विरसे अन्ने सेवीजेति : आ. १११ ). अशाच पदार्थांना रूक्षान्न किंवा रेंदाचेंदा असे म्हणतात. साधकाने अशा

१. ' कुस्करून घ्यावे : म्हणजे गुणे दोष कुस्करावा ... परी त्यजू नये : का जे उचित काळामध्ये आले म्हणौनि ' ( आ. बं. ९६ ).

२. ' निरसे म्हणजे ठायीचाच रस नाही : अंबील : भात : दिवसे : सुटकुळे : चना : तुरी : विरस म्हणजे रस होता मा गेला : विटली खीर : शिळे पदार्थ ' ( आ. स्थ. १११ ).

रुक्षान्नाने म्हणजे रेंद्याचेंद्यांनेच आपल्या पोटाची खळगी कशी तरी भरावी. ( रेंदेया चेंदेया दरू भरीजे : आ. ११२ ). पोटात ते पदार्थ जाणार नाहीत तरी कसेबसे कोंबलेच पाहिजेत. खुंटा बळकट करण्यासाठी त्याच्या भोव-तालच्या दरात ज्याप्रमाणे दगडगोटे घालून तो शिनारावा लागतो त्याप्रमाणे पोटात बलात्काराने शिळेबासे कुटके भरले पाहिजेत. काही झाले तरी सरस अन्न भिक्षुकाने खाता कामा नये. याचसाठी भिक्षान्नाचा काला केल्यावाचून ते खाऊ नये असे सांगितलेले आहे.

## इंद्रियांना आहार देऊ नये

काला केल्याने प्रत्येक पदार्थाची विशिष्ट रुचि मारली जाते. पण काला न करता पदार्थ वेगवेगळा खाल्ला म्हणजे त्या त्या पदार्थाची गोडी येते. त्यामुळे रसनेचे चोचले पुरवल्यासारखे होतात व रसनेच्या द्वारे इंद्रिये पोसली जातात. पण साधकाने आपली इंद्रिये कधीहि पोसू नयेत. त्याने आहार घ्यायचा तो केवळ शरीरयात्रा चालवण्यासाठी प्राणवायूला जितक्या आहाराची गरज असेल तितकाच घ्यावा. इंद्रियपुष्टीसाठी कधीहि घेऊ नये. ( प्राणासी आहारू देआवा : इंद्रियासी नेदावा : आ. ९७ ). याचसाठी रसनेंद्रिय रोधून ठेवणे आवश्यक आहे. रसनेंद्रियाचा निरोध व्हावा म्हणू-नच भिक्षान्नातील सदन्न व कदन्न—कोणताहि पदार्थ वेगवेगळा व गोडीने खाऊ नये. अशा सर्व पदार्थांचा काला करून मग ते भिक्षान्न खावे.

## इंद्रिय, रस सेवन करू नये

एखादा पदार्थ सेवन केल्याने तो तात्बडतोब जिभेला गोड लागतो, पण त्यामुळे तुष्टिपुष्टि काहीच मिळत नाही, असा पदार्थ ' इंद्रियार्थ ' होय. जो पदार्थ सेवन केल्याबरोबर जिभेला गोड लागून शिवाय त्यामुळे परि-णामी तुष्टि आणि पुष्टिहि मिळते तो ' रस ' होय. आणि जो पदार्थ सेवन करताच गोडी येऊन, परिणामी तुष्टिपुष्टि मिळून शिवाय त्या पदार्थ-सेव-

१. ' रेंदा म्हणजे आसट आंबिल : चेंदा म्हणजे नासला भात तथा खीर : बुरसैले दिवसे ' ( आ. स्थ. ११२ ).

२. ' इंद्रिय नेघे परी प्रयत्ने बलात्कारे घेईजे : यथा दर सिनारीजे मग खुंट बळी होय तैसे प्रयत्ने सिनारीजे ' ( आ. स्थ. ११२ ).

नेची अतृप्ति वाटते—म्हणजे तो कितीहि सेवन केला तरी अधिकाधिक सेवन करावासा वाटतो, इतकेच नाही तर ज्याचे पूर्वीचे सेवन उत्तर काळात वारंवार आठवते तो पदार्थ 'विषय' होय[१]. ह्या तिन्ही प्रकारच्या पदार्थांचे साधकाने सेवन करता कामा नये. (इंद्रियार्थ रसु न सेवावा : आ. ९८). 'विषय' पदार्थांच्या त्यागाविषयी मागे आपण विस्ताराने पाहिलेलेच आहे. आता बाकीच्या दोहोंचा विचार करू.

इंद्रियार्थ पदार्थ सेवन न केल्यास इंद्रियांचा निरोध होईल असे वाटण्याचा संभव आहे. पण वस्तुतः त्यामुळे इंद्रियांचा निरोध न होता वासनेचा मात्र निरोध होईल. कारण, वासनेमुळेच निरनिराळे इंद्रियार्थ सेवन करावेसे वाटतात. ज्या पुरुषाचे आपल्या शरीरावरील तादात्म्य नाहीसे झालेले आहे त्याच्या ठिकाणी तर वासनेचाहि उद्भव होणार नाही. अर्थात्, असा पुरुष इंद्रियार्थ सेवन करणार नाही. पण शरीरावर तादात्म्य ठेवणाराला मात्र इंद्रियार्थ सेवन करण्याची वासना[२] होईल. ती वासना त्याने नियमित केली पाहिजे हे सांगायला नको.

चर्याजरठ पुरुषाला भिक्षान्नात क्वचित् इंद्रियार्थ पदार्थ मिळाला व तो त्याने सेवन केला तरी फारशी हरकत नाही. कारण तेवढ्याने तो पुरुष पतित होण्याचा संभव नसतो. पण कोमळ चर्यावंताला जर असे पदार्थ मिळाले तर ते त्याने सेवन करता कामा नये. सामान्यतः कोणताहि कोमळ पुरुष आपल्या आचरणानिमित्त चर्याजरठाजवळ राहत असतोच. त्याला त्याने आपली झोळी दृष्टपूत करावी. मग त्या चर्याजरठाने त्या कोमळाला मिळालेले इंद्रियार्थ पदार्थ कोणत्या हेतूने मिळाले असावेत याचा विचार करावा. कदाचित्, एखाद्या अभ्यागतासाठी तो इंद्रियार्थ मिळाला असेल; किंवा एखाद्या त्रसलेल्या पुरुषासाठी तो मिळाला असेल, किंवा पुढे त्या चर्यावंताला त्रास उत्पन्न होईल म्हणून, त्याचा त्रास फेडण्यासाठी तो आला

१. '**प्रस्तुत गोडी** जिव्हेसी लागे परि परिणामी तुष्टीपुष्टी नाही **तो इंद्रियार्थ : परिणामी पुष्टितुष्टि तो रस : मना अतृप्ति उत्तरकाळी आठवे तो विखो**' (आ. बं. ९८).

२. '**इंद्रियाचा अर्थ : निरोध वासनावसे : शरीरी तादात्म्य असे तव ते निवर्ते तै फिटे**' (आ. स्थ. ९८).

असावा, किंवा अगदी सहज आला असावा. जशी त्या पदार्थाची अधिक उपयुक्तता असेल तशा रीतीने त्याने तो अभ्यागतादिकांना द्यावा. अभ्यागत नसल्यास त्या कोमळ पुरुषाची तो पदार्थ सेवन करण्याची योग्यता पाहून त्याला तो कदन्नाबरोबर कालवून खायला सांगावे. अर्थात्, कोमळ चर्यावंतांनी चर्याजरठांना आपली झोळी दृष्टपूत केल्यावाचून भिक्षान्न कधीहि सेवन करू नये.

## गोडी घेऊन खाऊ नये

'इंद्रियार्थ' आणि 'रस' सेवन करू नये असे सांगितल्यावर 'विषय' सेवन करू नयेत हे निराळे सांगण्याची गरजच नाही. पण, इंद्रियार्थ, रस व विषय पदार्थ यांचा त्याग करून भिक्षान्नाचा काला केला तरी भूक सपाटून लागलेली असल्यास, भुकेमुळे ते भिक्षान्न गोड लागणारच. म्हणून काला केल्यावर ते भिक्षान्न अशा रीतीने खावे की रसनेला त्याची गोडी येणार नाही. 'रसक्रिये वेगळेया होआवे' ( आ. ५५ ) या श्रीचक्रधरस्वामींच्या वचनाचा अर्थच असा आहे की, साधकाने निषिद्ध पदार्थांचे तर सेवन करायचेच नाही पण विहित पदार्थांचेहि सेवन त्याने रुचिपूर्वक करता कामा नये. ते खात असतांना त्याची गोडी वाटू देता कामा नये. भिक्षान्न, काला करून का होईना खायचे ते फक्त भुकेचा निरोध नाहीसा करण्यासाठी, त्यापासून गोडी अथवा रस घेऊन इंद्रिये तुष्टपुष्ट करण्यासाठी नव्हे. ( क्षुधानिवृत्ति कीजे : आ. मा. ६० ); 'जेविता आवडी गोडी न होआवी' ( आ. मा. ६१ ) या विधिवचनांचाहि भावार्थ हाच आहे.

अर्थात्, साधकाने काला केलेले रूक्ष भिक्षान्न पण तेहि रसपूर्वक खाऊ नये. म्हशीपुढे आंबोण ठेवले म्हणजे ती त्या आंबोणाची गोडी घेऊन चघळत न बसता त्याचे एकामागून एक घास घेत घेत ते भकर्न खाऊन टाकते. त्याचप्रमाणे साधकाने भिक्षान्नाच्या काल्याचे गोळेचे गोळे जिभेवर

१. '**वेईजे ऐसे म्हणजे अव्हेरून : मुसंब खोवून म्हणजे यथा महिषीवत्** तरि तेचि कैसे : ना : म्हैशीपुढे आंबवण ठेविलेया ते जैसी मुसंब शब्दे तोंड खोवून घासापाठी घास गिळी तैसे तेणे पुरुषे **चवी नेघत वेईजे** : म्हणजे काल्याची चव नेघता भोजन करावे' ( आ. बं. ९९ ).

ठेवून ते नुसते गिळून टाकावे. त्याची चव जिभेला लागू देऊ नये.जिभेच्या टोकापासून तो कंठापर्यंत तोंड पोकळच असते. म्हणून घास तोंडात घातला की एकदम तो कंठापर्यंत नेऊन पोचवावा व मग गिळून टाकावा. जिभेच्या इतर भागांना तो पदार्थ लागूच देऊ नये. असे केले म्हणजे त्या विषयी गोडी निर्माण होणार नाही. अशा रीतीने कंठाजवळ घास नेऊन पोचवला की पुढे कंठाखाली वोहटळ असल्याने तो आपोआप घशाखाली उतरतो. ( घेइजे ऐसे मुसंव्र खोउनि : आतु पोकळ असे : खाली वोहटळ असे : जाइल परते : आ. ९९ ).

## मात्रा कशी द्यावी ?

नीरस, विरस व रूक्ष भिक्षान्न गोडी देखील न घेता खाणे हे सहजासहजी साधणे शक्य होत नाही. पूर्वी सोपस्कार पंचपक्काने खाऊन चटावलेल्या जिभेला नियंत्रण घालणे हेच कठिण. त्यातहि भिक्षान्न पोटात ढकलणे हे तर अधिक कठिण. म्हाइभट जेव्हां परमेश्वराला अनुसरण्यासाठी रिद्धपुरला यायला निघाले तेव्हां रस्त्यात भिक्षान्न मिळवून गंगेवर जेवायला बसले असतांना, पदार्थांना धोत्राची घाण लागल्यामुळे त्यांना ओकारीच आली. म्हणून पहिला दिवस त्यांना कडकडीत उपवास पडला. दुसऱ्या दिवशी महत्प्रयासाने कसाबसा एक घास त्यांनी पोटात लोटला. तिसऱ्या दिवशी दोन लोटले. अशा क्रमाक्रमाने ते आहारावर आले ( ली. च. उत्त. ४७१ ). साधकाने आरंभी असेच करायला पाहिजे. कोणत्याहि कारणामुळे त्याला भिक्षान्न धकत नसले तर त्याने भिक्षान्नाचा काला करून ते एका पात्रात भरून ठेवावे आणि स्वतःला सांगावे की ' हे भिक्षान्न समोर आहे. खाशील तर खा. हे खायचे नसेल तर खुशाल माती खा. काही झाले तरी याच्या बरोबर, चव येण्यासाठी म्हणून का होईना पण मीठमिरचीसारखेहि पदार्थ मी तुला खाऊ देणार नाही. तू मरायला टेकशील तेव्हां हा काला आपोआप खाशील.' ( भदे भरौनि ठेवीजे : मागे तेव्हळी घालीजे : नेघे तरि म्हणीजे : खासील तरि खाये : न खासील तरि धूळि खाये : मरो लागसी तेव्हळी आपसयाचि खासी : आ. १०० ).

## एकच वेळ भोजन

आपल्या आहारापुरती भिक्षा मागून, भिक्षान्नाचा काला करून नदी-

तीरावर जाऊन भोजन करावे. दिवसातून हा आहार एकच वेळा घेणे, हा श्रेष्ठ आचार होय. तथापि कित्येकदा भिक्षान्नाच्या घृणेमुळे नेमलेला आहार एकाच वेळी पोटात ढकलता येत नाही. म्हणून त्याबरोबर मीठ-मिरचीसारखे रस उत्पन्न करणारे पदार्थ खाण्याची इच्छा होते. पण अधिकारी पुरुषासाठी रूक्षान्न सेवन करणे हाच मुख्य विधि असल्यामुळे त्याने शक्य तोवर असे पदार्थ घेऊ नयेत. तसे केल्याने दोष लागतो. त्यापेक्षा तेच आपले भिक्षान्न दोन वेळ विभागून खावे. म्हणजे एकाच वेळी ते पोटात ढकलणे शक्य होत नसेल तर त्याचे दोन भाग करून ते दोन वेळा खावे. दोन वेळा न जमल्यास तीन वेळा (पण तेच अन्न) विभागून खावे. इंद्रियार्थ-सेवनाचा दोष त्यामुळे चुकतो. (तैसे काइ बाइ : न गमे तरि तीन वेळ घेतले तरि काई : आ. १०९). याहून अधिक वेळा मात्र विभागून खाण्याची परवानगी नाही. मीठमिरची वगैरे पदार्थांचा उपयोग न करणारांनाच ही अन्न विभागून खाण्याची परवानगी आहे, हे लक्ष्यात ठेवले पाहिजे. अर्थात्, तीन वेळा भिक्षान्न विभागून खाणाऱ्यापेक्षा[1] दोन वेळा विभागून खाणारा हा श्रेष्ठ होय हे सांगायला नकोच.

## साधन-चतुष्टयाला परवानगी

मिळालेल्या भिक्षान्नाचा काला करून ते रूक्षान्न गोडी न घेता एकच वेळ सेवन करून अधिकारी पुरुषाला राहता येते. कित्येकांना तेच दोन वेळा किंवा तीन वेळा विभागून खावे लागते. पण काहींना तर दोन वेळा काय किंवा तीन वेळा काय पण नुसते रूक्षान्न मुळी धकतच नाही. त्यांना सी=भाजी; बी=मिरची; चूळ=ताक; आणि चिमूट=मीठ यांच्या साह्यावाचून भिक्षान्नाचा घास गिळवतच नाही. अर्थात्, त्यांना स्मरण वगैरेहि नीट करता येत नाही. सी, बी, चूळ, चिमूट या पदार्थांना 'साधनचतुष्टय' असे म्हणतात. वर निर्देशिलेल्या प्रकारच्या अनाधिकारी पुरुषांना या साधनचतुष्टयाचा परिमित प्रमाणात उपयोग करायला हरकत नाही. (सी : बी : चूळ : चीमुटि या चौमध्ये न गमे तरि एकु ठावो आपजवीजे : आ.

१. 'न गमे म्हणजे प्रथम काळी का अनधिकारें तेणंविण सरेचि ना ते न गमणे : तीन वेळ म्हणजे अन्ना दोष नाही : इंद्रियार्थी दोष' (आ. स्थ. १०९)

१०५ ). कित्येक अनाधिकारी पुरुषांना या चारहि साधनांचा उपयोग करावा लागतो; कित्येकांना तीन साधने पुरेशी होतात; काही जण तर दोनच साधनावर निभावून नेतात; आणि काही कोणत्या तरी एकाच साधनाचा उपयोग करून रूक्षान्न गिळू शकतात. अर्थात्, अनधिकारी पुरुषामध्येहि एकाच साधनाचा उपयोग करणारा श्रेष्ठ होय. तो अनधिकारी असला तरी भ्रष्ट मात्र नव्हे. नागदेवाचार्यांनी वाळुके रामदेवरावाजवळ ' हां गा : अष्टदश पक्कांनि जो जेवि तो जरी एके साधने सीद्धी ने तरी तोचि भला कि गा ' ( स्मृ. स्थ. १०१ ) असे म्हटले होते ते याच अर्थाने.

## थोड्या अनिष्टाने पुष्कळ इष्ट जोडावे

या साधनांचा उपयोग करणे इष्ट नाही हे खरे. पण तसा उपयोग न केल्यास शास्त्रादिकांचा कोणताच आचार साधकाकडून न होता उलट अनेक अनिष्टे त्याजकडून घडण्याचा संभव असतो. ती अनिष्टे एखाद-दुसऱ्या साधनाचा उपयोग करून घेऊन चुकाविता येणे शक्य असले तर जरूर चुकवावी, अर्थात्, थोड्या अनिष्टाने जर पुष्कळ इष्ट जोडत असले, किंवा पुष्कळ अनिष्टे चुकवता येत असली तर तसे जरूर करावे. 'अल्पे अनिष्टे बहुत अनिष्ट परिहरे तरि परिहरीजे :' ( आ. १०८ ) ह्या सामान्य नियमाप्रमाणे अशा वेळी आचरण करावे. निमित्त प्रसंगाने असा अनधिकारी पुरुष आपणाकडे आला असतांना त्याला भिक्षान्नाबरोबर साधन-चतुष्टय द्यावे.

## त्रास उत्पन्न होऊ देऊ नये

कित्येक पुरुषांना महिना—पंधरवाड्याने का होईना पण इंद्रियार्थ पदार्थ म्हणजे गोडी देणारा पदार्थ सेवन केल्यावाचून भागतच नाही. तसे त्यांनी न केले तर त्यांना रूक्ष भिक्षान्नाचा कंटाळा येतो. असा कंटाळा फार आला तर त्या आचरत्या पुरुषाकडून विषयसेवन होण्याचा संभव असतो. पायात काटा रुतल्यामुळे मनुष्य त्या दुःखात जसा वेचून राहतो त्याप्रमाणे रूक्षान्न सेवन केल्यामुळे होणाऱ्या दुःखात तो साधक वेचून राहतो. त्यामुळे आचार वगैरे सर्व काही सोडून देऊन त्या त्या

इंद्रियांच्या विषयोपभोगाकडे तो लागण्याचा संभव असतो. अशा पुरुषाला प्रसंगानुसार महिना-पंधरवाड्याने इंद्रियार्थ पदार्थ सेवन करायलाहि काही हरकत नाही. रूक्षान्न खाऊन शेवटी त्या अन्नाची विकृति उत्पन्न होते, मनाला कंटाळा वाटतो, ते रूक्षान्न वारंवार डोळ्यासमोर येऊन पुनःपुन्हा त्याचा कंटाळा येतो हा ' त्रस ' होय. असा त्रस निर्माण होऊ नये म्हणून मधूनमधून त्या अनधिकारियाने इंद्रियार्थ पदार्थ सेवन करायला परवानगी आहे. ( त्रसो नेदीजे : त्रसला साता जीव विषया शरण जाइल : आ. १०६ ). या पुरुषाला ' त्रसाचा ' पुरुष असे म्हणतात.

## त्रसामुळे आणखी तोटे

इंद्रियार्थ पदार्थ न मिळाल्याने त्रसलेला जीव कंटाळून इतका खब-खबतो की शेवटी तो कुठे तरी अनोळखी ठिकाणी जातो आणि ' सर्वाधमत्व ब्राह्मणत्व ' स्वीकारतो. ब्राह्मणांना देवतांचे, देवतांच्या आचारांचे, पूजेचे वगैरे ज्ञान असते. म्हणून लोकात त्यांना मान्यता मिळते. पण कित्येक जन्मजात ब्राह्मण आपणाला ज्ञान नसूनहि केवळ मान्यतेसाठी ब्राह्मणत्व मिरवतात; आपणच सगळयात श्रेष्ठ, इतर जाती कनिष्ठ असे काय वाटेल ते बडबडतात. असे ब्राह्मण हे सर्वाधम होत. आपल्याला लोकांनी मान्यता देऊन खाण्यापिण्याचे व इंद्रियोपभोगाचे पदार्थ द्यावेत या हेतूने त्रसलेला जीव देखील असेच ब्राह्मणत्व स्वीकारतो. मी असा श्रेष्ठ ब्राह्मण आहे म्हणून लोकांना खोटेच सांगत सुटतो. अशा या ब्राह्मणत्वात विचिकित्सा प्रधान असल्यामुळे त्याला प्रेतत्वारंभक अयोग्यता लागते. तात्पर्य, आचरत्या पुरुषाने कंटाळून जाऊन असे हे सर्वाधमत्व ब्राह्मणत्व स्वीकारू नये म्हणून त्याने रूक्षान्नाचा त्रस उपजू देऊ नये. हा त्रस नाहीसा होण्याइतपत इंद्रियार्थ

१. ' **त्रसला सांता म्हणजे त्रसला तरी विषया शरण जाए म्हणजे जेणेविण त्रसला ते आश्राये : ज्या इंद्रियाचा जो विषयो तया टेके** ' ( आ. स्थ. १०६ ).

२. ' **ज्ञानसंबंधे एकी पवित्रता आली** म्हणजे **वासना अधम** म्हणजे अधम बुद्धी संचरली : म्हणौनि **मी अवघ्यापासौनि उत्तम म्हणती असे :** ऐस्या अधम वासनेतव प्रेतत्व दृढतर होय : **हे का करी : ना· मान्यते : विषयालागी** म्हणौनि त्रसो नेदिजे ' ( आ. बं. १०७ ).

पदार्थांचा उपयोग त्याने करावा. (असला साता देशाचेया सेवटा जाउनि सर्वाधमत्व ब्राह्मणत्व स्वीकारील : आ. १०७). अर्थात्, ते ' अल्पे अनिष्टे बहुत अनिष्ट परिहरे तरि परिहरीजे ' ( आ. १०८ ) या वचनानुसार होय, हे आपण पूर्वी पाहिलेच आहे.

## आतृप्ति भोजन नको

भिक्षा-भोजन-विधीचा मुख्य हेतु आहाराला मात्रा देण्याचा असल्यामुळे कोणत्याहि आचरत्या पुरुषाने आतृप्ति भोजन कधीच करता कामा नये. सामान्यतः चतुर्थांशी, अर्धाहारी व पाऊण आहारी यांच्याकडून आतृप्ति भोजन कधीच होत नाही. पण पूर्णाहारी, तसेच अनिष्टपरिहारासाठी का होईना पण साधनचतुष्टय आणि इंद्रियार्थ-रस सेवन करणारे पुरुष यांच्याकडून मात्र तृप्ति मिळेपर्यंत भोजन होण्याचा संभव असतो. पण कोणत्याहि आचरत्या पुरुषाने मन तृप्त होईपर्यंत पोट भरून कधीहि जेऊ नये हा सामान्य नियम पाळलाच पाहिजे. ( धाये तव खाइजे : पाहे तव निजीजे : तैसे नव्हे की बाइ– आ. ११४ ).

आकंठ भोजन करण्याचा एक तोटा असा की, त्याने जाड्य उत्पन्न होऊन निद्रा येऊ लागते. त्यामुळे अनेक अविधि उत्पन्न होण्याचा संभव असतो. एकदा असेच झाले. एका गावी एक पुजारी राहत असे. तो आपल्या देवतेच्या ठिकाणी अष्टौप्रहर वेचलेला असे. एके दिवशी त्याला गावातील लोकांनी जेवायला बोलावले. तेथे तो पोट भरून जेवला आणि देवतेपुढे येऊन बसला. थोड्याच वेळात त्या अन्नामुळे जाड्य निर्माण होऊन त्याला हळूहळू झोप येऊ लागली. त्या भरात तो खुशाल त्या देवतेपुढे पाय पसरून निजला. मधेच तो गजबजून उठला तेव्हां कुठे त्याच्या लक्षात आले की आपण देवतेपुढे पाय पसरून झोपलो होतो म्हणून. पण जाड्य अनावर असल्यामुळे तो मनात म्हणाला की ' माझी देवतामाउली काय माझा हा एवढासा अपराध सहन करणार नाही ? ' असे बोलून तो खुशाल त्या देवतेकडे तसाच पाय पसरून निजला. या वृत्तीमुळे दुसऱ्या दिवशी तर्पण करीत असतांना त्याचे पाय पिंडीला लागत तरी त्याला काही वाटेना. पुढेपुढे तो पारोशा पाण्यानेच देवतेला स्नान घालू लागला व पारोशीच फुले वाहू लागला. पूर्वी तो दररोज अंगण सारवत असे; आता तो तिकडे

दुर्लक्ष करू लागला. तो मनात म्हणायचा की ' कालच तर आंगण झाडले होते; कालच तर सडा घातला होता. आता आज पुन्हा घालण्याची गरज काय ? ' पूर्वी तो कोणत्याहि स्त्रीची साउली सुद्धा अंगावर पडू देत नव्हता. पण आता ? त्याचे असे झाले की, एके दिवशी तेथे एक बाई आली. ती म्हणाली ' पुजारीबुवा, मला देवाची सेवा करायला परवानगी आहे काय ? ' जाड्याच्या सवयीमुळे आळसावलेला तो पुजारी बोलला, ' का नाही ? देवाची सेवा कुणालाहि करता येते ! ' पुजाऱ्याची परवानगी मिळाल्यावर ती बाई तेथे राहून देवाची सेवा करू लागली. ती अंगण झाडीत असे तर हा सडा घालू लागला. भिक्षेमधे आलेले गोडधोड अन्न तो तिला देऊ लागला. हा प्रकार वाढता वाढता पुढे त्या दोघांचा ' संबंध ' झाला. ती बाई गर्भिणी झाली. तिला मुले झाली. ती मुले पिंडीपाशी हगूमुतू लागली. हे पाहून गावातील लोकांनी त्याला म्हटले की ' पुजारीबुवा, आता तुम्ही लेकुरवाळे झालात. म्हणून आता गावात एक घर बांधा ! ' त्याप्रमाणे त्याने गावात घर बांधले. तेथून येऊन तो देवतेची तीन वेळ पूजा करू लागला. पुढे तो हळूहळू दोनच वेळ पूजा आणि संध्याकाळी तेथे नुसती वात लावू लागला. यानंतर फक्त एकाच पूजेवर भागवू लागला. पुढेपुढे तो तेही करीनासा झाला. नुसते मधूनमधून पाणी वाहून बेल वगैरे टाकू लागला. शेतात जाऊन भिक्षा मागून परततांना देवळासमोर तो यायचा, एका कोपऱ्यात वाहणा ठेवायचा आणि ' जय देवा ' म्हणून हात जोडायचा. हीच काय ती त्याची देवपूजा उरली. ( कठियाचा दृष्टांत ९४ ). हा सगळा परिणाम कशाचा ? पोट भरून जेवल्यामुळे निर्माण झालेल्या जाड्याचा ! यासाठी कोणत्याहि साधकाने मन तृप्त होईपर्यंत कधीच जेऊ नये.

## पोटाची पिशवी

त्याने हे लक्ष्यात ठेवावे की, मनुष्याचे पोट हे पिशवीप्रमाणे आहे. ती वाटेल तेवढी ( नेहमीच्या आहार-प्रमाणापेक्षा जास्तीत जास्त चौपट )

१. ' धायेतव खादलेया अविधी घडला कठियास : एसणे प्रसवले : आसळगोया येसणा वटबीजन्यावो जाला : येउलीया अनिष्टामाजी कठिये लेकरूवे सामावली होती ' ( आ. स्थ. ११४ ).

२. ' पिशवी किती वाढे : आहारा चौगुणा ' ( आ. स्थ. ११३ ).

मोठी होऊ शकते व वाटेल तितकी लहानहि होऊ शकते. पोट वाढवले म्हणजे खूप जेवण्याची सवय लावून घेतली तर अन्न पोटात मावतेच; आणि पोटाची पिशवी लहान केली म्हणजे कमी अन्न खाल्ले तरी चालते. ( जेव्हढी पीसवी कीजे तेवढी होये : आ. ११३ ). पूर्णाहारी पुरुषाच्या पोटाला पूर्णाहार पुरेसा होतो आणि चतुर्थांशियाच्या पोटाला चतुर्थांश आहार पुरेसा वाटतो. म्हणून आचरत्या पुरुषाने आहार शक्य तितका कमी करीत करीत चतुर्थांशापर्यंत यावे. प्रयत्नाने हे सगळे करता येते आणि तेवढ्यावरच पोट संतुष्ट राहून शरीरयात्रा चालू शकते, नाही असे नाही. अर्थात् मन तृप्त होईपर्यंत न जेवण्याने भागू शकते.

तथापि येथे एका वचनाचे स्पष्टीकरण केले पाहिजे. ‘ मंडळीका : धाये तव अन्न घेइजे गा : अधी काइ दोषु असे ’–( आ. मा. ६५ ). स्वामींच्या या वचनावरून ‘ आकंठ ’ भोजन करायला त्यांची आज्ञा आहे असे मात्र कुणी समजू नये. त्यांनी ही परवानगी दिली ती का ? याचे कारण त्याच वचनाच्या उत्तरार्धात आहे. ते असे. ‘ त्रसाल तरी खळेया पाळी टेकाल ’ ( आ. मा. ६५ ). अर्थात् साधकाला मागे सांगितल्याप्रमाणे त्रस उपजू नये म्हणून कधीकाळी आतृप्ति जेवायला हरकत नाही, एवढेच या वचनात सांगितले आहे. तो साधकाचा नित्य विधि नव्हे हे लक्ष्यात ठेवले पाहिजे.

## पचन-पाचन करू नये

महात्म्याने भिक्षान्नावरच नेहमी निर्वाह करावा, त्याला पुरेशी भिक्षा न मिळाली तर त्याने खुंट गिळून रहावे; वगैरे नियम आपण पाहिले. याच हेतूने साधकांनी कधी स्वतःसाठी किंवा इतरासाठी स्वयंपाक करू नये अथवा इतरांना करायला लावू नये, असा दंडक घातलेला आहे. ( पचन-पाचन न कीजे : आ. १९५ ). स्वतः स्वयंपाक करणे हे ‘ पचन ’ होय, तर इतराकडून स्वयंपाक करविणे याला ‘ पाचन ’ असे म्हणतात. नित्यविधि आचरतांना पचनपाचन करणे योग्य नाही. तथापि निमित्तविधीसाठी मात्र तसे करायला हरकत नाही.

१. ‘ पचन म्हणजे आपण कीजे : पाचन म्हणजे आणिकाकरवी करवीजे : भिक्षेचे मिळे तव आपण न कीजे : अथवा पुढील करित असे तरि न कीजे ’ ( आ. स्थ. १९५ ).

एखाद्याने आपणहून महात्म्यासाठी अन्न शिजवले तर ते अन्न त्याने स्वीकारावे. दुसऱ्या कोणासाठी तरी शिजवून ठेवलेले अन्न श्रीप्रभू स्वीकारीतच होते. ( श्रीगोप्रच. ३० ). तथापि त्यामुळे अन्न शिजवणाराला आनुषंगिक हिंसेचा दोष लागलाच. पण महदाइसा श्रीप्रभूसाठी रस्ते झाडीत असतांना तिच्याकडून होणारी हिंसा मात्र तिला लागत नव्हती. कारण ती क्रिया परमेश्वराप्रीत्यर्थ होती. त्याचप्रमाणे एखाद्या अशक्त महात्म्यासाठी किंवा परमेश्वरपरायणासाठी आपण अन्न शिजवले किंवा दुसऱ्याला शिजवायला सांगितले तर कर्त्यांना त्या हिंसेचा दोष लागतो; पण तो प्रसवाचा नसतो. त्या अशक्ताने किंवा ईश्वरपरायणाने त्या अन्नाचा स्वीकार न केला तरीहि प्रसवरूप दोष लागत नाही. कारण ते पचनपाचन स्वनिष्ठ नसून परमेश्वरपरायणाच्या हेतूने केलेले असते. ईश्वराप्रीत्यर्थ पचनपाचन केले तर मात्र दोष लागत नाही. उलट पचन करतांना ज्या प्राण्यांची हिंसा होते त्यांचा प्रस्तुत कर्मलेप नासतो व परमेश्वरसन्निधानाने, परमेश्वरसंबंध झाला असल्यास, त्यांना संबंधाचे फळ मिळते. त्याप्रमाणे परमेश्वराच्या असन्निधानात अधिकरणाजवळ असतांना परमेश्वरहेतूने पचन केले असल्यास, त्या प्राण्यांचा प्रस्तुत कर्मलेप नासून तदनंतर त्या देहाच्या पालटी तो दुःखफळाला न जाता लीळेच्या सुखफळालाच जातो. ज्ञानियाकरिता अशी हिंसा झाली तर ते ( मेलेले जीव ) अर्जित सुखफळाला जातात.[२]

तथापि, भिक्षान्न मिळत असेल किंवा इतर कोणी अन्न शिजवीत असेल तर मात्र साधकाने अन्न शिजवू नये. तसे केल्यास त्या हिंसेचा दोष त्याजकडे येईल. प्रीतीमुळे[३] भिक्षूला एखादा विशिष्ट पदार्थच खाऊ घालायचा असला तर पचन करायला हरकत नाही. कारण तो पदार्थ भिक्षान्नात येईलच असे नाही. आला तरी तो पुरेसा येईल असेहि सांगता येत नाही. अशक्ताने स्वतःच ' माझ्यासाठी अमुक अमुक करा ' अशी इच्छा दर्शवली

१. ' आणिकाचेया हेतु पचन केले ते आयते अन्न ईश्वरे स्वीकरीले : परि जेणे केले होते त्यास त्या पचनाची हिंसा जाली : आन पन्हिवेयाची नाही ' ( आ. बं. १९५ ).

२. ' दुःखदानी नव्हति : सुखालागी चहुदानी कृपा मोकलून घातली : हे अतिव्याप्ति : संते अर्जिते ' ( आ. स्थ. १९५ ).

३. ' न करावे ऐसाच विधि परि कीजयाते ते प्रीती ' ( सदर ).

तर शुश्रूषक साधकाने ते जरूर करावे. त्यामुळे त्याला गोमटेच होईल. पण त्या शुश्रूषकाने अशक्ताची अशी जी सेवा करायची ती तो अशक्त भिक्षुक बरा होऊन स्वतः भिक्षान्न मागायला समर्थ होईपर्यंतच. त्यानंतर मात्र त्याची सेवा करू नये किंवा त्याच्यासाठी त्याने पचनपाचन करू नये. केल्यास दोष लागेल. विशेषतः ज्ञातविरक्ताने करू नये. त्यांनी मग त्या अशक्ताला निर्वेद किंवा अनुताप उपजेल असा उपदेश करून निघून जावे. तो भिक्षान्न मागायला समर्थ असताहि इतर वासनिकांनी त्याला अन्न देणे चालूच ठेवले तर देणाराला गोमटे होईल, पण आजारातून उठलेल्या त्या भिक्षूला मात्र त्याने भिक्षाविधि खंडल्याचा दोष लागल्यावाचून राहणार नाही.

## काही उदाहरणे

पचन न करण्याविषयी भिक्षुक किती काळजी घेतात याची स्मृतिस्थळात एकदोन चांगली उदाहरणे आढळतात. एक वेळ देशात दुर्भिक्ष पडल्यामुळे भिक्षुकांना फारशी भिक्षा मिळेनाशी झाली. प्रत्येकाच्या झोळीत चारदोनच कोरके पडायला लागले. नागदेवाचार्यांना हे कळले तर कदाचित् ते आपणाला पचन करायला लावतील या भीतीने ते भिक्षुक झोळीच्या तळाशी चिंध्या घालून वर भिक्षा ठेवीत. हेतु हा की झोळी हृष्टपुष्ट करतांना भिक्षा थोडी मिळाल्याचे लक्ष्यात येऊन आचार्यांनी आपणाला पचन करण्याला सांगू नये. (स्मृ. स्थ. १०७).

दुसऱ्या एका प्रसंगी महात्म्यांना घेऊन आचार्यांना एका ठिकाणी भोजनाला जायचे होते. पण त्यांच्याजवळील एक महात्मा रुसून बसल्यामुळे तो काही केल्या जेवायला जाईना. तेव्हां नागदेवाचार्य म्हणाले की 'रुसून का होईना पण त्याच्याकडून पचनक्रिया चुको म्हणजे झाले' (स्मृ. स्थ. ४३).

पचनपाचन करू नये म्हणूनच नागदेवाचार्यांनी एकदा आपल्या शिष्यांना असा उपदेश केला की 'महात्म्यांनी चुलीभानवसी घालू नयेत. प्रसंगच पडला तर तीन विटा एकत्र करून तात्पुरता 'इटोला' मांडावा. पण कायमची चूल कधीच घालू नये' (स्मृ. स्थ. ४१).

१, '**ना विधि सांडल्यासि कैसा विधि करावा :** म्हणितल्या शुश्रूषा किमपर्यंत करावी : ना : भिक्षा मागवया दक्ष होय तव पर्यंत ' ( आ. बं. १९५ ).

## इतर सामान्य नियम

भिक्षुकाने भिक्षा मागायची ती झोळीतच मागितली पाहिजे. श्रीचक्रधरस्वामी हे स्वतः 'पाणीपात्रा' त भिक्षा करीत असत; म्हणजे भिक्षा घेण्यासाठी ते ओंजळ पुढे करीत व त्या ओंजळीत मावेल तितके अन्न मिळाले म्हणजे गंगेवर जाऊन आरोगणा करीत. पण हा आचार सामान्य साधकांना साधणे शक्य नाही. म्हणून त्यांच्यासाठी झोळीत भिक्षा मागण्याची परवानगी आहे. दीक्षा घेतल्यानंतर साधकाने एकदा झोळी घेतली म्हणजे ती मरेपर्यंत ठेवलीच पाहिजे. लग्न लागल्यानंतर पति ज्याप्रमाणे आपल्या पत्नीला कधीच विसंबत नाही त्याप्रमाणे दीक्षेनंतर भिक्षुकानें आपल्या झोळीला कधीच विसरता कामा नये. ( मंडळीका: झोळीएसी आणि तुम्हासि प्राणायाम कीजेल गा : हे तुम्हा लागे हो : शो. आ. ६१ ).

## झोळीत जेऊ नये

झोळीत भिक्षा मागायची असली तरी साधकाने झोळीत जेऊ मात्र नये. नदीतीरावर जाऊन, पात्रात भिक्षान्न घेऊन ते काला करून खावे. तेहि अशा रीतीने की त्या भिक्षान्नातील एक शीतदेखील वाया जाता कामा नये. शक्य तोवर प्रत्येकाने स्वतंत्र भोजन करणे हेच चांगले. पण क्वचित् प्रसंगी एकाच पात्रात दोघांनी जेवण्याचा प्रसंग आलाच तर त्याने महात्म्याबरोबरच भोजन करावे. गृहस्थाच्या तर काय पण वासनिकाच्याहि ताटात त्याने जेवू नये.तसे केल्यास त्या वासनिकाच्या दोषामुळे महात्म्याची धर्महानि होण्याचा संभव असतो. ( स्मृ. स्थ. ३७ ). 'विषयाचिये एकासनीं न बैसावे' ( आ. १४ ) या वचनावरूनच भोजनाचा उपरोक्त नियम स्पष्ट होतो.

## आहारमात्रा

अष्ट स्वभावापैकी क्षुधेला मात्रा देऊन परिमित आहार घेणे ही गोष्ट आचारधर्मात अतिशय महत्त्वाची आहे. कारण आहाराच्या कमीअधिक प्रमाणावर पुनःसंबंधाचा काळ अवलंबून असतो. जीवाला शाब्दज्ञान झाल्यावर व तदनुसार त्याने आचरण केल्यावर परमेश्वर त्याला पुन:संबंध देतात हे आपण पाहिलेच आहे. ( मागे पा. ३ पहा ). हा पुनःसंबंध किती वर्षांनंतर द्यायचा हे त्या शाद्बज्ञानियाने आपल्या आहाराला दिलेल्या मात्रेवर

अवलंबून असते. अनुसरलेल्या पुरुषाने दररोज जास्तीत जास्त चार शेरा-पेक्षा अधिक आहार घेता कामा नये, हा पूर्वी सांगितलेला स्थूल नियम लक्ष्यात घेऊन मग या आहाराच्या प्रमाणानुसार आचरत्या पुरुषाचे अनेक भेद होतात. हे भेद व त्यांच्या बाबतीतील पुनःसंबंधाचा काळ पुढीलप्रमाणेः

(१) **चतुर्थांशी :** एक चतुर्थांश म्हणजे दररोज एक शेर रूक्षान्न आहार एकच वेळ घेणाऱ्या चतुर्थांशी 'उत्तम' पुरुषाला पुनःसंबंधी परमेश्वर १२ वर्षांनी भेट देतात.

(२) **अर्धाहारी :** दोन शेर रूक्षान्न आहार एकच वेळ घेणारा अर्धाहारी हा 'मध्यम' पुरुष होय. त्याला परमेश्वर पुनःसंबंधी १३ वर्षे ४ महिन्यांनी भेट देतात.

(३) **पाउण आहारी :** तीन शेर रूक्षान्न आहार एकच वेळ घेणारा पाऊण आहारी हा 'कनिष्ठ' पुरुष होय. त्याला १४ वर्षे ८ महिन्यांनी भेट देतात.

(४) **संपूर्णाहारी :** चार शेर रूक्षान्न दिवसातून एकवेळ खाणारा तो संपूर्णाहारी होय. याला १६ व्या वर्षी भेट.

आचरत्या पुरुषांच्या या चार प्रकारांची माहिती आपण पूर्वी करून घेतली आहेच. याशिवाय आचरत्या पुरुषांचे आणखी भेद आहेत. ते पुढील प्रमाणे :—

(५) **दरिया :** आपला चार शेरांचा संपूर्ण आहार एकाच वेळी घेणारा तो संपूर्णाहारी हे वर आलेच आहे. पण हाच संपूर्णाहार दोन किंवा तीन वेळ विभागून जो खातो त्याला 'दरिया' असे म्हणतात. याला २० वर्षांनी पुनःसंबंधी भेट देतात.

(६) **अनधिकारी :** आपल्या आहाराबरोबर सी, बी, चूळ, चिमूट हे साधनचतुष्टय घेणारा तो 'अनधिकारी' पुरुष समजला जातो. याला २४ वर्षांनी पुनःसंबंधी भेट होते.

(७) **त्रसाचा :** आपल्या आहाराबरोबर पंधरवाड्यान अथवा महि-न्याने इंद्रियार्थ सेवन करणाराला 'त्रसाचा' पुरुष असे म्हणतात. याला २८ वर्षांनी पुनःसंबंधी भेट.

(८) **डिंगरा :** आपल्या आहाराबरोबर साधनचतुष्टय, इंद्रियार्थ, रस वगैरे सर्व पदार्थ जो सेवन करतो, शिवाय जो ३६ दोषांनी युक्त असतो;

तसेच जो चेतनाचे उल्लेख मात्र करीत नाही; इतकेच नाही तर परमेश्वराच्या ठिकाणी जो अत्यंत आसक्त असतो त्याला 'डिंगरा' असे म्हणतात. या डिंगऱ्याला ३२ वर्षांनी पुनःसंबंधी भेट होते.

'डिंगर' म्हणजे राजाचा दासीपुत्र. दासीपुत्राच्या ठिकाणी आपल्या आईच्या अंगचे ३६ विभाग व्यभिचारी असतात. तरी तो आपल्या पित्याविषयी विशेष प्रेम व श्रद्धा बाळगतो. इतकी की प्रसंगी तो त्याच्यासाठी प्राणदेखील देतो. तसाच, 'डिंगरा 'साधक ३६ दोषांनी युक्त असला तरी परमेश्वरावर आसक्त असतो. म्हणून ३२ वर्षांनी का होईना पण परमेश्वर त्याला पुनःसंबंधी भेट देतातच.

## 'डिंगरा' पुरुषाच्या ठिकाणी असलेले ३६ दोष

१ स्वभावचांचल्य; २ इंद्रियार्थादि जड पदार्थांची इच्छा; ३ कोणाला न विचारता एखादी मनःपूत क्रिया करणे; ४ अविहित द्रव्यपदार्थांचा स्वीकार; ५ एखाद्या विशिष्ट गावीच जाण्याची इच्छा; ६ योग्य ठिकाणी न थांबता मनाप्रमाणे ग्रामांतर उल्लंघून दूर जाणे; ७ भीतीचे कारण नसताहि ओसरीचा आश्रय करणे; ८ पाहिलेल्या पदार्थांचा अभिलाष; ९ त्या पदार्थांच्या उल्लेखाशी रसरूप होणे; १० तोरणमंडळाच्या ठिकाणी भिक्षा मागण्याची विशेष इच्छा; ११ बारा रसांच्या ठिकाणी आवड-नावड असणे; १२ आग्रह नसताहि पदार्थांचे सेवन; १३ कोणतीहि गोष्ट वेड्यासारखी = भ्रांत होऊन करणे; १४ दृष्टीसमोर येईल तिकडे पाहत राहणे; १५ सुगंध-दुर्गंधाविषयी आवड-नावड; १६ नादलुब्धता; १७ नवरसी लोलुपता; १८ शीतोष्णाची बाधा होणे; १९ हिवाळ्यात ऊन खाणे; २० तहानभूक वाटेल तेव्हां लागणे; २१ वाटेल तेव्हां शौचाला व लघ्वीला जाणे; २२ पदार्थ-सेवन करतांना कोणतेच बंधन न ठेवणे; २३ दुसऱ्याबरोबर खूप गोष्टी करणे; २४ मनोरथ खूप करणे; २५ वस्त्रादिकाविषयी आवड; २६ शरीरावर प्रेम व आस्था; २७ अहंकाराने वागणे; २८ आत्मस्तुति करणे; २९

१. 'बीज तर रायाचे पर दासीचा पोटी जन्मे' 'डिंगरा छत्तीसा दोषांचा : जयासि बीजाचे खरेपण आन क्षेत्रीचा व्यभिचार ऐसी दोन्ही उपतिष्ठति : खरेपणे तरि रायाचा काजी आपणपे न रखणे : आणि व्यभिचार तरि घरीचे पदार्थ चोरी' (दृ. स्थ. ८१).

परोत्कर्ष सहन न करणे; ३० आपल्या त्रासाचे व दुःखांचे रडगाणे दुसऱ्या-जवळ गाणे; ३१ इतरांच्या आश्रयाची आशा करणे; ३२ इतरांच्या सह-वासाची आशा करणे; ३३ आळस व निद्रा फार असणे; ३४ आपण पुष्कळ जगणार या भावनेने उद्योग करीत राहणे; ३५ इतरांच्या मदतीची वाट पाहणे; आणि ३६ मिळालेल्या पदार्थांत संतोष न मानणे.

(९) **इशाळु** : आचरत्या पुरुषाचा नववा प्रकार 'इशाळु' होय. हा नेहमी विकरतो. विकार हाच याचा स्वभाव. म्हणजे, स्त्रीविषयक उल्लेख करणारा, त्या उल्लेखाशी रसरूप इतकेच नव्हे तर अभिमुख होणारा पण प्रत्यक्ष सेवना चुकवणारा तो 'इशाळु' होय. हा प्रत्यक्ष स्त्रीसंग करीत नाही म्हणूनच पुनःसंबंधाला योग्य ठरतो. बाकी, डिंगऱ्याचे दोष याच्याहि ठिकाणी असतातच. तसेच परमेश्वरावर त्याची पूर्ण श्रद्धाहि असते. किंबहुना याच कारणामुळे पुनःसंबंधाला तो पात्र समजला जातो. याला ३६ वर्षांनी अथवा त्या देही केव्हां तरी भेट देतात.

## इतर स्वभावांना मात्रा

विकार आणि विकल्प यांचा नाश करण्यासाठी स्वभावांना मात्रा देणे म्हणजे त्यांचे नियमन करणे अत्यंत आवश्यक आहे. हे स्वभाव आठ आहेत. क्षुधा, पिपासा, मल, मूत्र, शीत, उष्ण, भय व निद्रा हे ते आठ स्वभाव होत. यापैकी क्षुधेचे नियमन कसे करायचे हे आपण विस्ताराने पाहिले. आता इतर स्वभावांचा आणि त्यांच्या नियमनांचा विचार करू.

## पिपासा : कुठलेहि पाणी प्यावे:

पिपासा म्हणजे काही तरी पिण्याची इच्छा किंवा तहान, हा देहाचा दुसरा महत्त्वाचा स्वभाव आहे; आणि तो क्षुधेबरोबरच लक्षात घ्यायला पाहिजे. तथापि, भुकेप्रमाणे तहानेचे नियमन करण्याची विशेष आवश्य-

१. 'डिंगरा इसाळु याचा भेद तो कैसा पा : ना डिंगरा रसरूपी होउनी रसादि मिष्टान्न सेवी परि मुख्य विषयाची अभिमुखता न करी : तयाचे अनिष्ट ईश्वरी विनट असे : म्हणौनि उपसाहाति : आणि कुयोगियासि तैसा विनट नाही : कुत्सित संयोग सकळ पदार्थ सेवी : अंतरी निश्चयाचे उल्लेख अभिमुखतेपर्यंत करी : सेवने एता देह जाए' ( इ. स्थ. ८२ )

कता नाही. कारण, नुसते पाणी कितीहि प्याले आणि कितीदाहि प्याले तरी त्यामुळे जाड्य निर्माण होत नाही की विकार चेवत नाहीत. तो धर्म मुख्यत्वेकरून अन्नाचा आहे, पाण्याचा नव्हे. म्हणून खाण्याच्या अन्नावर नियंत्रण ठेवणे जसे जरुरीचे आहे तसे पिण्याच्या पाण्यावर ठेवणे जरुरीचे नाही. म्हणूनच श्रीचक्रधरस्वामींनी जसे क्षुधा नियमनाचे नियम विस्तरशः सांगितले तसे तहानेसंबंधीचे सांगितले नाहीत.

तथापि तहानेचे अगदीच नियमन करायचे नाही असा याचा अर्थ नाही. साधकाने इतकेच पाणी प्यावे असा निश्चित नियम सांगता येत नाही, हे खरे. आपला विहित आहार व वातपित्ताची प्रकृति पाहून पाण्याचे प्रमाण आपणच ठरवावे. पाणी पितांना साधकाने एक नियम मात्र लक्ष्यात ठेवावा. तो असा की, घेतलेल्या पाण्याने त्याची स्वाभाविक तहान तर भागावी पण त्यामुळे त्याला पूर्ण तृप्ति होता कामा नये.

या बाबतीत आचरत्या पुरुषाने आणखीहि दोन गोष्टी अवश्य लक्ष्यात ठेवल्या पाहिजेत. पैकी पहिली अशी की, विकल्पविनाशासाठी चारहि वर्णांत, घरे न निवडता भिक्षा करणे जसे महत्त्वाचे आहे तसेच त्या ठिकाणचे पाणी पिणेहि महत्त्वाचे आहे, हेहि ओघानेच आले. कोणत्याहि वर्णांच्या घरचे अन्न खायला जशी हरकत नाही, तशीच कोणत्याहि वर्णांच्या घरचे पाणी प्यायलाहि हरकत नाही. (स्मृ. स्थ. १९३). इथले पाणी पवित्र आणि तिथले पाणी अपवित्र असे मानता कामा नये. साधकाच्या दृष्टीने पाणी गंगेचे असो की डबक्याचे असो, ते सारख्याच योग्यतेचे आहे. त्याने त्या दोहोंच्याहि ठिकाणी समानता मानली पाहिजे; त्यांच्यात फरक करता कामा नये. केल्यास तो विकल्पाला कारण होईल. ( तुम्हा बोडी गंगा समानाचि होआवी की गा: आ. ११५ ).

१. '**उदक ते अनुभवेचि जाणावे** : एवं अन्नमात्राभेदे तथा वातपित्तानुरूप पुरुषभेदे जाणावे : **तृषा तर शमे** म्हणजे तृषा स्वभावासी निरोध व्हावा : ती शमे आन **तृप्ती** तर **नाही** म्हणजे तृषा धालेपण नाही : तर नाही ऐसे अनुभवे जाणावे' (ल. बं. अ. प. ३ ).

२. '**बोडी गंगा समान म्हणजे पवित्र अपवित्र ये दोन्ही न होआवी : आन तृषा लागलेया बोडीचे चोखट गंगेचे चोखट ऐसे न म्हणावे : जे मिळे तेचि घ्यावे : विचिकित्सा न करावी**' (आ. स्थ. ११५ ).

## ही समानता स्वतः पाणी पितांना

ही समानता आचरत्या पुरुषाने स्वतःच्या बाबतीत आचरावी, इतरांच्या बाबतीत मात्र नव्हे. उदाः आपल्या क्षुधानिवृत्तिसाठी त्याने नीरस-विरस भिक्षान्न भोजन करावे हे ठीक; पण गुरूला किंवा इतरांना प्रीतिपूर्वक अन्न समर्पण करितांना त्यांना काय त्याने नासके-कुजके अन्न वाढायचे ? अर्थात् नाही. त्याचप्रमाणे इतरांना पाणी प्यायला देतांना ते चांगल्या म्हणजे निर्मळ ठिकाणचेच आणून द्यावे. एक वेळ असे झाले की, नागदेवाचार्यांना तहान लागली असतांना त्यांनी जवळच्या एका भिक्षूला पाणी मागितले. त्या भिक्षूने, जवळच असलेल्या डबक्यातील पाणी गाळून आणले आणि ते आचार्यांना दिले. त्यांनी ते प्राशन केले खरे, पण लागलीच म्हटले की 'मला जसे डबक्यातील पाणी पाजलेस तसे इतरांना पाजू नकोस हो' यावर तो भिक्षु म्हणाला, 'पण भटो, स्वामींनी तर बोडि आणि गंगा समानच सांगितली आहे ना ?' नागदेवाचार्य म्हणाले 'होय, ते खरे आहे. पण ते फक्त आचरत्या पुरुषाच्या स्वतःच्या बाबतीत; इतरांना पाणी देतांना मात्र त्याने लक्ष्यात ठेवावे की, डबके ते डबके आणि गंगा ती गंगा. एरवी, पुढिलाविषयींना त्याचा भाव हीन असल्याचे दिसेल'[1] (स्मृ. स्थ. २८)

## पाणी गाळून प्यावे

आचरत्या पुरुषाने स्वतःसाठी (किंवा इतरासाठी) पाणी कुठलेहि घेतले तरी ते गाळून प्याले पाहिजे. वरील आख्यायिकेतील भिक्षूने डबक्यातील का असेना पण ते पाणी 'गाळून' घेतले होते असे दिसेल. 'वस्त्रपूतं पिबेज्जलम्' हा जलप्राशनाचा महत्त्वाचा नियम होय. दर्शनप्रकाशकारानेहि भिक्षूचे वर्णन करतांना 'तो एकांती करी भिक्षाभोजन : सदा उदक घे शोधून' (द. प्र. ५७८) असे म्हटलेले आहे ते याच अर्थाने.

## मल-मूत्र यांना मात्रा ?

क्षुधा व पिपासा यानंतरचे दोन महत्त्वाचे स्वभाव मल व मूत्र हे होत. हे दोन्ही स्वभाव वस्तुतः क्षुधा व पिपासा यावरच अवलंबून आहेत.

१. 'भटोबासी म्हणितले : ते आपणयासि : पुढीलासि संपादिता बोडि ते बोडिचि गंगा ते गंगाचि : ऐसी बुद्धी होआवी कि : भावे हीन ते दैवे हीन' (स्मृ. स्थ. २८).

शिवाय शरीरयात्रा सुव्यवस्थित रीतीने चालण्यासाठी त्यांचा निरोध करणे इष्ट नाही, इतकेच नाही तर ते विघातक आहे. याच कारणामुळे मल व मूत्र यांना मात्रा देण्याचे किंवा त्यांचे नियमन करण्याचे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले नाही. दर्शनप्रकाशकाराने मलमूत्रविसर्जनाचा नियम म्हणून 'नदीतीरे गवां गोष्ठे क्षेत्रमध्ये चतुष्पथे। धर्मस्थाने सभास्थाने मलमूत्रं न कारयेत्' असा एक श्लोक दिला आहे. त्याचा अर्थ असा की, नदीच्या काठावर, गोठ्यात, पवित्र क्षेत्रामधे, चौहाट्यावर, धार्मिक स्थानी व सभास्थानी मलमूत्र विसर्जन करू नये. सामान्य विवेकाच्या दृष्टीने हा नियम अत्यंत उपयुक्त आहे यात शंकाच नाही.

## शीत व उष्ण यांचे नियमन

शीत व ऊष्ण हे यापुढील दोन विशेष महत्त्वाचे स्वभाव होत. त्यांचे नियमन करणे म्हणजे या दोहोपासून शरीराचे आवश्यक त्या प्रमाणात संरक्षण करणे जरूरीचे आहे. (शीतोष्ण परिहारु कीजे : आ. मा. ६८). आचरत्या पुरुषाला नित्य आणि एकाकी अटण व विजन स्वामींनी सांगितले असल्यामुळे तसे करीत असतांना त्याला थंडीवाऱ्याचा व उन्हाचा त्रास होणे शक्य आहे. हा त्रास टाळण्यासाठी, म्हणजे थंडी व ऊन यापासून आपल्याला उपद्रव पाचू नये म्हणून साधकाने अंगावर वस्त्र घेतले पाहिजे. (तुम्हा अशन आच्छादन होआवे : आ. मा. ७२); आणि वेळीप्रसंगी निवाऱ्याच्या जागेचा आसराहि घेतला पाहिजे. यापैकी, त्याने कोणकोणत्या जागांचा आसरा घ्यावा व कोणकोणत्या जागांचा घेऊ नये याविषयी दुसऱ्या तिसऱ्या व पाचव्या प्रकरणात विवेचन केले आहे. आता त्याने कोणते वस्त्र स्वीकारावे यासंबंधीचे नियम पाहू.

## नागवे राहू नये

विकार व विकल्प उत्पन्न करणाऱ्या सर्व वस्तूंचा त्याग करायला स्वामींनी सांगितले असल्यामुळे वस्त्रांचा आत्यंतिक त्याग करणे व दिगंबरवृत्तीने राहणे इष्ट वाटण्याचा संभव आहे. पण श्रीचक्रधरस्वामींनी या दिगंबरवृत्तीचा निषेध केला आहे हे लक्ष्यात ठेवावे. 'अशन आच्छादन होआवे' (आ. मा. ७२) या सूत्रात शरीर आच्छादून ठेवायला त्यांनी मुद्दामहून सांगितले आहे; इतकेच नाही तर 'नागवेया नसावे' (आ.मा.

२२९ ) म्हणजे नागवे राहू नये असेहि स्पष्ट म्हटले आहे. नागवे न राहण्याचे कारण, शीतोष्णपरिहार करणे हे जसे साधकाचे कर्तव्य आहे तसेच लज्जारक्षणासाठी सभ्यता पाळणे हेहि त्याचे कर्तव्य आहे. अर्थात्, यासाठी अत्यंत आवश्यक असेल तेवढेच जुनेपुराणे वस्त्र त्याने वापरावे.

## नवे वस्त्र नको

शीतोष्णपरिहार ( आणि लज्जारक्षण ) हेच वस्त्राचे मुख्य कार्य होय. त्यासाठी कोणतेहि वस्त्र चालेल. साधकाने 'नवे वस्त्र न नेसावे' ( आ. मा. ७३ ) म्हणजे नवेकोरे वस्त्र कधी नेसू नये. तसे करणे हा एक प्रकारचा विकारच आहे. इतकेच नाही तर त्यामुळे असतीपरीचे आचरण नीट रीतीने न होता उलट अनेक प्रमाद घडणे शक्य होते. आचरत्या पुरुषाने नवे वस्त्र वापरले तर त्यामुळे त्याच्या सुखाची वाढ होते, त्याचे मन सुखाला लालचावते; आणि त्यामुळे परमेश्वराकडे त्याचे लक्ष नीटं लागत नाही. जवळ नवे वस्त्र असेल तर असे वाटते की, आता हे वस्त्र चारदोन महिने तरी आपल्याजवळ राहील व आपणाला उपयोगी पडेल. असे वाटणे म्हणजे चारदोन महिने तरी आपण जिवंत राहूच अशी कल्पना करणे होय. अशा कल्पनेमुळे आचरत्या पुरुषाची परमेश्वराकडे पीचण्याची आर्तता नष्ट होते. नव्या वस्त्रामुळे, दुसरा एखादा माणूस आपल्याजवळचे हे वस्त्र चोरून तर नेणार नाही ना; किंवा आपणाला मारून ठोकून तर तो हे वस्त्र लुबाडणार नाही ना अशी भीति त्याला उत्पन्न होते. तसे झाले म्हणजे मन ईश्वरस्मरणाकडे लागण्याऐवजी त्या नव्याकोऱ्या वस्त्राच्या संरक्षणाकडेच लागते. ही धर्मभ्रष्टताच होय. भिक्षूजवळ नवे वस्त्र पाहिले म्हणजे त्यामुळे आकृष्ट होऊन दुसऱ्या एखाद्या 'पात्राला' त्याच्याकडे जावेसे वाटणे साहजिक आहे. आणि तसे झाले म्हणजे ज्यांचा 'संबंध' टाळणे इष्ट त्यांचाच संबंध होण्याचा अधिक संभव निर्माण होतो. नव्या वस्त्रावर साधकाची ममता जडणे हा एका दृष्टीने आलंबनाचा दोष होय. अटणविजनात असतांना दुसऱ्या एखाद्या भिक्षूची भेट झाली तर आपले वस्त्र त्याला देऊन त्याचे वस्त्र आपण घ्यावे ( फालुकी पालटीजेति : आ. १३२ ) असा विधि आहे. पण नवे वस्त्र असले म्हणजे ते त्या दुसऱ्या भिक्षूला द्यावेसे कसे वाटणार ? आणि ते न दिले तर विधिभंग होऊन शिवाय भेटीलं

आलेल्या त्या भिक्षूची वंचना होणार. वस्तुतः तो दुसऱ्याचा म्हणजे त्या भेटणाऱ्या भिक्षूचा पदार्थ होय; पण त्याला आपण आपला म्हणणे हा आलंबनाचाच दोष नाही काय ? हे सर्व दोष नव्याकोऱ्या वस्त्राच्या आलंबनामुळे निर्माण होतात. म्हणून आचरत्या पुरुषाने नवेकोरे वस्त्र वस्त्र कधीच घेऊ नये.[1]

## तलम वस्त्र नको

साधकाने नवे वस्त्र नेसता कामा नये, इतकेच नाही तर त्याने कोणतेहि तलम वस्त्र नेसता कामा नये. 'वोली बहिर्वासू न नेसावे' (आ. मा. ६९) असे स्वामींनी सांगितले आहे. 'वोली' म्हणजे तलम रेशमी वस्त्र; आणि 'बहिर्वास' म्हणजे बाहेरून दिसणारे वस्त्र. तलम वस्त्रांनी आणि बहिर्वासाने साधकाला अत्यंत सुख वाटून, त्या सुखसीनतेमुळे तो ईश्वरभजनापासून दूर खेचला जातो. शिवाय त्या वस्त्रामुळे तो सुंदर दिसतो. इतरांच्या मनात त्यामुळे उपभोगभावना जागृत होऊन त्यामुळे खुद्द तो साधक आपलवला जाणे संभवनीय होते. यासाठी अशी वस्त्रे न नेसणे श्रेयस्कर होय.

## जीर्ण वस्त्रे नेसावी

तेव्हां, साधकाने शीत निवारण करण्यासाठी वस्त्रे नेसायची ती जाडीभरडी व जुनीपुराणी असली पाहिजेत हे ओघानेच आले. त्याने नवे वस्त्र नेसू नये याचाच अर्थ जुने वस्त्र नेसावे. तेहि धड असता कामा नये, म्हणजेच ते फाटके किंवा ठिगळ लावलेले असले पाहिजे. 'धडवस्त्रनिषेधे भिक्षेचे अन्नवस्त्रप्रशंसा' या स्मृतिस्थळातील (२३१) स्मृतीत नागदेवाचार्यांनी 'धड वस्त्र न पांगुरावे : थिगळांचे प्रावर्ण···येणे बहुत चुके' म्हणून स्पष्टच सांगितले आहे. स्वरूपसुंदर भास्करभट्ट बोरीकर हे आपल्या प्रावर्णांची शिवण नेहमीप्रमाणे आत घालून ते अंगावर घेत असत. त्यामुळे ते सहजसुंदर दिसत. म्हणून आचार्यांनी 'तू वस्त्र-दसीयांचाचि

१. 'धड वस्त्र आश्राइलेया सुरवाड : निश्चिती : प्रमाद धर्मी अदक्ष : ममता पदार्थानुरूप : तै भिक्षु वंचिला : लोकाचा पदार्थ आपला म्हाणितला' (अस्तीपरीचा गुढा). ' नवे वस्त्र न नेसावे ··· ते प्रधान करूनि···धडवस्त्र आश्राऊ नये' ऐसे सांगितले असे ' (ल. बं. अ. प. गुढा).

वाई पांघुर' (स्मृ. स्थ. १२२) अशी आज्ञा केली. त्यामुळे शिवण बाहेर ठेवून ते ठिगळाचे वस्त्र पांघरू लागले; ही आख्यायिका लक्ष्यात ठेवण्या-जोगी आहे.

ठिगळाचे वस्त्र नेसल्याने पुष्कळ गोष्टी चुकतात म्हणून नागदेवाचार्य म्हणतात, त्या गोष्टी कोणत्या ? तर अशा वस्त्राने साधक सुंदर न दिसता दरिद्री व वेंधळा दिसतो. त्यामुळे सहजच त्याच्यावर कुणाहि स्त्रीचे मन जात नाही. उलट, अशा पुरुषाला ती विटते. त्यामुळे विकारदोषापासून तो वाचतो, ही सगळ्यात महत्त्वाची गोष्ट होय. शिवाय, फाटक्या वस्त्रावर साधकाची आसक्ति राहत नाही. म्हणून भेटीच्या वेळी वस्त्रे पालटण्याचा विधि तो पाळू शकतो. जवळ धड वस्त्र असले तर ते सोडावेसे वाटत नाही. त्यामुळे भेटीच्या वेळी वस्त्र पालटावेसेहि वाटत नाही. अर्थात्, त्यामुळे विधिभंग होतो. शिवाय, नव्या वस्त्रात असलेले सर्व दोष धड वस्त्रातहि असतात. ते चुकवण्याचा सरळ उपाय म्हणजे नव्या वस्त्राप्रमाणेच धड वस्त्रे साधकाने नेसू नयेत. जीर्ण व ठिगळ लावलेली अशीच वस्त्रे त्याने वापरावी.

## मलिन वस्त्रे

साधकाने जी वस्त्रे वापरायची ती जशी नवी आणि धड असता कामा नयेत तशीच ती स्वच्छ व चकचकीतहि असता कामा नयेत. ती जितकी मळकट आणि घाणेरडी असतील तितके अधिक चांगले. 'विराली कुचिळे : पांगुरावी वल्कले : अथवा झळाळेची पातळे : दीगांबरे' (उद्ध.गी.१९२) या ओवीत भास्करभट्ट बोरीकरांनी साधकाची वस्त्रे नुसती 'विराली'=विरविरीत किंवा फाटकी असावीत एवढेच सांगितले नाही तर ती 'कुचिळे'=वाईट, मलिन असावीत असेहि म्हटले आहे. 'झळाळेची' असावीत म्हणजे पांढरी असावीत, म्हणजेच ती रंगीबेरंगी असू नयेत, असा त्यांच्या म्हण-ण्याचा भावार्थ आहे.

जनसंपर्क टाळण्याच्या दृष्टीने, आचरत्या पुरुषांनी मुद्दामहून स्वच्छ व नीटनेटके राहण्याचा प्रयत्न करू नये. कारण त्यामुळे आपणाला पाहून इतरांच्या मनात विकार निर्माण होण्याचा संभव असतो. इतकेच नाही तर जाणूनबुजून असे राहण्याचा प्रयत्न करणे हाच मुळात विकार आहे. तो निर्माण न होऊ देण्यासाठीच साधकाने कसेतरी, काळे-मचकट राहावे असे

स्वामींनी सांगितले आहे. ( जोगिया तो मसी घसी लीतला होआवा की गा : आ. ४४ ). त्याने शरीराची 'लीसपूस' करू नये. 'लीसे' म्हणजे अंगावर वाजवीपेक्षा जास्त केस वाढले तर ते लागलीच काढून टाकणे, कुठे व्रण झाला असेल तर त्यावर लागलीच औषध लावणे, अंगावरचा मळ वारंवार काढणे, वस्त्रालंकारांनी शरीर शृंगारणे वगैरे; आणि 'पूसे' म्हणजे हातपाय वारंवार धुणे, रुमालाने मळ झाडणे, तोंड पुसणे वगैरे. अशी लीस-पूस करणे हे वेश्येचे काम आहे. साधकाने तसे न करता आपले शरीर धूळ-मातीने व चिखलाने लिंपल्यासारखे खुशाल राहू द्यावे.

साधकाच्या शरीरासंबंधी स्वामींनी सांगितलेला हा आचार त्याच्या वेषालाहि लागू पडतो. अर्थात्, तदनुसार, साधकाने आपली वस्त्रे मुद्दाम धुतलेली, स्वच्छ, रंगीबेरंगी ठेवता कामा नये. असा रंगीबेरंगीपणा हा विकार आहे. ( धौ विकारु : आ. मा. १६१ ). क्वचित् त्याने आपल्या वस्त्रावरील मळाची घाण काढून टाकली तरी, वस्त्रे पाण्यात धुतल्यामुळे त्यावर जो विटकेपणा येतो तो मात्र तसाच राहू दिला पाहिजे. इतर उपा-यांनी तो नाहीसा करू नये. ( मळघाणी फेडिजे : जळघाणी लाविजे : आ. मा. ७४ ). कारू तारू लोक म्हणजे सुतार, लोहार, शेतकरी, चांभार, नावाडी वगैरे कामकरी लोक, यांच्या अंगावरील वस्त्रे जशी मळलेली व गादलेली असतात तशी वस्त्रे साधकांनी नेसावी. ती वस्त्रे अगदी पांढरी स्वच्छहि नसतात आणि गर्द तांबड्या रंगाचीहि नसतात. साधकाचीहि वस्त्रे तशी असली पाहिजेत. ( कारुवा खारुवाचेया सारिखे वस्त्र होआवे: आ. मा. २३६ ).

१. 'लीसि म्हणजे लुंचिले अंगीचा केस : क्षत खांडुक फुटकळी तोडणे : माती खरडणे : आपणेयाते चितारणे उजुसुजु नेसणे' (आ. स्थ. ४४).

२. 'पूस म्हणजे हातपाय धुणे तथा कापडाचेनि हाते पुसणे' (आ. बं. ४४).

३. 'कारुवा सारिखे वस्त्र म्हणीतलेया मालिन गंध परिमळ तैसे व्हावे : तरी तारुवे तियेचे म्हणजेति : कारुवे तिये बलुतीये अथवा काढुक कर्म करिती : बुरडे : त्यांच्या वस्त्रासारिखे वस्त्र व्हावे : तथा खारुवा : विटकरी सारखे पांढरे ना तांबडे तैसे व्हावे.' (आ. बं. २३६)

## कौपीन किंवा दोन हातांचे वस्त्र

साधकाने असे विरलेले व मलिन वस्त्र वापरावयाचे ते तरी केवढे? तर, कौपीनाला पुरेल एवढेच. केवळ कौपीन धारण करून राहणे हा त्याचा मुख्य आचार आहे. (कौपीनोद्धारण करावे : आ. मा. १६०). तथापि, अनधिकारामुळे सर्वांनाच ओढलेली कौपीन सहन होते असे नाही. ज्यांना ती सहन होत नसेल त्यांनी दोन हातांचे फडके ढुंगणाला गुंडाळायला हरकत नाही. (तरि हात दोनि वेढीजे आ. ११७). आच्छादन म्हणून डोक्यावर काही पाहिजे असेल तर गोंड लोक जसे टोपरे घालतात तसे टोपरे साधकाने वापरावे. (गोंडी बुंथी घालीजे : आ. मा. ७९)

## रस्त्यातील किंवा स्मशानातील वस्त्र

शीतोष्ण स्वभावांना मात्रा देण्यासाठी साधकाने जे दोन हातांचे वस्त्र वापरायचे ते मिळवावे कसे? श्रीचक्रधरस्वामींचे सांगणे असे आहे की, ते त्याने स्मशानातून मिळवावे. स्मशानात आणलेल्या प्रेतावरील वस्त्रे फाडून तेथे ती तशीच टाकून दिलेली असतात. साधकाने तेथील वस्त्र मिळवून वापरावे, हे उत्तम. पण आपणाला स्मशानातील वस्त्र मिळावे म्हणून लोकांच्या मृत्यूची मात्र त्याने वाट पाहू नये. (मसनीचे वस्त्र घेपेः पेरे हो: तेयाचीचि वाट पाहाल : जे कव्हणी एकु मरो का'' आ. ११६). मृत्यु न चिंतिताहि मुद्दामहून स्मशानातील वस्त्र मिळविण्यासाठी त्याने वाट पाहिली तरी मृत्यु चिंतिल्यासारखेच होईल. म्हणून वस्त्राची गरज असेल त्यावेळी स्मशान शोधावे; पण त्यावेळी तेथे वस्त्र मिळाले नाही तर रस्त्यावर पडलेले एखादे वस्त्र घ्यावे. (मार्गी पडिले वस्त्र घेपे : आ. मा. ७०). आणि तेहि न मिळाले तर नाइलाजास्तव कुणाला तरी चार हाताचे जुनेपुराणे फडके मागून घ्यावे. (...तरी कव्हणा एकाते हात च्यारि सुडा मागिजे : आ. ११६).

१. 'तरि म्हणजे ज्यास कौपीन वोढू न साहे अनधिकारे' (आ. स्थ. ११७).
२. 'मसनीचे वस्त्र घेपे म्हणजे मसनीचे उत्तम ग्राह्य होय' (आ. स्थ.११६).
३. 'परि बाहुल्ये स्मशान न शोधावे : तेणे वाट पाहिली होईल : म्हणौनि मागीजे : का बिदी पडले घेईजे ते उत्तम' (सदर)

## स्त्रियांनी : ब्राह्मण विधवांचा वेष करू नये

अनुसरलेल्या पुरुषाप्रमाणे बायांनीहि आपले तारुण्य व देहस्वभाव लोपवून वृद्ध स्त्रियाप्रमाणे नेहमी राहावे. (अभोक्तेया म्हातारीचेया परी असावे : आ. २६८ ). त्यांनी कारुवा-तारुवासारखे म्हणजे मलिन गंधहीन वस्त्र ( किंवा 'खारुवा' म्हणजे पांढरेहि नाही व तांबडेहि नाही असे वस्त्र ) परिधान करून देहधर्म लोपवावे. तथापि, त्यांनी ब्राह्मणांच्या विधवा बायाप्रमाणे मात्र वेष करू नये. वस्त्रे वगैरे त्यांच्या सारखी नेसू नयेत. नेसल्यास, अनुसरलेल्या बाया ह्या ब्राह्मणविधवा आहेत असे लोकांना भासेल. त्यांना कुणी दुरुत्तरे केली तर त्यांचा अभिमान ब्राह्मण घेतील. वेषविभ्रमामुळे का होईना पण अनुसरलेल्या बाईचा अभिमान ब्राह्मणांनी घेणे म्हणजे परमेश्वराचा अभिमान ठाकणे होय. असे होता कामा नये.

दुसरे असे की, ब्राह्मण कोणतीहि क्रिया विकल्परूप म्हणजे आश्रम-धर्मानुसार आपणाला श्रेष्ठ कल्पून व इतरांना तुच्छ लेखून, त्याचप्रमाणे हे पवित्र, ते अपवित्र अशा प्रकारे विचिकित्सा करून आचरतात. अनुसरलेल्या बायांनी ब्राह्मण विधवांचा वेष धारण केला आणि त्या वेषाशी न शोभणारे असे निर्विकल्प वर्तन केले तर त्या उगीच लोकनिंदेला पात्र होतील. किंवा, ब्राह्मणवेष घेऊन आपण ब्राह्मण आहोत असे जर त्या भासवायला लागल्या तर त्यांना वेषाच्या भीतीमुळे तरी विकल्परूप क्रिया आचराव्या लागतील. या दोन्ही गोष्टी अनुचित होत. यासाठी अनुसरलेल्या बायांनी ब्राह्मण विधवांचा वेष न करणे हेच उत्तम होय.

## सुड्यांची त्रिपटी नेसावी

अनुसरलेल्या पुरुषांनी नेहमी ' सुडा ' म्हणजे चार हातांचे वस्त्र ( चारापेक्षा अधिक हातांच्या वस्त्राला ' खांडोवा ' म्हणतात ) नेसावे हे आपण पाहिले आहे. पण बायांना नेसण्यासाठी चार हातांचा सुडा पुरत नाही. म्हणून त्यांनी असे चारपाच सुडे एकत्र शिवून त्याची त्रिपटी करून आपले शरीर झाकण्याला पुरेसे वस्त्र तयार करावे. (बाईः सुडे मागिजेति : मग

१. ' ब्राह्मणाचेनि वेषे हीना बोलो नये : आन ब्राह्मण कैवार घेती : आन वेषाचेनि भेणे काही अन्याय राहाटो नये : लोका भेणे ' (आ. स्थ. २६८).

आपुले अंग झाके ऐसे कीजे : आ. २७३ ). पुरेसे वस्त्र तयार होईपर्यंत सुड्यांचा संग्रह करून ठेवणे बायांना दोषास्पद नाही. पण वस्त्र तयार झाल्यावर आणखी सुडे जमवणे हे मात्र दोषास्पद होय.

असे दोनतीन सुडे एकत्र शिवून तयार केलेले वस्त्र बायांनी नेसावे. पण ते मोकळे नेसू नये. त्यांनी आत लंगोटी कसायला पाहिजे. आतला भाग मोकळा राहू देणे हा फार मोठा दोष होय. त्याचप्रमाणे आपल्या वस्त्राच्या कटिप्रदेशावर ठिगळ वगैरे लावून तो सुशोभित करणे हाहि दोष होय. कारण त्यामुळे विकार लौकर उपजतो.

## सर्व शरीर झाकावे

सुड्यांचे वस्त्र तयार करून अनुसरलेल्या बायांनी ते असे नेसावे की आपले सगळे अंग व्यवस्थित झाकले जाईल. त्यांनी आपली मांडी पर-पुरुषाच्या नजरेस पडू देऊ नये. ( साधे हो तुम्ही आपुली मांडी परपुरुषा देखो नेदीजे कीः आ. २७५ ). अर्थात् शरीराचे जे जे आच्छादनीय अवयव असतील ते ते सावधपणे व असावधपणे कुणाच्याहि नजरेला पडू देऊ नयेत. पडू दिल्यास त्यांच्या मनात त्या बायाविषयी विकाररूप अभिलाष उत्पन्न होईल. त्याचप्रमाणे, परपुरुषाचेहि अवयव बायांनी आपल्या नजरेला पडू देऊ नयेत, म्हणजे तिकडे मुद्दाम लक्ष घालू नये. घातल्यास त्या बायांच्या ठिकाणी त्या पुरुषाचा अभिलाष उत्पन्न होईल. त्यामुळे प्रमादाचा संभव असतो. तो टाळला पाहिजे.

## लज्जाधर्म बाळगावा

पुरुषापेक्षा स्त्रियांची विषयवासना आठ पटींनी तीव्र असते. पण त्यांच्या ठिकाणी स्त्रीस्वभावसुलभ लज्जा असते. ( स्त्रियासि अष्टगुण कामुः परि लज्जारूप धर्मु एकु आति : वि. १९९ ). आणि त्यामुळेच त्यांचे प्रमादा-

१. ' चार हात तो सुडा : यावरुता खांडोवा : सूडे आपजाविति : अंग जियेचे जेवढे : कीजे म्हणजे अर्थातव सीवणे निपजे तव संग्रहो : आंचळे अन्यमहात्मत्वः भीतर मुक्त हा थोर दोष : कटिप्रदेशावरि नितळ सौकर्यत्व ' ( आ. स्थ. २७३ ).

२. ' मांडी म्हणजे जेतुले आच्छादनीय अवयव : ते भलत्याहि भिक्षुचे:' ( आ. स्थ. २७५ ).

पासून संरक्षण होते. ( लज्जारूप धर्मु स्त्रियासि रक्षण: आ. २७६ ). या लज्जागुणामुळेच त्या प्रमाद करीत नाहीत. पण एकदा का त्यांनी लाज व त्यामुळे निर्माण होणारी मनाची व जनाची भीति जिंकली, म्हणजे त्यांनी लाज सोडली की मग दीक्षित-कन्या ज्याप्रमाणे कोळयाचे घर रिघाली ( दीक्षितकन्येचा दृष्टांत ५२; मागे पा. ७० पहा ) त्याप्रमाणे त्या वाटेल त्या हीन पुरुषाच्या गळी पडायला कमी करीत नाहीत¹. म्हणून अनुसरलेल्या बायांनी लज्जाधर्म साक्षेपाने राखून ठेवावा.

१. ' पुरुषापासि अष्टगुणा काम : ध्यान लज्जा भय जिंकिले तरि नेणो केसणे एक आंगवील ' ( आ. स्थ २७६ ).

## प्रकरण ९ वे

## अटन-विजन

जेथ मदनाचा बाणी : घायवटे तरुणी
तिये नगर-पुर-पाटणी : वासु न करावा ॥
असावे गिरिकपाटी : शिळातळी वाळुवंटी
झाडाचा तळवटी : बहुत करुनि ॥ ( उद्ध. गो. १८१;१८३ ).

### नित्याटन करावे

आचरत्या पुरुषांनी विकारविकल्पशून्य होण्यासाठी स्वदेश, स्वग्राम, स्वसंबंधियें इत्यादिकांचा त्याग करणे अवश्य असल्याचे आपण पाहिले. हा त्याग करून त्यांनी जावे कोठे, राहावे कोठे हे प्रश्न साहजिकच उद्‌भवतात. त्यांचाच विचार आपणाला या प्रकरणात करायचा आहे. जीवाला बोध झाल्यानंतर त्याने सर्वसंगपरित्याग करून परमेश्वराला अनुसरावे आणि आपल्या स्वभावांना मात्रा देऊन परमेश्वराच्या स्मरणात सर्व जन्म क्षेपावा हा अस्तिपरीचा मुद्रितार्थ आहे. त्याने प्रथम ' जीव : देवता : परमेश्वर : आणि प्रपंचु हे जैसे असे तैसे जाणिजे ' आणि मग लागलीच ' इतुलेनि कपाळावरि फाळुके घालौनि जावो लागिजे. ' पण कुठे ? तर ' जेथ गेलेया मेलेयाची सुधी न लभे ' ( आ. मा. १८९ ), म्हणजे जेथे गेले असतांना आपण मेलो की जिवंत आहोत याचा शोधहि इतरांना लागणार नाही अशा ठिकाणी जावे. पण याचा अर्थ, आचरत्या पुरुषाने गिरिकंदरात कुठे तरी जाऊन एखाद्या ठिकाणी नियत वास करावा असा नाही. छे छे. त्याला कोणत्याहि एका स्थानाची सवय लागता कामा नये. त्याने नेहमी फिरत राहिले पाहिजे, अटन केले पाहिजे. ' नित्याटन करावे ' ( आ. मा. १३२ )

हा त्याचा विधि होय. पण असे नित्याटन करीत असतांना त्याने कोण-कोणत्या ठिकाणी जाऊ नये, आणि कोणकोणत्या ठिकाणी जावे या संबंधीचे काही निश्चित विधिनिषेध श्रीचक्रधरस्वामींनी सांगितलेले आहेत. तेच आता पाहू.

## ओळखीच्या गावी राहू नये

स्वदेश, स्वग्राम आणि स्वसंबंधिये यांचा त्याग करून निघालेल्या आचरत्या पुरुषाने जेथील लोक आपणाला ओळखतात अशा कोणत्याहि गावी जाता कामा नये. उलट जेथे कोणी आपल्या ओळखीचे नाही व आपणाला कोणी ओळखणार नाही अशा ठिकाणी राहावे. ( आपणेयातें कव्हणी नेणे : आपण कव्हणाते नेणिजे ऐसा स्थानी असावे : आ. २२ ). जेथील, स्वसंबंधियाव्यतिरिक्त इतर लोक=राजाधिकारी किंवा व्यापारी वगैरे आपणाला ओळखतात अशा ठिकाणी आपण राहिलो तर त्यांच्याकडून आपणाला विषयरूप पदार्थांचे संपादन होण्याचा संभव असतो. तो टाळण्यासाठी अशा ठिकाणी राहू नये. बरे, आपल्या ओळखीचे लोक जेथे आहेत अशा गावी किंवा त्या गावाभोवती आपण राहिलो तर त्या परिचितांच्या आश्रयाने राहिल्यासारखे होते. आणि ' महात्मियासि आश्रय : परिग्रह ये दोनिही न व्हावी की बाई : शो. आ. १६ ) या वचनाचा भंग होतो. प्रसंग पडल्यास हे ओळखीचे लोक आपल्या उपयोगी पडतील अशी भावना उत्पन्न होते. असे होणे म्हणजे परमेश्वराचा आसरा सोडून जीवाचा आसरा घेणे होय. हा विकल्पदोष आहे. तो टाळलाच पाहिजे. त्यासाठी अशा गावात किंवा त्याभोवती आचरत्या पुरुषाने कधीच राहू नये.

## पुरी-पाटणी न वसावे

विकार आणि विकल्प टाळण्याच्या दृष्टीने आचरत्या पुरुषांनी ' पुरी पाटणी ' राहता कामा नये. ( तुम्ही पुरी पाटणी न वसावे : आ. मा. २० ).

१. ' **आपणेयाते आणिक जाणे तरी विखो संपादी : अथवा निंदा स्तुती : ना आपण त्याते जाणीजे तरी आश्रयो : हा मज असे भलतिये विषयी** ... तरी तेणे देवाचा आश्रयो तोडीला आन जीवाचा धरीला : तो विकल्प होय' ( आ. बं. २२ ).

नगर, पुर व पाटण यांच्या व्याख्या निरनिराळया रीतींनी केलेल्या आढळतात. विकार आणि विकल्प यांनी संपूर्ण असलेले ते 'पुर' आणि विकारमिश्रित विकल्प जेथे असतो ते 'पाटण' ( तैसेचि विकार विकल्पु संपूर्ण असे तया गावाते 'पुर' बोलीजे। विकारमिश्रित विकल्प तयाते 'पाटन' बोलीजे : स्मृ. स्थ. ५१ ). तसेच 'तीर्थक्षेत्रव्रतदान ये चारि असति तया गावाते 'पुर' ऐसे म्हणीजे : क्षत्र नाही आन येरे तीन्ही असति तया गावाते 'पाटण' ऐसे म्हणिजे : तीर्थ आहे आन एर तीन्ही नाहीति तया गावाते नगर ऐसे बोलिजे' ( टीप. उद्ध. गी. १८१ ). या व्याख्यांचा भावार्थ हाच की, विकार आणि विकल्पाने भरलेली मोठमोठी गावे—ही आचरत्या पुरुषांनी त्याज्य मानावी. 'जेथ मदनाचा बाणी : घायवटे तरुणी : तिये नगर-पुर-पाटणी : वासु न करावा' ( उद्ध. गी. १८१ ). या ओवीवरून नगरपुरपाटणे ही प्रामुख्याने 'विकार' उत्पन्न करणारी स्थाने होत असे दिसते; वर स्मृतिस्थळातील उताऱ्यावरून ती देवतास्थाने व म्हणून 'विकल्प' उत्पन्न करणारी स्थाने होत. अशा दोन्ही ठिकाणी भिक्षूंनी राहू नये.

याच कारणासाठी आचरत्या पुरुषाने देवतादिकांच्या यात्रांना किंवा तीर्थक्षेत्रांना जाऊ नये, ( आ. मा, १९ ); पुरुषोत्तमक्षेत्रांना जाऊ नये, आ. मा. १३४ ); अन्य 'मार्गियांचिये गुंफे न वचावे' (आ. मा. ७७ ) इत्यादि आज्ञा श्रीचक्रधरस्वामींनी सांगितलेल्या आहेत. या अन्यमार्गियामधेहि जोगी लोकात राहण्याचा त्यांनी विशेष निषेध केला आहे. ( जोगीयातुल वास निका नव्हे नायका : शो. आ. १८ ). हा जोगी म्हणजे अघोरपंथी म्हणून वाखाणलेला केवळ अघोरपंथी जोगीच नव्हे तर कानफाटे म्हणून प्रसिद्ध असलेले कर्मराहाटीचे इतर जोगीहि त्यात आलेच. यांच्यामध्ये आचरत्या पुरुषांनी कधीहि वस्ति करून राहू नये. कारण या जोग्यांना कोणतेच विधिनिषेध नसतात. ( तेथ विधिनिषेध नेणिजे : शो. आ. २० ). त्यांना त्यांचे ज्ञान नसते म्हणून ते विधिनिषेध पाळत नाहीत, इतकेच नाही तर विधिनिषेधांची ते पर्वाहि करीत नाहीत. यांच्या संसर्गाने आचरत्या पुरुषाकडूनहि परमेश्वरमार्गातील विधिनिषेधांचा भंग होण्याचा संभव असतो म्हणून त्यांनी जोगी लोकात राहणे अगदी त्याज्य मानले पाहिजे.

## कन्नड व तेलंग देशात जाऊ नये

अटन करीत असतांना राजस ठिकाणीहि कधी जाऊ नये. असे प्रदेश आचरत्या पुरुषांनी टाळले पाहिजेत. ज्या ज्या प्रदेशात विषयबाहुल्य असेल ते ते सगळे प्रदेश राजस, अतएव त्याज्य होत. उदा: कानड देश आणि तेलंगण देश हे विषयबहुल देश आहेत. ती भूमि राजस, तेथील पुरुष व स्त्रिया राजस, तेथील पदार्थ राजस. सारांश, तेथे विषयोपभोग मुबलक प्रमाणात सहज प्राप्त होऊ शकतो. अशा ठिकाणच्या स्त्रिया व पुरुष सगळेच 'विषयी' असल्यामुळे एखादा सामान्य विरक्त पुरुष भेटला तरी त्याला तेथे मानमान्यता फार मिळते. अशा देशात आचरता पुरुष गेल्यास तेथे त्याचा आदरसत्कार, पूजापुरस्कार फार मोठ्या प्रमाणात होईल. तसे झाल्यास तेथील लोक त्याला अष्टभोगांचे विषयरूप पदार्थ संपादन करतील. त्यामुळे तो आचरता पुरुष विषयसेवन करून भ्रष्ट होण्याचा फार संभव असल्यामुळे अशा विषयबहुल देशात त्यांनी मुळीच जाऊ[3] नये. कानडदेश व तेलंगण देश सर्व दृष्टींनी राजस होत आणि म्हणून आचरत्या पुरुषांनी ह्या देशात व अशा इतर कोणत्याहि राजस गावी जाऊ नये. ( कानडदेशा तेलंगदेशा न वचावे : ते विषयबहळ देश : तेथ अवधूत मान्य : आ. २३ ).

या दोन्ही देशातील साधक महाराष्ट्रात आला तर त्याला बोध होऊन असतीपरीहि आचरता येईल. त्या देशातील लोकांच्या दृष्टीने म्हणजे आचरत्या पुरुषांच्या दृष्टीने त्यांनी आपल्या ह्या देशांचा त्याग तावडतोब करणे अत्यंत अवश्य आहे.

१. ' विषयबहुल म्हणजे विषयाचे आलंबन बहुत : फुकाचा विषयो मिळे : रजबाहुल्ये ' ( आ. स्थ. २३ ).

२. ' अवधूत म्हणजे वैराग्यनिष्ठ··· मान्य म्हणजे त्यावर बुद्धि आवड : द्यावया सुवावया मनोधर्म ' ( सदर ).

३. ' गेलेया विषयो भाजन होईल : धर्म जाईल म्हणौनि निराकरीले ' ( सदर ).

४. तरी तेथिचेयासि उद्धरण कैसे : ना देशानुरूप असती परी विहीती ' ( आ. स्थ. २३ ).

## देवतास्थानी जाऊ नये

सामान्यतः देवतांनी ज्या स्थानांचा अभिमान घेतलेला असतो अशा कोणत्याच ठिकाणी आचरत्या पुरुषांनी जाऊं नये. हें निषेधवाक्य चुकवून जर साधक त्या ठिकाणी गेला तर देवता त्याला विघ्न करतात. विषयरूप पदार्थांच्या द्वारेच त्या विघ्न करतात असे नाही; पण त्यांच्या सामर्थ्यामुळे परमेश्वरमार्गातील त्या साधकाच्या ठिकाणी परमेश्वरसेवेची बुद्धि राहत नाही. एका दृष्टीने हा त्याचा बुद्धिभ्रंशच होतो. त्याला परमेश्वराचे स्मरण करावेसे वाटत नाही. त्याचे अंतःकरण जाते म्हणजे परमेश्वराविषयी तो अंतःकरणशून्य होतो. क्वचित् त्याचे डोळे जातात; किंवा त्याच्या शरीराला रोग होतात आणि प्रसंगी तर त्याचा प्राणहि जातो. देवतांनी अभिमान घेतलेल्या ठिकाणी साधक गेल्यास त्याला वरील प्रकारांनी विघ्ने होत असल्यामुळे त्याने तेथे जाता कामा नये. हा साधक देवतास्थानी जाऊन काही अनिष्ट क्रिया आचरतो म्हणून त्याला देवता विघ्ने करतात असे नाही. त्याने अनिष्ट क्रिया न आचरली तरीहि, परमेश्वराची आज्ञा भंगून गेल्यामुळे देवता त्याला विघ्ने करतात.

पण केवळ आज्ञाभंगाचे फळ म्हणून देवता विघ्न करतात असे मानणे योग्य नाही. परमेश्वराने तरी अशा ठिकाणी न जाण्याला सांगण्याचे कारण काय ? कारण असे की त्या स्थानांचा देवतांनी विशेष अभिमान घेतलेला असतो. तेथे गेल्यावर साधकाला विकल्प संचरण्याचा संभव असतो. ज्या स्थानांचा देवता विशेष अभिमान घेतात अशी 'साभिमानिये' स्थाने अतिशय 'असुर' असतात. तेथील देवता असुर असतात असे

१. **'साधक म्हणजे अनुसरला : विघ्न म्हणजे विघात करिती : तरि काई विखो संपादिती : म्हणे ना : संभवाचा घरा येत असे : तरि विघ्न ते कैसे : ना सत्त्व स्मरण चर्या जाये : बुद्धिभ्रंश होये : अंतःकरण जाये : हातपाय डोळे जाती : देही रोग उपजे का तत्काळी देहचि जाये'** ( आ. स्थ. २५ ). 'तो साधक गोसाव्याची आज्ञा भंगौनि जरी जाए तरीच अपराधें देवता विघ्न संपादिती : वाचौनि काही अनिष्ट क्रिया आचरे म्हणौनि संपादी ऐसे नाही' ( आ. बं. २५ ).

२. **'साभिमानिये म्हणजे अतिअसुरे : तिये भूमीचा देवतासि थोर अधिकार'** ( सदर ).

नव्हे, तर ती स्थानेच असुर असतात. बलिदानार्थ झालेल्या हिंसेमुळे त्या भूमीचा गुणच असा होतो की तेथे असतांना साधकांना विघ्न संपादन करण्याची इच्छा देवतांना तीव्रतेने होते. समर्थांच्या साम्राज्यात एखादा हीन पुरुष जर दंभाने गेला तर तो समर्थ त्याला विघ्न करतो. तद्वत् सामर्थ्यांच्या व ज्ञानाच्या दृष्टीने थोर असलेल्या अशा देवतास्थानी आपण परमेश्वराचे साधक आहोत अशा गर्वाच्या भावनेने साधक गेल्यास त्याला विघ्न करावे असे देवतांना वाटते व त्या विघ्न करतात. म्हणून 'अति असुरे स्थानी नसावे' (आ. मा. ४४) अशी श्रीचक्रधरस्वामींची आज्ञा आहे. कोल्हापुर व मातापुर ही अशीच हिंसाप्रधान अति असुर स्थाने असल्यामुळे तेथे गेल्यास साधकाला तेथे विघ्न होण्याचा संभव आहे. म्हणून आचरत्या पुरुषांनी तिकडे जाऊ नये. ( मातापुरा कोल्हापुरा न वचावे : तिये साभिमानिये स्थाने : साधकासी विघ्न करिती. आ. २५ )

## प्रतिमापाषाणांच्या ठिकाणी देवता-सामर्थ्य

जी जी देवतास्थाने आहेत त्या त्या ठिकाणी म्हणजे तेथील प्रतिमापाषाणांच्या ठिकाणी देवतांची 'स्वरूपे' असतात. असे नाही. तेथे देवतांची 'सामर्थ्ये' निक्षेपिलेली असतात ज्ञानसुखसामर्थ्यादि पंचप्रकार हे देवतास्वरूपी गुणरूप असल्यामुळे ते स्वरूपापासून वेगळे असू शकतात. म्हणजे एखाद्या ठिकाणी देवतेचे स्वरूप नसूनहि तिचे सामर्थ्य असू शकते. देवतास्थानी जे निरनिराळे चमत्कार होतात ते तेथे देवतास्वरूप असते म्हणून नव्हे. कारण तेथे देवतास्वरूप मुळी नसतेच, तर फक्त सामर्थ्य असते. अर्थात् ते चमत्कार देवतासामर्थ्यामुळेच होतात. सारांश ज्ञान, सुख, सामर्थ्य, ऐश्वर्य व प्रकाश हे पंचप्रकार स्वरूपाव्यतिरिक्त

१. 'जैसे समर्थाचिया गावा हीन दंभेसी जाये मग तो त्यास विघ्न करी : तैसे तीये समर्थ हा हीन तेथे गेलिया तिये विघ्न करीती '(आ.स्थ. २ ).

२. 'प्रतिमेचा ठायी आभिमान : वाचौनि ते तेथ नाही : तरी ते म्हणजे स्वरूप' ... 'त्यांच्या ठायी अनेक अनेक चमत्काररूपे सामर्थ्ये असती तरी तीये काई स्वरूपे तदाकार जाली असती ?' ... 'देवता म्हणजे दिव्य हा धातु प्रकाशी वर्ते : चेतनत्व : सामर्थ्यरूपता : प्रकाश : ज्ञान : सुख : ऐश्वर्य असे परी परमत्व नाही : येणे पक्षे देवतेच्या स्वरूप चेतनत्व वेगळे पंचप्रकार बोलिले ' ( आ. बं. २५ ).

इतर ठिकाणी असू शकतात. हे ज्या ज्या ठिकाणी असतात त्या त्या ठिकाणी स्वरूप असलेच पाहिजे असे नाही. देवताविग्रहाने दिलेला स्थित्यानंद हा देवतांचे सुख असल्यामुळे तो देवतास्वरूपापासून वेगळा होऊ शकतो; पण ईश्वराचे सुख मात्र त्याच्या स्वरूपाविगळे असू शकत नाही. आणि म्हणून ईश्वरस्वरूपात गेल्यावाचून ते सुख उपभोगता येत नाही.

## प्रतिमांच्या ठिकाणी सामर्थ्य कुणाचे ?

प्रतिमापाषाणादिकांच्या ठिकाणी देवतांचे केवळ सामर्थ्य निक्षेपलेले असते; आणि आपल्या स्वरूपावधीत त्या देवतांच्या ब्रह्मांडस्था फिरत असतातच. येथे एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती अशी की तीर्थक्षेत्रांच्या व तेथील पाषाणप्रतिमांच्या ठिकाणी फक्त कलियुगीच्या अधिष्ठात्री देवता=कर्मभूमि,अष्टौदेवयोनि आणि अंतराळ याच तीन थोव्यातील देवतांचे सामर्थ्य निक्षेपिलेले असते. कारण, तीर्थक्षेत्रव्रतदान हा कलियुगीचा धर्म आहे. अर्थात्, तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी नेहमी याच युगाधिष्ठात्रींचे सामर्थ्य असणार. मग ते युग कोणतेहि असो. द्वापरयुगात काय किंवा त्रेतायुगात काय तीर्थक्षेत्रांच्या व तेथील पाषाणप्रतिमांच्या ठिकाणी याच तीन थोव्यातील देवतांचे सामर्थ्य असते.

प्रतिमा किंवा मूर्ति वरील देवतेची असली तरीहि तेथे सामर्थ्य मात्र वरील तीन थोव्यातील देवतांचेच असते! उदा: भैरवाची, विष्णूची, ब्रह्मयाची–कोणत्याहि वरील देवतेची मूर्ति असो, तेथे त्या देवतेचे म्हणजे भैरवाचे, विष्णूचे, किंवा ब्रह्मयाचे सामर्थ्य नसते. तर कलियुगाधिष्ठात्री कोणत्या तरी देवतेचे असते. त्यातहि, तीर्थांच्या ठिकाणी फक्त चित्ररथ देवतेचे सामर्थ्य असते. उदा: वाराणशीला महेशाने क्रीडा केली आणि त्याचेच नाव तेथील मूर्तीला आहे. लोणारला विष्णूने लीळा केल्या आणि तेथील मूर्तीला नावहि विष्णूचेच आहे. पैठणला ब्रह्मयाने क्रीडा केली आणि त्याचे नाव तेथील मूर्तीला आहे. पण वरील तिन्ही ठिकाणी अनु-

१. 'म्हा ऐसीया राहती तरी तिया कर्मभूमीच्या देवता असती की वरीला दोही स्थापणीयाचीयाही असती' 'म्हा तरी जेतुकया युगाधिष्ठात्र्या तेतुकयाही विघ्न करू लागतील : त्यांचे अभिमान त्या प्रतिमेच्या ठाइ असती म्हणौनि : ऐसे म्हणो आन काई' (आ. बं. २५).

क्रमे महेशाचे, विष्णूचे व ब्रह्मयाचे सामर्थ्य नाही. त्या दोन्ही तीर्थस्थानी चित्ररथ देवतेचेच सामर्थ्य आहे. अर्थात् महादेव, विष्णु, व ब्रह्मा यांना प्राप्त करण्याचे साधन त्यांच्या मूर्तींची पूजा नसून त्रेतायुगातील धर्म–मातृपितृगुरुभक्ति हे होय.

प्रतिमापाषाणात कर्मभूमि, अष्टैदेवयोनी व अंतराळ यापैकी एखाद्याच देवतेचे सामर्थ्य निक्षेपिलेले असते. कर्मभूमीच्या देवतापैकी जिचे सामर्थ्य निक्षेपिलेले असेल त्या देवतेची ब्रह्मांडस्था त्या क्षेत्रात किंवा देवालयात असू शकते. पण तिच्याशिवाय इतर अनेक देवतांच्या ब्रह्मांडस्थाहि त्या ठिकाणी असतात. त्यांचे थोवेचे थोवे एकेका ठिकाणी राहतात. आणि या थोव्यात शाब्दज्ञानियाला अनुकूल असलेल्या देवताप्रमाणेच प्रतिकूल देवताहि असतात. म्हणजेच पुरुष देवताप्रमाणेच स्त्रीदेवताहि असतात. त्या प्रतिमापाषाणाजवळ थोव्याने राहणाऱ्या या सगळया अनुकूल व प्रतिकूल देवता त्या प्रतिमेचा आणि म्हणून त्या प्रतिमेच्या ठिकाणी आचरलेल्या क्रियेचा अभिमान घेतात. पण त्यातहि, तिथे आचरली जाणारी क्रिया जिच्या फळाला पुरेल ती देवता त्या क्रियेचा अभिमान घेते व तीच फळ देते. थोव्यातील सगळयाच देवता त्या क्रियेचा अभिमान घेतात आणि सगळयाच फळ देतात असे नाही; तर त्यापैकी जिच्या फळाला क्रिया पुरेल तीच देवता त्या क्रियेचा अभिमान घेते व फळ देते. अनिष्ट क्रिया आचरली तर ती दुःख देते, विघ्न करते. तथापि, परमेश्वरसाधकाला ती किंवा त्या देवता विघ्न करतात याचे कारण तो अनिष्ट क्रिया आचरतो असे नाही. तर ज्ञानादिकाने आपल्यापेक्षा कमी असूनहि, आपण देवतासाधक नसून परमेश्वरसाधक आहोत या आढ्यतेने ज्ञानिया आलेला

१. 'मा तरी ऊचाचा आख्यान स्थळी नीचा मध्ये एकी मूर्ति अभिमानासहित राहिली आन एकाचा अभिमानच असती : त्या प्रतिमास ऊचाचेच नाव ऐसी कवण कवण स्थाने जाणावी पा : ना जैसे वाराणसी महेशाचे आख्यान आन त्याचे नाव प्रतिमेशी असे : तैसेची लोणारी विष्णूचे आख्यान आणि त्याचीये स्त्रीचे नाव कमळजा तेणे नावे प्रतिमा असे ··· तेथ आणिका देवताची नावे तथा अभिमाने असती' ( आ. बं. २५ ).

२. 'आन एकीचि ऐसे नाही : त्यांचे थोवे राहती : त्यात अनुकुळाही प्रतिकूळाही असती' 'त्या वेगळीया जेतुकया फळसूचका क्रिया ज्या ज्या देवतेसारखिया होती तिया तिया देवता त्याचा अभिमान घेउनी फळ संपादी' ( सदर ).

असल्यामुळे त्याला त्या देवता विघ्न करतात; हे आपण पाहिलेच आहे. साधारणतः साधकाला म्हणजे शाब्दज्ञानियाला प्रतिकूल देवताच विघ्न करतात; पण देवतास्थानी गेल्यास प्रतिकूलाप्रमाणे अनुकूल देवताहि त्याला विघ्न करतात. हे त्या असुरस्थानाचे सामर्थ्य होय.

## वासनिकाला विघ्न नाही

देवतास्थानातील अनुकूळ प्रतिकूळ देवता साधकाला विघ्न करतात हे खरे; पण वासनिकाला मात्र त्या विघ्न करीत नाहीत[1]. अनुसरण न केल्यामुळे अजून कर्मांचे स्वातंत्र्य त्याला आलेले नसते. त्याच्या क्रियांना इतर कुणाचे तरी चेष्टकत्व असते आणि म्हणून तो देवतास्थानाकडे जातो, स्वतंत्र रीतीने स्वतः जातो असे नाही. त्या ठिकाणी जाऊन काहीतरी दृष्ट-लाभ – लौकिकदृष्ट्या काही लाभ व्हावा असे त्याचे अर्जक असले तर त्या स्थळाची अभिमानिनी किंवा त्याच्या देहाभिमानिनीपेक्षा उंच देवता चेष्टकत्व करून त्याला तिकडे नेते. या दोन्ही वेळी देवतांच्याच चेष्टकत्वा-मुळे तो तेथे जातो म्हणून देवता त्याला विघ्न करीत नाहीत.

पण कधीकधी संलग्नाच्या चेष्टकत्वाने त्या स्थानी जाऊन काही अपूर्व संत किंवा असंत जोडले जावे असे त्या वासनिकाचे अर्जक असते. म्हणून संलग्नाच्या चेष्टकत्वाने तो देवतास्थानाकडे जातो. हे संलग्नाचे चेष्टकत्व मोडण्याचे सामर्थ्य वासनिकाला असते. कारण त्याला बोध झालेला असतो. चेष्टकत्व मोडण्याचे सामर्थ्य असूनहि तो तिकडे जातो म्हणून देवता त्याला विघ्न करतात. आणि अनुसरल्यानंतर बोधवंत स्वतःच्याच चेष्टकत्वाने तिकडे जात असल्यामुळे त्याला देवता विघ्न करतातच करतात. सारांश, दृष्टलाभाचे अर्जके[2] असल्यामुळे वासनिक स्थलाभिमानिनीकडून किंवा उंच देवतेकडून, म्हणजे त्यांच्या चेष्टकत्वाने देवतास्थानी गेला तर देवता त्याला विघ्न करीत नाहीत, एरवी करतात. वेधवंताला तर तो देवतास्थानी गेल्यास देवता मुळीच विघ्न करीत नाहीत. कारण त्याला अद्याप बोध झालेला

१, '**वासनिका काही न करी : यथा तुरक**' ( आ. स्थ. २५ ).

२. 'मा तरी जयासी न करिती तोही वासनिक असतीपरीचा साधक असता त्यास विघ्न का न करीती : ना येथ अर्जकसंबंध जाणावा ' ( आ. वं. २५ ).

नसतो. त्यामुळे संलग्नाचे चेष्टकत्व मोडण्याचेहि सामर्थ्य त्याच्या ठिकाणी नसते.

मुसलमानांच्या जनानखान्यात दहाव्या वर्षापर्यंतच्या मुलाला नेहमी येऊ देतात; आणि दहा ते बारा वर्षांच्या पुरुषांना परवानगीने येऊ देतात; पण बारा वर्षांवरील पुरुषाला मात्र मुळीच येऊ देत नाहीत. इतकेहि करून तो आला तर त्याला शिक्षा करतात. त्याप्रमाणे लहान मुलासारखा वेधवंत हा देवतास्थानाकडे गेला तर काही हरकत नाही. तसेच दहाबारा-वर्षांच्या मुलाप्रमाणे देवतांच्या परवानगीने म्हणजे त्यांच्याच चेष्टकत्वाने वासनिक देवतास्थानाकडे गेला तरी हरकत नाही. पण परवानगी नसतांना, अर्थात् स्वतंत्र चेष्टकत्वाने जर तो जाईल तर देवता त्याला विघ्न केल्यावाचून राहणार नाहीत. बोधवंत हा तर सर्वच दृष्टींनी 'जाणता' पुरुष होय. देवतांच्या दृष्टीने तो परपुरुष होय. त्याला देवतास्थानाकडे जायला पूर्ण बंदी असते. ही बंदी मोडून म्हणजे परमेश्वराची आज्ञा भंग करून तो तिकडे गेला तर देवता त्याला तात्काळ विघ्न करतात. ही विघ्ने करतांना देवता त्या बोधवंताच्या ठिकाणी जो विशेष गुण असेल किंवा ज्या विशेष गुणामुळे त्याने एखाद्या सत्पात्र पुरुषाच्या किंवा ईश्वराच्या ठिकाणी दुर्लक्ष, अपमान, अधिकवृत्ति वगैरे दोष आचरले असतील तो त्याचा गुण नष्ट करतात. तो निरोगी असेल तर त्याला रोगी करतात; तो अंतःकरणाने चांगला असेल तर ते अंतःकरण नष्ट करून त्याला वेडापिसा बनवतात; तो बुद्धिमान असेल तर त्याचा बुद्धिभ्रंश करतात. अशा रीतीने देवता-स्थानाला गेल्यास देवता विघ्न करतात. म्हणून बोधवंतांनी म्हणजे अनु-

१. 'यथा तुरकवत् म्हणीतले तरी तोचि न्याय कैसा : ना तुरकपुत्रास १० वर्षे पर्यंत हरीमात कर्तो देती : मग बारा बर्षा चौदा पर्यंत पुसोनि जावे : सोळा जाली मग त्याकडे जावोच नेदीती : ऐसाही न पुसत गेला तरी दंद करीती ... तैसे दहा वर्षे स्थानी वेधवंत : आन बारा चवदा स्थानी वासनिक : सोळा वर्षास्थानी अनुसरला ' (आ. बं. २५ ).

२. 'ना जयाचा ठायी जो गुण श्रेष्ठ असे तो जाऊन त्याचा पालटी दोष संचरे ... ना दुसरा : तरी जेणे जेणे गुणे सत्पात्री नाकोचणे : असलग्न : पातलेपणे : अधिकवृत्ति विपरीत घडले असेल तया क्षोभातव तेथ जावयाची बुद्धि उपजे : मग गेलेया त्या देवता त्या त्या गुणाचा असद्भाव करून त्याचा पालटी दोष संचरेति ' ( आ. बं. २५)

सरलेल्या आचरत्या पुरुषांनी अतिअसुरस्थाने, भोगस्थाने, देवतास्थाने या ठिकाणी कधीच जाऊ नये. असुरस्थानात आल्यानंतर जर त्याला बोध झाला असेल तर बोध होताक्षणीच त्याने त्या स्थानाचा त्याग करावा.

## महाराष्ट्री असावे

आचरत्या पुरुषांनी, आतापर्यंत वर्णन केलेल्या निषिद्ध ठिकाणी जाता कामा नये. तर मग त्यांनी जावे तरी कोठे ? यासंबंधीचा मुख्य विधि म्हणजे त्यांनी ' महाराष्ट्री असावे ' ( आ. २४ ) हा होय. परमेश्वर-मार्गीच्या सर्व साधकांनी आपली असतीपरी आचरण्यासाठी महाराष्ट्र देशातच राहावे. अर्थात्, इतर देशातील, प्रांतातील किंवा भोगभूमीतील लोकांनी महाराष्ट्रात येऊन येथेच परमेश्वराला अनुसरावे व त्याने सांगितलेला आचार करावा. असतीपरीच्या आचारासाठी इतर सगळे देश त्याज्य होत. महाराष्ट्रातच असणे आवश्यक व हितकारक आहे. कारण महाराष्ट्र हे महंत राष्ट्र आहे; ते थोर राष्ट्र आहे. केवळ भूमीच्या विस्ताराच्याच दृष्टीने ते थोर आहे असे नाही तर गुणबाहुल्याच्या दृष्टीनेहि ते थोर आहे. ते सात्त्विक आहे, सुखरूप आहे, धर्माचरणासाठी इष्टकारक आहे, सगुण आहे व निर्दोष आहे–म्हणजे अनिष्टाची निपज येथे होत नाही. महाराष्ट्राची भूमि सात्त्विक आहे. येथील स्त्रीपुरुष, वृक्षवल्ली, नद्यानाले, पशुपक्षी, धनधान्य, आहारविहार–सारांश, सर्व जडचेतन पदार्थ सात्त्विक आहेत महाराष्ट्रात असतांना शारीरिक व मानसिक उपद्रव ( आधिव्याधि ) उपजत नाहीत, इतकेच नव्हे तर इतर देशातील अधिवासामुळे उद्‌भवलेला शारीरिक व मानसिक उपद्रव महाराष्ट्रात येताच शांत होतो. इथल्या सात्त्विक अन्नोदकांनी व औषधपाण्याने तो उपद्रव तात्काळ नाहीसा होतो. कारण येथील वारा, झाड, पाऊस हेहि सात्त्विक आहेत. आधि-व्याधींचा नाश त्याचमुळे लौकर होतो.

महाराष्ट्र हे महंत म्हणजे थोर राष्ट्र असल्यामुळे ते निर्दोष व सगुण स्थान आहे. हे स्थान स्वतःच सगुण व निर्दोष आहे असे नाही तर

१. ' **महन्त राष्ट्र म्हणौनि महाराष्ट्र : राष्ट्र म्हणजे देश** : महंत म्हणजे थोर : तर तेच थोर कवण कवण अर्थे पा : ना सात्त्विक हा एक : दुसरा **सुखरूप** : तिसरा **इष्टकारक** : चवथा निर्दोष : पाचवा सगुण ' (आ. बं. २४)

आपल्या सान्निध्यात येणाऱ्या इतरांनाहि सगुण व निर्दोष करणारे आहे. ते तसे असल्यामुळे या ठिकाणी इष्ट क्रिया निपजतात. अनिष्टाकडे व अनाचाराकडे येथे राहणारांची बुद्धीच जात नाही. आणि एखाद्याला अनाचार करण्याची बुद्धि झालीच तर गुरुकुळाच्या संयोगामुळे म्हणजे परमेश्वर-मार्गातील लोकामुळे त्याच्या हातून अनाचार होऊ शकत नाही. येथील आचरते पुरुष स्वतः तर अनाचार करीत नाहीतच पण इतरांनाहि करू देत नाहीत. त्यामुळे महाराष्ट्रात घडलेले धर्माचरण सिद्धीला जाते. अशा या महाराष्ट्रात असणे हा आचरत्या पुरुषांचा मुख्य विधि होय.

येथील स्थान, प्रसाद, भिक्षु, वासनिक, बोधवंत हे सगळेच या दृष्टीने 'महाराष्ट्र' होत. कारण त्यांच्या संयोगाने धर्म सिद्धीला जातो. आणि ज्या दादाच्या किंवा बाईच्या सान्निध्यात धर्म सिद्धीला जात नसेल तो दादा व ती बाई म्हणजे मूर्तिमंत कानड व तेलंगण देश होत असे निश्चित समजून त्यांचा तात्काळ त्याग करावा.

महाराष्ट्रात असणे हा विधि असल्यामुळे तो 'विधि' म्हणून पाळला गेला तरच ते वचन पाळण्यासारखे होईल. या दृष्टीने, परमेश्वर-मार्गाचे अनुसरण करणारे वासनिक जर महाराष्ट्रातच जन्मलेले असले तर त्यांच्याकडून 'महाराष्ट्री असावे' हे वचन पाळले जाते असे म्हणता येत नाही. सर्वसंगपरित्याग करून धर्माचरणासाठी म्हणून मुद्दाम महाराष्ट्रात जर ते राहिले, त्या बुद्धीने त्यांनी या देशात रहिवास केला तरच त्यांना या विधीची योग्यता लाभेल; एरवी नाही. इतर प्रांतातील लोक देखील धर्माचरणाच्या बुद्धीने इकडे आले तरच त्यांनी तो विधि अनुष्ठिल्यासारखे होईल.

१. 'महाराष्ट्र निर्दोष आन सगुण : आपण निर्दोष आन सगुण तैसेचि आणिकातेही निर्दोषा करी आन सगुणा करी : अनिष्ट न निफजे म्हणौनि निर्दोष : इष्ट निफजे म्हणौनि सगुण' 'आपण अनाचार न करी : आणिकासी करो नेदी : ते महाराष्ट्र : धर्म सिद्धी जाये ते महाराष्ट्र'(आ. स्थ.२४)

२. 'संगात : भेटी : शुश्रूषा : स्थान : प्रसाद : वासनिक : बोधवंत : ते अवघेन्त्र महाराष्ट्र' (आ. बं. २४); 'अक्रिया सिद्धी जाये जया दादेयाचेनि जिये बाइचेनि ते बाई अथवा तो दादा तेलंग देश' (आ. स्थ. २४)

## मातापुर कोल्हापुर अपवाद

महाराष्ट्रात असावे हा सर्वसामान्य विधि सांगितलेला आहे हे खरे. पण याचा अर्थ महाराष्ट्रातील प्रत्येक स्थान आचरत्या पुरुषाच्या वसतीला योग्य आहे असा मुळीच नाही. महाराष्ट्रातील प्रत्येक स्थान सात्विक आहे असेहि नाही. या देशातहि अतिअसुरस्थाने किंवा देवतांची भोगस्थाने अनेक आहेत. त्या ठिकाणी आचरत्या पुरुषाने जाता कामा नये. उदा : मातापुर आणि कोल्हापुर ही देवतास्थाने होत. तिथे साधकांनी जाऊ नये. ( मातापुरा कोल्हापुरा न वचावे : तिये साभिमानियें स्थाने : साधकासि विघ्न करीति : आ. २५ ). या स्थानांचा देवतांनी विशेष अभिमान घेतलेला असल्यामुळे परमेश्वरमार्गीचा साधक त्या ठिकाणी गेल्यास त्याला तेथे देवताकडून विघ्न होण्याचा संभव असतो.

कोल्हापुर हे देवीचे क्षेत्र असल्यामुळे ते असुर भोगस्थान होय आणि म्हणून तिकडे न जाण्याची आज्ञा श्रीचक्रधरस्वामींनी केली हे उघड आहे. पण मातापुर ऊर्फ माहूरला जाण्याचा निषेध का केला असा प्रश्न अनेकांना पडण्याचा संभव आहे. कारण वस्तुतः ' या मार्गासि आदिकारण असलेल्या ' श्रीदत्तात्रेय प्रभू ' चे ( वि. २८५ ) ते शयनस्थान होय. इतकेच नव्हे तर परमेश्वरावतार श्रीचक्रपाणी राऊळ ( अथवा श्रीचांगदेव राऊळ ) यांनी तेथे अनेक क्रीडा केलेल्या आहेत. श्रीदत्तात्रेय व श्रीचक्रपाणी या ' दोही देवां ' च्या चरणांनी अंकित झालेली अनेक पवित्र स्थाने त्या ठिकाणी आहेत. असे असतांना ' मातापुरा न वचावे ' असे निषेधवाक्य उच्चारण्याचे कारण काय ! याचे कारण असे की, माहूरलाहि रेणुका देवीचे भोगस्थान आहेच. त्या स्थानात गेल्यास तेथील देवतेकडून विघ्न होण्याचा संभव आहे. या दृष्टीने विचार केला असता ज्याचा अभिमान

१. या बाबतीत आपल्या मृत्युसमयी श्रीगोविंदप्रभूंनी नागदेवाचार्यांना ' आवो मेला जाए : मातापुरासि जाए म्हणे ' अशी माहूरला जाण्याची स्पष्ट आज्ञा केली होती हे लक्ष्यात घेतले पाहिजे. त्याप्रमाणे नागदेवाचार्य माहूरला गेले होते. तेथील पर्वतावर मात्र ते गेले नाहीत. ( अ. स्मृ. १८ व १९ ; स्मृ. स्थ. पा. ९५ पहा ). ' मातापुरा न वचावे ' ऐवजी ' मातापुरा न वंचावे ' असा पाठ असल्याचे तळेगावकर आम्नायाचे म्हणणे आहे. तदनुसार माहूरला अवश्य गेलेच पाहिजे, ते टाळता कामा नये, असा त्या आम्नायाच्या अनुयायांचा दंडक आहे, असे कळते.

देवतेने घेतलेला आहे अशा रेणुकादेवीच्या भोगस्थानात साधकाने कधीच जाता कामा नये असा स्वामींच्या म्हणण्याचा आशय स्पष्ट दिसतो.

## गंगातीरी राहावे

आचरत्या पुरुषांनी, निषिद्ध स्थाने वर्ज्य करून सात्त्विक महाराष्ट्रात असावे; पण त्यातहि गंगेच्या म्हणजे गोदावरीच्या तीरावर राहावे, म्हणजे गोदावरीच्या निकटच्या प्रदेशात आचारधर्म सिद्धीला न्यावा. ( गंगातीरी असीजे – आ. मा. ८३ ). महाराष्ट्राचे, वऱ्हाड व गंगातीर असे दोन विभाग कल्पिले तर आचरत्या पुरुषाला वऱ्हाड हे आपल्या माहेराप्रमाणे व गंगातीर हे सासराप्रमाणे आहे असे नागदेवाचार्यांनी म्हटले. स्त्रीला आपला पतिव्रताधर्म ज्याप्रमाणे सासरला पतीच्या सान्निध्यात राहून पार पाडता येतो त्याप्रमाणे आचरत्या पुरुषाला गंगातीरावर राहून आचारधर्म सहज सिद्धीला नेता येतो. तेव्हां आचार सिद्धीला जाण्याच्या दृष्टीने गंगातीर विशेष सात्त्विक होय. ( स्मृ. स्थ. २४६ ). श्रीचक्रधरस्वामींनी आपले बहुतेक आयुष्य गंगातीरी घालविले. नागदेवाचार्यांनीहि श्रीगोविंदप्रभूंच्या मृत्यूनंतर गंगातीराचाच आश्रय केला होता, यावरून ही गोष्ट दिसून येईल.

## देशाच्या शेवटी जन्म क्षेपावा

साधकाने महाराष्ट्र देशात राहावे हा सामान्य विधि झाला, त्यात मातापुर–कोल्हापुर सारख्या अतिअसुर देवतास्थानांचा अपवाद किंवा निषेध सांगितला. आता प्रश्न असा की, महाराष्ट्र देशात तरी साधकाने रहावें कुठे ? त्याला उत्तर हे की, महाराष्ट्र ' देशाच्या शेवटी ' जाऊन एखाद्या झाडाखाली साधकाने आपला जन्म क्षेपावा. ' देशाचा सेवटी झाडाखाली जन्म क्षपावे ( आ. २६ ); ' देशाचा सेवटा : झाडाचा तळवटा : देउळाचा कोनटा इए तीन्ही सेउनि असावे ' ( आ. मा. २१९ ) या वचनावरून आचरत्या पुरुषांनी ' देशाच्या शेवटी ' जाऊन आचार करण्याचा विधि लक्षात येईल.

' देशाचा शेवट ' म्हणजे त्या देशाची–प्रस्तुत ठिकाणी महाराष्ट्राची मराठी–भाषा संपून इतर देशाची भाषा जेथून सुरू होते तो प्रदेश. जिथे मराठी व जवळच्या देशातील भाषा सारख्याच प्रमाणात

बोलली जाते म्हणजे दोन्ही देशांचे लोक ज्या ठिकाणी सारख्याच प्रमाणात मिसळलेले असतात, तो देशाचा सेवट नव्हे; पण जेथे एकचतुर्थांश लोक इतर भाषा बोलतात व तीनचतुर्थांश लोक मराठी भाषा बोलतात तो प्रदेश महाराष्ट्राचा सेवट होय. अशा ठिकाणी जाऊन एखाद्या काटेरी झाडाखाली आचरत्या पुरुषाने आपले सर्व आयुष्य कंठावे. 'आपुला गावींहूनि सात मंडळे सांडूनि जाइजे : याते सेवटु म्हणिजे : शोधु : मंडळ प्रदेशु' ( स्मृ. स्थ. २०६ ) अशीहि शेवटाची व्याख्या नागदेवाचार्यांनी केली आहे.

देशाच्या शेवटी जाऊन जन्म क्षेपणाऱ्या आचरत्या पुरुषाला परमेश्वर लौकर प्राप्त होतो. तथापि सगळयांनाच देशाच्या शेवटी जाता येते असे नाही. परमेश्वरप्राप्तीची अत्यंत तीव्र उत्कंठा ज्यांना लागलेली असते ते हरप्रयत्न करून देशाच्या शेवटी जातातच. पण इतर लोकांना लुळेपांगळे-पणामुळे किंवा रोगजर्जरतेमुळे तेथे जाता येत नाही. ते मध्यदेशीच राहतात; किंवा नुसते आपले गावच सोडून राहतात; किंवा गावातल्या गावात एका घराचा त्याग करून गावाच्या शेवटी दुसऱ्या घरी राहतात. पण तेथे ते कामक्रोधांचा पूर्ण निरोध करून सतत स्मरण, मनन वगैरे करीत असतात. त्यांच्या या सगळया क्रिया लेखी लागतात. उलट देशाच्या शेवटी जाऊनहि अनाधिकारीपणाने विकारवश होऊन वर्तन करणारे पुष्कळ असतात. त्यांच्या क्रिया लेखी लागत नाहीत. किंबहुना परमेश्वरविषयक क्रियाच त्यांच्याकडून होत नाहीत. हे काही देशाच्या शेवटी जाऊन क्षेपणे नव्हे. सारांश, देशाच्या शेवटी जाणे हे महत्त्वाचे नसून 'क्षेपणे' महत्त्वाचे आहे. तथापि, केवळ संबंधियांचा त्याग करून गावातच क्षेपणाऱ्यापेक्षा ग्रामत्याग करून आपल्या प्रांतात किंवा स्वदेशात राहणारा श्रेष्ठ होय; त्यापेक्षाहि स्वदेशत्याग करून मध्यदेशी राहणारा श्रेष्ठ आणि स्वसंबंधी, स्वग्राम व स्वदेश यांचा त्याग करून देशाच्या शेवटी जाऊन जन्म क्षेपणारा पुरुष हा सगळयात श्रेष्ठ होय.

## गडी सीडी असावे

आपल्या देशाची भाषा बोलणारे लोक जास्त, म्हणजे जवळजवळ

१. 'देशाचा सेवट तो गडे आरुता : दोन्ही भाषा मिसळली मनुष्ये ते गडे : मग एक नावेक बहुत ते सेवट.' (आ. स्थ. २६.)

तीन चतुर्थांश प्रमाणात असून इतर देशाची भाषा बोलणारे लोक जेथे एकचतुर्थांश प्रमाणात असतात तेथून आपल्या देशाचा शेवट सुरू होतो. तीन भाग इतर देशाची भाषा बोलणारे आणि एक भाग मराठी बोलणारे लोक जेथे असतात तो तर महाराष्ट्राचा शेवटच म्हणायचा. जेथे दोन भाषा बोलणारांचे समप्रमाणात मिश्रण असते त्या भागाला 'गडे' असे नाव आहे. उदा: अर्धे लोक मराठी भाषा बोलणारे व अर्धे लोक कानडी भाषा बोलणारे जेथे असतील तो भाग महाराष्ट्राच्या दृष्टीने 'गडे' ( = गढी ) सारखाच होय. अशा ठिकाणीहि साधकाने रहावे. तथापि या भागातहि जेथे व्यापारादिकाच्या निमित्ताने आपले संबंधिये किंवा परिच-याचे लोक येण्याचा संभव असेल त्या गावी साधकाने मुळीच राहू नये. त्याने ती टाळलीच पाहिजेत. नाहीतर परिचिताकडून साधकाला आपल्या घरादाराची बातमी मिळेल.त्यामुळे त्याचे मन आपलवून तो आचार सोडून परत जाण्याचा संभव असतो. उदा: सारंगभागवत या नावाचा एक ब्राह्मण संन्यासी सर्वसंगपरित्याग करून एका 'गडे'च्या गावी राहिला होता. पण तेथे त्याच्या परिचितांचे येणेजाणे असे. त्यांच्याकडून त्याला एकदा आर-ल्यामागे आपल्या बायकामुलांची झालेली दैन्यावस्था ऐकायला मिळाली. त्यामुळे त्याच्या मनात ममता उत्पन्न होऊन तो परत त्यांच्याकडे गेला आणि त्यांच्याच बरोबर राहू लागला. म्हणून आचरत्या पुरुषांनी गडेच्या भागात देखील व्यापारधंद्याच्या, उतारपेठेच्या वगैरे गावी राहू नये. क्वचित् असे होते की अशा गावी राहिल्यास आपल्याकडील एखादा माणूस आप-णाला पाहतो. तो ती बातमी आपल्या संबंधियांना सांगतो. त्यामुळे ते आपणाला न्यायला येतात. उदा: पद्मनाभीला न्यायला जोगनायक अशाच रीतीने आला होता. हे काहीच संभवू नये म्हणून गडेच्या विभागातील उतारपेठेची गावे टाळावी व 'सीडी' = देशाच्या शेवटी पण राजमार्गात

१. 'सेवट म्हणजे श्रीनगर : जुन्नर : कल्याण : खांदार : तीन भाग मऱ्हाटे तो सेवट : सरसी ते गडे···दोन्ही भाषेची मनुष्ये बरोबरी वर्तती ते गडे' ( आ. बं. ३५ ).

२. 'तेथ ओळखती : भेटती : संबंधियांचिया वोखटिया गोमटिया वार्ता : जरी ममता तरी वोवांडी : यथा सारंग भगवत : जोगनायक ' ( आ. स्थ. ३५ ).

न येणारीं गावे, आडमार्गातील ठिकाणे, तेथे जाऊन राहावे.

गडी आणि सीडि यांच्या व्याख्या नागदेवाचार्यांनी पुढीलप्रमाणे केलेल्या आहेत. 'लज्जाहरण वस्त्र नाही : क्षुधाहरण अन्न नाही तया गावाते सीडी म्हणिजे। ये दोन्ही असति तयाते गडी म्हणिजे' (स्मृ. स्थ. ५१). या अर्थाने देखील आचरत्या पुरुषांनी गडीमधे राहण्यापेक्षा सीडीमधे राहणे हे अधिक श्रेयस्कर आहे. कारण सीडीमधे कोणत्याहि विषयपदार्थांचा संभवच नसतो. पण गडीमधे तो असतो. म्हणून गडीपेक्षा सीडी ही वसतिस्थानाला अधिक योग्य होय.

क्वचित् अक्षमत्वामुळे किंवा इतर कारणामुळे साधक 'गडे' विभागात जाऊ शकला नाही, पण आपले सगळे दोष सोडून मध्यदेशात आचारासाठी राहू लागला तरी हरकत नाही. ज्या ठिकाणी तो सर्व संग व सर्व दोष सोडून आचरण करील ते ठिकाण त्याच्या दृष्टीने गडेच होय. ते देशाच्या शेवटी आहे असेच समजायचे. 'गडे' च्या विभागात विषयसंभव फार असला तर तो विभाग साधकाने टाळावा. पण समजा कानड व महाराष्ट्र देश यांची गडे=सरहद्द, त्या सरहद्दीवरील कानड लोक, जे एरवी विषयबहुल असतात ते आपला राजसपणाचा दोष सोडून वागणारे असतील तर तेथे रहायला हरकत नाही. इतकेच काय पण मध्यदेशातहि असे लोक स्वतःचे दोष सोडून वागत असले तर तेथेहि त्यांच्यात राहायला हरकत नाही.

## हाळी-पाळी मधे रहावे

मोठमोठ्या नगर-पुर-पाटणापेक्षा आचरत्या पुरुषांच्या वस्तीसाठी 'गडी' सारखी छोटी गावे अधिक चांगली. त्यातहि 'सीडी' सारखी विषयपदार्थशून्य गावे अधिक चांगली हे खरे. पण यांच्याहि पेक्षा अधिक छोटी गावे असतील तर ती विशेष श्रेयस्कर होत. म्हणूनच 'हाळिया पाळिया असावे' ( आ. ३६ ) असे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे. 'हाळी'

१. '**सिडी मार्ग सांडून अवकाशरूप** : मार्ग म्हणजे त्या देशात जावयाचा यावयाचा ऐसा जो राजपथ तो सांडून' (आ. बं. ३५)

२. '**गडे कानड तेलंग : आपला दोष सांडून वर्ते ते गडे** : तरी आपला दोष म्हणजे आपुलेया देहीचा दोष सांडून मध्यदेशी वर्तले तरि तेही गडे बोलीजे' (आ. बं. ३५).

म्हणजे दहापाच घरांच्या वस्तीची गावे. येथे सामान्यतः शूद्रांचीच वस्ति फार असते. बाकीचे तीन वर्ण असले तरी क्वचित्. आणि 'पाळी' म्हणजे चालती गावे. अर्थात् तात्पुरती वस्ती करून राहणाऱ्या लोकांच्या निवासस्थानाला पाळी असे म्हणतात. उदा : वंजारी, वडर वगैरे लोकं. हे नेहमी फिरते असतात. दहापाच कुटुंबांच्या टोळया करून हे एकसारखे भटकत असतात. जेथे उतरतात तेथे तात्पुरती गवताची घरे बांधतात. काही दिवसांनी ती घरे मोडून दुसऱ्या ठिकाणी जातात व तेथे झोपड्या बांधून राहतात. 'चालती घरे : चालती उखळे : चालतीया चुली : तयाते पाळी बोलीजे । जेवावेया तळी नाही : वाढावेया पळी नाही तयाते हाळी बोलीजे' ( स्मृ स्थ. ५१ ) असे हाळी-पाळीचे वर्णन केले आहे. अशा फिरत्या लोकांच्या दहापाच घरांच्या गावात साधकाने रहावे. तेथे राहिल्याने त्या भटक्या लोकांहून साधकाला विषयरूप पदार्थांचे संपादन होण्याचा मुळीच संभव नसतो. कारण ते स्वतःच अगदी गरीब असतात.

## नेहमी अटन करावे

पण याचा अर्थ आचरत्या पुरुषांनी स्वदेश व स्वग्राम यांचा त्याग करून देशाच्या शेवटी गडी-सीडी सारख्या किंवा हाळी-पाळी सारख्या एखाद्या अत्यंत छोट्या गावी जाऊन 'वसति' करून रहावे असा मात्र नाही त्यांच्या मुख्य विधि 'नित्याटन करावे' ( आ. मा. १३२ ) म्हणजे नेहमी फिरत राहण्याचा आहे. कोणत्याहि एका गावात कायमची वस्ती करून त्यांनी कधीच राहता कामा नये; तर 'गाउनि गावा जावे' ( आ. मा. ४१ ) म्हणजे एका गावाहून दुसऱ्या गावाला जात असावे. तो एका गावी वसती करून राहिला म्हणजे त्याने 'आश्रय' घेतल्यासारखेच आहे आणि ते तर श्रीचक्रधरस्वामींनी निवारलेले आहे. ( महात्मियासि आश्रय : परिग्रह ये दोनिही न व्हावी की बाई : शो. आ. १६ ). कारण गावाचा आश्रय घेतल्यावर सामुग्री वगैरे जोडून, विषयसंबंधादिकाच्या योगाने आचरता पुरुष भ्रष्ट होण्याचा फार संभव असतो. म्हणून कोणत्यहि गावी वसती न करता साधकाने नेहमी अटन करीत राहिले पाहिजे.

१. 'हाळिया तिया सानिया दाहापाचा घरांचीया : तीन वर्ण सकृत् : पाळिया म्हणंजे अनियत वास यथा वंजारवाडिया' ( आ. स्थ. ३६ ).

## निरुद्देश अटन

एका गावाहून दुसऱ्या गावाला जाण्याची ही क्रिया कोणत्याहि हेतूने होता कामा नये. कारण एखाद्या गावी विशिष्ट हेतूने जायचे म्हटले म्हणजे अभिलाष आलाच. आणि एकदा साधक अभिलाषाच्या आधीन झाला तर मग तो धर्मभ्रष्ट व्हायला फारसा वेळ लागायचा नाही. कारण अभिलाष एकसारखा वाढतच जातो. त्याला शेवट नाहीं. यासाठी आचरत्या पुरुषाने अटन करायचे ते अगदी निर्हेतुक असले पाहिजे. (अटन तें निरुद्देशे करावें: आ. मा. ४० ). एखाद्या गावी गेल्यानंतर तेथे किती दिवस रहावे संबंधीचे स्थूल नियम 'भिक्षा' प्रकरणात सांगितलेले आहेत. सामान्यतः कोणत्याहि गावी एकाच घरी दोन वेळ भिक्षा मागण्याची पाळी येणार नाही तोपर्यंत राहायला हरकत नाही हा त्याचा भावार्थ आहे. 'ग्रामे एकरात्रं नगरे पंचरात्रम्' (आ. मा. १३३) राहण्याला सांगण्यातहि हाच हेतु दिसून येतो. याच वचनावरून गावात किंवा नगरात राहायचे ते फक्त रात्री-निद्रेसाठी म्हणून, एरवी गावाचा आश्रय करण्याचे कारण नाही हे ध्वनित होत असल्याचे लक्ष्यात येईलच. जोपर्यंत आपले श्रेष्ठत्व किंवा नष्टत्व प्रकाशित होऊन आपणाला तेथील लोकापासून कोणत्याहि विषयपदार्थाचे संपादन होण्याचा संभव निर्माण होत नाही किंवा उपद्रव होत नाही तोपर्यंत एखाद्या गावी राहायला हरकत नाही हाहि एक सर्वसाधारण दंडक आहेच. (तवंपर्यंत असावे जवं आपुले श्रेष्ठत्व नष्टत्व प्रकाशेना : आ. मा. ९; स्मृ. स्थ. २१४ पहा.)

## झाडातळी विजन

अटन करीत असतांना चातुर्मास्यानिमित्त अथवा इतर कारणाने म्हणजे अक्षमत्वामुळे वगैरे भिक्षूला एका ठिकाणी रहावे लागल्यास त्याने रहावे कुठे ? अर्थात्, निर्जन ठिकाणी, एखाद्या झाडाच्या खाली त्याने आसरा

१. 'चातुर्मास्यातहि प्रत्यक्ष पावसाच्या वेळी अथवा ज्वरतापादि प्राप्त झाले असतांना त्याने वाण्याच्या ओसरीवर देवळात, अथवा पडवीमधे राहायला हरकत नाही. (**देउळी ते देहीचेन अनाधिकारें : का ऋतुकाळीं पावसाळा**' (आ. स्थ. ११९) **झाड प्रास पुरुषा : ते प्रतिबंधलेया तर देऊळ : भोगस्थान : का तामस : तर वाणासी का पडवी**' (आ. स्थ, १२०).

घ्यायला काहीहि हरकत नाही. किंबहुना नित्य अटन करावे हा जसा विधि आहे तसाच 'झाडातळी विजन कीजे' ( आ. मा. ४३ ) हाहि साधकाचा विहित विधि आहे. 'देशाचा सेवटा झाडाचा तळवटा : देउळाचा कोनटा इए तिन्ही सेउनि असावे' (आ. मा. २१९ ) या वचनातहि देशाच्या शेवटी जाऊन झाडाच्या खाली राहण्याचा विधि सांगितलेला आहे. ('झाड' याचा अर्थ अधिकरण असाहि आहे. शास्त्र, आचार वगैरे शिकण्यासाठी साधकाला अधिकरणाच्या आश्रयाने राहणे अवश्य असते.) अर्थात्, आचरत्या पुरुषाने, त्याग केल्यावर नेहमी अटन करावे, अटन करतांना विजनात असावे आणि विजनात असतांना एखाद्या झाडाच्या खाली बसून आपला नित्यनैमित्तिक धर्म आचरावा हा सर्वसामान्य नियम होय.

## सात्त्विक वृक्षाचा आश्रय

साधकाने ज्या वृक्षाचा आश्रय घ्यायचा तो सात्त्विक वृक्ष असला पाहिजे; राजस किंवा तामस नसावा. 'राजसे तामसे स्थानी नसावे' ( आ. २४२ ) हा एक महत्त्वाचा नियम साधकांनी नेहमी लक्ष्यात ठेवला पाहिजे. ज्या स्थानी राहिल्याने साधकाच्या अंतःकरणात राजस व तामस धर्म उपजतात ते स्थान राजस व तामस समजावे. काही देशच सात्त्विक, राजस व तामस असतात. त्या देशात कुठेहि गेले तरी तेच विशिष्ट भाव मनात निर्माण होतात. उदाः स्थूल मानाने महाराष्ट्र सगळाच सात्त्विक देश आहे. कानड आणि तेलंगण हे राजस देश आहेत. कोल्हापूर हे तामस गाव आहे. तथापि एखादा प्रदेश सात्त्विक आहे की राजस आहे हे ओळखायचे असल्यास भोवतालच्या चारहि गावांचा अनुभव घ्यावा; त्या चारहि गावी असतांना जर सत्त्वच उपजत असेल तर तो प्रदेश सात्त्विक समजावा; राजस भाव किंवा तामस भाव निर्माण होत असतील तर तो प्रदेश राजस, किंवा तामस समजावा. एखादे गाव सात्त्विक, राजस, किंवा तामस आहे

१. 'रजोरूप मनोरथ उपजति तरी राजस स्थान जाणावे : तमोरूप तरी तामस जाणावे' (आ. स्थ. २४२ ).

२. 'पूर्व : पश्चिम : उत्तर : दक्षिण : चहु दिशांचे चारी गाव अनुभवीजति : जरि सत्त्वा नये : रज का तमचि उपजे तरि तो देशचि सांडिजे' (सदर).

की नाही हे ओळखायचे असल्यास त्या गावाभोवतालच्या चारहि दिशा पारखून पहाव्या. सर्व ठिकाणी सत्त्व उपजले तर तो गाव सात्त्विक मानावा.[1] भोवताच्या चार गावावरून देशाचा आणि चार दिशावरून गावाचा सात्त्विकपणा, राजसपणा किंवा तामसपणा जसा ओळखायचा तसा भोवतालच्यां दिशावरूनच झाडाचा हि सात्त्विकपणा वगैरे ओळाखावा. झाडाचे, इतकेच नव्हे तर निद्रास्थाने, देवळे, भोजनस्थाने वगैरे यांचेहि सात्त्विक-राजसपण याच रीतीने ओळखावे.[2] तथापि, ज्या पुरुषाला कोठेहि गेले तरी सत्त्व उपजत नाही, उलट नेहमीच आळस, जाड्य, राजस-तामस मनोरथ उपजतात त्याने आपण स्वतःच राजस किंवा तामस आहोत म्हणून समजावे.[3] अशा रीतीने पारखून पाहिल्यानंतर ज्या ठिकाणी सत्त्व उपजणार नाही अशी राजस किंवा तामस झाडे साधकाने टाळावी. फक्त सात्त्विक झाडाचाच आश्रय घ्यावा. सारांश 'असावे गिरिकपाटीं : शिळातळी वाळुवंटी : झाडाचा तळवटी : बहुतकरुनी' त्यातहि 'सत्त्वाचेनि वोलांसे : बोधतरु वेल्हावतु दीसे : तेणे तेणे प्रदेशे : असावे : वीतरागी' ( उद्ध. गी. १८३; १८४ ).

## फलपुष्पहीन झाड असावे

ज्या सात्त्विक झाडाचा आश्रय साधकाने घ्यावयाचा ते फळाफुलांनी डवरलेले नको. ते फुलांनी डवरलेले असल्यास त्या फुलांच्या सुगंधाने मन आपलवून स्मरणादि क्रियात खंड पडण्याचा संभव लागलीच निर्माण होतो. त्यातहि सुगंध म्हणजे 'सुगंधवनितावस्त्रं गीतताम्बूलभोजनं । शय्या च भुवनं चैव अष्टभोगाः प्रकीर्तिताः' या अष्टभोगातील मूर्धाभिषिक्त असा एक उपभोग्य पदार्थ आहे, हे लक्ष्यात घेतले म्हणजे त्यामुळे साधक किती सहज आपलवला जाणे शक्य आहे याची कल्पना येईल. आणि 'फळ' हा

१. 'चहु दिशांची विजने अनुभवीजति : जरि सत्त्वा नये तरि तो गावो सांडावा' (आ. स्थ. २४२).

२. 'तैसोचि विजन : भोजनस्थान : निद्रास्थान : झाडांतळीली च्यान्ही दिशा अनुभवीजति : सत्त्वा नये : रजोरूप का तमोरूप मनोरथ उपजोति तरि ते झाड सांडीजे' ( आ. स्थ. २४२ ).

३. 'आलस्य : जाड्य : तामस मनोरथ अखंड उपजति तरि मीच तामस ऐसे जाणावे' ( सदर ).

तर जिव्हेचा प्रत्यक्ष खाद्य असा उपभोग्य पदार्थ होय. ज्या झाडावर फळे लटकलेली आहेत त्याखाली बसल्यावर साधकाला त्या फळाचा आस्वाद घेण्याची इच्छा न होणे अशक्य आहे. आणि एकदा इच्छा झाली म्हणजे तो त्या विषय-पदार्थाच्या स्वाधीन झालाच म्हणून समजावे ! यासाठीच कोणत्याहि आचरत्या पुरुषाने ' फलतेया फुलतेया वृक्षाखाली न बैसावे ' ( आ. मा. २०६) असा स्पष्ट आदेश श्रीचक्रधरस्वामींनी दिलेला आहे. सुगंधलोलुप भुंगा सुगंधसेवनेच्या तीव्र अभिलाषाने केतकीची काटेरी जाळी अत्यंत कष्टाने भेदून जातो; इतकेच नव्हे तर केवळ त्याच अभिलाषाने तो स्वतःला कमलकोशाच्या कारागारात अडकवून घेतो ' कष्टी भेदुनी केतकीची काटी : भ्रमर रिगे परिमळासाठी : अमोदालागी सापडवी पोटी : कमळी आपणयाते' त्याप्रमाणे'तेवि सुगंधवेधे भूलला : अखंड असे लुब्धला : तोचि जेव्हेळी होय विरमला : तेव्हेळीं अंगुस्तिया दे ॥ जैसे नासलेया प्रपंचाचिये घानि : उभे न ठाकवे तिये वाहणी : तेवि परिमळ न भावे घ्राणीः विकृतितव ' अशी विरक्त साधकाची अवस्था झाली पाहिजे. ( ज्ञा. प्र. ७२३-७२५ ). यासाठीच ' फुलत्या ' वृक्षाखाली बसणे त्याज्य होय.

## विजनासाठी मळा त्याज्य

विजनासाठी म्हणून मळयात देखील साधकाने बसता कामा नये. मळा हा गावाच्या बाहेर असेल, तो जनसंमर्दापासून दूर असेल हे खरे,पण तो फळत्या व फुलत्या वृक्षवल्लरींनी भरलेला असतो. अशा ठिकाणी सत्त्व उपजणार कसे आणि परमेश्वरस्मरण होणार कसे ? महदाइसा ही अटन करीत असता एका गावी म्हाइभट ' विजनी ' असल्याचे तिला समजले. म्हणून तिने विरक्त पुरुषांना उचित ठरतील अशी सगळी विजनस्थळे पाहिली. पण तिला म्हाइभट कुठेच आढळले नाहीत. कारण ते एका मळ्यात बसले होते. महादाइसेने त्यांची तिथे भेट घेतली. पण नंतर धर्म-वार्ता करीत असतांना तिने म्हाइभटाला स्पष्टपणे सांगितले की ' ईश्वरविरह्या पुरुषाची ये ( = मळा ) तव वीजने नव्हति : ये सलागां पुरुषांची वीजने ' म्हाइभटाला महदाइसेचे म्हणणे पटले, आपली चूक कळल्याबद्दल त्यांना आनंद झाला. ( स्मृ. स्थ. १६९ ). यावरून विजनासाठी मळा देखील त्याज्य होय हे कळून येईल. कारण तेथे फलपुष्पयुक्त वृक्षवल्लरी असतात.

## काट्याचे झाड सर्वोत्कृष्ट

जी गोष्ट फळाफुलाविषयी तीच भरगच्च अशा पानाविषयी. भरगच्च पानांनी दाटलेला वृक्ष म्हणजे आळस, जाड्य, यांचे माहेरघरच. त्या वृक्षाच्या दाट छायेखाली मनुष्य बसला म्हणजे तेथील सुखशीतल मंद वायूने त्याच्या डोळयावर किंचित् गुंगी चढून त्याला लवंडावेसे वाटणार नाही, असे कधी झाले आहे काय? आणि तो लवंडून निद्राधीन झाला म्हणजे कुठले स्मरण आणि कुठला नित्यनैमित्तिक विधि! म्हणून आचरत्या पुरुषाने विजनात असतांना दाट छायेच्या झाडाचा आश्रय करू नये. जेथे अगदी विरळ सावली असेल असे झाड त्याने पहावे. विशेषतः काटेरी झाडे विरळ सावलीची असतात. अशाच झाडाखाली साधकाने रहावे. 'कांटिये एकी तळी सुकौनि पाडी'-- (आ. ७३) असा काट्यातळी स्वतःचा देह सुकवणारा साधक श्रेष्ठ मानला आहे तो याच अर्थाने.

## एकाच झाडाची सवय नको

झाड म्हणजे ज्या वृक्षाच्या आश्रयाला जाऊन साधक स्मरण वगैरे करतो ते; अर्थात् स्थावर वृक्ष. तसेच, ज्या अधिकरणाच्या आश्रयाने साधक राहतो त्यालाहि झाड म्हणतात. या दोन्ही अर्थांनी आचरत्या पुरुषाला झाडाची म्हणजे अर्थात् वृक्षाची, तसेच चेतन अधिकरणाची सवय असता कामा नये.

ही झाडे व स्थाने सगुण, निर्दोष व सदोष अशी तीन प्रकारची असतात. ज्याच्या सहवासाने इष्ट क्रिया उपजते ते सगुण स्थान होय. ज्याच्या सहवासाने अनिष्ट क्रिया उपजते ते सदोष स्थान होय. आणि ज्याच्या सान्निध्यात इष्टानिष्ट अशी कोणतीच क्रिया उपजत नाही ते निर्दोष स्थान होय.[1] पैकी निर्दोष व सदोष स्थाने ही तर साधकाला सर्वथैव त्याज्यच होत. पण एखादे स्थान सगुण असले तरी त्या एकाच स्थानाची किंवा झाडाची सवय लागता कामा नये. ही सवय धर्माला विघातक ठरते. विशेषतः तशाच प्रकारची इतर स्थाने व झाडे असतांनाहि साधकाला जर एखादे

१. जडचेतन पदार्थ एक सगुण : एक निर्दोष : एक सदोष ... तरि ज्याचेनि इष्ट निफजे तो सगुण : आन अनिष्ट निफजे तो सदोष : दोन्ही न निफजति तिये निर्दोष ' (आ. बं. ३७).

विशिष्ट झाडच आवडायला लागले तर त्याला त्या झाडाची सवय लागली असे त्याने समजावे, आणि सवय लागताक्षणीच ती त्याने मोडून काढावी. एका झाडाची सवय त्याने लागू देऊ नये.

## छर्दोबाचे उदाहरण

आचरत्या पुरुषाने विजनात काटेरी झाडाखाली असावे हे खरे, पण नेहमीकरता नव्हे. तो दररोज एकाच झाडाखाली जाऊन बसू लागला तर धर्मभ्रष्ट होण्याचा संभव आहे. (एका झाडाची सवे न होआवी : एका स्थानाची सवे न होआवी : आ. ३७). एकाच झाडाची सवय लावून घेतल्याने साधकाचा अधःपात कसा होतो हे पहावयाचे असल्यास छर्दोबाचे उदाहरण दृष्टीसमोर आणावे. छर्दोबा नावाचे एक महात्मा होते. ते अत्यंत विरक्त होते. प्रत्यक्ष श्रीचक्रधरस्वामींच्या मुखाने त्यांना बोध झाला होता. त्यामुळे श्रीचक्रधरावर त्यांची फार श्रद्धा होती. श्रीचक्रधरस्वामींच्या विद्यमानीच पण त्याच्या असान्निधानात स्मरण करतांना ते अतिशय दुःख करीत. निर्वेद अनुताप, अनुशोच, आर्त वगैरे करण्यात निरंतर काळ कंठीत. शरीरावरची त्यांची आसक्ति उडाली होती. देशत्याग करून ते उत्तम चर्या करू लागले. एके दिवशी ते भिक्षेला निघाले. त्यावेळी रस्त्यात त्यांना कुणाची तरी ओकारी आढळली. जणु आपणासाठी हे ओकारीचे अन्न ईश्वरानेच पाठवले आहे, आता आपण पुढे गेल्यास आपल्या स्मरण विधीला बाधा येईल, असा सारासार विचार करून त्यांनी ती ओकारी म्हणजे ते 'छर्दितान्न' भक्षण केले. म्हणूनच पुढे त्यांना 'छर्दोबा' असे नाव पडले. सारांश, छर्दितान्न भक्षण करण्याइतपत त्यांची घृणा नष्ट झाली होती. इतके कडक वैराग्य त्यांच्या अंगी बाणले होते. पण...

पण या छर्दोबाला स्मरणानिमित्त एकाच झाडाखाली बसण्याची सवय होती. त्यामुळे पुढे तो मलिन झाला. त्याचे असे झाले की, त्याला एकाच झाडाची सवय असल्यामुळे पुढे ते झाड ज्या शेतकऱ्याच्या शेतात होते त्या शेतकऱ्याची व त्याची ओळख झाली. त्याच्याबरोबर बोलण्याचालण्याची

१. 'दो ठायी समानगुण अथवा समान दोष असता एकोचि ठायी चित्त राहे : एके ठायी न राहे तरि सवे लागली जाणावी' (आ. स्थ. ३७).

त्याला सवय लागली. त्या प्रीतीमुळे तो शेतकरी छर्दोबाला गावात घेऊन गेला. आणि अशा रीतीने देशाच्या शेवटी झाडातळी राहूनच मरू इच्छिणारा छर्दोबा रानमहात्मा होता तो आता गावमहात्मा झाला. गावातील लोक त्याचा पूजापुरस्कार करू लागले आणि तो ती स्वीकारू लागला. कालांतराने तो शेतकरी मेला. तेव्हां त्याच्या स्त्रीने काकुळतीला येऊन छर्दोबाकडून आपला स्वीकार करविला. छर्दोबाने मोठ्या प्रेमाने तिचा स्वीकार केला. तो विषयप्रमादी बनला. इतकेच नव्हे, चांगदेव राऊळ हे नावहि तो विसरला. सृष्टिक्रमानुसार छर्दोबाला मुलगा झाला. एकदा काही कारणासाठी त्यांना गाव सोडून जावे लागले. तेव्हां छर्दोबाच्या डोक्यावर मुलाचा पाळणा, हातात मुलाच्या दुधासाठी एक शेळी व तिच्यासाठी कडबा वगैरे घेऊन तो पुढे चालू लागला आणि हातात लेकरू व डोईवर पाटी घेऊन त्याच्या मागे ती शेतकरीण चालू लागली. (हाती शेळी डोइये पाळणा ए काह्याची रे : ना नागदेव राउळाची: एथीचे नावहि नाही: आ. मा. २३२). सारांश, छर्दितान्न खाण्याइतकी विरक्ति ज्याच्या अंगी बाणली होती त्या छर्दोबाची अशी स्थिति केवळ एकाच झाडाच्या सवयीमुळे झाली. यासाठी आचरत्या पुरुषाने एका झाडाची सवय मुळीच ठेवू नये. (ईश्वरबोधे बोधवंतु: ईश्वरवियोगे देशाचा सेवटी झाडातळी जन्म क्षेपो जाए: छर्दितान्न भोजन करी: हा ठावोवेऱ्ही घृणा जिंतिली : तो सवेतव एवं पर्यंत मैळे: आ. २०२).

## गावात जाऊ नये

अटन करीत असतांना साधकाने नित्यनैमित्तिक क्रियांच्या निमित्ताने नेहमी झाडातळी विजन करावे; त्याने गावात जाता कामा नये. एका गावाहून दुसऱ्या गावी अटन करावे याचा अर्थ 'गावात' जावे असा मुळीच नाही. भिक्षा विधिव्यातिरिक्त महात्म्याने गावात जाऊ नये असा नागदेवाचार्यांचा स्पष्ट उपदेश आहे. (स्मृ. स्थ. ३४). याला अपवाद नाही असे नाही. एखादा अभ्यागत किंवा अशक्त भिक्षुक याच्यासाठी गावात वाटेल तेव्हां जायला हरकत नाही. पण एरवी भिक्षावसराव्यतिरिक्त साधकाने कोणत्याहि गावात जाणे वर्ज्य मानावे. त्याने नेहमी गावाबाहेर झाडाखालीच असावे.

## निद्रेसाठी गावाजवळील खांड-देउळ

अशा रीतीने अटन–विजन करीत असतांना साधकाने रात्री झोपावे कुठे हा प्रश्न उत्पन्न होतो. अटनविजनाच्या नियमाप्रमाणे उत्तम चर्यावंताने रात्र देखील गावाबाहेर झाडाखालीच काढली पाहिजे. तथापि रात्री विजनात राहिल्यास चोराचिलटापासून व विशेषतः हिंस्र पशूपासून भीति वाटण्याचा व उपद्रव होण्याचा संभव असतो. म्हणून श्रीचक्रधरस्वामींनीच 'किडा मुंगी दिसे तेवढिया वेळा चालिजे' (शो. आ. मा. १७) आणि 'दी मीळणी गावाचा कडिसरा टेकावे' (आ. मा. २३८) म्हणजे सायंकाळच्या वेळी गावाच्या जवळ विश्रांति घ्यावी. गावापासून फार दूर नाही व फार जवळ नाही, जेथे गावातील शब्द स्पष्टपणे ऐकू येणार नाही इतक्या अंतरावर एखादे खांडदेउळ पहावे व तेथे श्वानकुंडली घालून निद्रा करावी (गावाचा कडिसरा खांड–देउळी एकी पाहिजे : तेथ श्वानकुंडली घालीजे : आ. ११९).

'खांड–देउळी' म्हणजे देवतामूर्ति नाही असे लहानसे देऊळ. देऊळ बांधलेले असते पण तेथे देवतेची प्रतिष्ठा झालेली नसते; किंवा देवतेची प्रतिष्ठा झालेली असूनहि ती मूर्ति फुटलेली असते; किंवा तेथे मूर्ति असूनहि तिच्यावर पालापाणी कुणी वाहत नसते म्हणून तिथे देवतेचे अधिष्ठान नसते. कारण, देवतामूर्तीवर जोपर्यंत पालापाणी पडत असते, तिचा पूजापुरस्कार जोपर्यंत होत असतो तोपर्यंतच देवता त्या मूर्तीचा अभिमान घेताते. (वि. मा. १००). सारांश, कोणत्या का कारणाने असेना पण जिथे देवतेचे अधिष्ठान नाही अशा देवळात त्याने श्वान कुंडली घालून पडावे. 'श्वानकुंडली घालणे' म्हणजे कुत्रा ज्याप्रमाणे आपले पाय पोटाशी घेऊन निजतो त्याप्रमाणे निजणे. श्वानकुंडली घालण्याचे तीन प्रकार

१. 'कडिसरा गावासमीप ना दूर : शब्द नाइकीजे येतुलिया' (आ. स्थ. ११९).

२. '**खांडदेउळी म्हणजे देवता नाही ते खांडदेउळी : देउळी केली परि देवता प्रतिष्ठिली नाही : अथवा देवता होती मग खोमली : अथवा देवता तरी असे परि पूजा नाही : उपहत असे**' (सदर).

३. '**श्वानकुंडली म्हणजे श्वानवत् हातापायाची मुरकुंडी : तेचि त्रिविध : एक पाय पोटेंसी लावीजति : परि करंडी सामाये येतुला पैस असे : एक नवाच्या अंकासारीखे : एक कानवडेया धनुष्याकार : तेणे हिंसा चुके**' (आ. स्थ. ११९).

आहेत. (१) एक तर पोटाशी पाय लावून, पण मधे प्रसादाची पेटी ठेवून निजणे; (२) नवाऱ्या आकड्यासारखे शरीर करून निजणे; आणि (३) धनुष्याकार निजणे. श्वानकुंडली घालून निजण्याचा मुख्य हेतु असा की त्यामुळे क्षुद्र जीवजंतूंची हिंसा फारशी होत नाही.

खांडदेवळात निजायला सांगितले असले तरी तो विधि, ज्यांना भीति वाटणे संभवनीय आहे अशा कोमळ चर्यावंतासाठी आहे. दृढ चर्यावंत म्हणजे श्रेष्ठ महानुभाव देउळीचा आश्रय न करता झाडाचाच आश्रय करतात. आणि एखादा अधिक वृत्ति करणारा तर अरण्याचाहि आश्रय करतो. झाडाच्या व अरण्याच्या आश्रयाने अर्थात्च योग्यता अधिक प्रमाणात जोडली जाते.[1] साधकाने निद्रेसाठी गावाजवळील झाडाचा आसरा घ्यायचा असला तर ते झाड निर्देवता असलेले पहावे; म्हणजे त्याखाली देवता मांडलेली नको, देवतेचे अधिष्ठान तेथे असता कामा नये. हेतु असा की, जाड्यामुळे देवतेकडे पाय करून झोपण्याचे अनिष्ट टळावे. तसेच उठतांना किंवा पांघरूण वगैरे झटकतांना देवतेकडे धूळ जाण्याचे अनिष्ट टळावे.[2]

## गावाजवळ किंवा गावात निद्रा

वर सांगितलेल्या अंतरावरील, गावापासून जरा दूर असलेल्या खांड-देवळीत किंवा झाडाखालीहि ज्याला भीति वाटत असेल त्याने बुरुड लोकांप्रमाणे गावाला लिगटून निद्रा करावी. ( तरी वोडबुरुडन्यावो कीजे—आ. १२० ). तेथेहि भीति वाटत असली तर प्रसंगी त्याने गावात जायला हरकत नाही.[3] गावात त्याने एखादे निद्रेयोग्य स्थळ पाहून तेथे झोपावे. गावात काय किंवा गावाजवळ काय लोकांची नेहमी गडबड

१. ' खांडदेउळी हा विधी आन तेथ वृद्धाचार : कव्हणी राहे ना : मग ऐसा राहे तो सकृत् : झाड अधिक योग्यता ' ( आ. स्थ. ११९ ).

२. ' जया झाडाखाली देवता मांडली असे तेथे न बैसावे ··· निर्देवता झाड : निर्देवता स्थान : निर्देवता देउळी ऐसे विहिले ··· देवतेकडे पाय करी ··· वस्त्र झाडिता देवतेकडे रज जाये ते अनिष्ट चुकले ' ( सदर ).

३. ' गावातुला लिगटले निजावे : ··· गावात भलतेथ राफाड पाहूनि निजावे ' ( आ. स्थ. १२० ).

चालू असते हे खरे; पण ती चार घटकापर्यंत.( ते च्यारीचि घडीया की–आ. १२० ). तोपर्यंत आपण आपल्या अंथरुणावर पडून रहावे. ती गडबड आपल्या कानी पडू देऊ नये. (–तव आपण निद्रा कीजे–आ. १२० ). त्या चार घटकानंतर सगळेच झोपी जातात व मेल्यासारखे होऊन पडतात. साधकाच्या दृष्टीने इतर लोक मेल्यासारखे होतात व लोकांच्या दृष्टीने साधक मेल्यासारखा होऊन पडतो. ( पाठी निजैलेया मेलेया सरीचि : आ. १२० ). लोकांची गडबड चालू असतांना ती कानी पडलीच तर तिकडे पूर्ण दुर्लक्ष करावे. लोकांचे गुणदोष नजरेला आले तर गुणांनी दोष कुसकरावे व दोषांनी गुण कुसकरावे.

गुणांनी दोष कुसकरायचे म्हणजे असे की, लोकांचे दोष नजरेला आल्यास 'हा मनुष्यस्वभावच आहे; हे लोक तरी काय करतील; सगळ्यांचीच स्थिति अशी असते' वगैरे विचार करून त्या दोषाकडे दुर्लक्ष करायचे. आणि दोषांनी गुण कुसकरायचे म्हणजे असे की, लोकांचे कर्मराहाटीच्या दृष्टीने असलेले गुण नजरेला पडल्यास ते दोषरूप आहेत असे साधकाने समजावे. कुणी उत्तम वस्त्रालंकार घातले असले म्हणजे मनात म्हणावे की 'आता हे वस्त्रालंकार घातल्याने याला बरे वाटत असेल; पण उद्या हा काळाच्या दाढेत पडला तर काय करील ?' कुणी देवतेची पूजाअर्चा करीत असला तर साधकाने मनात म्हणावे की, 'आता देवतेची पूजा करतोस पण हीच देवता फळ भोगवतांना तुला आधी दुःख भोगवील ना ?'

## गावात निद्रेसाठी गेलेच तर—

एखाद्या साधकाला अपवादात्मक परिस्थितीत गावामधे निद्रेसाठी जाण्याचा प्रसंग आला तर त्याने सायंकाळी रानातून गुरेढोरे चरून परत येतात त्यांच्या बरोबरच गावात प्रवेश करावा. ( गोरुवासरिसे गावातु रिगीजे : आ. मा ७८ ). त्यातील हेतु एवढाच की किडामुंगी दिसू शकेल

१. 'तेथ रचमच की : ते चारच घडिया : तव आपण निद्रा कीजे : तेणे काहीचि नाइकीजे : का ते मृतवत् की' ( आ. स्थं. १२० ).

२. 'तेथीचे गुणदोष झाडून निघणे ते झाडणे : कनणे परी झाडावे : दोषे गुण कुसकरावा : गुणे दोष कुसकरावा : जेणे गुणे धर्महानी तेथिचे दोष काढावे' ( आ. स्थ. १२० ).

अशा वेळेसच साधकाने आपल्या निद्रास्थानी जावे. म्हणजे चालतांना होणारी या क्षुद्र जीवजंतूंची हिंसा चुकवता येईल. (शो. आ. पा. १७). ज्यांना बाहेर भीति वाटते त्यांनीच गावालगत किंवा गावात निद्रा करावी असे नाही; तर प्रसंगोपात्त म्हणजे पावसाळा वगैरे असल्यास, किंवा गावाबाहेर व्याघ्रसर्पादिकांचा उपद्रव असल्यास, अथवा इतर कारणांनी मनात तर्क-वितर्क उपजण्याचा संभव असल्यास चर्यादृढांनीहि गावात झोपायला हरकत नाही.

## देउळी निद्रा न कीजे

त्यापैकी कुणीहि कोणत्याहि परिस्थितीत गावातील देवळात निद्रा करता कामा नये. रात्रीच्या वेळी आणि एरवीहि तेथे देवादिकांना नानाविध खाद्यपेयांचा भोग चढविण्यात येतो. त्यासाठी उत्तम वस्त्रालंकार घालून सविकार स्त्रिया तेथे येतात. त्यामुळे परमेश्वरमार्गातील साधकाच्या मनात विकार उत्पन्न होऊन प्रसंगी त्या स्थानाच्या निर्मळपणामुळे, मूर्तीच्या रेखीव-पणामुळे वगैरे विकल्प देखील संचरण्याचा संभव असतो. किंवा देवतेविषयी तुच्छताबुद्धि बाळगून तो त्या ठिकाणी राहिल्यास त्याच्या त्या ' अलेखन-' पणांमुळे देवता त्याला अपूर्व विघ्न संपादन करण्याचा संभव असतो.

दुसरी गोष्ट अशी की ही गावातील देवळे बहुधा सुंदर चित्रांनी शृंगारलेली असतात, तेथे लाकडाच्या व पाषाणाच्या विलोभनीय मूर्ति ठेव-लेल्या असतात. 'चित्रे' नुसती रेषांची व रंगांची असतात तर 'लेप' म्हणजे काष्ठपाषाणादिकांच्या मूर्ति; ह्या अधिक सविकार असतात. त्यात अवय-वांचा उठाव विशेष असतो. ही चित्रे व ह्या मूर्ति बहुधा सविकार स्त्रीपुरु-षांच्या असतात. त्यांच्या दर्शनाने साधकाच्या मनात विकार संचरतो. रात्रीच्या वेळी तर या रजोरूप विकाराची तीव्रता विशेष निर्माण होते. म्हणून रात्री – पण रात्रीच नव्हे तर एरवीहि – साधकाने अशा

१. ' दुसरे : न लेखनेनि क्षोभे : यथा उपाधि न मानिता तो क्षोभे तैसा-ठावो ' ( आ. बं. ३८ ).

२. ' चित्रापासौनि लेप थोर : तेथ नसुद्धिया रेघा : येथ अवयवशुद्धि ' ( आ. स्थ. ४० ).

लेपाच्या देवळात निद्रेसाठी किंवा इतर कोणत्याहि निमित्तानें जाता कामा नये. ( लेपाचा देउळी न बैसावे : आ. ४० ).

## देवताशी वर्तन

काही कारणामुळे साधकाला देवतेच्या देवळात जाण्याचा प्रसंग आलाच तर त्याने अत्यंत सावधगिरीने वागावे. देवता ह्या परमेश्वर नाहीत, म्हणून मुक्तीसाठी त्यांची भक्ति करणे इष्ट नाही हे खरे. पण म्हणून साधकांनी त्यांना तुच्छतापूर्वक क्षुद्र लेखावे असे नाही. किती झाले तरी त्या परमेश्वराच्याच शक्ति आहेत. त्यांच्याशी साधकाचे वर्तन शिष्टाचार व सदाचार यांना धरूनच असले पाहिजे. म्हणून, जेणे करून देवतेचा—देवताप्रतिमेचा निरोध होईल, तिचा अपमान होईल असा शब्द साधकाने आपल्या मुखावाटे काढू नये. (ऐसे न भणीजे की गा डखलेया : देवतेसी निरोधु होए : आ. २२८ ). तशी क्रियाहि आचरू नये. प्रतिमा, तीर्थ, देवता इत्यादींची चेष्टा करू नये. त्यांना उपहासाने हसू नये. देवळात गेल्यावर देवतेच्या प्रतिमेला हात लावू नये, तिच्याजवळ बसू नये. आपल्या पायाने उडालेला धूलीकण प्रतिमेवर पडू देऊ नये. देवताप्रतिमेकडे पाय पसरून निजूबसू नये. तसे केल्यास देवतेला निरोध होतो, संकोच होतो. त्या निरोधामुळे देवता फावल्या ठिकाणी विघ्न करते. देवताअधिष्ठित उदकात एकदा मार्तंड शौच्याला बसला. म्हणून तात्काळ त्याच्या समोर नग्न देवता उभ्या राहिल्या. पण मार्तंड हा परमेश्वराचा अनुयायी म्हणून त्याचे अनिष्ट चुकले, ती गोष्ट निराळी. कोळाई नावाच्या देवताप्रतिमेच्या बोंब्रीत डखल्याने अंगुळी घातली त्याचाहि परिणाम तोच झाला. ( ली. च. भाग २ पा.५५ ). म्हणून देवळात गेल्यावर किंवा एरवीहि देवतेचा निरोध करू नये.

## संपन्नांच्या घरी जाऊ नये.

त्याने देवळात निद्रेसाठी जाण्याचा जसा निषेध आहे तसाच संपन्न पुरुषाच्या घरी जाण्याचाहि निषेध आहे. देवळात जायचे नसल्यामुळे

**१. ‘ ऐसे न भणिजे डखळेया : म्हणजे जेणे देवतेशी निरोध होय तो शब्द न बोलावा : ते क्रिया न करावी : हात न लावावा : जवळी न बैसावे : रज जावों नेदावे : निरोध म्हणजे संकोच ’** ( आ. स्थ. २२८ ).

साहाजिकच साधक एखाद्याच्या घराचा, तेथील ओट्याचा किंवा ओसरीचा आश्रय घेऊन झोपू म्हणतो. असे निद्रास्थान निवडतांना त्याने 'संपन्नाचा घरी न वसावे' ( आ. मा. १६२ ) श्रीमंताच्या घराचा आसरा घेऊ नये. तसेच ज्या घरी फक्त नवराबायको एवढी दोनच माणसे राहत असतील त्या घरीहि त्याने जाता कामा नये. (केवळ वैरेते वैरेते वर्तति तेथ नसावे : आ. मा. २३९ ). वीतरागी असूनहि जे राजस मनोवृत्तीचे असतील त्यांच्याहि घरी जाऊ नये. ( राजसधर्मी निवृत्तांचिया ठाया जाओ नए : शो. आ. मा. ३२ ). सारांश जेथे जेथे गेल्याने रजोरूप विकार निर्माण होण्याचा संभव आहे ती सगळी स्थाने निद्रेसाठी व इतर वेळच्या वस्तीसाठीहि साधकाने त्याज्य मानावी. राजसतामस स्थानांचा त्याने आश्रय करू नये. गावातील धर्मशाळेतहि निद्रेसाठी जाऊ नये. कारण त्यामुळे अन्यमार्गीयांचा संसर्ग होण्याचा संभव असतो.

## मोठ्या पहाटे पुन्हा गावाबाहेर

अटन व विजन हा साधकाचा मुख्य विधि आहे. त्याने नेहमी विजनात झाडाखाली असले पाहिजे. निद्रेसाठी गावात जायला त्याला स्वामींनी परवानगी दिलेली आहे ती अपवादात्मक परिस्थितीत, हे त्याने विसरता कामा नये. तो निद्रेसाठी गावात गेल्याबरोबर त्याला निद्रा येते असे नाही. ती येण्याचा त्याने प्रयत्नपूर्वक अभ्यास करावा. निद्रा न आल्यास त्याने निदान भोवतालच्या लोकांच्या गडबडीकडे लक्ष देऊ नये. नाहीतर त्यांचे वर्तन पाहून त्यातच तो रममाण होण्याचा संभव आहे.

सकाळी, इतर लोक उठण्यापूर्वीच साधकाने उठून आपल्या मार्गाला लागावे. कारण आता, ज्या भीतीमुळे तो गावात निद्रेसाठी आला होता त्या भीतीचा काळ संपलेला असतो. आणि म्हणून पहाटेला चिमण्या चिवचिवायला लागतात न लागतात तोच त्याने आपल्या शरीराची मोळी गावाबाहेर नेऊन टाकावी. नुसती गावाबाहेरच नव्हे तर दूर एखाद्या झाडाखाली नेऊन टाकावी. (सिवनी चिंचना आपुली मोळी गावा बाहिरी : झाडातळी घालावी : आ. मा. ८२ ). त्याच गावी न राहता आपले निरुद्देश अटन चालू ठेवायचे असल्यास त्याने 'सवेळेचि उठौनि मार्गी उभया ठाकीजे'— सकाळीच उठून रस्त्यावर उभे रहावे; 'सांगातु पाहीजे'— सोबती पहावेत

आणि मार्ग चालू लागावा (आ. मा. ८१.) ' सांगातु पाहीजे ' चा आचार मुख्यतः स्त्रियासाठी सांगितलेला आहे. पण व्यापक अर्थाने तो सर्व साधकांना लागू पडतो.

### अवेळ : सवेळ : दुपार चुकवावी

अटन करीत असतांना साधकाने अवेळ, सवेळ व दुपार चुकवली पाहिजे. यावेळी अटन करता कामा नये ( अवेळ : सवेळ : दुपाहारू इयें तीन्ही चुकवावीं : आ. मा २०४ ). अवेळ म्हणजे संध्याकाळ, सवेळ म्हणजे प्रातःकाळ आणि दुपाहार म्हणजे दुपारी १२ वाजताची वेळ. या तिन्ही वेळा अटन न करण्याचे मुख्य कारण असे की या वेळी भुतेखेते स्वैरपणे संचार करीत असतात. महात्म्यांच्या ( आणि इतरांच्याहि ) अटनामुळे त्यांच्या या स्वैर संचाराला बाध येतो आणि म्हणून त्यांच्याकडून उपद्रव होण्याचा संभव असतो. यासाठी ह्या तिन्ही वेळा अटनासाठी त्याज्य म्हणून सांगितल्या आहेत. अटनासाठीच नव्हे तर इतर कारणासाठीहि या वेळी भ्रमण करता कामा नये. उदा: भिक्षा मागण्यासाठी देखील या वेळा टाळल्या पाहिजेत.

### एकाकी अटन

अशा रीतीने महात्म्याने नेहमी अटन करीत असावे. शक्य तोवर त्याने एकट्यानेच अटन करावे. अनेकांच्या सहवासात अटन केल्यास एकमेकाशी भांडण तंटा होतो, दोघेजण असले तरीहि गप्पागोष्टी व्हायला सवड सापडतेच. अनुषंगानेच स्नेह उत्पन्न होऊन त्याची वाईट फळे हळूहळू दिसू लागतात. ' बहुतांचा मेळी : एकमेकेसी उपजे काळि : दोघा असता जवळी : गोष्टी घडे ' ( उद्ध. गी. ४८२ ). ' दुजेयाचा संगी : पडे स्नेहाची वज्रांगी : गोष्टी मातु करी वाउगी : वेळु फेडावया ' ( उद्ध. गी. १८७ ). जो एकटाच जन्म क्षेपतो तो मोक्षाचा अधिकारी होतो. ' संसारत्रस्त अनुतापी : जो एकला जन्म क्षेपी : तो मोक्षाचा निक्षेपी : संपनु होए ' ( उद्ध.गी.४८३ ) असे असल्यामुळे साधकांनी निःसंग होऊन एकाकिता साधावी ' म्हणौनि एकाकिता निःसंगी : साधावी वीतरागी ' ( उद्ध. गी ४८८ ) म्हणजे त्याने एकट्याने अटन–विजन करावे हाच सर्वोत्कृष्ट आचार होय. तथापि हे ज्यांना साधणार नाही त्यांनी संगसांघात जोडावा, नाही असे

नाही. पण हे संप्रसांप्रातिये सात्त्विक वृत्तीचे असतील अशी काळजी मात्र त्याने घेतली पाहिजे.

### अपवाद

जो साधक एकटाच अटन-विजन करतो तो असतीपरी उत्तम रीतीने आचरून विजयी होऊ शकतो. 'एकला विजया ' ( आ. मा. १३१ ) असे श्रीचक्रधरस्वामींनी म्हटले आहे. आचरत्या पुरुषाला एकटे रहायला सांगण्यात, त्याचे इतर जीवाचे आलंबन सुटून विकार-विकल्पादि दोष चुकावे हाच मुख्य हेतु असतो. पण कित्येकदा काहींच्या बाबतीत हा एकटे-पणाच विकार-दोषाला कारणीभूत होण्याचा संभव असतो. उदा : केसोबास हे एक वेळ एकटे अटनाला गेले असता एका गावातील व्यापाऱ्याच्या मुलीचे त्यांच्यावर मन बसले. केसोबास ज्या देवळात निद्रेसाठी गेले होते रात्री तेथे ती गेली. आणि एकदम त्यांच्या मांडीवर बसली. केसोबास या प्रसंगातून युक्तीने निसटले ही गोष्ट वेगळी. ( स्मृ. स्थ. १०५ ).पण हा प्रसंग त्यांच्यावर ओढवला तो त्यांच्या एकटेपणामुळेच. तेच, त्यांच्याबरोबर आणखी कुणी असता तर असा प्रसंग त्यांच्यावर येऊ शकला नसता. नागदेवाचार्यांवर देखील एकाकी अटनामुळे एकवेळ असाच प्रसंग ओढ-वला होता. ( स्मृ. स्थ. १०६ ). तेहि त्यातून युक्तीने निसटले होते. तथापि हे निसटणे केसोबास, नागदेवाचार्य यांच्या सारख्या विरक्ताचार्यां-नाच शक्य होते. म्हणून त्यांच्या सारख्यांनी एकाकी अटन-विजन करायला हरकत नाही. इतर साधकांनी म्हणजे ज्यांना दोष टाळून एकाकी अटन करणे शक्य नसेल त्यांनी तसे करता कामा नये. नाही तर जो दोष टाळ-ण्यासाठी एकटेपणा स्वीकारायचा तोच विकारदोष त्यामुळे नेमका व्हायचा. आपल्या स्वतःच्या अनुभवानंतर नागदेवाचार्यांनीच ' एकलेया अटन न करावे गा ' ( स्मृ. स्थ. १०६ ) असा निर्बंध आपल्या शिष्यांना घालून दिला होता. दोनदोन पुरुषांनी मिळून व चारचार बायांनी मिळून अटन करावे, अशी त्यांनी व्यवस्था केली होती.

### स्त्रियासाठी सजन-विजन

अनुसरलेल्या ' पुरुषा ' प्रमाणे बायांनी विजनात जाण्याची गरज नाही. त्यांचे ' विजन ' देखील ' सजन ' पाहिजे. ( स्त्रिया सजन विजन

होआवे: आ. २६९) म्हणजे, त्यांनी विजनात असावे पण जेथे लोक आपणाला सहज पाहू शकतील अशाच ठिकाणी असावे. लोकांच्या दृष्टी आड होता कामा नये. झाल्यास त्यांच्याकडून प्रमाद होण्याचा संभव असतो. एकटी स्त्री जर विजनात सापडली म्हणजे लोकापासून फार दूर अशा ठिकाणी आढळली तर तिच्यावर कोणीहि बलात्कार करू शकतो. म्हणून अनुसरलेल्या बायांनी कोणाच्याहि दृष्टीआड ठिकाणी जाऊ नये.

## कवाडाच्या देवळात बसू नये

ज्या देवळाला आणि घराला कवाडे आहेत त्या देवळात आणि घरात अनुसरलेल्या बायांनी बसू नये.( कावाडाचा देउळी न बैसावे : आ. २७०). कारण, नाही तर कवाड लावून प्रमाद करण्याची त्यांना बुद्धी होणे संभवनीय होते. हा संभव देखील टाळण्यासाठी चारहि बाजूंनी खुल्या असलेल्या देवळात किंवा घरात त्यांनी बसावे. देवळाला कवाडे असल्यास त्यात अंधार असतो आणि त्यात कुणी पापी वासनेने आधी लपून बसलेला असला तर तो लक्षातहि येत नाही. म्हणूनहि कवाडाच्या देवळात बायांनी प्रवेशच करू नये. तसेच त्यांनी रात्री झाडाखालीहि निद्रा करू नये.[२] त्यांनी रजतमहीन अशा साधुसंताच्या घरी ओसरीमधे निद्रा करावी. तिथेहि एकट्या बाईने निद्रा करता कामा नये. केव्हांहि कमीत कमी दोन बायांनी तरी एकत्र असलेच पाहिजे. एकट्या स्त्रीने कधीहि राहू नये.

## समय स्थानी राहू नये

जिथे प्रसंगविशेषी चार लोक एकत्र येऊन बसण्याचा संभव असतो अशा ' समय ' स्थानीहि बायांनी बसू नये. अशा ठिकाणी बसल्यास प्रसंगविशेषी जर चार लोक तेथे आले तर त्यांना ' येथून तुम्ही दूर व्हा ' असेहि म्हणता येत नाही. कारण, चार लोकांचे जमण्याचेच ते ठिकाण असते. त्यावर या बायांना सत्ता कशी गाजवता येईल ? बरे ते

१. ' सजन म्हणजे लोक आपणेयाते देखे ऐसा ठायी विजन बाइयासी : दूरि गेलेया प्रमाद आक्षेपे : एकली स्त्री भलतेया टाकिती ' (आ. स्थ. २६९).

२. ' तैसेच बाइयासि झाडहि निराकरीले : का ओसरी : कवाडाचे निराकरण : पावसाळा दोघी बाईया वाचौनि सांगातच नाही ' (आ. वं. २७० ).

तेथेच राहिले तर बायांना त्यांच्या सान्निध्यात राहण्याचा प्रसंग येतो. आणि मग नाही नाही तशा गोष्टी वगैरे होण्याचा संभव उद्भवतो. हे टाळण्यासाठी बायांनी आरंभीच समयस्थानी न बसण्याची काळजी घ्यावी. (समय स्थानी न बैसावे : आ. २७१ ).

## ओसरीवर बिऱ्हाड

अनुसरलेल्या बायांनी रजतमहीन अशा एखाद्या सदाचरणी महात्म्याच्या ओसरीवरच निद्रेसाठी बिऱ्हाड करावे हे आपण पाहिलेच. ( साधा संताचिये वोसरीये बिढारु कीजे : आ. २७२ ). त्याच्या घरात त्यांनी झोपू नये. कारण रात्री अंधारात एकमेकांचे पाय एकमेकांना लागले तर विकार उद्भवून प्रमाद होईल. किंवा त्याच घरातील एखाद्या माणसाने घरात चोरी केली तर तो आळ त्या बायावर येण्याचा संभव आहे. यासाठी कमीत कमी दोन बायांनी मिळून आणि तेहि ओसरीवरच बिऱ्हाड करावे. घराच्या आत अंधारात निद्रा करू नये.

## एकट्या स्त्रीला लांब पाठवू नये

संग-सांघातात असतांना किंवा मार्गात असतांना लहानमोठी कामे उद्भवताच. ती ' स्वयं दास्यं तपस्विनाम् ' ( आ. २७८ ) या वचनानुसार प्रत्येकाने आपापली उरकली पाहिजेत. अर्थात् पुरुषांना आणि स्त्रियांना दोघांनाहि हा सामान्य नियम लागू आहे. क्वचित्, काम करवून घ्यायचे असल्यास बायाकडून करवून घेऊ नये. बरे, त्यांच्याकडून काम करवून घेणे अवश्यच असले तर कोणत्याहि कामासाठी त्यांना लांब मात्र पाठवू नये. त्यातून एकट्या स्त्रीला तर मुळीच पाठवू नये. ( महात्मे हो एकली स्त्री तेन्हडेया वेळा तैसेया स्थाना न धाडिजे की : आ. २७७ ). तशात अवेळी म्हणजे रात्रीअपरात्री तिला एकटी पाठवणे अत्यंत अनुचित होय. ज्या ठिकाणी तिला पाठवायचे ते ठिकाण कोणत्याहि दृष्टीने भयजनक असले तर तिला एकटीला तेथे पाठवणे अनुचित होईल. एक तर स्त्रीत्वाचा दोष तिच्या ठिकाणी असतो. ती स्त्री असल्यामुळेच तिला भीतिहि विशेष वाटणे साहजिक आहे. अंधारात पाठवल्याने किडामुंग्यांचा संहार होऊन ते पातकहि माथी बसते. यासाठी स्त्रियांना कामासाठी वेळी-अवेळी लांब पाठवणे अवश्य टाळले पाहिजे.

## प्रकरण ६ वे

# संग-सांघात व भेट

> तर भेटलियाचे कार्ये कायीं : आणित्येची उपजे नवलायी
> दाहावीये अवस्तेचा उपायी : दक्ष होये ( ज्ञा. प्र. १४५ ).

### प्रास्ताविक

साधकाने एकाकी व नित्य अटन-विजन केले पाहिजे हा सामान्य विधि मागील प्रकरणात आपण पाहिला. केवळ एकटे असल्यामुळेच क्वचित् विकाराचे आलंबन होण्याचा संभव असतो; त्यातून ज्यांना पार पाडण्या-इतके धैर्य नसेल त्यांनी दोघादोघांनी मिळून अटनास जाण्यास हरकत नाही; किंबहुना, कोमल चर्यावंतांना ते आवश्यक होय हेहि आपण पाहिले. पण केवळ विकारप्रसंग टाळण्यासाठीच नव्हे, तर इतर कारणासाठीहि साधकांनी इतरांच्या गाठीभेटी घेतल्या पाहिजेत व संग-सांघात जोडले पाहिजेत. ' संग ' म्हणजे आपण दुसऱ्याजवळ राहणे आणि ' सांघात ' म्हणजे दुसऱ्याला आपल्याजवळ ठेवणे. साधकाने एखाद्या उत्तम चर्यावंताचा किंवा अधिकरणाचा ' संग ' करायचा असतो तो त्याच्यापासून वैराग्याचे धडे शिकण्यासाठी; आणि एखाद्या अधिकरणाने साधकाला ' सांघात ' द्यायचा असतो तो त्याला शास्त्र घोकवण्यासाठी.

आपण अशी कल्पना करू या की, एखाद्याला परमेश्वराचा बोध होऊन तो अनुसरला आणि लागलीच असतीपरी आचरण्याच्या निमित्ताने एकाकी अटन-विजन करायला लागला. त्याला असतीपरी योग्य रीतीने आचरता येणे शक्य होईल काय? अर्थात् नाही.कारण त्याला बोध झालेला असला

तरी असतीपरी कशी आचरायची हे यथार्थतेने कळलेले नसते. कळले तरी त्याचा अभ्यास नसतो. हा अभ्यास श्रेष्ठ व दृढ चर्यावंताजवळ राहिल्याशिवाय कसा होणार ? तसेच बोधामुळे चहु पदार्थांचे यथार्थ ज्ञान झाले असले तरी त्याच्या ठिकाणी शास्त्र दृढावलेले नसते. हा शास्त्राभ्यास, हे ज्ञान दृढ झाल्यावाचून त्याला आचारधर्म पाळता येणे अशक्य आहे. म्हणूनच श्रीचक्रधरस्वामींनी ' ज्ञानेविण वैराग्य ते काइ करावे बापेया ' ( आ.२२१ ) असे म्हटले आहे.

## खरा आचार्य कोण ?

अर्थात् आचाराचा आणि शास्त्राचा अभ्यास करण्यासाठी साधकाने ज्या एखाद्या गुरुजवळ, म्हणजे अधिकरणाजवळ किंवा आचार्याजवळ राहणे अवश्य आहे तो दैवराहटीचाच, म्हणजे परमेश्वरमार्गीचा ज्ञानी असावा हे सांगणे नकोच. कर्मराहटीचा आचार्य हा मुळी आचार्यच नव्हे. कारण त्याला चहु पदार्थांचे ज्ञान मुळीच नसते. जे असते ते चुकीचे असते. त्या चुकीच्या ज्ञानानुसार आपल्या अनुयायांना आचरण करायला लावणारा हा कर्मराहटीचा आचार्य वस्तुतः त्यांच भले करीत नाही, तर त्यांची तो प्रतारणा करीत असतो असेच म्हटले पाहिजे. अशा आचार्यांना नरक प्राप्त होतात. ( आचार्या नरक : वि. १५७ ).

सर्वच प्रकारच्या प्रतारक आचार्यांना नरक होतात. एखादा आचार्य मुद्दाम चांगली गोष्टहि वाईट असल्याचे सांगतो, एखादा दुसऱ्याला जाणून-बुजून इष्ट कार्यापासून परावृत्त करतो. एखादा आचार्य या दोन्ही गोष्टी करतो. यापैकी काही पूर्ण अज्ञानी असतात, कित्येक उगीचच आपला गौरव दाखविण्यासाठी इतरांची प्रतारणा करतात. कित्येकांना यथार्थ ज्ञान असूनहि ते तिकडे लक्ष न देता स्वत: अनिष्टाकडे वळतात व इतरांनाहि वळवतात. हे सगळे प्रतारक आचार्य म्हटले पाहिजेत. मग ते कर्मराहाटीचे असोत की दैवराहाटीचे असोत. अधिकारी पुरुषाला जाणत्या आचार्याने विधिनिषेधांची यथार्थ जाणीव अवश्य करून दिली पाहिजे. तेव्हां साधकांना अनिष्टापासून काढून इष्ट अशा परमेश्वरमार्गाकडे लावणारा तोच खरा आचार्य होय. ( तू प्राणियाते अनिष्टापासौनि काढौनि इष्टी लाविता आचार्या की : वि. १५८ ). अशाच आचार्याजवळ राहून साधकाने आचारधर्म व शास्त्र यांचा अभ्यास करावा.

## गुरुसन्निधान हे ईश्वरसन्निधान

अशा ज्ञानसंपन्न आणि विशेषतः आचारविचारसंपन्न गुरूचे सन्निधान हे जणु ईश्वराचेच सन्निधान होय, या भावनेने साधकाने आपल्या गुरूची सेवा जन्मभर केली पाहिजे. ' अधिकरणाची सान्निधीः तेचि सन्निधान ऐसी बुद्धीः गुरुभक्ती देहावधीः न संडी जीवे ' ( ज्ञा. प्र. ९०१ ) असे विश्वनाथबासाने म्हटले आहे. गुरुपासून दूर जाण्याचा प्रसंग आला तर शिष्याचे अंतःकरण गुरुजवळ लागलेले असावे. गुरूची भेट पुन्हा केव्हां होईल याविषयी त्याच्या मनात निरंतर तळमळ असावी. हाच अर्थ विश्वनाथबासाने ' गुरुवेगळा जर होयेः तर आत्मा तेथ ठेऊनि जायेः जेवि वत्सापासी गायेः निक्षेपी चित्त ॥ मग दुरौनि पद्मिनी जैसीः मित्राच्या उदयो आशंसीः तेवि तो प्रीतितव मानसीः भेटी इच्छी ॥ जेथे गुरु अथवा गुरुकुळः ते स्थानचि वाहे अढळः जैसे जननियेते बाळःदुरौनिया ' ( ज्ञा. प्र ९०२—९०४ ).

## गुरूवर ईश्वरबुद्धि नको

गुरुसन्निधान हे ईश्वरसन्निधाना ' सारखे ' आहे, खरे ईश्वरसन्निधान नव्हे, हे नीट लक्षात ठेवले पाहिजे. अर्थात्, गुरु म्हणजे परमेश्वर नाही. शिष्याने गुरूवर ईश्वरबुद्धि कधीहि येऊ देता कामा नये. तसे होणे म्हणजे विकल्पदोष आंगवणेच होय. परमेश्वरावतारालाच गुरु केलेले असले तर गोष्ट निराळी. पण अवताराव्यतिरिक्त इतर गुरूंना ईश्वर मानणे म्हणजे सामान्य जीवांना परमेश्वर समजणे होय. हे अन्यथाज्ञान आहे. ते आपल्या ठिकाणी शिष्यांनी कधीहि उत्पन्न होऊ देता कामा नये. ज्या अधिकरणाच्या मुखाने आपणाला बोध झालेला असेल तोहि ईश्वर नसून बोधदानासाठी निमित्त झालेला जीव आहे ही जाणीव साधकांनी निरंतर मनात बाळगणे अवश्य आहे.

## गुरुजवळचा आचार

गुरुजवळ राहणाऱ्या साधकाने आपल्या गुरूची आज्ञा पाळली पाहिजे हा मुख्य नियम आहे. ' भाजिये गुरू मानावा ' ( आ. मा. १२४ ); ' गुरुरनुगंतव्य : ' ( आ. मा. १२६ ); ' गुरु आज्ञा भंगीलिया यसने

अंतर पडिले असे आनि आज्ञा प्रतिपाळिलिया यसनी सिद्धी जाली' ( शो. आ. मा. २५ ); 'गुरु आज्ञा वर्तावे' ( शो. आ. मा. १५ ); 'गुरु अनुसंगीक वर्तावे' ( शो. आ. मा. १६ ) इत्यादि वचनावरून हा विधि स्पष्ट होईल. ज्याच्या जवळ राहून आचाराचे आणि विचाराचे म्हणजे परमेश्वरशास्त्राचे धडे घ्यायचे त्याच्या आज्ञेत साधकाने सदासर्वकाळ राहणे अत्यंत आवश्यक आहे. 'एवं हे निःपाप आचार स्थिती : जेणे दाविली निगुती : तया आचार्यांची उपास्ती : करी हितक्ष भावे' ( ज्ञा. प्र. १०९ ) असे पंडित विश्वनाथाने म्हटले आहे. आज्ञापरिपालनाव्यतिरिक्त ही उपास्ती आणखी कशी करायची ? तर गुरूने आपणावर जे उपकार केले आहेत त्यांचे अहर्निश स्मरण करून ! 'तेची उपास्ती ऐसी : उपयोग भरोनि मानसी : स्मरे अहर्निशी : केलेया गुणाते ॥ सकुलीन कृतज्ञ जेवी : नित्य परोपकार आठवी : तेवी अखंड हृदयी भावी : गुण तयाचे' ( ज्ञा. प्र. ११०; १११ ). अर्थात् गुरूची आज्ञा पाळणे आणि त्याच्या उपकाराची कृतज्ञताबुद्धीने जाणीव ठेवणे हा शिष्य-साधकाचा महत्त्वाचा विधि होय.

## गुरुभक्ति कणैरीची

आपल्या गुरूची सेवा कशी करावी यासंबंधी श्रीचक्रधरस्वामींनी कणैरीचा आदर्श आपल्या शिष्यासमोर ठेवला होता. ( गुरुभक्ति कणैरीची शो. आ. पा. ९६ ). नागार्जुन या नावाचे एक सत्पुरुष होते. त्यांचा कणेरी नावाचा एक अत्यंत आज्ञाधारक शिष्य होता. एके दिवशी कणेरी भिक्षेसाठी गेला असता एका घरासमोर उभा राहिला. तेथे त्याने भिक्षा मागितली. घरात उत्तम पदार्थांचा स्वयंपाक चालू होता. घरातील बाईने, भिक्षाशब्द ऐकताच वडा आणून तो त्या कणेरीला भिक्षा म्हणून घातला. भिक्षेहून परत गेल्यावर कणेरीने नागार्जुनाला तो वडा दिला. तो खाऊन त्याने म्हटले 'वा, वडा किती उत्तम झाला आहे !' आपल्या गुरूचे हे शब्द ऐकताच कणेरीने ताडले की गुरुजींना आणखी वडा मिळाल्यास पाहिजे आहे. त्याने ते प्रसन्न होतील. म्हणून तो तसाच निघाला आणि त्या घरापुढे येऊन पुन्हा त्याने भिक्षा म्हणून वडा मागितला. घरातल्या बाईने म्हटले 'वडा कुठला ?' कणेरीने सांगितले, "मघा मी भिक्षेला आले

असतांना आपण मला जो वडा दिला तो मी माझ्या गुरूला अर्पण केला. तो खाऊन त्यांनी म्हटले की ' वडा फार उत्तम झाला आहे. ' मला आणखी वडा पाहिजे तो त्यांच्यासाठी. " यावर ती बाई बोचकपणे म्हणाली "पण जे जे उत्तम असेल ते ते आपणाला नेहमी मिळते असे थोडेच आहे.' कणेरी म्हणाला ' का मिळणार नाही ? ' बाईने विचारले ' आता हे पहा, तुमचे डोळे किती सुंदर आहेत! द्या पाहू तुह्मी आपला डोळा मला. ' बाईने असे म्हणताच कणेरीने नख खुपसून आपला डोळा तावडतोब काढला आणि तो त्या बाईच्या हातावर ठेवला. ' हे पाहताच ती बाई भ्याली. तिने तात्काळ दोन वडे त्याच्या हातावर घातले. ते घेऊन कणेरी नागार्जुनाकडे आला आणि त्याने त्यांना ते वडे दिले. कणेरीने आपल्या काढलेल्या डोळयाच्या खाचेवर एक हात ठेवला होता तो पाहून नागार्जुनाने विचारले, ' हे रे काय ? ' तेंव्हां कणेरीने आपली सगळी हकीकत गुरूला सांगितली (ली. च. उत्त. ४२० ). गुरूला वडा पाहिजे हे नुसते जाणून तो मिळवण्या साठी प्रत्यक्ष आपला डोळा काढून देणारा कणेरी हा खरा गुरुभक्त–गुरूची सेवा करावी ती अशी अनन्यभावाने. त्याच्या प्रत्यक्ष आज्ञेची वाट न पाहता त्याचे इंगित ओळखून त्याप्रमाणे आचरण करणारा साधक तोच खरा शिष्य होय.

## अधिकवृत्ति नको

गुरूच्या जवळ असतांना त्याच्यापेक्षा अधिकवृत्तीने शिष्याने कधीहि आचरण करू नये ही महत्त्वाची गोष्ट होय. चर्या आचरतांना गुरूला भाकर द्यायची, आपण मात्र पोळी खायची; गुरूला तेलहि नाही आणि आपण मात्र तुपावर हात मारायचा, ही अधिकवृत्तीची उदाहरणे होत. गुरूच्या वस्त्रापेक्षा भारी, उंची वस्त्रे परिधान करणे, गुरूचा अपमान होईल अशी बैठक घालून त्याच्यासमोर बसणे, गुरुजवळ असलेल्या शिष्यापेक्षा आपला स्वत:चा शिष्यपरिवार मोठा करणे, गुरुपेक्षा अधिक मानमान्यता, अधिक पूजापुरस्कार स्वीकारणे, या सर्व गोष्टी अधिकवृत्तीतच अंतर्भूत होतात. शिष्याने यापैकी काहीच करू नये. या सर्व बाबतीत गुरूपेक्षा नम्रतेने

१. ' अधिकवृत्ति म्हणजे गुरूचेयापासि आगळे अन्न : उंच वस्त्र : अधिक शिष्य : अधिक मान्यता : पूजापुरस्कार ' ( आ. स्थ. १७० ).

राहणे हेच त्याचे कर्तव्यकर्म होय.(गुरूपासि अधिक वृत्ती न वर्तावे:आ. १७०).

## अपवाद : आचाराची अधिकवृत्ति

श्रीचक्रधरस्वामींनी निषिद्ध म्हणून सांगितलेली अधिकवृत्ति अधिकारचर्येच्या किंवा वैराग्याचरणाच्या बाबतीतली नाही. म्हणजे आहाराच्या बाबतीत गुरूचा चर्याधिकार जसा असेल तसाच शिष्याचा असावा किंवा कमी असावा असे नाही. ज्याने त्याने आपापल्या अधिकाराप्रमाणे आहार करावा. गुरु चतुर्थांशी आणि शिष्य पूर्णाहारी असल्यास गुरूपेक्षा शिष्य केव्हांहि अधिक अन्न खाणार; त्याला इलाज नाही. ती अधिकवृत्ति नव्हे. गुरूपेक्षा काही शिष्यांचे वैराग्य अधिक कडक असते. ते त्याने जरूर आचरावे. पण ते केवळ कीर्तीच्या हेतूने आचरू नये. गुरूपेक्षा आपल्या ठिकाणी अधिक ज्ञानवैराग्य असले तर ते शिष्याने केवळ कीर्तिहेतूने प्रकाशित करू नये आपले ज्ञानवैराग्य प्रकट झाल्याने जर विश्व आपल्या गुरूला न भजता आपणालाच भजू लागेल तर शिष्याने असे ज्ञानवैराग्य प्रकट न करता लपवावे व गुरूची मान्यता राखावी. कधीकधी असे होते की, गुरूचे आचरण सदोष असते. म्हणून गुरुकुळातील लोक ज्ञानवैराग्याने श्रेष्ठ असलेल्या त्या शिष्याचा पूजापुरस्कार करून त्याला अधिक मानमान्यता देतात. अशी मानमान्यता त्या शिष्याने गुरुजवळ राहून स्वीकारू नये. ती मानमान्यता स्वतः न स्वीकारता, तो पूजापुरस्कार आपल्या ठिकाणी करवून न घेता त्याने तो आपल्या गुरूच्या ठिकाणी करविला पाहिजे. पण तसे न करता स्वतःच्या ठिकाणी या गोष्टी करवून घेतल्या तर ती अधिकवृत्ति होईल; यात शंका नाही.

अधिकवृत्तीच्या दोषामुळे शिष्याच्या शरीरात रोग उद्भवतो किंवा कधीकधी तर त्याचा प्राणहि जातो. अन्यकथनाच्या दोषापेक्षाहि हा अधिकवृत्तीचा दोष मोठा आहे. त्यामुळे ईश्वराला थोर खंती वाटते. कारण गुरुकुळाला ज्ञानवैराग्यामुळे मान्य असलेल्या गुरूपेक्षाहि श्रेष्ठत्वाची बुद्धि तो अधिकवृत्तीचा शिष्य आपणा स्वतःवर आणतो. हे योग्य नाही. विनम्र

१. ' अधिकवृत्तीचेनि सामर्थ्ये देही रोग उपजे : का तात्कालीक देहचि जाये : यथा कान्ह : कथनापासि अधिकवृत्तीची थोरी खंति : का पा : तो वरिष्ठ बुद्धी आणित असे : गुरूते विपलाबित असे : ' ( आ. स्थ. १७० ).

शिष्याने गुरूपेक्षा अधिकवृत्ती करू नये; इतकेच नाही तर समानवृत्तिहि करू नये. तीहि तितकीच दोषास्पद आहे.

## अधिकवृत्तीने प्राणाशी गाठ

गुरूपेक्षा अधिकवृत्ति केल्याने अविधि उत्पन्न होऊन शेवटी प्राण जाण्यापर्यंत पाळी कशी येते याचे एक अतिशय सुंदर उदाहरण श्रीचक्रधर–स्वामींनी आपल्या शिष्यांना सांगितले आहे. जालंदर या नावाचे अत्यंत वैराग्यसंपन्न असे एक योगी पुरुष होते. त्यांचा कान्हा या नावाचा शिष्य होता. त्याने आपल्या गुरूंपेक्षा आपला शिष्यपरिवार फार मोठा वाढवला होता. त्याने एकूण सातशे शिष्य केले. त्या सर्वांसहित जेव्हां हा निघायचा तेव्हां याचे ऐश्वर्य फार मोठे वाटायचे. योगसामर्थ्याच्या बाबतीत देखील हा गुरूपेक्षा अधिकवृत्तीने वागायचा. एकदा तो बहुडी नावाच्या एका योगिनीच्या उपवनात गेला. त्याने तिला तेथील एक नारळ मागितले. बहुडीला कान्हाची अधिकवृत्ति आणि त्यामुळे निर्माण झालेला अभिमान ठाऊक होताच. तो जिरवण्यासाठी ती म्हणाली 'महाराज, आपणाजवळ सामर्थ्य असेल तर झाडाचे नारळ आपणच तोडून घ्या ना !' हे ऐकताच कान्हाने नेत्रसंकेताने एक नारळ तोडून आपल्या शिष्याच्या हाती दिले. बहुडीने लागलाच दृष्टी आटाहून त्या नारळाकडे पाहिले, तो ते लागलीच जाऊन पुन्हा झाडाला चिकटले. याप्रमाणे कान्हाने पुष्कळ नारळे पाडली; पण ती सर्व बहुडीच्या योगसामर्थ्याने पुन्हा झाडाला जाऊन चिकटली.

आपला हा पराभव कान्हाला फारच झोंबला. तेव्हां तो बहुडीला म्हणाला 'तुझ्या ठिकाणी एवढे योगसामर्थ्य आहे तर चल ये आपण रति-क्रीडा करू. माझे वीर्य तू कसे शोषून घेतेस ते मी पाहतो.' तेव्हां बहुडीचा आणि कान्हाचा रतिसंग्राम सुरू झाला. बहुडी आपल्या सामर्थ्याने त्याचे रेत खाली ओढण्याचा प्रयत्न करी पण कान्हा उर्ध्वरेता असल्यामुळे तो ते पुन्हा वर ओढून घेत असे. असे अनेक वेळा झाले. या स्थितीमुळे बहुडी रोड झाली. तिची स्वामिनी कामाख्या नावाची योगिनी होती. तिला हे कळताच तिने बहुडीला एक कपटयुक्ति सुचवली. त्याप्रमाणे पुढील रति-

१. '**अधिकवृत्ति हे कायी म्हणावे असे परि उपाधिमंताचा ठाई समानता हेचि दोषावह**' ( आ.स्थ. १७० ).

क्रीडेच्या वेळी बहुडीने आपल्या योनीत हिरा ठेवला. उपभोगाच्या वेळी आपले पद्म पाहणारे वीर्य जेव्हां कान्हाने वर खेचले तेव्हां त्यासरशी बहुडीच्या योनीतील हिराहि खेचला गेला. तो त्याच्या इंद्रियाच्या छिद्रात अडकला. त्यामुळे कान्हा लागलीच गतप्राण झाला. ( ली. च. उत्त.४४२). वस्तुतः कान्हा हा बहुडीपेक्षा अधिक योगसामर्थ्यसंपन्न होता. पण गुरूपेक्षा अधिकवृत्ती केल्यामुळे बहुडीसारखीकडून प्राणास मुकला. 'जो गुरुहुनी उच्चपणे वर्तला : म्हणौनि कान्हाचा पिंड नाशला ' ( स. व. ४१२ ). म्हणूनच स्वामींनी आपल्या शिष्यांना सांगितले ' कान्हा कायी बहुडिया जाए ! : परि अविधीतव गेला : गुरुहुनी अधिकवृत्ति न वर्तावे ' ( शो. आ. पा. १४७ ). तेव्हां गुरूपेक्षा अधिकवृत्तीने वागू नये. त्यामुळे ईश्वराला खंती येते. गुरूपेक्षा उणी वृत्ती केल्याने मात्र परमेश्वराला संतोष वाटतो. म्हणून शिष्यांनी नेहमी गुरूपेक्षा उणी वृत्ती ठेवणे हेच चांगले.

## गुरुद्रोहाचे पातक

हेच आणखी निराळ्या शद्बात सांगायचे झाले तर गुरुजवळ राहून शिष्याने त्याच्याशी कोणत्याहि प्रकारचा द्रोह करता कामा नये, असे सांगता येईल. अधिकवृत्ति हा गुरुद्रोहच होय. शिवाय गुरूची आज्ञा मोडणे, त्याची फसवणूक करणे, त्याच्या विरुद्ध त्याच्या अपायाची किंवा घाताची इच्छा करणे, ही सगळी कर्मे गुरुद्रोहात अंतर्भूत होतात. अशा गुरुद्रोहामुळे साधकाला त्या गुरूजवळून आचारविचाराचे ज्ञान कसे मिळणार ? ते तर मिळणार नाहीच उलट गुरुद्रोहाच्या पापाचा मात्र तो धनी होईल. या पापाची फळे त्याला भोगावी लागतील. हे गुरुद्रोहाचे पाप फार मोठे आहे. किंबहुना, खळोबासांच्या म्हणण्याप्रमाणे सर्व पापाहून गुरुद्रोहाचे पाप मोठे आहे. ' जया ईश्वरद्रोहो घडला : तयाचेही पापा क्षयो जाला : परि गुरुद्रोहिया नाही मुचला : निरया पासौनि ' ( स. व. ४०८ ). यावरून ईश्वरद्रोहाचे पापहि गुरुद्रोहाच्या पापापुढे कमी ठरते असे दिसेल. ' जेही विश्वासघात केले : तयाचेयाही निरया निगावे जाले : परि गुरुद्रोहियाचे नरक सरले : आती चि ना ॥ सृष्टी असंत क्रिया जेतुली : ते एकीकडे घातली : परि न तुके काही केली : गुरुद्रोहेसी ' ( स. व. ४०९; ४१२ ). या खळोबासांच्या ओव्यावरून या पापाचा मोठेपणा सहज कळून येईल. गुरूला पाठ

दाखवणे, म्हणजे त्याच्याकडे पाठ करून चालणे हाहि एक प्रकारे गुरुद्रोहच आहे. तो देखील होऊ देऊ नये. ( राजा गुरू यासी पाठ देऊ नये : शो. आ. पा. १३२ ). सभ्यतेचे आणि शिष्टाचाराचे सगळे नियम योग्य रीतीने सांभाळून शिष्यांनी गुरुजवळ शास्त्राचे शिक्षण आणि आचारधर्माचे धडे घ्यावे.

## महारवाड्यातून धर्म काढावा

कित्येक अनुसरलेले पुरुष स्वदेशस्वग्रामादिकांचा त्याग करून देशाच्या शेवटी जाऊन जन्म क्षेपू लागतात. पण त्यांना शास्त्राचे यथार्थ ज्ञान झालेले नसते. त्यामुळे त्यांना विहित विधिनिषेध कळत नाहीत. शास्त्राभावी त्यांना पदोपदी अडचण पडते. बरे एखाद्याला शास्त्र विचारावे तर तेथे जवळपास उत्तम अधिकरण किंवा यथार्थज्ञाता त्याला कोणीच भेटत नाही. कारण पूर्व प्रमादात उत्तम स्थानी उत्तम अधिकरणाची असळग, पातलेपण, आज्ञाअव्हेरण घडल्यामुळे त्या अयोग्यतेस्तव यावेळी उत्तम अधिकरणाचा त्याला योगच येत नाही. श्रीमुखातूनहि त्याला ज्ञान होत-नाही. कारण तितकी कणव त्याने जोडलेली असते. आणि आचरणासाठी तर यथार्थ शास्त्रज्ञान होण्याची आवश्यकता असते. स्वदेशी, स्वग्रामी किंवा स्वसंबंधियात जर एखादा ज्ञात अधिकरण असला व विदेशी अधिकरणाचा योग नसला तर शास्त्रज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी त्याला स्वग्रामादिकात जाऊन स्वसंबंधियात अधिकरणाजवळ राहण्यावाचून गत्यंतर नसते. अगोदरच त्याज्य ठरवलेली ही स्थाने त्याच्या दृष्टीने महारवाड्याप्रमाणे अपवित्र असतात. कर्मजड ब्राह्मणाला ज्याप्रमाणे महारवाड्यात क्रिया करण्याचा अधिकार नसतो त्याप्रमाणे त्या अनुसरलेल्या पुरुषाला स्वदेशस्वग्रामादिकात जाण्याचा अधिकार नसतो. पण तेथे गेल्यावाचून तर शास्त्राभ्यास होऊ शकत नाही. अशा परिस्थितीत त्याने त्या 'महारवाड्यात' जायला हरकत नाही. अर्थात् स्वदेशात, स्वग्रामात, इतकेच नव्हे तर स्वसंबंधियात देखील जाऊन तेथे त्याने प्रयत्नपूर्वक शास्त्राभ्यास अवश्य करावा. वरील

१. 'महारवाडा संबंधियाचेनि योगे जाला : यापरता अपवित्र ठावो नाही म्हणोनि त्याचे निदर्शन दिधले :' ( आ. स्थ. १४९ ).

परिस्थितीत या निषिद्ध स्थानी जाण्याने त्याला दोष लागत नाही. ( महार-वाडाहौनि धर्मु काढावा : आ. १४९ ).

## तेथील दोष परमेश्वर उपसाहतात

स्वदेशाकडे, शास्त्राभ्यासासाठी का होईना, गेल्याने त्याजकडून इतर दोष होण्याचा संभव असतो. तेथील जड पदार्थ म्हणजे आहारविहाराची पूर्वपरिचित स्थाने पाहून पुन्हा त्या उपभोगाची इच्छा होते. तसेच त्याच्यावर ममता ठेवणारे किंवा याला ज्याविषयी ममता वाटते असे स्वसंबंधी लोक आणि ज्याच्याजवळ शास्त्राभ्यास करायचा तो व त्याचे संबंधी लोक, या चेतनांच्या संसर्गानेहि उपभोगाचे अनेक दोष त्याजकडून होण्याचा संभव असतो. तथापि दुसरी काही गति नसल्यामुळे, व 'महार-वाडाहौनि धर्मु काढावा' या वचनाचा आधार घेऊनच तो तिकडे जात असल्यामुळे प्रत्यक्ष चेतनस्त्री-सेवनाव्यतिरिक्त त्याचे इतर सगळे दोष पर-मेश्वर उपसाहतात. या दोषांच्या पहिल्या उल्लेखामुळे तर वस्तुतः कोणताच दोष लागत नाही. दुसऱ्या रसरूप उल्लेखामुळे होणारे दोष त्याच्या शास्त्र-श्रवणामुळे नाहीसे केले जातात. अभिमुखतेचे दोष परमेश्वरसाह्याने नष्ट होतात. आणि भिडेमुळे किंवा इतर काही कारणामुळे स्त्रीव्यतिरिक्त इतर पदार्थांची सेवना घडल्यास त्यामुळे होणाऱ्या दोषांचा नाश त्याला 'अनु-ताप' करून करावा लागतो. अर्थात् अनुतापाने ते सेवनेचे दोष नाहीसे होऊ शकतात. जडस्थानांच्या संबंधामुळे त्याला काहीच दोष लागत नाहीत. कारण परमेश्वराने जाणूनबुजून त्याला तेथे पाठविलेले असते. स्वसंबंधि-यांच्या योगे होणारे दोष त्याच्या शास्त्रश्रवणामुळे नाहीसे होतात.

१. '**राजसे स्थाने निषेधिली : तो दोष नाही : हे सांगितले :** तरि तेचि कवणे वचनी : ना प्रत्यक्ष महारवाडाहौनि धर्म काढावा म्हणीतले येणेच वचने शास्त्र काढी तव ईश्वरीचे सकळ साह्य वर्ते' ( आ. बं. १४९ ).

२. '**महारवाडा द्विरूप : त्यामध्ये स्थान स्वग्रामादिक : सावयाच वोखटे तो थोर दोष ममता असे : निमित्ताच्या ठायी नाही: ऐसाहि तेथ जे मनोरथ उपजती : एकाचा दोषच नाही : एक तो शास्त्रश्रवणे परिहरे : एक सा ह्य जाती : एक अनुतापे परिहरावे**' ( आ. स्थ. १४९ ).

## महारवाड्यात किती दिवस रहावे ?

असे असले तरी त्या अनुसरलेल्या पुरुषाने स्वदेशादिरूप महारवाड्यात फार दिवस राहता कामा नये. तिथे जाऊन त्याने आधी आचारपर शास्त्र आत्मसात् करावे व आचार करता करता विचारशास्त्र=तत्त्वज्ञान आत्मसात् करावे. परमेश्वराच्या पुन:संबंधाला पुरेसे होईल इतके शास्त्रज्ञान होताक्षणीच त्याने तेथून परत यावे व देशाच्या शेवटी राहून जन्म क्षेपावा. त्या महारवाड्यात राहून आपल्या अनुसरणाचा भंग होऊ न देता शास्त्राभ्यास करणे शक्य असेल तर त्याने सगळ्या शास्त्राचा अभ्यास करावा. पण तेथे राहिल्याने अनुसरणाची चर्या जर थोडी थोडी भंग पावत असेल तर मात्र ईश्वराच्या पुन:संबंधाला पुरेसे शास्त्र होईपर्यंतच तेथे रहावे. तदनंतर राहू नये.[१] आणि अनुसरणाचा भंग होण्याचा संभव असेल तर त्याने तेथे न राहता ताबडतोब निघून जावे.

महारवाड्यात अर्थात् पूर्वीच्या स्वदेशस्वग्रामादिकात जाऊन शास्त्राभ्यास करणे अतिशय कठिण असते हे सांगायला नकोच. साधकाला मोठ्या प्रयासाने तेथे अध्ययन करावे लागते. त्यासाठी शास्त्रज्ञाची प्रसन्नता जोडावी लागते. त्याने प्रसन्न होऊन सांगितलेल्या शास्त्रज्ञानाचे ग्रहण जिज्ञासापूर्वक करून त्यावर मनन, निदिध्यसन, चर्चा, मंथन वगैरे करून ते दृढ करावे लागते. म्हणूनच महारवाड्याहून धर्म 'काढायला' सांगितले आहे. कारण तो त्या ठिकाणी गेल्यावरहि आपोआप किंवा सहजसुलभ रीतीने प्राप्त होत नाही. अर्थात् नुकतेच अनुसरण केलेल्या कोमल चर्यावंतासाठी हा विधी नाही, तर तो दृढ अशा प्रयत्नशील पुरुषासाठी आहे.[२]

## ज्ञात यथार्थिया आचार्य

शास्त्राध्ययनासाठी अनुसरलेल्या पुरुषाने महारवाड्यातील अधिकरणाचा सांघात करायला जशी हरकत नाही तशी एखाद्या उपभोगशील सदोष

१. 'जे अनुसरण न भंगता निघे तरि अवघाच काढावा : ईश्वरसंबंधा पुरे तेतुका कणुकणु भंगौनि काढावा' (आ. स्थ. १४९).

२. 'मा तरि हा विधि समस्ता पुरुषास लाभे आन काई : ना दृढ प्रयत्नियावाचौनि न लभे : येराचे सिद्ध अनुसरण तेंच जाईल म्हणौनि' (आ. बं. १४९).

ज्ञानी आचार्यांचाहि किंचित् काळ सांघात करण्याला हरकत नाही. ( आ. १४३ ). असा आचार्य विरक्त असला तर उत्तम. पण नसला तरी हरकत नाही. तो परमेश्वरमार्गाचा ज्ञानी मात्र अवश्य पाहिजे. कारण, अन्यमार्गीय विरक्तापेक्षा परमेश्वरमार्गातील उपभोगशील ज्ञानी हा अनंतपटींनी श्रेष्ठ होय. (म. तत्त्व. पा. ४२३ पहा)

सारांश, शास्त्राभ्यासासाठी ज्याच्याकडे जायचे तो ज्ञातयथार्थिया म्हणजे चांगला ज्ञानी व शास्त्राचा यथार्थ अर्थ जाणणारा असला म्हणजे पुरे. मग त्याच्या ठिकाणी काही दोष ( उदाः क्रयविक्रय, कमी चर्या वगैरे ) असले तरी चालतील. तो ज्ञातयथार्थिया असल्यास आपण त्याच्याकडे निःशंकपणे जावे, त्याजजवळ रहावे, त्याची मनोभावाने सेवा करावी, व त्याची प्रसन्नता संपादून त्याजकडून शास्त्र शिकावे. त्यासाठीं आपल्या उत्तमपणाकडे, जाति-श्रेष्ठतेकडे, आपल्या नयाकडे व त्याच्या आचाराकडे आपण दुर्लक्ष करावे. केवळ त्याच्या जवळील यथार्थ शास्त्रज्ञानाकडे लक्ष ठेवून ते प्राप्त करून घेण्याचाच मनोधर्म ठेवावा. त्याची प्रसन्नता जोडण्यासाठी सेवा करीत असतांना काय पडेल ते काम करण्यास त्या अभ्यासकाने नेहमी तयार असावे. त्या गुरूने जरी आपणाला आज्ञा केली नाही, तरी आपण स्वस्थ बसू नये. स्वयंप्रेरणेने त्याची योग्य सेवा योग्य वेळी केलीच पाहिजे. अशी सेवा केल्याने लौकिक दृष्ट्या व पारमार्थिक दृष्टया सेवकाला कोणताच दोष लागत नाही. उलट त्याने आज्ञा केली नसली आणि म्हणून हा सेवक जर गप्प बसला तर मात्र लौकिक दृष्टया त्याचा तो दोष होय.

अशा यथार्थ ज्ञात्याची सेवा केल्याने व त्याने उपदेशिल्याप्रमाणे आचरण केल्याने त्या सेवकाचे--अधिकारियाचे अज्ञान व अन्यथाज्ञान दूर होऊन पुढे त्याला पुनःसंबंध प्राप्त होण्याचा संभव असतो, हा काय लहान फायदा आहे ! या फायद्यासाठी त्याने त्या गुरूची कोणतीहि सेवा करण्यास हरकत नाही. नाही तरी घरी असतांना बायकालेकरांची सेवा तो करीतच होता की नाही ? त्यामुळे तो नरकच 'जोडीत' होता. उलट या गुरुसेवेमुळे, त्याच्या जवळ अभ्यास केल्यामुळे, त्याच्या शास्त्रार्थनिरूपणा-मुळे याला इंद्रियधर्म व मनोधर्म बाधत नाहीत. ज्याच्याजवळ अभ्यास करायचा त्याच्या दोषाकडे जो लक्ष देतो, व आपल्या स्वतःला जो

फार मोठा समजतो त्याचा शास्त्राभ्यासाचा हेतु पुरवण्यासाठी त्याला ईश्वराचेहि साह्य होत नाही. म्हणूनच अशा पुरुषाला तो यथार्थज्ञाता शास्त्र सांगत नाही. म्हणून शास्त्राभ्यास करू इच्छिणाऱ्या अधिकाऱ्याने आपल्या मोठेपणाकडे यत्किंचितहि लक्ष देता कामा नये. किंवा आपण याची फार सेवा करतो असेहि मनात आणता कामा नये. तर निर्हेतुकपणे त्याची सेवा करून त्याची प्रसन्नता जोडावी व त्याजजवळून शास्त्र प्राप्त करून घ्यावे हेच श्रेयस्कर होय.

## आपणापेक्षा ज्ञात-विरक्ताचा संग

अपवादात्मक परिस्थितीत वरीलप्रमाणे शास्त्राध्ययनासाठी किंचित् सदोष पुरुषाजवळ राहणे इष्ट असले तरी आपली चर्या दृढ करण्यासाठी महात्म्याने आपल्यापेक्षा अधिक ज्ञानी व अधिक विरक्त असलेल्या पुरुषाचाच संग करणे चांगले ( आपणेयापसि ज्ञाता विरक्ताचा संगु कीजे: आ. १९६ ). तथापि, एखाद्याजवळ एखादाच गुण चांगला असला तर तेवढ्या एकाच गुणासाठी त्याचा संग करणे फारसे योग्य नाही. तसे, केल्याने त्याचा तो एक गुण आपल्या अंगी येण्याऐवजी त्याचे अनेक दोषच लागण्याचा संभव असतो. म्हणून त्याचा संग टाळावा. संपूर्ण ज्ञात व संपूर्ण विरक्त अशा श्रेष्ठ पुरुषाचा संग दुर्मिळ असला तरी तोच सर्वोत्कृष्ट होय.

एखाद्याच गुणासाठी कुणाचाहि संग करणे निरर्थक होय हे म्हाइमभटाच्या उदाहरणावरूनहि दिसून येते. त्याने श्रीप्रभूचा संग केला होता. पण त्यामुळे त्याचे साधन चरितार्थ झाले नाही. तेच चालताबोलता देव श्रीचक्रधर याच्या अत्यल्पकाळ सन्निधानाने मात्र होऊ लागले होते. तेव्हां ज्याचा संग करायचा तो नुसता संपूर्ण ज्ञातविरक्तच असून उपयोगी नाही, तर तो 'चालताबोलता' म्हणजे स्वतः चर्या आचरून दुसऱ्याला त्याप्रमाणे उपदेश करणारा पाहिजे. आपल्याजवळ आलेल्याचे सेवादास्य स्वीकारणारा

१. 'आपणेयापासि एके गुणे आगळा : तयाचेनि संगे असता आपुले दोष दृढ होती :' ( आ. स्थ. १९६ ).

२. 'जैसे म्हाइभटीं श्रीप्रभूचे सन्निधान केलें परि चरितार्थ नव्हेचि : आमचा गोसावी चरितार्थ करू म्हणीतले ''' सांगात चरितार्थता तै होय जै निरूपका विरक्ताचा संग कीजे' ( आ. वं. १९६ ).

पाहिजे. भांडारेकर याला श्रीचक्रधरस्वामींचे १६ वर्षे सन्निधान लाभले होते; पण तरीहि तो अपरोक्षाला योग्य झाला नाही. कारण त्यावेळी स्वामी विरक्त होते, पण ज्ञानदानाची प्रवृत्ति त्यांना त्यावेळी नव्हती. ती त्यांनी बाइसाला प्रेम दिले तेव्हांपासून स्वीकारली. सारांश जो विरक्त आहे पण बोलत नाही, मार्गदर्शन करीत नाही, तसेच जो उपदेश करतो पण त्याप्रमाणे स्वतः आचरत नाही अशा ज्ञातविरक्ताजवळ राहिल्याने आचारधर्म सिद्धीला जात नाही. उलट, संग करणाऱ्याच्या ठिकाणी निर्वेद, अनुताप, अनुशोच व आर्ती नसली तर तो त्या पुरुषाच्या संगतीने मलिन होतो. म्हणून आचारदृढतेसाठी मात्र नुसता संपूर्ण ज्ञातविरक्तच नव्हे तर स्वतः उत्तम चर्या करणारा, उपदेश करणारा, व धर्मशास्त्र सांगणारा असा जो पुरुष असेल त्याचाच संग करणे चांगले.

## भेटीची आवश्यकता.

सर्वश्रेष्ठ आचारधर्मांच्या दृष्टीने अनुसरलेल्या पुरुषाने एकाकी अटन-विजन करणे श्रेयस्कर असले तरी शास्त्राध्ययनासाठी त्याने अधिकरणाचा संग जोडणे व प्रसंगी पूर्वपरित्यक्त स्वदेशादिकात जाऊन राहणे आवश्यक असते हे यावरून दिसून येईल. संग-सांघात जोडण्याला आणखी एक महत्त्वाचे कारण आहे. कुणाचाहि आश्रय न घेता, अगदी एकट्याने विजनात राहणे मनुष्यस्वभावाला फारसे धरून नाही. तशा स्थितीत त्याच्याकडून काळ कंठवला जात नाही. 'निरालंबी एकलेया काळु क्षेपवेना' ( आ. मा. १२७ ) असे श्रीचक्रधरस्वामींनीहि म्हटले आहे ते याच अर्थाने. हा एकलेपणाचा कंटाळा मधूनमधून का होईना पण झाडून टाकणे अवश्य ठरते. त्यासाठीच साधकाने प्रसंगोपात्त ज्ञातविरक्त पुरुषांचा संग जोडणे निषिद्ध ठरत नाही. त्याला गुरु-सुहृदाची भेट अवश्य झाली पाहिजे.

## सहज भेट व मुद्दामहून भेट

गुरु-सुहृदाची, अनुसरलेल्या ज्ञात्या विरक्ताची, अनुसरणाची वासना असलेल्या वासनिकाची आणि परमेश्वरमार्गाच्या परिवाराची साधकाने

१. 'सोळा वर्षां भांडारेकारा सन्निधान जाले परि अपरोक्षा योग्य नव्हतीचि का जे तै देवो विरक्त आन शिष्यहि विरक्त' ( आ. वं. १९६ ).

भेट घेणे चांगले, त्यातहि सहज भ्रमण करीत असतांना, भेटीचा अभिलाष दोघापैकी कुणाच्याहि मनात नसतांना अगदी अदृष्टवशे जर त्यांची भेट झाली तर ती उत्तम भेट होय. कित्येकदा, वर सांगितल्याप्रमाणे मुद्दामहून त्यांची भेट घ्यावी लागते. कित्येकांच्या भेटीत उत्तम शास्त्रविचार होतो म्हणून, कित्येकांच्या संगात राहिल्याने निर्भय आणि सावध वैराग्य आपल्या ठिकाणी बाणते म्हणून, तर क्वचित् आपणास एकाकी आचार करता येत नाही म्हणून, तसेच अदृष्टदृष्टीने कित्येकांच्या सान्निध्यात राहिल्याने साधकाच्या मनातील परमेश्वराविषयीचा भाव वाढतो, आर्ति वाढते, निर्वेद व अनुताप हेहि वाढतात, त्यामुळे योग्यता प्राप्त होते इत्यादि अनेक कारणांसाठी वर निर्दिष्ट केलेल्या पुरुषांची भेट मुद्दामहून घ्यावी लागते. अशी इच्छापूर्वक भेट घेणे ही मध्यम प्रकारची भेट होय. कधी आपण अडचणीत असलो म्हणजे, तसेच क्वचित् आपल्या भेटीला आलेल्या गुरु-सुहृदाचा पूजावसर साधण्यासाठी काही पदार्थांची गरज असते ते मिळवण्यासाठी म्हणूनहि त्यांची भेट मुद्दामहून घ्यावी लागते. ( भ्रमत भ्रमता भेटी : का आपजौनि भेटी : आ. १२८ ).

## भेट घ्यायला जातांना—

या पुरुषांची मुद्दामहून भेट घ्यायला जातांना साधकाने त्यांच्या बाबतीतील अव्यक्ताची लीळा आठवीत जावे, म्हणजे आपण ज्याला भेटायला जातो तो पुरुष किती भाग्यवंत आहे, त्याच्यासाठीच जणू परमेश्वराने ही सृष्टी रचून स्वतः अवतार धारण केला व या पुरुषाला नानाप्रकारे शोधून काढून त्याला त्याने बोध दिला या अव्यक्ताच्या लीळेप्रमाणे त्या पुरुषाने केलेला त्याग, त्याला भविष्यकाळी प्राप्त होणारे ईश्वरप्रेमाचे वैभव हेहि आठवीत जावे. त्याची भेट झाल्यानंतर त्याला बोध कसा घडला, इत्यादि विषयी

१. ‘ भ्रमता म्हणजे अनुक्रमे हिंडता : अदृष्टवशें : दोघाही हेतु नाही : टेळेनि होय ते उत्तम ’ ( आ. स्थ १२८ ).

२. ‘ निभुळता वैराग्य यावेया : अथवा एकला असोंचि न सकै : का चर्या : हे दृष्टपर : भावो : आर्ति : योग्यता हे अदृष्टपर ’ ( सदर ).

३. ‘ पुरुषाद्य आपादून वेत असे म्हणोनि हे मध्यम ··· अडणीचा : का वरपडल्या : का अवसरी अर्थिक ’ ( सदर ).

त्याच्याशी संभाषण करून त्यात रममाण व्हावे आणि अशा प्रकारचा त्याग आपणाकडून अद्याप घडला नाही म्हणून दुःख मानावे. सारांश, तो पुरुष भावाळू असेल तर त्याच्याशी भावाळूप्रमाणे, चर्चक असेल तर चर्चका-प्रमाणे, ज्ञानी असेल तर ज्ञानियाप्रमाणे आपण त्याच्याशीं वागावे व भाषण करावे, त्याशी साजात्य रहावे. कारण वैजात्य राहिल्याने भाषण वगैरे काहीच मनःपूर्वक होऊ शकत नाही.

## वासनिकाची भेट का घ्यावी ?

वस्तुतः 'वासनिक' हा आपल्या संसारात मग्न असतो- पण त्याच्या ठिकाणी अनुसरणाची वासना असते म्हणूनच तशा संसारी वासनिकाचीहि भेट साधकाने घ्यायला हरकत नाही. तो श्रीमंत व उपाधिक असला तरी त्याच्या भेटीने दोष लागत नाही. उलट असा वासनिक बोधवंत असल्याने त्याच्याशीं झालेल्या ज्ञानचर्चेमुळे त्याला भेटणारा साधक मोक्षमार्गावर राहून मोक्ष लवकर प्राप्त करून घेऊ शकतो. कारण त्या शास्त्रचर्चेत ह्याचे अज्ञान, अन्यथाज्ञान वगैरें नष्ट होते. म्हणूनच अशा सोपाधिक वास-निकाच्या भेटीने दोष लागत नाही व मलिनत्व येत नाही. भिक्षु-वासना-दिकांनी आपल्या भेटीला आलेल्या भिक्षुवासनादिकांचे योग्य आदरातिथ्य करून पूजापुरस्कार करावा आणि स्तुतिगुणानुमोदन करावे.

## भेटीमुळे होणारे लाभ

एकमेकांच्या भेटीमुळे एकमेकांच्या अयोग्यता व अनधिकार नासून त्यांना योग्यता व अधिकार लागतात. कर्मलेप जसे आगंतुक, अनारब्ध व प्रारब्ध असतात तसेच अयोग्यता, अनाधिकार, योग्यता व अधिकार हेहि आगंतुक, अनारब्ध व प्रारब्ध होतात. एखादी योग्यता प्रारब्ध झाली आणि

१. '**भिक्षुका वासनीका भेटो जाता बोधाचीये ठाऊनी अव्यक्ताची लीळा** ... ना या सदैवा भिक्षुवासनिकाकारण आनंदरूप अव्यक्ती सृष्टी रचावयाची प्रवृत्ति उपनली ... **त्यांचा त्याग पोटी भरावा : ... येणे जे सांगितले ते मज न घडेचि ऐसे दुःख करावे** ' ( आ. बं. १२८ ).

२. '**जो जैसा तैसेया व्हावे : का पा : साजात्या वेध की : मग गोष्टी मात की,** ' ( आ. स्थ. १२८ ).

३. '**हस्तीचा स्कंधी : तो दोष स्पर्शे ना : येराते मोक्षा ने** ' ( सदर ).

त्या योग्यतेच्या आत एखादी अयोग्यता प्रारब्ध झाली तर योग्यतेचे कार्य अयोग्यता नष्ट झाल्यावाचून होत नाही. उदा:–बाइसाला भेट द्यावी अशी तिची योग्यता प्रारब्ध झाली होती. म्हणून तिला भेट देणाऱ्या इच्छेने श्रीचक्रधरस्वामी निघाले. पण त्याचवेळी तिने भेटीच्या योग्यतेच्या आतच जोडलेली कोणती तरी अयोग्यता प्रारब्ध झाली. म्हणून तिला तत्काळ भेट न देता सहा महिनेपर्यंत श्रीचक्रधरस्वामी मेहेकरला राहिले. बाइसाच्या भेटीचा मनोधर्म धारण करून तेथूनच त्यांनी तिच्या अयोग्यतेचा नाश केला आणि मग तिला भेट दिली. महदाइसाचे भेटीनंतर वस्तुत: तिला बोध द्यायचा, पण त्याचवेळी तिची अयोग्यता व अनधिकार प्रारब्ध झाली होती. म्हणून तिला वारंवार भेट देऊन स्वामींनी तिची अयोग्यता नष्ट केली आणि तिला बोधदातृत्वाला पात्र केले. महादेवरायाच्या बाबतीतहि तेच होते. श्रीचक्रधरस्वामींचे दर्शन होताक्षणीच आपले सगळे राज्य अर्पण करावे अशी योग्यता त्याने जोडली होती. लोणार येथे त्याला जे प्रथम दर्शन झाले त्यावेळी ही योग्यता अनारब्ध होती. पुढे ती प्रारब्ध झाली. त्या नंतरच्या भेटीत त्याने खरोखरच आपले सगळे राज्य अर्पण केले असते. पण त्याचवेळी त्या प्रारब्ध योग्यतेतील अयोग्यता व अनधिकार ही प्रारब्ध झाल्यामुळे त्याला ह्या जन्मी पुढील दर्शन होऊ शकले नाही. ही अयोग्यता व अनधिकार भिक्षुवासनादिकांच्या भेटीने नष्ट होत असतात म्हणून त्यांनी परस्परांना भेट देत घेत असावे.

पण मलिन झालेल्या भिक्षुवासनिकाच्या भेटीमुळे मात्र भेटणाराला मलिनत्व येते. धर्मापासून तो भ्रष्ट होण्याचा संभव असतो. अशांची भेट घेण्यात अर्थ नाही. मलिन पुरुषाने मात्र आचारसंपन्न भिक्षुवासनिकांची भेट अवश्य घ्यावी. पण ती अनुसरलेल्या पुरुषाप्रमाणे अत्यंत नम्रतेने घ्यावी म्हणजे त्याचे अनिष्ट थोडेफार चुकेल.

१. ‘ जैसा कर्मलेप आगांतुक : अनारब्ध : प्रारब्ध : तैसीच योग्यता : तैसाच अधिकार तैसीच अयोग्यता : तैसाच अनधिकार : मेघंकरी सहा मास राज्य केले मग बाइसा दर्शन दीधले ’ ( आ. स्थ. १२८ ).

२. ‘ तैसेचि मैळलेयाचिया भेटी धर्मापासौनि जाये : मैळलेनि पुरुषे भिक्षुका वासनिका भेटावे तर्‍हेळी अनुसरलेयाचिया परी भेटावे : तैचि अनिष्ट चुके आन इष्ट होए ’ ( सदर ).

## धर्माचरणात दक्षता

अयोग्यता व अनधिकार यांच्या नाशाखेरीज, भेटीमुळे आणखीहि अनेक लाभ होतात. चर्चेनंतर दोघांनाहि आपल्या देहांच्या अनित्यतेची तीव्रतेने जाणीव होऊन ते धर्माचरणात अधिक दक्ष होतात. आपल्या जीवितावर उदास होऊन ईश्वरप्राप्तीची सर्व विधि-विधाने अहिंसात्मक वृत्तीने ते आचरू लागतात. पंडित विश्वनाथ सांगतात 'तर भेटलियाचे कार्ये कायी : अनित्यतेची उपजे नवलाई : मग दाहावे अवस्तेचा उपायी : दक्ष होये ॥ तेव्हेळी थोर सत्त्वेशी : उत्कृष्ट विधीते हातवशी : पाळी अवस्थाभरे कासी : जीवितावरी ॥ सकळेही इंद्रिये : अनन्ये ब्रह्मचर्ये : वेटाळुनी सेवाविषये : करूनि घाली ॥ तो सकळही साधन : जेतुलेही विधिविधान : निर्विषय हिंसाप्रधान : करूनि आचरे' (ज्ञा. प्र. ९४५-९४८).

## भेटीचा आनंद

अशा साधकांच्या परस्पर भेटीचा आनंद काय वर्णन करावा ? अटन-विजन करीत असतांना साधकाला महात्म्याच्या सहज भेटीची एक प्रकारची आर्त लागलेली असते. ज्या दिशेला गुरु आणि गुरुकुळातील महानुभाव असतात तिकडे त्याचे डोळे लागलेले असतात. अशा स्थितीत असतांना तिकडून जर 'कोण्ही येत देखे' तर हा उल्हासतो; आणि तोहि कसा ? तर, निर्जन अरण्यात पडलेला आणि पाण्यासाठी भटकणारा तृषार्त एकदम पाणी सापडल्याने जसा आनंदित होतो तसा. नव्हे, 'चकोराचिया उपवासा : कारणे चंद्र उगवे जैसा : मेघ चातकाची अवदशा : फेडावया वोळे ॥ अथवा वोलतुटे सुकती कोंभ : तयावर औचिते वर्षे आंभ : तेवि तया सुख प्रकटे सैंभ : भेटीसवे ॥ ऐसा व्यवधाने अवचटे : जर पढियते सुहृद भेटे : तर दर्शनासवे फुटे : हृदय आघी." (ज्ञा. प्र. ९०९ ९१०, ९१२). असा परस्पराच्या भेटीचा आनंद उच्च प्रकारचा असतो.

## परमेश्वर भेटल्याचा आनंद

इतकेच नव्हे तर साधकांची परस्पर भेट झाली तर त्यांना प्रत्यक्ष परमेश्वर भेटल्याचा आनंद होतो. (एकमेका भेटलेया हे भेटलेयाचा पाडु

जाए : आ. १२९ ). ' तव सुहृद येता देखिला : संभ्रमे देव म्हणौनी उठिला : जैसा का ईश्वरचि भेटला : तो पाड दोघाही ' ( स. व. ३७३ ) असे रवळोबासानेहि म्हटले आहे. यावरून भेटप्रसंगी भिक्षुवासनिकादिकांनी भेटलेल्यांना ईश्वरतुल्य मानून त्यांच्याशी आदरातिथ्यपूर्वक वर्तन करावे हे लक्षात येईल.

वस्तुतः साजात्या-साज्यात्यांची भेट झाली तरच दोघांनाहि सारखाच आनंद होईल. म्हणजे भिक्षुकाला भिक्षुक भेटला, ज्ञानियाला ज्ञानिया भेटला तरच दोघांनाहि परमेश्वर भेटल्यासारखे वाटेल, तेवढा लाभ घडेल. कारण, त्यांच्यात साज्जात्य असेल तरच भेटीत चर्चा, खानपान, श्रमनिवृत्ति, प्रीति वगैरे समान योग्यतेने होऊ शकेल व तरच दोघांनाहि ईश्वर भेटल्यासारखा लाभ होईल.

## वैजात्यांच्या भेटीमुळे

भिक्षुकाला वासनिक भेटला तर त्या वासनिकाला मात्र भिक्षूच्या भेटीमुळे परमेश्वर भेटल्यासारखे वाटेल, पण वासनिकाच्या भेटीने भिक्षूला मात्र परमेश्वर भेटल्यासारखे वाटणार नाही; तर आपला कुणीतरी गोत्रीय भेटला एवढेच सुख त्याला वाटेल. पण हे का ? तर त्या भेटीत ' हा वासनिक आहे, हा संसारात अजून रममाण झालेला आहे ' असे विचार भिक्षूच्या मनात येतात म्हणून. तथापि, वासनिकाच्या भेटीने भिक्षूच्या मनात असे विचार न आले, त्या वासनिकाला त्याने कमी योग्यतेचे न लेखता जर त्याच्याशी वर्तन केले तर त्या भिक्षुकालाहि त्याच्या भेटीने परमेश्वर भेटल्यासारखाच लाभ व्हायला काही हरकत नाही. उदा : नागदेवाचार्य हे जरठ चर्यावंत, शाब्दज्ञानी—पण शाब्दज्ञान चारित होऊन अपरोक्षाला पात्र झालेले होते, शिवाय ते सान्निधानीचे होते; आणि लक्ष्मींद्रभट असन्निधानीचे व

१. ' एकमेका म्हणजे दोघाही सारखाचि : पाड दोघेहि तत्समान असती तरी : आन समान नसताही पाड होय परी न्यूनाधिक्य आति ' (आ. बं. १२९).

२. ' भिक्षुवासनीक परि आबुलियेचे निंदैलेपण देखैल तेथ येर उणा होईल : तीयेची मेहेरीची पोसीत असे ... ऐसी लक्ष न घली तरी तेणे उणा नव्हे ' ( आ. बं. १२९ ).

कमी योग्यतेचे होते. अधिकाराच्या दृष्टीने या दोघामध्ये वैजात्य असूनहि लक्ष्मींद्रभटाच्या भेटीमुळेहि नागदेवाचार्यांना परमेश्वर भेटल्यासारखेच वाटत असे. कारण ते लक्ष्मींद्रभटाच्या योग्यतेकडे लक्ष देत. हा परमेश्वर-मार्गातील आहे या एकाच गोष्टीकडे विशेष लक्ष देत. लक्ष्मींद्रभटा सारख्याच्या भेटीने जर नागदेवाचार्यांना इतका लाभ होत असे तर महदाइसा, म्हाइभट, इत्यादींना परस्परांच्या भेटीमुळे यापेक्षाहि अधिक आनंद व लाभ होत असेल यात शंकाच नाही. उद्धवदेव ( प्रेमी भक्त ) व विदुर ( आवडीचे वेधवंत पण अज्ञान ) हे साज्यात्य-सारख्या अधिकाराचे-नव्हते. तथापि श्रीकृष्णाच्या कथावार्ता करण्यात त्यांनी ७ रात्रंदिवस घालविले. अर्थात् त्यावेळी विदुराच्या भेटीमुळेहि उद्धवाला परमेश्वर भेटल्यासारखेच वाटत होते.

## कनिष्ठांशी प्रीतिपूर्वक वर्तन

सारांश, वैजात्य पुरुषांची भेट झाली असतांना श्रेष्ठांनी कनिष्ठांशी अत्यंत प्रीतिपूर्वक वागले पाहिजे. उद्धवदेव ज्याप्रमाणे विदुराशी वागले, किंवा नागदेवाचार्य जसे लक्ष्मींद्रभटाबरोबर वागले त्याप्रमाणे श्रेष्ठांनी कनिष्ठांशी वागावे. म्हणजे त्या श्रेष्ठांनाहि कनिष्ठांच्या भेटीमुळे आपणाला परमेश्वर भेटल्यासारखे वाटेल; त्यांना तितका लाभ होईल. अनुसरलेल्याकडून वासनिकाबरोबर असे वर्तन व्हायला पाहिजे. तसे आजच्या दिवसात होणार नाही ही गोष्ट निराळी. म्हणूनच साजात्या-साजात्यांच्या भेटीने दोघांनाहि निश्चितपणे परमेश्वर भेटण्यासारखे वाटेल असे म्हटले आहे. वैजात्यांच्या भेटीत श्रेष्ठाने कनिष्ठांशी प्रीतिपूर्वक वर्तन केल्यास त्या श्रेष्ठालाहि कनिष्ठाच्या भेटीने परमेश्वर भेटल्यासारखे वाटेल. पण तसे प्रीतिपूर्वक वर्तन न करता त्याच्या अनधिकाराकडे व दोषाकडे लक्ष पोचविले तर मात्र त्या श्रेष्ठाला परमेश्वर भेटल्यासारखा आनंद न होता आपला एक गोत्रीय भेटल्याइतकाच आनंद होईल.

निरनिराळया गुणांनी अलंकृत असलेले लोक एकत्रित झालेले अस-

१. ' विदुरदेवा उध्दवदेवा कैसा पाड जाला तो नेणिजे : सात अहोरात्रे उभया गेली : उध्दवदेव प्रेमीये अपरोक्ष संचरिले : आन विदुरदेव कोमळ अज्ञान ' ( आ. स्थ १२९ ).

तांना त्या सगळ्यांना एकमेकांच्या भेटीमुळे परमेश्वर भेटल्यासारखाच लाभ घडत असेल हे सांगायलाच नको. अशा भेटीमुळे तर सर्वांत अधिक लाभ होणार ! आणि अर्थात त्याच मानाने त्यांची अनिष्टेहि नासणार[१] !

## क्षेमालिंगन

भेट झाल्याबरोबर, भिक्षूंनी प्रथम परस्परांना क्षेमालिंगन द्यावे. 'द्यावे' ... असे म्हणण्याचीहि वस्तुतः गरज नाही. ज्याच्या विषयीं आपल्या अंतःकरणात प्रीति असते अशा गुरुसुहृदाची भेट झाल्याबरोबर आपण उत्सुकतेने धावत जाऊन त्याच्या पायी लागतो अथवा त्याला क्षेमालिंगन देतो. ईश्वरतुल्य पुरुष आपणाला भेटत आहे ही भावना मनात असल्यास साजात्यांचेच नव्हे तर वैजात्य पुरुषांचेहि क्षेमालिंगन तात्काळच घडून येते. हे आलिंगन इतके गाढ असते की ते लौकर सुटत नाहीं. चुकलेले मूल सापडल्यानंतर माउली त्या मुलाला स्नेहाने जें आलिंगन देते ते दीर्घकाळ टिकून राहते. तीच स्थिति साधकांच्या परस्पर भेटीत होते. 'परस्परे क्षेमालिंगन जाले : ते सुटता न दिसे वहिले : जैसे का भणगा जोडले : अमृतपान ॥ हारतले उत्तम जोडले : की चुकले वत्स माते मीनले : तैसे प्रीती स्नेह दोखिले : योगी तयाचा ' ( स. ब. ३७४-३७५ ) असे रवळोबासांनी त्या क्षेमालिंगनाचे वर्णन केले आहे. विश्वनाथ पंडित म्हणतात की ' मग क्षेमालिंगनासवे : उतावळपणाचेनि धावे : भीतरोनी येती हेलावे : सात्त्विक भावाचे.' क्षेमालिंगनाबरोबर उभयतांच्या शरीरावर अष्ट सात्त्विक भावांच्या लहरी उत्पन्न होत असतात. ( ज्ञा. प्र. ९१३ )

## श्रम-निवृत्ति

दोघांनी परस्परांना प्रीतिपूर्वक दिलेले क्षेमालिंगन सुटले म्हणजे त्यांनी एकमेकांची ' श्रम-निवृत्ति ' करावी ( श्रमनिवृत्ति कीजे : आ. १३० ).

१. ' बहुते मिळती एकत्रे हे थोर लाभाचे कारण : एके भजके : एके सेवके : एके करणस्वरूपे : एके ज्ञाते : एके विरक्ते : एतुली एके वेळे दिसती तेतुला परमेश्वर भेटला एके वेळे : नाठविता आठवण : न करीता स्मरण : तेसणी योग्यता एके वेळे होताये : आन तेसणी अनिष्टे एके वेळे नासती ' ( आ. स्थ. १२९ ).

ज्यांच्यामुळे त्यांना विशेष शीणभाग आला असेल असे एकमेकांचे शारीरिक व मानसिक श्रम नाहीसे करावे. भेटलेल्या पुरुषाचे शारीरिक व मानसिक असे दोन्ही प्रकारचे श्रम नाहीसे करणारा पुरुष श्रेष्ठ होय. नुसते मानसिक श्रम फेडणारा मध्यम; आणि शारीरिक श्रम फेडणारा कनिष्ठ होय.[1] ही श्रमनिवृत्तिहि जणू आपण परमेश्वरमूर्तीचीच श्रम-निवृत्ति करीत आहोत इतक्या आस्थेने व कळकळीने केली पाहिजे. ' श्रम-निवृत्ति करते मान : ते जैसे श्रीमूर्तीसी मर्दन ' ( स. व. २७९ ) अशी भावना भेटणारांनी आपल्या अंतःकरणात ठेवावी.

पुष्कळसे ओझे घेऊन चालण्याने किंवा फार दूरवरपर्यंत चालण्याने शारीरिक श्रम होतात. पण दुसऱ्याला उद्देशून ( किंवा दुसऱ्याने याला उद्देशून ) पैशुन्ययुक्त दुष्ट शब्द बोलण्याने मानसिक कष्ट होतात. त्यामुळे त्या पुरुषाच्या ठिकाणी निळ्ळता ( धर्माच्या ठिकाणी पातळपण अनास्था ); टळटळ ( निराधारपणा ) व डंडळ ( धर्मावरून डळमळीतपणा ) येतात. म्हणून आपल्याकडून होईल तितका त्याने भेटलेल्याचा शारीरिक व मानसिक श्रम फेडावा. त्यामुळे त्या पुरुषाचा उदासपणा नाहीसा होऊन ती श्रमनिवृत्ति करणाराविषयी परमेश्वराला तोष वाटतो, त्याच्यावर एरवी ईश्वराची खंती असली तर ती नाहीशी होते, त्याला योग्यता प्राप्त होऊन त्या श्रमनिवृत्तिमुळे त्याच्या सत्सदृश इतर कर्मांचा नाश होतो.[2] अशक्ताच्या सेवेमुळे व भेटीकाळी केलेल्या श्रमनिवृत्तिमुळे सारखाच लाभ होतो. अशक्त पुरुषाच्या अंगात त्राण नसते म्हणून तो धर्म आचरू शकत नाही. तसेच श्रमलेल्या पुरुषाच्या अंगात व मनात त्राण नसल्याने तोहि धर्माचरणात शिथिल होण्याचा संभव असतो. अर्थात्, अशक्त किंवा रुजाभिभूत पुरुषाची सेवा केल्याने साधकाला जसा लाभ होतो तसाच[3] श्रांत भिक्षुकाचे

१. ' श्रम ते द्विविध : शारीर मानसिक : जेणे श्रमला ते फेडिजे : शारीर मानसिक दोन्ही फेडी तो उत्तम : मानसिक तो मध्यम : शारीरिक तो कनीयस ' ( आ. स्थ. १३० ).

२. ' ज्याचेनि जेतुका श्रम हरे तो हारिजे : तेणे ईश्वरासी तोष : खंति परिहरे : योग्यता : कर्मनाश ' ( आ. स्थ. १३० ).

३. ' हेहि शुश्रुषाचि एक : तरि दोहीसि भेद कैसा : ना अशक्ती चर्याचि ठाके : गति नाही : आन श्रमे करवेना अदक्षता ' ( सदर ).

शारीरिक व मानसिक श्रम नाहीसे केल्यानेहि होतो.

## क्षेम-वार्ता

ही श्रमनिवृत्ति चालू असतांनाच भेटणारांनी परस्परांचे कुशल विचारावे; क्षेमवार्ता कराव्या; आपापले क्षेम आपल्या त्या अच्युत-गोत्रियाला सांगतांना भिक्षूंना अतिशय आनंद वाटतो. खळोबास म्हणतात की 'आपुलाले क्षेम सांगता: तोंड पघळुनि बोलता: तया धनि नाही तत्त्वता: अच्युत प्रीती' (स. व. ३७८). आपले क्षेम-कुशल तोंड भरून सांगत असतांना त्यांना ते कितीहि सांगितले तरी जणु समाधान वाटतच नाही! आपले क्षेम सांगतांना आणि दुसऱ्याचे क्षेम जाणून घेतांना दोघांनाहि अतिशय आनंद वाटतो-वाटायला पाहिजे हे सांगणे नकोच.

## एकत्र खान-पान

क्षेमवार्ता करीत करीत श्रमनिवृत्ति केल्यावर मग त्या दोघांनीहि एकत्र खाणे-पिणे करावे. ( एकत्र खानपान कीजे: आ. १३१ ). म्हणजे दोघांनीहि दोघांचे भिक्षान्न कालवून एकाचं ताटात जेवावे; किंवा दोघांचेहि भिक्षान्न एकत्र कालवून त्यातून आपापल्या मात्रेइतके निरनिराळे काढून घ्यावे आणि मग ते सेवन करावे; अथवा आपापले भिक्षान्न निराळे ठेवून ते आपापल्या मात्रेइतके खावे. पण दोघांनीहि एकाच पंगतीत बसावे. भेटलेल्याला आपले भिक्षान्न देऊन भोजन घालीत असतांना जणु आपण परमेश्वराला आरोगणा करीत आहोत या विशुद्ध स्नेहभावाने खानपान केले पाहिजे. 'त्या एकमेकांचे भोजन: ते आरोगणाचि काई' (स. व. ३७९).

जी गोष्ट भोजनाच्या बाबतीत तीच पाणी ( ताक, दूध वगैरे ) पिण्याच्याहि बाबतीत. त्या दोघांनीहि एकाच भांड्यातून पाणी प्यावे; किंवा त्या दोघाजवळील पाणी मिसळून ते आपापल्यापुरते निराळे काढून घ्यावे; किंवा आपापल्या जवळचे पाणी निरनिराळे पण एकाच पंगतीत बसून घ्यावे.

१. 'दोहीचे अन्न कालऊनि एकीचि ठायी जेऊ बैसीजे: बाधी तरी कालऊनि वेगळे: अथवा आपुलाले अन्न: परि पांवी बैसीजे' (आ. स्थ. १३१).
२. 'पान म्हणजे उदक: ताक पयादिक: एक भाजन: एक उदकपात्र: ते एकत्र' (सदर).

## फाळ कीपालटावी

भेटीच्या वेळी दोघांनीहि आपापली वस्त्रे पालटावी. म्हणजे आपली वस्त्रे भेटणाराला देऊन त्याची आपण घ्यावी. (फाळुकी पालटीजेति : आ. १३२ ). ज्याची वस्त्रे घड असतील त्याने आधी आपली वस्त्रे दुसऱ्याला देऊन त्याची फाटकी वस्त्रे आपण घ्यावी. बरे दोघांचीहि वस्त्रे सारखीच असली तर मग जो वडील पुरुष असेल त्याने प्रथम आपली वस्त्रे द्यावी. मग त्या दुसऱ्याने आपली द्यावी. वस्त्रे पालटण्याचा हा विधिहि अत्यंत प्रीतिपूर्वक झाला पाहिजे. किंबहुना रवळोबासांचे तर म्हणणे आहे की, भेटीच्या वेळी वस्त्रे पालटीत असतांनाच त्या अच्युतगोत्रियांच्या परस्पर-प्रीतीची नवलाई दिसून येते. ती काय वर्णन करावी ? परमेश्वरमूर्तीची पूजा होत असतांना प्रगट होणारी आवडच जणु त्यावेळीहि त्यांच्या ठिकाणी दृग्गोचर होते. ‘आवडीचा नवलावो कैसा : जो पालटी देखिला सारिसा : श्रीमूर्ति पूजिता जैसा : पाढियासत’ ( स. व. ३७७ ).

## परमेश्वराच्या कथा-वार्ता

वस्त्रे पालटल्यानंतर मग दोघांनीहि परमेश्वराच्या कथावार्ता करण्यात रममाण व्हावे.( एथिचीया कथा वार्ता कीजेति : आ. १३३ ).कथा व वार्ता या शब्दांचे निरनिराळ्या दृष्टींनी अनेक अर्थ होऊ शकतात.(१) कथा=परमेश्वराने सांगितलेल्या गोष्टी. वार्ता=परमेश्वराचे वर्तन; अर्थात् सर्व अवतारातील परमेश्वराची चरित्रे.(२) कथा=परमेश्वराने स्वत: तोंडाने सांगून इतराकडून जे करवून घेतले ते; वार्ता=त्यांनी स्वत: जे आचरण केले ते. (३) अनुसरलेल्या ज्ञानियाबरोबर परमेश्वराने केलेले वर्तन त्या वार्ता आणि तद्व्यतिरिक्त इतराबरोबर केलेले वर्तन त्या कथा. (४) परमेश्वर विचार- शास्त्रविचार म्हणजे कथा. आणि परमेश्वराचे आचरण त्या वार्ता. (५) सन्निधानीच्या पुरुषाकडून करवून घेतलेल्या क्रिया म्हणजे धाववणे, पोहवणे, दरे-दरकुटे बुजवणे, पाषाण फोडवणे वगैरे त्या कथा; आणि असन्निधानीच्या पुरुषांनी केलेल्या क्रिया

१. ‘फाळुके म्हणजे वस्त्राचि : तो घडे फाटकेनसी करावा : जयाचा घड तयाचा आदिभावो : दोन्ही समचि तरी वडिले आदि व्हावे’ (आ. स्थ. १३२)

त्या वार्ता. या सर्व अर्थांनी भेटलेल्या साधकांनी एकमेकाशी कथावार्ता करीत असावे.

## शास्त्रचर्चा कुणाशी !

कथावार्ता करतांना त्यांनी परस्पराशी परमेश्वराच्या शास्त्राची व आचाराची चर्चा करायलाहि सांगितले आहे. ( ४ था अर्थ पहा ). पण हे साज्यात्य पुरुषांच्या बाबतीतच शक्य आहे. बोधवंत आणि वेधवंत यांची भेट झाली तर बोधवंताने वेधवंताशी शास्त्रविषयक बोलणे करू नये. भेटीची इतर विधाने करायला हरकत मात्र नाही. तसेच दोन्ही बोधवंत पण वैजात्य पुरुषांची भेट झाली तर आधि ज्ञानियाने शास्त्रविषयक काही सूचक प्रश्न त्याला विचारावे. ते त्याला उमटले तर तो शास्त्रचर्चेला योग्य आहे की अयोग्य आहे हे तात्काळ लक्षात येईल. आपल्या प्रमाणेच तोहि बोधवंत आहे असे दिसून आले तर त्याच्याशी मोकळ्या मनाने शास्त्रचर्चा करावी. त्याचे बोधकाळीचे अनुभव विचारावे. ते विचारल्याने तो पुरुष खरोखर जरठ आहे की अजून कोमळ आहे, कर्माच्या ठिकाणी त्याचे जडलेपण नष्ट झाले की कायम आहे वगैरे गोष्टी आपोआप उलगडतील त्या उलगडल्यावर त्या पुरुषाच्या योग्यतेप्रमाणे त्याला समजेल व उमटेल अशाच प्रकारची शास्त्रचर्चा त्याच्याबरोबर करावी. भेटीकाळी ही शास्त्रचर्चा करायची ती कशी याविषयी पुढे सविस्तर वर्णन करण्यात येईलच.

## स्त्री-पुरुषांच्या भेटीत

आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून साधकांनी भेटीच्या वेळी श्रम-

१. ' **येथिचिया म्हणजे आमुचिया : कथा म्हणजे काथिल्या ··· भक्तिजना विद्यमान वर्तिनले तिया वार्ता : दुसरे : शब्दे वर्तन करवणे निराकरणे पाठवणे ते कथा : अंगकरण म्हणजे** आपणच अंग करणे **ते वार्ता** यथा विहरण : निरूपण ··· **तिसरे : इतरेसी वर्तन ते कथा : अनुसरलेनि ज्ञानियेसि ते वार्ता ··· चवथे · विचार ते कथा : आचार ते वार्ता ·· पाचवे : सन्निधानीचे धर्म ते कथा ··· असान्निधान धर्म ते वार्ता** ' ( आ. वं. १३३ ).

२. ' ··· **तै शास्त्रविषयी बोलणे न किजे : येर विधान ते किजे** ' ( आ. स्थ. १३३ ).

निवृत्ति करणे, क्षेमालिंगन देणे, एकत्र खानपान व वस्त्रपालट करणें अवश्य असल्याचे दिसून येईल. भेटणारे दोन्ही साधक पुरुष असले किंवा दोन्ही स्त्रियाच असल्या तर हे विधी आचरता येणे शक्य आहे. पण एखादी स्त्री ( भिक्षुकीण ) दुसऱ्या पुरुषाला ( भिक्षुकाला ) भेटली किंवा पुरुष ( भिक्षुक ) स्त्रीला ( भिक्षुकिणीला ) भेटला तर त्यांनी ही भेटीची विधाने आचरायची की काय ? अर्थात नाही. स्त्री–पुरुष साधकांच्या भेटीत त्यांनी एकमेकांची श्रमनिवृत्ति करण्याची, क्षेमालिंगन देण्याची, एकत्र खानपान व वस्त्रपालट करण्याची, काहीच गरज नाही. एकमेकांच्या योग्यतेनुरूप शास्त्रचर्चा होणे शक्य असेल तर तेवढी त्यांनी अवश्य करावी. पण इतर विधाने मात्र आचरू नयेत.

## किती दिवस रहावे ?

अशा रीतीने परस्परांची भेट झाल्यानंतर त्यांनी फार तर पाचसात दिवस(=१२ दिवस) एकत्र राहावे. तदनंतर आपापल्या मार्गाने निघून जावे. एकत्र राहत असतांना, जेणेकरून एकमेकांना सोडून जावेसे वाटणार नाही असे प्रेम परस्परात निर्माण होऊ देऊ नये. तसेच द्वेषहि निर्माण होऊ देऊ नये तसे प्रेम किंवा द्वेष निर्माण होत आहे असे दिसून आल्यास दोघांनीहि परस्परांचा एकदम त्याग करून निघून जावे. विशेषतः विषम–वैजात्य पुरुष एकात्रित असतांना सहवासामुळे सवय, निल्लळता, धर्माविषयी पातळपण वगैरे दोष उद्‌भवण्याचा संभव फार असतो. याकरिता विषम पुरुषाच्या ठिकाणची दोषरूप विषमता दिसून येताक्षणीच जणु आपण कोणी कोणाचे नाही अशा भावनेने त्यांनी एकमेकांना सोडून जावे. ( सात पाच दीस एकत्र असीजे : मग आपुलालेया जाओ लागीजे : आ. १३४ )

साजात्य पुरुषांना एकमेकांच्या भेटीकाळीच निर्वेद, अनुताप, अनुशोच व आर्ति निर्माण होते. ती जोपर्यंत परस्परांच्या सहवासात निर्माण होत राहील तोपर्यंतच त्यांनी एकत्र असावे. ज्ञानियाच्या बाबतीत परस्प-

१. ' सात पाच एवं बारा दीस एकत्र असणे '··· ( आ. स्थ. १३४ ).

२. ' मग कव्हणी कव्हणाचा नव्हे ऐसा गेला : राग अथवा द्वेष दोन्ही पोटी भरो नेदावे : बहुत दिवस एकत्र विषमा पुरुषासी असता सवे निल्लळता पातळता पातळेपण ये चारी होती म्हणोनि विभाग विहिला असे ' (आ. वं. १३४).

रांच्या सहवासाने जोपर्यंत अज्ञान-निवृत्ति, अन्यथाज्ञान-निवृत्ति, संदेह-निवृत्ति वगैरे होऊन अपूर्व निष्पत्ति होते तोपर्यंत त्यांनी सहवासात असावे. असे काहीच होत नाहीसे दिसून येताच त्यांनी विभाग करून निघून जावे. परस्परांच्या भक्तिज्ञानवैराग्यादि गुणांची आवड असेपर्यंत एकत्रित रहावे.

क्वचित् असे होते की, सान्निध्यात असलेल्या पुरुषाचे वर्तन बाह्यतः दोषरूप असते, पण वस्तुतः ते गुणरूपच असते. उदा: नागदेवाचार्य हे श्रीचक्रधरस्वामींचे अंगीटोपरे घालत असत. हे सदोष वर्तन होते. पण श्रीचक्रधरांच्या आज्ञेनुसार ते ते अंगीटोपरे घालीत होते म्हणून त्यांचे वर्तन गुणरूपच होते. इंद्रियार्थ पदार्थ, मिष्टान्न वगैरे सेवन करणे दोषरूप होय. पण तेच इतरांची सेवा करण्याच्या निमित्ताने घडले तर दोषरूप न राहता गुणरूप होते. अशा बाह्यतः सदोष पण वस्तुतः गुणरूप असलेल्या क्रिया जोपर्यंत दुसरा आचरीत आहे तोपर्यंत त्याच्या सहवासात राहायला हरकत नाही. तथापि असे करतांना त्याच्या वास्तविक दोषरूप क्रिया सोयी-स्कर रीतीने मात्र गुणरूप मानता कामा नये. किंवा गुणरूप क्रिया दोषरूप मानता कामा नये; त्याचप्रमाणे आपण केलेली दोषरूप क्रिया मात्र गुणरूप मानायची, पण तीच क्रिया आपल्या सहवासातील इतरांनी केली तर ती मात्र सदोष मानायची, असे करणे हे महापाप आहे. असे न करता, आपल्या जवळच्या पुरुषाची दोषरूप क्रिया जोपर्यंत नजरेला येत नाही तोपर्यंत त्याच्या सहवासात एकत्र रहायला काही हरकत नाही. कित्येक पुरुष आपल्यापासून दूर असताहि प्रीतिशून्य, उदास व धर्मी पातळ असतात. अशा पुरुषांच्या भेटीने इष्ट क्रिया कोणतीच जोडली जात नाही. इतकेहि

**१. 'भेटिकाळी निर्वेद अनुताप अनुशोच आर्ति उपजे तव असीजे : अथवा अज्ञान निवृत्ती : अन्यथाज्ञान निवृत्ती : संदेह निवृत्ती : अपूर्व निष्पत्ति होय तव असीजे : अथवा त्याच्या गुणी आवड उपजे तव असो ये'** ( आ. स्थ. १३४ ).

**२. 'अथवा पुढीलाचा दोष ऐकीला का देखीला परी हृदयासी न ये : त्याच्या दोषाचा गुणच उपजे : आपुलिये क्रियेचा गुण ये : पुढीलाची क्रिया आपुलेयाचि सारिखी परि तियेचा दोष ये हे महापाप : हेच लक्षण पुढीलाच्या ठायी पाहावे'** ( आ. स्थ. १३४ ).

**३. 'एक विभागे असताच निलुलता : त्यासि भेटलेया कायी इष्ट होईल'** ( सदर ).

करून अशांच्या भेटीचा प्रसंग आलाच तर त्यांच्यापासून तात्काळ दूर जावे.

## पुर्वोत्तर क्षणांचे दुर्लभत्व

साधकांच्या परस्पर भेटीचा क्षण तो पूर्व-क्षण आणि विभागाचा-वियोगाचा क्षण तो उत्तरक्षण होय. हे दोन्ही क्षण भेटणाऱ्यांना दुर्लभ वाटले पाहिजेत. भेटकाळी परस्परामधे आत्यंतिक प्रीति-आर्त निर्माण होईल तर त्यांना पूर्वक्षण दुर्लभ वाटेल. त्यानंतर पाचसात =१२ दिवस एकत्र राहून शेवटी विभाग होतांनाहि तशीच प्रीति वाटली पाहिजे. काल भेटलेला पुरुष पुन्हा दुसऱ्या दिवशी भेटला तरी त्यावेळीहि तो नवीनच भेटल्याइतका आनंद वाटावा हेच दुर्लभत्व होय. ( पूर्वोत्तर क्षण दुर्लभ: आ. १३५ ).

## ओल्या पुरुषांच्या भेटीत

ओल्या पुरुषांच्या भेटीत हे पूर्वोत्तर क्षणांचे दुर्लभत्व निरंतर असते. अंतर्यागियाला विद्यासंचार होताच पिंडस्था प्रकाशित होऊन तिच्या ठिकाणी ज्याप्रमाणे असीम आवड निर्माण होते व ती निरंतर टिकून राहते त्याप्रमाणे ओल्या पुरुषाला ओल्या पुरुषाच्या भेटीमुळे मानसिक प्रीतीचा उचंबळे येतो. प्रयत्निया पुरुषाच्या बाबतीत पहिल्या भेटीसरशी त्याला प्रीतिपूर्वक आवड वाटते हे खरे; पण तशीच ती निरंतर वाटत नाही म्हणून त्याला ती प्रयत्नपूर्वक टिकवून धरावी लागते[3]. तशी तो टिकवून धरतो. कोरड्या पुरुषांना परस्परांच्या पहिल्या भेटीचा क्षण दुर्लभ वाटतो. पण पुढे एकमेकांच्या सहवासातील क्षण त्याला तसे वाटत नाहीत. इतकेच नाही तर दुसरा पुरुष साजात्य नसला तर त्याच्या सहवासाने अनिष्ट निपजायला लागते. तेव्हां अशा पुरुषांनी अनिष्ट निपजू लागले आहे असे दिसताच परस्परांचा त्याग करावा. काही बलवत्तर कारणामुळे त्याग करणे

१. ' कालच भेटला होता : परि हा एक मज भेटेल ऐसी आशच नाही : आन पाहेचि भेटे तरी पहिला देखीला : ना प्रीतिकरूनि कहीच भेटला नाही का जैसा ' ( आ. स्थ. १३५ ).

२. ' पूर्वोत्तर तेथ एकसरा भडकाचि निगत असे जैसा अंतर्याग ' ( आ. स्थ. १३५ ).

३. ' ते झाक गेलेया मग प्रयत्ने ' ( आ. स्थ. १३५ ).

शक्य नसले तर त्यांनी परस्परांच्या सहवासात अत्यंत सावधपणाने राहणे आवश्यक आहे. नाहीतर अनिष्ट निपजून धर्माविषयीं पातळपण येईल. कित्येकांना तर भेटीचा पहिलाहि क्षण दुर्लभ वाटत नाही. त्यांनी एकमेकाच्या सहवासात यत्किंचित राहू नये. तावडतोब विभाग करून निघून जावे. नाहीतर अर्थातच अनिष्ट निपजेलें. एखाद्याच्या वियोगकाळी जी दुर्लभता वाटत ती दुर्लभता त्याची पुन्हा भेट होईपर्यंत भंग पावू देता कामा नये. म्हणजे, त्याची पुन्हा भेट होताच तो काळ त्याला दुर्लभ वाटायला पाहिजे.

## दुर्लभतेचा भंग होऊ देऊ नये

परस्परांच्या सहवासात असतांना दोघांनीहि त्या दुर्लभतेचा भंग होऊ देता कामा नये. आपल्या विषयी दुसऱ्याला वाटणारी दुर्लभता आपण आपल्या विपरीत आचरणाने भंग पावू देऊ नये. तसेच आपणा विषयी जर दुसऱ्याला दुर्लभता वाटत नसेल तर आपल्या आचरणाने आपण ती त्याच्या ठिकाणीं निर्माण करावी. बरे, दोघांनाहि परस्पराविषयी दुर्लभता नसली तर त्यांनी तात्काळ विभाग करून निघून जावे. नाही तर धर्माविषयी निष्ठळता निपजून अनिष्ट आचरण होऊ लागेल. त्यामुळे पुढे नरक भोगावे लागतील. ज्याचा संग करायचा, शुश्रूषा करायची, शास्त्रनिमित्त जवळीक करायची, ज्याच्याशी बोलायचे, घेणे-देणे करायचे त्याच्या विषयी जर हे दुर्लभत्व वाटत नसेल तर त्याजजवळ राहता कामा नये.

१. '**क्षण दुर्लभ तों अवसर जाये : मग अनिष्ट निपजो लागे ··· म्हणौनि सावधेया वर्तावे**' ( सदर ).

२. '**पहिला क्षण दुर्लभ जेथ न देखीजे तयाचि भेटि तेव्हेळीसीचि पुरे: असिलेया अनिष्ट निपजैल**' ( सदर ).

३. '**पहिला क्षण शेवटील क्षण दुर्लभ : तैसीचि दुर्लभता जव भेटे तव जावो नेदावी**' ( सदर ).

४. '**पुढीलाची दुर्लभता भंगे ऐसी क्रिया आपण न करावी : ज्यास दुर्लभता नाही त्यास उपजवावी : दोघाही दुर्लभता नाही तरी विभाग करावा : एरवी निष्ठळता उपजेल : नरक घडतील**' ( आ. स्थ. १३५ ).

परस्परांच्या भेटीकाळी जे सुख होते त्यामुळे पूर्वार्जित पुण्य-कर्मांचा नाश होतो आणि वियोगकाळी जे दु:ख होते त्यामुळे पूर्वार्जित दु:खरूप कर्मांचा नाश होतो. याचमुळे पूर्वोत्तर क्षण दुर्लभ मानलेले आहेत.

## मैळल्याला उजळण्यासाठी भेट

शास्त्राध्ययनासाठी, किंवा शास्त्रचर्चेसाठीच भेट घेणे अवश्य असते असे नाही. आचाराचे धडे घेण्यासाठी किंवा देण्यासाठीहि एकमेकांची भेट घेणे अवश्य ठरते. उदा: एखादा मलिन झालेला पुरुष असेल तर त्याला उजळण्यासाठी त्याची भेट घेणे अवश्य आहे. भिक्षान्नात आलेली ढेपेची भाजी कालवून न खाल्ल्यामुळे मुरारिमल्लबास कसा मलिन झाला होता हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. ( मागे पा. १२९ पहा ). ती मलिन झालेला पाहून त्याला उजळण्यासाठी त्याचा सुहृद विनायकबास याने त्याची मुद्दाम भेट घेतली. त्याला त्या तेलघाणीबाहेर काढून गावाबाहेर नेले. आणि तेथे त्याने त्याच्याशी धर्मचर्चा करायला सुरुवात केली.

विनायकबास मुरारिमल्लाला म्हणाला ' मला एक संदेह आहे तो तू फेड.' मुरारिमल्ल बोलला ' आजकाल सगळे शास्त्र मी विसरलो पण आठवेल तर सांगतो.' विनायकबासाने मुद्दाम म्हटले ' विखो अनंता सुखासी आश्रयो : स्वर्गासी हेतु ' असेच स्वामींनी सांगितले आहे ना ? तेव्हां मुरारीमल्ल आवेशाने बोलला '' छे छे ' ' विखो अनंता तापासी आश्रयो : नरकासी हेतु ' असा पाठ आहे.' विनायकबास म्हणाला ' छे छे ! तसे असणे शक्य नाही. माझेच म्हणणे खरं. कारण विषयोपभोगाने शरीराला पुष्टि, मनाला तुष्टि, व इंद्रियांना रस मिळतो. त्यामुळे पिंडस्था संतुष्ट होतात. विषयोपभोगामुळे धातुसाम्य होते. तेव्हां 'विषय' सुखासी हेतु हेच खरे. पिंडस्था दुखविण्याचे पाप होत नसल्यामुळे तो नरकाचाहि नाश करतो.' त्याचे हे बोलणे ऐकून मुरारीमल्ल म्हणाला ' असा अर्थ करणारा पुरुष प्रतारक म्हटला पाहिजे ' वगैरे बोलून विषयोपभोग म्हणजे महापाप असे तो ठसून प्रतिपादू लागला. तेव्हां सुहृद म्हणतो ' विषय अनंत तापासी हेतु नसून सुखासी हेतु असावा असा मला संदेह निर्माण होण्याचे कारण इतकेच की तुमच्यासारखे श्रेष्ठ पुरुष त्यात मग्न आहेत!' हे ऐकल्यावर मुरारिमल्लाने ( तैल्यकाराने ) आपण कसे मलीन झालो ती सगळी हकीकत विनायकबासाला सांगितली. तेव्हां

विनायकबास विशेषच दुःख करू लागला. तो म्हणाला 'तुमच्या सारख्याची जर ही स्थिति तर आता माझ्यासारख्याचे काय होईल!' त्याची ती अवस्था पाहून त्या तैल्यकाराचे डोळे उघडले. जणु आपल्याला या विषयाच्या नरकातून बाहेर काढण्यासाठीच या सुहृदाला परमेश्वराने आपल्याकडे पाठवले आहे, असे त्याला वाटले. त्याने ते गाव सोडले व तो त्या सुहृदाबरोबर दूर निघून गेला. आपल्या घरची टेपेची भाजी त्याला खाऊ घालावी असे त्याच्या मनातहि आले नाही. कारण, त्या भाजीमुळेच तर तो स्वतः मलिन झाला होता! त्याप्रमाणे तो सुहृदहि मलिन झाला तर? जणु यान आंतरिक भावनेने त्याला ती इच्छा झाली नाही. अशा रीतीने उजळलेल्या सुहृदाच्या साह्याने तैल्यकाराप्रमाणे मलिन झालेले पुरुषहि पुन्हा उजळू शकतात. म्हणून उजळलेल्यांनी मैळलेल्यांची मुद्दाम भेट घेणे इष्ट व अवश्य ठरते.

## उजळलेल्यांचे चार प्रकार

मलिन होऊन उजळलेल्या पुरुषांचे स्थूल मानाने चार प्रकार आहेत. (१) काही पुरुष आपल्याच प्रयत्नाने आपले आपण उजळतात. ते श्रेष्ठ होत. उजळण्यासाठी इतरांच्या भेटीगाठीची त्यांना आवश्यकता नसते. (२) काही जण इतरांचे निरूपण ऐकून उजळतात. ते मध्यम होत. (३) दुसऱ्या उजळलेल्या पुरुषाला पाहून स्वतः उजळणारे काही असतात. ते कनिष्ठ होत. आणि (४) ज्या निमित्ताने मालिन्य आले होते ते निमित्तच नष्ट झाल्यामुळे उजळलेले पुरुष हा चौथा पक्ष. अशा उजळलेल्या पुरुषाची सहज अटन करतांना एखाद्या मैळल्या पुरुषाची गाठ पडली तर त्याने त्याला निरूपणाने उजळावे. किंवा आपला एखादा मित्र मैळलेला आहे असे ऐकल्यावर मुद्दामहून त्याजकडे जाऊन त्याला उजळावे. क्वचित् संयोग-वियोग करणाऱ्या मायेने मुद्दाम या मैळल्याचा व आपला संयोग घडवून आणला हा अदृष्ट हेतु ओळखून तो उजळलेला पुरुष त्या मैळल्याला उजळतो; तर कधी कधी मैळला पुरुष आपणहून एखाद्या उजळलेल्या पुरुषाचा

१. 'उजळलेयाचे भेद : आपणेया आपण तो उत्तम : निरुपणे तो मध्यम आणिकाते देखूनि तो कनीयस : निमित्तापगम तो चौथा पक्ष '(आ.स्थ. २०३).

संग करतो. तेव्हां तो उजळलेला पुरुष त्याला उजळतो. (उजळलेयाचेनि संगे मैळला उजळे : आ. २०३)

मैळलेल्या पुरुषाला भेटल्यानंतर, तैल्यकाराला उजळणाऱ्या पुरुषाप्रमाणे, त्या उजळलेल्यानें त्या मलिन पुरुषाशी संभाषण करावे. जेणेकरून त्याला निर्वेद, अनुताप इत्यादि दुःखे होतील, त्याला पुढे होणारे नरक त्याच्या लक्षात येतील अशा रीतीने त्याने स्वतःहून भाषण करावे. म्हणजे तो मलिन पुरुष आपले अवघेच मलिनत्व सोडून देतो.

## मैळल्याच्या संगाने उजळलेला मैळतो

उजळलेला पुरुष मैळल्याला उजळतो त्याप्रमाणे अतिशय मैळलेला पुरुष उजळलेल्यालाहि मलिन करतो. म्हणून उजळलेल्यांनी मैळलेल्यांचा व्यर्थ संग करू नये. 'विषयान्चिये एकासनी न बैसावे' (आ. १४) असा उपदेश स्वामींनी केलेला आहे तो याच हेतूने. मैळल्याच्या संगाने, उजळलेले पुरुष मैळल्याची पुष्कळ उदाहरणे सापडतात. अशा पुरुषाच्या संगाने राहिल्यास तो हासेल तसे हासावेसे वाटते, तो बोलेल तसे बोलावेसे वाटते, तो खाईल तसे खावेसे वाटते, तो निजेल तसे निजावेसे वाटते. म्हणून अशा मैळलेल्याच्या बरोबर राहूच नये. आपल्याला एकटे राहवत नसेल तर आपल्यापेक्षा अधिक ज्ञातविरक्त असेल त्याचा संग करावा.

## संग कुणाचा करू नये. ?

म्हणून, आपल्या अनुचितत्वाबद्दल किंवा मलिनत्वाबद्दल ज्या भिक्षूला किंवा वासनिकाला खेद वाटत नाही, दुःख होत नाही तो भिक्षुक व वासनिक संगतीला योग्य नव्हे. तो इतरांना मलिन करतो. आपल्या उण्या मात्रेबद्दल दुःख न मानणारा पुरुष उत्तम मात्रेच्या पुरुषाला मलिन करतो. साधन चतुष्ट-

१. 'आदी उजळलेनि : तैल्यकार : बोलो आदरीले : अंतःकरणी भरे : सत्त्व प्रगटे : निर्वेद : अनुताप : अनुशोच : आर्त उपजे तथाविध बोले : उदया निरय तैसेया बोलावे' (सदर).

२. 'मैळला उजळल्याते मैळी : केवि : विषयाचे एकासन निराकरीले म्हणोनि' (सदर).

३. 'म्हणोनि आपुले अनुचित देखूनि जो दुःख न करी तो भिक्षुक तो वासनिक भेटीस योग्य नव्हे : मा संगास कायी होईल' (आ. स्थ. २०३).

याचा पुरुषहि उत्तम मात्रेच्या पुरुषाला व इतरांना मलिन करतो. रभस्पाने अविधि करणारा कठिया, कांजी-भाजी सेवन करणारा डिंगरा, कुयोगिया, कखाया, अधिकवृत्तीचा, कथनाचा, हे सर्व पुरुष त्यांना आपल्या उण्या-मात्रेचे दुःख नसले तर चांगल्यांना देखील मळवतात. कथनाचा पुरुष पाणी गिळणाऱ्या लोहाप्रमाणे असणाऱ्यालाहि मलिन करतो, वगैरे. म्हणून उजळलेल्यांनी अशा पुरुषांचा संग करता कामा नये. त्यांनी त्यांची भेट घेऊ नये.

## भेट कुणाची घ्यावी ?

अनुसरलेल्यांनी अनुसरणाची वासना असलेल्याची भेट घ्यावी. प्रसंगी इतरांचीहि घ्यावी. उत्तम पुरुषाच्या भेटीने काही जण अनुसरतील. पण जे अनुसरणार नाहीत त्यांचे अनिष्ट तरी चुकेल. उदाः भटोबासांनी पद्मनाभीची भेट घेतली म्हणून त्याचे अनिष्ट चुकले. सामान्य नामधारकाची जरी अनु-सरलेल्यांनी भेट घेतली तरी त्या नामधारकाचे अनिष्ट चुकून त्या उत्तम पुरुषाला गोमटे होते. इतकेच नव्हे तर उत्तम पुरुषाच्या भेटीने मलिन पुरुष देखील उजळले जातात. उदा. ज्याच्या भेटीने तैल्यकार उजळला त्याला किती गोमटे झाले असेल याची कल्पना करावी. उत्तम पुरुषाने एखाद्या अनुसरलेल्याची भेट घेतली तर त्या अनुसरलेल्या पुरुषाचे अनु-सरण भंगेल अशी क्रिया, असे अनिष्ट त्याजकडून तो होऊच देत नाही. होण्याचा संभव असला तर ते चुकवले जाते. सारांश, उत्तम पुरुषाच्या भेटीने इतरांना पुष्कळ गोमटे होते. मग खास त्या उत्तम पुरुषाला किती गोमटे होत असेल ते ध्यानात आणावे. याचसाठी प्राण्यांना अपर धर्मातून काढून परधर्मात लावण्याची क्रिया पुरुषांनी नेहमी करीत असावे. त्यासाठी वासनिकादिकांची भेट घेणे इष्ट होय.

प्रकरण ७ वे

# आदर्श महात्मा

**असो तया बहुति उपमा । योगयुक्त तोचि महात्मा**
**जो चराचरेंशी समा । बुद्धि वर्ते**
**जेवि पतिव्रते आपुला पती । वाचौनि आन नसे चित्ती**
**तेवि अव्यभिचार भक्ती । वर्ते अनन्य योगे** ( ज्ञा. प्र. १७८, १८८ )

## अन्य वार्ता करू नये

परस्परांच्या भेटीत साधकांनी अन्यवार्ता कधीहि करू नयेत. परमेश्वर, परमेश्वरावतार, परमेश्वरावताराच्या सेवासंबंधाला उपयोगी पडलेला प्रपंच, परमेश्वराचे भक्त, अनुसरलेले ज्ञानिये, बोधवंत व वेधवंत हे सगळे जीव आणि परमेश्वराने ज्यांचा निर्वंच केला आहे त्या देवता यांव्यतिरिक्त इतर जीव, देवता व प्रपंच हे सर्व ' अन्य ' होत. याची वार्ता करण्यात, या विषयी उगीच गोष्टी बोलण्यात व चर्चा करण्यात अनुसरलेल्या पुरुषांनी आपला वेळ घालवू नये. परमेश्वराच्या ठिकाणी त्याची इतकी अनन्यता असावी की कोणत्याहि प्रकारच्या अन्यवार्ता त्याला सलू लागतील. ' हा ठावो केंव्ही अनन्यता : जीवी सलू लागे अन्यवार्ता : धर्मस्मरणी तत्परता : चांग आति ' ( ज्ञा. प्र. ९९४ ). ह्या अन्यवार्ता करण्यापेक्षा एकवेळ झोपून राहिले तरी बरे. ( अन्यवार्तेंपसि निद्रा चांग : वरि निद्रा कीजे परि अन्यवार्ता न कीजे : आ. १५१ )

१. ' अन्य प्रपंच : अन्य जीव : अन्य देवता यांचे जे वर्तन ते अन्य वार्ता ' ( आ. स्थ. १५१ ).

स्वाभाविक निद्रेपेक्षा अधिक निद्रा घेणे हे सदोष खरे, पण अन्यवार्तेच्या दोषापेक्षा हा निद्रेचा दोष पुरवला. अन्यवार्तेमुळे विकार, विकल्प, आलंबन व हिंसा हे चार दोष तर घडतातच; पण शिवाय आनुषंगिक रीत्या कथनाचाहि दोष घडतो. कारण या ना त्या रीतीनें श्रीमुखीचे शब्द अन्यवार्ता करणारांच्या तोंडून अभावितपणे बाहेर पडतात व त्यामुळे अन्यकथन घडते. विकार, विकल्प, आलंबन, हिंसा व कथन या पाचं दोषांचे आश्रयस्थान असलेली अन्यवार्ता न करणे हेच केंव्हांहि अधिक श्रेयस्कर होय.

## मौन धारण करावे

जेथे आपणाकडून अन्यवार्ता होण्याचा संभव असतो तेथे साधकाने मौन धारण करणे फार चांगले. 'कथानुमोदनी अवधान : अन्य विषयी बहिरे कान : गुण स्तुती धर्मकथन : येरव्ही मौन' (ज्ञा. प्र. ९५५) हे तर आदर्श महात्म्याचे लक्षण होय. अन्यवार्तेत 'कथन' होण्याचा संभव असतो. आणि कथन होऊ नये म्हणून 'लोहे पाणी गिळीले ऐसे होऊनि असावे' (आ. १९९) म्हणून स्वामींनी सांगितलेच आहे. यावरून मौनाचें महत्त्व कळून येईल. पण मौन धारण करायचे म्हणजे मुखावाटे मुळीच शब्द काढायचे नाहीत असे नाही. विहिताचारासाठी आवश्यक तेवढे बोलणे केलेच पाहिजे! त्याशिवाय इतर गोष्टी मात्र मुळीच करू नयेत एवढाच मौनाचा अर्थ. आपल्या विहिताचारावर, शास्त्रावर, व स्मरणावर पूर्णपणे लक्ष ठेवून साधकाने इतर बाबतीत मौन स्वीकारावे. कांही झाले तरी हे मौन त्याने सोडू नये. (दोही ओंठां टाळे घालावे : आ. मा. १९८). शास्त्र, स्मरण, चर्या यावरील लक्ष सुटू देऊ नये आणि इतर बाबींकडे लक्ष देऊ नये. साधकाने आपण स्वतः तर मौन धारण करावेच पण इतरांनाहि मौन धारण करायला लावावे; किंवा धर्मवार्ता करण्यात काळ कंठावा. आणि यापैकी काहीच होत नसेल तर परस्परांचा संग टाळून, विभाग करून निघून जावें; म्हणजे अन्यवार्तेचा प्रसंगच मुळात नाहीसा करावा हे सर्वांत चांगले.

१. '**अन्यवार्तेचेया ठायी विकार : विकल्प : आलिंबन : हिंसा : निद्रा स्वभावातिक्रम : अन्यवार्तेमधे कथन घडे**' (आ. स्थ. १५१).

२. '**अन्यवार्ता ऐकीजे अथवा पूसीजे तरि लक्ष सुटे : मरणा ठी** [पुढे

## अन्यवार्तेने धांदुलमोक्ष

जेथे मौन धारण करणे अत्यंत आवश्यक आहे तेथे तसे न करता जो उगीचच गोष्टीवेल्हाळपणा करतो त्याच्या शेवटी प्राणावर बेतण्याचाहि संभव असतो. तो कसा हे धांदुलमोक्षाच्या कथेवरून उत्तम रीतीने दिसून येते. धांदुल या नावाचा एक कुणबी होता. त्याच्या शेतात पऱ्हाटी (कापूस) चांगली पिकली होती. एकदा काय झाले की, इंद्राचा ऐरावत त्याच्या शेतात चरायला आला, आणि चरून गेला. असे दररोज व्हायला लागले. दररोज आपल्या शेतात कुणाचे ढोर चरून जात असावे, हा धांदलाला विचार पडला. एके दिवशी तो मुद्दाम शेत राखत बसला. पहातो तो भला मोठा 'म्हैशा' (कारण ऐरावताला तो म्हशाच समजला). हा ज्याचा असेल त्याच्या घरी न्यावा म्हणून त्याने त्याची शेपटी धरली. तो काय चमत्कार ! तो म्हैशा, अर्थात् ऐरावत जो उडाला तो इंद्रसभेच्या महाद्वाराजवळ जाऊन पोचला. आत सिंहासनावर बसलेला इंद्र हा त्या म्हैशाचा मालक असला पाहिजे अशी कल्पना करून धांदुल सरळ त्याच्या समोर जाऊन उभा राहिला आणि म्हणाला की 'अरे बाबा, हा तुमचा म्हैशा माझ्या शेतात येऊन दररोज शेताची नासाडी करून ठेवतो. याला नीट बांधून का ठेवीत नाही ? आणि तुम्हाला हा नीट ठेवता येत नसेल तर विकून तरी टाका किंवा एखाद्या चोराला देऊन टाका ! माझ्या शेताची याने धूळधाण केली. आता मी खर्चवेच कसे फेडू ?' इंद्र म्हणाला 'तुझ्या शेतात जे पिकेल त्याने तू फेड आणि तुला खायला लागेल तेवढे द्रव्य माझ्याजवळून ने' असे म्हणून इंद्राने सोन्याच्या नाण्यांनी आपली मूठ भरली आणि ती देण्यासाठी त्याने आपला हात वर उचलला. धांदल एकदम पुढे गेला. आपल्या जवळचे रकटे त्याने पसरले. त्यावर इंद्राने मुठी भरून भरून सोन्याच्या नाण्यांचा ढीग टाकला. तो घेऊन तो जायला निघाला. पण आता जायचे कसे ? इंद्राने सांगितले 'या ऐरावताचेच शेपूट धरून जा.' आज्ञे-प्रमाणे तो ऐरावताचे शेपूट धरून खाली आला.

चालू] होय : यथा धांदूल : लक्ष सुटलेया मरण ये प्रत्यक्ष : म्हणौनि मौन्य भंगो नेदावें : आपण मौन्य करावे का धर्मवार्ता करावी : ना तरी विभाग करावा : एरवी मरणा ठी ये ऐसे भ्यावे' (आ. स्थ. १५१).

पुढे त्याने शेत पुन्हा नांगरले. त्यात पेरणी केली. त्यात उत्तम पीक आले. वेचणी करण्यासाठी त्याच्या शेतात मजूर आले. काम करता करता एकाने सहज त्याला विचारले, ‘ धांदुलदादा, तुझे मागचे पीक तर साफ बुडाले होते. मग तुला खायला मिळाले कसे ? ’ या प्रश्नाला उत्तर न देता धांदुल स्वस्थ बसला असता तर बरे झाले असते. पण गोष्टीवेल्हाळ-पणामुळे त्याने आपण स्वर्गात कसे गेलो आणि तेथून इंद्राने आपणाला द्रव्य कसे दिले वगैरे सगळी हकीकत तिखटमीठ लावून सांगितली. आणखी वर बोलला की ‘तो ऐरावत अजून माझ्या शेतात नेहमी येत असतो.’ तेव्हां सर्वजण टाळ्या पिटून म्हणाले , ‘ मग धांदुलदादा, तुझ्या बरोबर आम्हा-लाहि स्वर्गाला घेऊन चल ना एकदा. ’ धांदुल म्हणाला ‘ वा, का नाही, चला आपण सगळेच जाऊ या. ’ दुसऱ्या दिवशी ऐरावत शेतात आला तेव्हां धांदलाने त्याची शेपटी धरली. आणि धांदलाचे पाय दुसऱ्याने, त्याचे पाय तिसऱ्याने धरले. अशी माळची माळ तयार होऊन, ऐरावत उडाल्याबरोबर सगळे जण स्वर्गाकडे जायला लागले. बरे, जातांना तरी धांदलाने मौन धारण करावे की नाही ? पण छे, बोलल्यावाचून त्याला कुठले चैन पडायला ! तो गोष्टी करायला लागला. मधेच त्याला एकाने विचारले ‘ धांदलदादा, मला तेथे कपाशी मिळेल का रे ? ’ तो म्हणाला होय मिळेल तर. ’ ‘ एका रुपयाला किती मिळेल बरे ? धांदुल म्हणाला ‘ किती म्हणजे काय ? अरे ही इतकी इतकी ’ ... असे म्हणून तो आपल्या दोन्ही हातांनी दाखवू लागला. तो काय ? त्याचे हात सुटल्यामुळे तो आणि त्याच्या पायाला धरून असलेल्या लोकांची माळची माळ एकदम खाली पडली आणि सगळे जण मरण पावले. ( ली. च. भाग २ पा. ३० ). मौन धारण न करता व्यर्थ बडबड केल्याने धांदलाप्रमाणे अनेकदा प्राणाला मुकण्याची अशी पाळी येते म्हणून साधकाने विहिताचाराव्यतिरिक्त एरवी मौन धारण करणेच चांगले. धांदलाप्रमाणे आपणाला होणाऱ्या थोर लाभाचे रहस्य अथवा खोट्याच लाभाच्या गोष्टीहि त्याने कधी करता कामा नये.

### वर्म-स्पर्श करू नये

अन्यवार्ता करतांना वार्तालापाच्या भरात साधकाकडून इतरांचा वर्मस्पर्श होण्याचा संभव असतो. तो टाळण्यासाठीहि अन्यवार्ता न करणे श्रेयस्कर

होय. 'वर्म' म्हणजे दुसऱ्याचे गुप्त रहस्य. ते आपण कधीच प्रगट करू नये. तसे केल्याने त्या पुरुषाला, म्हणजे ज्याचे वर्म प्रगट केले असेल त्याला दैन्य येते आणि त्यामुळे वर्म प्रगट करणाराला नरक लागतात. ( वर्मस्पर्शे नरक : आ. १७३ ). एखाद्या वर्माचा म्हणजे गुप्त रहस्याचा उच्चार करताच त्या पुरुषाला इतक्या प्राणांतिक वेदना होतात की त्या वर्मस्पर्शापेक्षा आपले शिर जरी तोडले गेले असते तरी बरे झाले असते असे त्याला वाटते. ( वर्मस्पर्शापासि वीर शिरछेदु चांगु : आ. १७३ ). शिरच्छेदाने एकच वेळ मरण येते. पण आपल्या वर्माची वाच्यता झाल्याने त्या पुरुषाला ज्या ज्या वेळी त्या वर्माची आठवण होते त्या त्या वेळी त्याला शिरच्छेदाचे व मरणाचे दुःख वाटते. एखादा पुरुष तर त्यामुळे पोटात सुरी खुपसून घेऊन प्राणहि देतो. म्हणून आचरत्या पुरुषाने इतरांचे वर्म कधीच उघडकीस आणू नये. तसे केल्याने, इतराचा शिरच्छेद केल्यामुळे प्राप्त होणारे नरक त्याला लागतात.

### अंतःकरण दुखवू नये

अन्यवार्तेत इतरांचा वर्मस्पर्श होण्याचा जसा संभव असतो तसाच, व्यर्थ शब्दच्छल होऊन त्यामुळे इतरांची अंतःकरणे पोळण्याचाहि संभव असतो. कोणत्याहि रीतीने इतरांची अंतःकरणे दुखवणे श्रीचक्रधरस्वामींनी निषिद्ध मानले आहे. त्यांना ते मुळीच आवडत नसे. त्यांच्याजवळ पद्मनाभीदेव या नावाचा एक शिष्य होता. एळापुरी असतांना तेथील 'परमाणुभवदेव' नावाच्या स्वामीच्या मठात तो गेला. हे परमाणुभवदेव राजयोगी होते. त्यांच्या एका विड्यासाठी एका आसूची पाने लागत. पद्मनाभीला पाहून त्यांनी त्याचा चांगला मानसन्मान केला. त्याला बसायला आसन दिले. बोलताबोलता पद्मनाभीने 'परमाणुभव' या नावावर कोटी केली. तो म्हणाला 'तुमचा अनुभव परमाणु एवढाच आहे की

१. 'वर्म म्हणजे पुढीलाचा गुप्त अर्थ प्रगट कीजे : जो करू नये : दैन्यरूप : हे केल्या नरक' ( आ. स्थ. १७३ ).

२. 'धडकरी जिव्हारी लागे ते देहपर्यंत न विसरे : एक पोटी सुरी सूती : शिरे एकच मरण आन दुःख वर्म जेव्हेळी जेव्हेळी आठवी ते ते मरण आन दुःख' ( सदर ).

काय ? त्याचमुळे तुम्हाला परमाणुभव नाव पडले वाटते ?' हे ऐकताच परमाणुभवदेवांचे अंतःकरण दुखवले. त्यांनी रागावून पद्मनाभीला मठाबाहेर हाकलून दिले. तिथून तो आला पण श्रीचक्रधरस्वामी त्याला आपल्या मठात घेईनात. त्यांनी बाइसाला सांगितले की 'बाई, याला आत येऊ देऊ नका. हा माझा शिष्य म्हणून परमाणुभवदेवांनी याचा चांगला मानसन्मान केला. पण याने त्यांच्या नावाचे खंडन करून त्यांचे अंतःकरण दुखवले, म्हणून त्यांनीहि याला मठाबाहेर हाकून दिले.' स्वामींचा रोष पाहून पद्मनाभी दुःख करू लागला. बाइसांनी विनंती केली तेव्हां स्वामी म्हणाले की 'हा शेणामातीने अंग सारवून परमाणुभवदेवांची क्षमा मागील तर त्यांच्या सांगण्यावरूनच मी याला माझ्याजवळ राहू देईन; एरवी नाही.' तेव्हां पद्मनाभीने परमाणुभवदेवाकडे जाऊन त्यांची क्षमा मागितली. त्यांनी येऊन स्वामींना सांगितले. तेव्हां स्वामींनी पद्मनाभीचा स्वीकार केला (ली. च. भाग ३. पा. ३१). यावरून इतरांची अंतःकरणे पोळणे किती निषिद्ध आहे याची कल्पना येईल.

### उपहास करू नये

अन्यवार्तेत कथाप्रसंगाने साधकाकडून इतरांचा उपहासहि होण्याचा संभव असतो. पद्मनाभीकडून परमाणुभवदेवाचा वस्तुतः उपहासच झाला होता. तथापि प्रत्यक्ष उपहास करण्याचा मात्र त्याचा हेतू नव्हता; तर आपल्या विद्वत्तेने त्याच्या नावाचेच तो खंडन करीत होता. कधी कधी साधक मुद्दामहून इतरांचा उपहास करतो. त्यामुळे त्याला फार अनिष्ट निपजते. लुईपाई या नावाचा एक जोगी होता. तो एका राजाच्या प्रधानाचा गुरु होता. एके दिवशी राजा प्रधानाला घेऊन बाहेर पडला. तेव्हां मार्गात लुईपाई रस्त्यातील 'लुई' (=अळ्या) वेचून खात होता. त्याच्या तोंडावर घाण होती व त्यावर माशा घोंगावत होत्या. लुईपाईला पाहून प्रधान खाली उतरला. त्याने त्याला नमस्कार केला. राजा मात्र लुईपाईचे ते घाणेरडे 'ध्यान' पाहून हसला आणि म्हणाला 'पाहिले, आमच्या प्रधानाचे गुरु!' असे बोलून राजा खदखदा हसू लागला. म्हणून त्याच्या जवळचे चारदोन

१. 'परमाणु अनुभव नामखंडन' (आ. स्थ. १५१).

लोकहि हसू लागले. त्यामुळे लुईपाई रागावला. तो म्हणाला ' राजा, आताच्या वेळी तू मला हासलास, तर केवळ तूच हसलास; पण आता मी तुला हसेन तर तुझा सगळा सैन्य परिवार हसेल.' राजा म्हणाला 'हास बापडा.' राजा प्रधानाला घेऊन पुढे गेला. इकडे लुईपाई हसू लागला आणि म्हणून त्याच्या सिद्धिसामर्थ्यामुळे राजाचा परिवारहि एकसारखा हसू लागला. त्यांचे हसणे काही केल्या थांबेना. राजा फिरून परत आला तरी परिवार हसतच होता. हसूनहसून त्यांची आतडी तुटायला लागली. प्रधानाने राजाला लुईपाईची क्षमा मागायला सांगितले. त्याप्रमाणे राजाने क्षमा मागितली, इतकेच नाही तर तो त्याचा शिष्य बनला. तेव्हां कुठे त्याच्यावरील व त्याच्या परिवारावरील ते संकट नाहीसे झाले. ( ली. च. उत्त. ४१९ ). म्हणून आचरत्या पुरुषाने अन्यवार्तेत किंवा केव्हांहि इतरांना उपहासाने कधीच हसू नये.

श्रीचक्रधरस्वामीकडे एकवेळ द्वारावतीकारांचा एक स्थूळ विद्यावंत आला होता. त्याचा स्वामींनी चांगला मानसन्मान केला. तो गेल्यावर बाईसांनी डखले चांगदेव भटाला बाजारात पाठवले. तो तो विद्यावंत दोन बायांच्या खांद्यावर हात ठेवून व कुत्रे घेऊन बोरेगाजरे मागतांना दिसला. हे पाहून डखले हासत हासतच आला व त्या विद्यावंताची हकीकत बाईसाला उपहासपूर्वक सांगू लागला. ते कळताच स्वामींनी त्याला म्हटले की 'साधकांनी असे उपहासपूर्वक कुणालाहि हसू नये. किंवा त्यांची गोष्ट उपहासपूर्वक सांगू नये.' ( ऐसे न भणिजे की गा डखलेया : पुरुषी क्षोभ उपजैल तेव्हेळी काइ कराल : आ. २२८ ). नाही तर लुईपाईमुळे राजाची व त्याच्या परिवाराची जी स्थिती झाली तीच त्याची होईल. यावर त्यांनी लुईपाईची वरील गोष्ट सांगितली. सारांश, साधकाने कुणाला हसू नये; इतकेच नाही तर त्याची गोष्ट उपहासपूर्वक इतरांना सांगूहि नये. अन्यवार्ता केल्याने या प्रकारची व इतर अशीच अनेक अनिष्टे जोडण्याचा संभव असतो. म्हणून अन्यवार्ता करू नये.

## परस्परावर प्रीति

एकमेकांच्या भेटीत साधकांनी परस्परावर प्रीति करावी. भेटलेले अथवा एकत्रित झालेले सर्वच्चजण एकाच परमेश्वराचे अनुयायी असल्यामुळे व त्या सर्वांचा एकच धर्म असल्यामुळे त्यांनी एकमेकावर विशेष प्रीति

करणे अवश्य आहे. ( एकु देवो एकु धर्मु तया परस्पर परमप्रीति होआवी की : आ. मा. ३६ ). व्यवहारदृष्ट्याहि एकाच निशाणाखाली जमणारे लोक 'साजात्य' भावनेमुळे एकमेकाविषयी आस्था व प्रेम बाळगून असतात हे आपण पाहतोच. मग ती एकाच देवाच्या आणि एकाच धर्माच्या निष्ठावंत अनुयायामध्ये नेहमी आढळावी हे स्वाभाविक नाही काय ?

एका परमेश्वरावर आपली श्रद्धा असली म्हणजे त्याच्या परिवाराविषयी साधकाला नैसर्गिक रीत्याच प्रेम आढळते. ( आधी एथ बुद्धि होआवी : मग एथिचेया परिवारावरि होआवी : वि. २४८ ). ईश्वरावर बुद्धि आहे पण परिवारावर नाही, असे असल्यास ईश्वरावरील बुद्धीमुळे पुढे हळूहळू त्याच्या परिवारावर देखील बुद्धि येते. हा ईश्वराचा परिवार कोणता?

## ईश्वराचा परिवार

ईश्वराच्या परिवारात प्रामुख्याने अनुसरलेल्या बोधवंतांचा व ननुसरलेल्यांचा समावेश होतो. अनुसरलेल्या बोधवंतांचे एकूण ३१ प्रकार आहेत. ते येणे प्रमाणे :- (१) **अनुसरलेला** – त्रिदोषरहित. (२) **प्राप्तत्यागीये** प्राप्त अनिष्टाचा त्याग करणारे (३) **विरक्त**–वैराग्य– प्रधान. (४) **तापसे**-उग्र तप आचरणारे. (५) **दमनशील** – इंद्रिये, मन व स्वभाव यांचे दमन करणारे. (६) **निर्वेदशील**-मागील दोषांनी पोळणारे. (७) **अनुतापशील** प्रस्तुतच्या दोषांनी पोळलेले. (८) **वटोवटो करिते** - मी कसा उद्धरेन, मी कसा निस्तरेन अशी अनुशोचपूर्वक वटवट करणारे. (९) **परिच्छेदी**--सर्वस्वाचा त्याग करणारे. (१०) **प्रयत्नी** – प्रयत्नपूर्वक चर्या करणारे (११) **व्युत्पन्न** - आचाराविचारांची व्युत्पत्ति लावणारे व जाणणारे. (१२) **ज्ञाते**-चहू पदार्थांचे व आचाराविचारांचे यथार्थ ज्ञान झालेले. (१३) **जिज्ञासक**-महदाइसाप्रमाणे नेहमी शास्त्रविषयक प्रश्न विचारणारे. (१४) **मननशील**–पाठाअर्थाचे मनन करणारे. (१५) **स्मरणनिष्ठ** – परमेश्वराचे स्मरण सदा-सर्वदा करणारे. (१६) **रंकवृत्तीचे** -- आपले दोष नासण्यासाठी शोच्या-पुढेहि नम्र होणारे. (१७) **उपाधिस्थूळ** -- इतरांना इष्ट वडावे म्हणूनच केवळ उपाधि बाळगणारे. (१८) **संसारत्रस्त** -- उबगून ज्यांनी संसाराचा त्याग केला असे. (१९) **आर्त** -- ईश्वराप्रीत्यर्थ नेहमी उत्कंठा बाळगणारे. (२०) **साधे**-विकारचेष्टाविरहित. (५१) **संत**–सत्त्वस्थ (२२) **महंत**–

सगळ्या गुणांनी महत्त्व पावलेले. (२३) **सेवक**–परमेश्वराचे किंवा मार्गाचे नित्य सेवक. (२४) **भजक**–पात्रापात्राचा विचार न करता नेहमी लोकांना भोजन घालणारे. (२५) **शहाणे**--आचार करतांना आपले साने दोष लपवून क्रिया करणारे. (२६) **बुद्धिमंत**--व्यावहारिक दृष्ट्या दूरदर्शी. (२७) **प्रेमळ**–अश्रुपात करणारे. (२८) **साद्रव**–परमेश्वरचरित्रे ऐकताच अळुमाळ द्रवणारे. (२९) **भावाळू**–भावप्रधान क्रिया करणारे. (३०) **वेध-वंत**–वेधामुळे अनुसरलेले; आणि (३१) **बोधवंत**--बोधामुळे अनुसरलेले.

परमेश्वराच्या परिवारात ननुसरलेल्यांचाहि समावेश होतो. (१) **ज्ञानिये**—बोध होऊन न अनुसरलेले; कर्मराहाटीत वावरणारे. (२) **नामधारक**—व्यवहारात राहून परमेश्वराचे नित्य नामस्मरण करणारे. (३) **बोधवंत**--विपरीत वेधाचे म्हणजे युगधर्मावरून मन निघून परमेश्वर-मार्गाविषयी आवड उत्पन्न झालेले. (हा परमेश्वराचा चेतन परिवार झाला. चेतनाप्रमाणेच परमेश्वराचा अचेतन परिवार आहे. त्यात स्थान व प्रसाद अंतर्भूत होतात ).

## अच्युत गोत्रियांची परस्परप्रीति

परमेश्वराचा हा सगळा परिवार' अच्युतगोत्रीय 'होय. आईचे आपल्या बालकावर जितके प्रेम असते त्यापेक्षा अनंतपटींनी परमेश्वर जीवावर प्रेम करतो. परमेश्वराचे जीवावरील हे प्रेम ' अच्युत ' असते. असे अच्युत प्रेम करणारा जो अच्युत परमेश्वर,त्याच्या गोत्रातील म्हणजे परमेश्वरमार्गातील लोकांनी देखील असेच अच्युत प्रेम परस्परावर केले पाहिजे.(तुम्ही अच्युत गोत्रीय की गा : तुम्हा परस्परे परमप्रीति होआवी : आ. १३६ ). आपल्या स्वतःवर विनाशकाल आला तरी त्यावेळीहि परमेश्वरमार्गातील लोकावरचे प्रेम कमी करता कामा नये. या बाबतीत, पूर्वी निर्देशिल्याप्रमाणे परमेश्वर-मार्गावर अंतःकरणपूर्वक श्रद्धाबुद्धि ठेवणारा वेधवंत ( परमेश्वरपरिवारातील जवळजवळ शेवटचा पुरुष ) हाहि परमेश्वराचा गोत्रीयच म्हटला पाहिजे. त्या

**१. ' ते पाहून मातेचा एकदेश : परस्परे म्हणजे एकमेका : येरयेरी : प्रीति म्हणजे अवसरी उचित गोमटे कीजे : परम म्हणजे विनाश काळे परि हितनिरत '** ( आ. स्थ. १३६ ).

वेधवंतावर देखील आपल्याकडून अनायासे म्हणजे आपली चर्या न थांबवता, होत असेल तर सगळ्यांनी परमप्रीति करावी; म्हणजे त्याला अन्नोदक देणे, फाळके पालटणे, त्याला आपत्तीपासून सोडवणे वगैरे क्रिया त्याच्या बाबतीतहि कराव्या. वेधवंत व्यवहारात असतो तरीहि हे करावे. विनायकदायाने एका वासनिकाच्या लेकराला माशापासून त्रास होऊ नये म्हणून त्याच्या अंगावर फडके टाकले होते त्याचे कारण हेच की तो वासनिक परमेश्वरगोत्रीय होता; आणि काहीतरी पूर्वसंस्कारानेच त्याच्या पोटी ते मूल जन्माला आले होते. जिथे वासनिक व त्याचे लेकरू ह्यांच्यावर प्रेम करायला सांगितले आहे तिथे आचरत्या पुरुषांनी परस्परावर प्रेम करायला पाहिजे हे सांगायला नको. आणि उत्तम पुरुषांनींच असे प्रेम करावे असे नाही तर सदोष पुरुषांनीहि करावे. कारण, असे प्रेम केल्याने सदोष पुरुषांचे दोष लोप पावतात. परमेश्वराच्या गोत्रीयावर परमप्रीति केल्याने प्रीति करणाराची अयोग्यता नासते. अर्थात्, प्रीति करतांना जे दोष घडतील अशाच दोषांची अयोग्यता नासते.

सर्वसामान्यतः परमार्गातील पुरुषाने अच्युतगोत्रीयाशी म्हणजे मार्गातील इतर सर्व पुरुषाशा परमप्रीति करावी हे तर खरे; पण सर्वोत्तम पुरुषानेहि उत्तम पुरुषाबरोबर अवंचकत्वाने प्रीतिपूर्वक वर्तन करावे. उदा:- म्हातारी महदाइसा ही तारुण्यात असतांनाहि इंद्रियमनोधर्मापासून तिला बाधा होत नव्हती. इतका तिचा त्यांच्यावर ताबा होता. अशी ती उत्तम चर्यावंत महदाइसा श्रीचक्रधरस्वामींनी नागदेवाचार्याला निरोविली होती. तिची कोणत्याहि रीतीने वंचना करायची नाही, आबाळ करायची नाही अशी स्वामींची नागदेवाला आज्ञाच होती. त्याप्रमाणे नागदेवाने तिला

१. 'मार्गावरि श्रेष्ठ भाव बुद्धि ऐसा जो वेधवंत तोही गोत्रजचि : तेणेसि प्रीतिपूर्वक विधान करावे : तरी तेचि कैसे : ना : अन्नोदक : फाळुके देणे : आपत्तीपासौनि आडवणे एवमादिक : जरि आपुलेनि अनायासे होअवे' (आ. बं. १३६).

२. 'हे विनायकदाये ही करणे : मग भिक्षु वस्त्र देणे हे दूर ठेले: प्रीतीवीण सकळ दोष भिक्षूचा न लोपे : अयोग्यता पुसती : का पा : तैसी प्रीती' (आ. स्थ. १३६).

खरोखरच अवंचकत्वाने वागविले. त्याप्रमाणेच अधिकरणाने आपल्याजवळ निरोविलेल्या उत्तम अधिकारी पुरुषाशी अवंचकपणे प्रीतिपूर्वक वर्तन करावे. त्या अधिकरणाचे पूर्व वर्तन गर्ह्य असल्यास तिकडे त्या उत्तम चर्यावंतांनीहि लक्ष देऊ नये. उदा : नागदेव हा पूर्वाश्रमी अनेक व्यसनांनी युक्त होता. पण त्याच्या पूर्व वर्तनाकडे लक्ष न देण्याची स्वामींनी म्हाताऱ्या महदाइसेला आज्ञा केली होती. कारण तोच नागदेव श्रीचक्रधरस्वामींच्या सान्निध्यात पूर्णपणे पालटून गेला होता. ( वानरेया : आता म्हातारी तुम्हा लागे गा : कव्हणे अर्थे वंचीजे ना : बाइ : तुम्ही याते पुसीजे : पुरीकर नागदेवो ऐसे न भणीजे : हा एथीचिया जवळीका आन जाला असे : आ. १३७ ). त्याचे शाब्दज्ञान चरित होऊन तो अपरोक्षाला योग्य झाला होता. इतकेच नव्हे तर चारहि पदार्थ त्याला किंचित् प्रमाणात दिसूही लागले होते. ह्याच दृष्टीने तो महदाइसा, म्हाइभट वगैरे सर्वांपेक्षा श्रेष्ठ होता. म्हणूनच महदाइसा, म्हाइभट वगैरेसारख्या उत्तम चर्चावंतांना व मार्गातील इतर पुरुषांनाहि त्याच्या स्वाधीन केले होते. त्यांनी परस्परावर एखाद्याची कनिष्ठता किंवा पूर्वाश्रमीचा व्यसनीपणा लक्षात न घेता जसे परस्परावर प्रेम केले तसेच सर्व आचरत्या पुरुषांनी केले पाहिजे.

## विशिष्ट बुद्धि नको

परमेश्वरमार्गातील सगळ्या पुरुषावर परमप्रीति करावी, म्हणजे भेटीपासून मथनापर्यंतच्या ( आ. १४० ) सर्व क्रिया त्याच्या ठिकाणी कराव्या. परंतु ज्यावर परमप्रीति करायची त्यावर 'विशिष्ट बुद्धि' म्हणजे 'परमेश्वर बुद्धि' मात्र येऊ देऊ नये. कारण, त्यामुळे विकल्प उत्पन्न होऊन दोघेहि पुरुष धर्मापासून भ्रष्ट हातोते[2]. उदा : नागदेवाचे दास्य करायला स्वामींनी महदाइसेला सांगितले खरे; पण धाकट्या बहिणीने

**१. 'वय तारुण्य असता परि इंद्रिये मनोधर्म न बधीती म्हणौनि म्हातारी : तरी लागे म्हणजे कव्हणी व्यसन लागून ठाके जैसे : तैसेचि भट्टोबासी शेवटपर्यंत अवंचकत्व केले'** ( आ. स्थ. १३७ ).

**२. 'हे करावे : परी हेचि माझे पर ऐसी विशिष्ट बुद्धि येवो नेदीजे : तेणे विकल्प संचरे'** ( आ. स्थ. १३८ ).

( अथवा भावाने ) वडील भावाची जशी सेवा करावी त्याप्रमाणे ते होते. तसे करतांना महदाइसेने नागदेवावर विशिष्ट बुद्धि येऊ देता कामा नये अशी स्वामींनी सूचना केली ती याच अर्थाने. ( बाइ : परम प्रीति कीजे : परि विशिष्ट बुद्धि न कीजे : आ. १३८ ). परमेश्वराच्या दास्याने जशी मुक्ति मिळते तशी नागदेवाच्या दास्याने मला मुक्ति मिळेल अशी विशिष्ट बुद्धि महदाइसेने आणायची नव्हती. तशी तिने आणली नाही. आणि कोणत्याच आचरत्या पुरुषाने परस्परावर प्रीति करतांना तशी ती कधीच आणता कामा नये.

## प्रीतीला विषय व्हावे

परमेश्वरमार्गातील पुरुषावर परमप्रीति करावी या वचनाच्या अनु- षंगाने साहजिकच दुसरा एक असा नियम निष्पन्न होतो की मार्गातील एखाद्या पुरुषाने आपणावर प्रीति केली तर त्या प्रीतीला आपण ‘ विषय ’ झाले पाहिजे—पात्र झाले पाहिजे. म्हणजे त्या प्रीतीचा स्वीकार केला पाहिजे. ( प्रीति विखो होइजे : आ. १३९ ). अर्थात्, मार्गातील एखाद्या पुरुषाने मोठ्या आवडीने उपचारपूर्वक व प्रसन्नतापुरःसर एखादा पदार्थ आपणाला अर्पण केला तर आपण त्याचा स्वीकार करावा. नाही तर या वचनाचा भंग केल्याचा दोष आपल्या म्हणजे न घेणाऱ्याच्या पदरी येईल.

सामान्यतः, इतरांनी भिक्षान्नाव्यतिरिक्त दिलेले पदार्थ आचरत्या पुरूषांनी स्वीकारू नयेत हे खरे. तथापि ईश्वरादिभावाने मिळालेला पदार्थ साधकाने स्वीकारायला हरकत नाही. इतकेच नाही तर ते पदार्थ त्याने नाकारू नयेत. नव्हे, त्याने तेच पदार्थ स्वीकारावे. ( पोरे हो : ते तुमचिया कडौनि तुम्हासि काइ न होआवे : एथौनि तुम्हा सकळही होआवे की :आ.१२५). पदार्थ प्राप्तीविषयी साधकाच्या ठिकाणी पूर्णपणे हेतुरहितता असावी. आपण इच्छा केल्यामुळे व रुचि दाखविल्यामुळे जे पदार्थ मिळतील ते त्याने घेऊ नयेत. तसेच जीवहेतूने म्हणजे इतर जीवांनी स्वतःचे भले व्हावे या

१. ‘ विशिष्ट म्हणजे मोचक ते ईश्वरदास्यचि : परि भावंडे का जैसी ’ ( आ. स्थ.१३७ ).

२. ‘ म्हणजे हेतुरहितता आन रुचि वासनावशे ना : ’ ( आ. स्थ. १२५ ).

हेतूने साधकाला संपादलेले पदार्थहि त्याने स्वीकारू नयेत. तर केवळ ईश्वरादि भावाने मिळालेले पदार्थ, मग ते साधन–चतुष्टयाचे किंवा षड्रस-संपन्न असले तरी हरकत नाही, पण तेवढेच स्वीकारावेत. अर्थात् ‘ परस्परें परमप्रीति होआवी ’ ( आ. १३६ ) या वचनानुसार जर कुणी परमेश्वर–मार्गियानेच प्रीतिपूर्वक व सौजन्यपुरःसर पदार्थ दिले तर ते ईश्वरादिभावाने मिळाल्यासारखेच होतें. ते ‘प्रीति विखो होइजे ’ ( आ. १३९ ) या नियमानुसार देखील स्वीकारायला पाहिजेत. ते पदार्थ नाकारल्याने वचन-भंगाचा दोष पदरी येतो.

## पण दृढचर्यावंतांनीच

अर्थात् हा नियम दृढचर्यावंताच्या बाबतीतच लागू आहे. कारण प्रीति-पूर्वक संपादन केलेला पदार्थ स्वीकारल्यानेहि त्याच्या चर्येचा भंग होऊ शकत नाही.[2] म्हणून त्यांनी असा पदार्थ स्वीकारलाच पाहिजे. नाहीतर त्यांच्यावर ‘ प्रीति विखो होइजे ’ ( आ. १३९ ) या वचनाचा भंग केल्याचा दोष येईल. पण कोमळ पुरुष, वैजात्य प्रकृतीचे व वैजात्य स्वभावाचे पुरुष त्यांना हा नियम लागू करता येत नाही. कारण, त्यांना पदार्थ–स्वीकारामुळे चर्याभंगाचा दोष लागण्याचा संभव असतो. अशा पुरुषांना पदार्थ संपादन करणे हेच मुळी चुकीचे आहे. त्यांना पदार्थ संपादन करून त्यांनी तो न घेतल्यास त्यांना वचनभंगाचा दोष लागेल हे खरे. पण पदार्थ संपादन करणाऱ्या पुरुषालाहि त्यामुळे गोमटे न लागता ओखटेच होईल. तेव्हां ‘ प्रीति विखो होइजे ’ हा नियम दृढचर्यावंतांनाच लागू पडतो. पण दृढ-चर्यावंताला देखील एखाद्याने ‘ वामवेधाने ’ पदार्थ दिला, म्हणजे उपचार, प्रसन्नता, प्रेम, आग्रह इत्यादिपूर्वक अर्पण न करता कसा तरी द्यायचा

१. ‘ येथून म्हणजे ईश्वरादिभावे : प्रमाणविहित : प्रीति सौजन्य सकळहि म्हणजे साधनाचिये ठाउनि रसहि मुख्य षड्रसान ’ ( आ. स्थ. १२५).

२. ‘ मा तरी तुम्हा म्हणितल्या आधिकारी अनाधिकारी नवे जुने अवघेच लाभती आन काई : म्हणे ना : चर्या न भंगता यथाधिकारे सहात्मक होय तैसे पुरुष भेदे घेणे लाभे ’ ( आ. नं. १२५ ).

या बुद्धीने दिला तर त्यानेहि तो स्वीकारूं नये.

## दुःखपूर्वक पदार्थ संपादन

देणाराने पदार्थ द्यायचा तो नम्रतेने व दुःखपूर्वक, म्हणजे तो स्वीकारला न गेल्यास आपणाला होणारे दुःख प्रगट करून द्यावा. आबैचे दुःख पाहूनच तिच्या पुऱ्या श्रीचक्रधरस्वामींनी स्वीकारल्या. ( ली. च. उत्त. २८६ ). नागदेवाचार्यांचे रुद्धपुरला असतांनाचे दुःख ऐकूनच स्वामींनी त्यांना परत आपल्या जवळ बोलावून घेतले व त्यांना क्षेमालिंगन दिले. ( ली. च. उत्त. २ ). यासाठी नित्यविधि व नैमित्तिक विधि आचरीत असतांना सगळ्या क्रियांच्या बाबतीत दुःख करीत असावे; दुःखपूर्वक त्या क्रिया कराव्या. दुःख उपजत नसेल तर ते प्रयत्नपूर्वक उपजवावे. इतरांनाहि प्रयत्नपूर्वक दुःख करायला सांगावे. जो साधक असे दुःख करीत नाही त्याचा कोणताहि पदार्थ आपण स्वीकारू नये; त्याचा संसर्ग करू नये, त्याचें कांही ऐकू नये, त्याच्याशी बोलू नये. कारण तसें केल्याने आपणालाच अनिष्ट उपजेलें.

ज्या भिक्षूच्या ठिकाणी दुःख नाही, निर्वेद नाही, अनुताप नाही त्याच्या जवळहि कधी राहू नये. त्याची भेटहि घेऊ नये. दुःख नसलेला भिक्षुक हा 'जीतचि प्रमादिया' म्हणजे त्याजकडून प्रमाद प्रत्यक्ष घडलेला नसूनहि तो प्रमादिया होय. कारण, त्याच्या कडून लौकरच प्रमाद घडणार यात शंका नाही. अशा पुरुषाने चाड–दुःख नसतांना पदार्थ संपादन केल्यास 'हा पदार्थ मला आवडत नाही, सहन होत नाही' वगैरे म्हणून तो निराकरावा. पण 'हा पदार्थ मला नको. तुम्हालाच तो पाहिजे, तुम्हीच

१. 'वामवेधे पदार्थ संपादिला नानुकरीता तो न स्वीकारावा' ( आ. स्थ. १३९ ).

२. 'म्हणौनि नित्य विधी निमित्त विधी दुःख होआवे : उपजे ना तरी प्रयत्न करावे : आन पुढीलाकरवी प्रयत्न करवावे : दुःख नाही त्या भिक्षूचा पदार्थ न स्वीकरावा : त्याचा संसर्ग न करावा : दुःख नाही त्याचे म्हणितले ते न करावे : त्यासी न बोलावे : अनिष्ट निपजेल' ( आ. स्थ. १३९ ).

तो खा–घ्या' असे काही बोलू नये. कारण तसे बोलल्याने देणाऱ्याच्या वर्मावर आघात केल्यासारखे जरी होणार नाही तरी त्यामुळे त्याला दैन्य मात्र खात्रीने येईल. तरी तसे करू नये.

## अप्रिय बोलू नये

ईश्वरसंबंधिया पुरुषाबरोबर महात्म्याने अत्यंत प्रीतिपूर्वक भाषण व वर्तन करावे; आणि इतर पुरुषाबरोबर त्यांनी प्रिय भाषण करावे. आपल्या अप्रिय बोलण्याने कोणीहि पुरुष दुखवला जाता कामा नये. परमेश्वर–मार्गियाला काय किंवा इतरांना काय, जेणेकरून दुःख होईल असे कधी बोलू नये. (ऐसे न भणीजे की गा भोजेया : प्राणियासि असुख होए : आ. २२७). बोलल्यास त्या अन्यमार्गियाला तर दुःख होईलच. पण पुढे त्याचा प्रसव वाढता वाढता परमेश्वरमार्गातील पुरुषांनाहि दुःख द्यावेसे वाटेल. किंवा तो साधनवंत जर थोर विद्यावंत असला तर जालंधराने गोविंदचंदाला भस्म केले ( ली. च. उत्त ४१८ ) त्याप्रमाणे तो आपणाला भस्म करील. म्हणून मुखावाटे वाटेल त्याला वाटेल तसे टाकून बोलण्याची ज्याला सवय आहे त्याने आपल्या जिभेवर नेहमी नियंत्रण ठेवावे.

## प्रिय बोलावे

महात्म्यांनी अप्रिय किंवा इतरांना दुःखदायक असे काही बोलू नये, इतकेच नाही तर त्यांनी सर्वांशी नेहमी प्रिय भाषण करावे. ( महात्मेनि प्रियवक्तेया होआवे : आ. १८८). अन्यमार्गियाशी त्याने प्रिय भाषण करावे हे खरे, पण त्याने त्याच्या प्रत्यक्ष उपयोगी मात्र पडू नये. त्याने वाट विचारली, किंवा प्रसंगी देवतेला नैवेद्य कसा दाखवावा, पूजा कशी बांधावी वगैरे संबंधी जर त्याने विचारले तर त्याच्या मुळीच उपयोगी पडू नये. कारण तसे करणे म्हणजे त्याच्या अन्यदेवताविषयक क्रियांना आपण निमित्त होण्यासारखे आहे. ते टाळावे. त्याच्या कोणत्याहि चांगल्या–वाईट

**१. ' दुःख नाही : निर्वेद अनुताप नाही त्याची जवळीक न करावी : त्याची भेटि नाही : तो जीताचि प्रमादीया जाणावा : पुढील संपादील : मज नावडे : न साहे ऐसे म्हणावे : वाचौनि हे तुम्हासि लागत असे म्हणे तरी वर्मस्पर्श तरी नोहे परी दैन्य मानील '** (आ. स्थ. १३९ ).

कार्याला आपण निमित्त होता कामा नये. नाही तर आपणाला निमित्त-दोष लागेल. तथापि, त्याच्या उपयोगी न पडले तरी त्याच्याशी अप्रिय न बोलता प्रिय भाषण करावे.

महानुभावीयाव्यतिरिक्त इतर पुरुषाशी, उपयोगी न पडता, प्रिय बोलत असावे; पण खास महानुभावीयाशी अर्थात् परमेश्वर–संबंधियाशी मात्र प्रीतिपूर्वक वर्तन करावे. अशा वर्तनाला तो पात्र नसला तरीहि त्याच्याशी साधकाने प्रियच बोलले पाहिजे. नाही तर तो उदास होईल. त्यामुळे त्या परस्परात अवज्ञा घडेल, त्याचे गुण कार्याला न येता दोषच कार्याला येतील; वाढता वाढता तो ईश्वरावर देखील दोष घेऊ लागेल; ईश्वरसाधनावरील त्याची गोडी नाहीशी होईल. शेवटी तो ईश्वरालाहि न जुमानता, कुठला त्याग आणि कुठले वैराग्य, अशा उपहासपर शब्दांनी बोलत राहील. म्हणून आचरत्या पुरुषांनी सदोष महात्म्याशी देखील प्रियच बोलावे; त्याची उदासीनता न वाढता जेणे करून त्याला सुख होईल असेच भाषण त्याच्याशी करावे.

**सत्यप्रियता**

साधकांनी परस्पराशी वागतांना नेहमी सत्य बोलावे, इतकेच नाही तर आर्जवपूर्वक बोलावे. ( महात्मेनी सत्यार्जवा होआवे : आ. १८९ ). शब्दांनी सत्य बोलून तशीच यथार्थ क्रिया करणे हेच सत्य बोलणे होय. एखाद्याजवळ पदार्थ मागायचे असल्यास पाहिजेत तितकेच मागावे. आणि जितक्या जणासाठी पदार्थ पाहिजे असतील तितक्याच जणासाठी ते मागा-वेत. तरच ते पदार्थ मिळविण्याला परमेश्वराचे साह्य होईल. सत्य बोलणे हा

१. ‘ **प्रीति** वर्तावे ते **आपुल्यासि** : आन **प्रिय भाषण** बोलावे ते **आणिकेसि** : **उपयोगी न वचावे आन प्रिय बोलावे : आपुलेनि निमित्त पुढील न जळावा** ’ ( आ. बं. १८८ ).

२. ‘ **प्रीय का बोलावे : ना उदास्य पडेल : अवज्ञा होईल : तयाचा गुण न ये : दोष येईल : ईश्वराचा दोष येईल**··· **काइसा त्याग : काइसे वैराग्य : काईसी चर्या : मग ईश्वराचाहि दोषी ये** ’ ( सदर ).

३. ‘ **शब्दे क्रिया यथार्थ वर्तिजे ते सत्य : पदार्थ अपजनने पडिला तरि लागे तोच मागावा : आपणया लागी अथवा बहुतालागी : सत्येच मागवा: तै ईश्वर साह्य** ’ ( आ. स्थ. १८९ )

तर नीतिशास्त्राचा सामान्य नियम आहे. मनुष्य खोटे बोलला तर केव्हां तरी 'सत्यार्थु प्रकटे' ( आ. २२५ ) खरी गोष्ट प्रकट होतेच.

साधकाने इतरांच्या बरोबर जर सत्य बोलले पाहिजे, तर परमेश्वर-संबंधिया बरोबर त्याने सत्य बोलावे हे सांगायलाच नको. नव्हे, त्यांच्याशी त्याने विनोदाने देखील खोटे बोलता कामा नये. ( बटिका : एथ हासताही लटिके न बोलिजे हो : आ. १९० ). परमेश्वराशी किंवा त्याच्या संबंधियाशी खोटे बोलल्याने किती अनिष्ट निपजेल हे सांगताच येत नाही. ( बाइःएथ लटिके बोलिलियां काइ होईल ते तो केवी जाणे : शो. आ. मा.९० ). उदाः वरंगळच्या महादेव भक्ताला श्रीचक्रधरस्वामी मारले गेल्याचे एका ब्राह्मणाने खोटेच सांगितले. त्यामुळे त्या भक्ताने तात्काळ प्राणत्याग केला. त्याचा दोष अर्थातच त्या ब्राह्मणावर आला. ( ली. च. एकांक. १४ ). धांदुल-मोक्ष प्रकरणात ( मागे पा. २२७ पहा ). दामाचा कापूस 'इतका' असे प्रतिष्ठेने खोटेच सांगण्यासाठी हात पुढे करतांना ऐरावताच्या शेपटीची मिठी सुटून धांदुलाला मरण आले. आपल्या व आपल्याबरोबर इतरांच्याहि घाताचे पातक त्याला लागले की नाही ! इशाळुवाच्या दृष्टांतात ( दृष्टांत ५९ ) शेजारणी म्हणत की 'बाहेर गेलेला तुझा नवरा काय तुला पाहत आहे की काय !' त्याप्रमाणेच कांजी–भाजी खायला हरकत नाही, असे खोटेच सांगणारा वासनिक हाहि इतराप्रमाणेच दोषी आणि प्रतारक होये. म्हणून परमेश्वराशी व परमेश्वर–परायणाशी थट्टेत देखील खोटे बोलू नये. तसे केल्याने होणाऱ्या अनिष्ट कार्याचे पातक तर लागतेच पण शिवाय त्यामुळे परमेश्वराला व ज्याच्याशी खोटे भाषण केले त्याला खंती येते खोटे बोलण्याचा प्रसव वाढून शेवटी नित्यनरक देखील जोडले जाण्याचा संभव असतो.

## सत्य बोलण्याच्या मर्यादा

साधकांनी नेहमी खरे बोलावे हा सामान्य नियम झाला. पण त्यालाहि काही मर्यादा आहेतच- कित्येक गोष्टी अशा असतात की त्या खऱ्या असल्या तरी बोलता कामा नयेत. महादेव भक्ताशी खोटे बोलणाऱ्या ब्राह्मणाला

१. 'लटिके बोलिल्या दृष्टादृष्टी दोष : भक्ताचा ब्राह्मण : धांदुलमोक्ष इशाळुवाचा दृष्टांत ··· ' ( आ. स्थ. १९० ).

स्वामींनी स्पष्टच सांगितले की 'हा भटो ऐसा सत्यही अर्थु न बोलिजे : मा एसणे असत्य तुम्हा कैसेनि बोलविले :' ( आ.२३० ) यावरून हे दिसून येईल. तेव्हां, जेणे करून इतरांचे नुकसान होईल, वोखटे होईल असे पापरूप असत्य तर काय पण पापरूप सत्यहि बोलता कामा नये. या रस्त्याने गाय गेली असे तिचा पाठलाग करणाऱ्या कसायाला कसे बरे सांगावे ? तसे केल्यास तिच्या हिंसेचे पातक, सांगणाऱ्याच्या माथी बसेल. त्याने विचारले तरी 'ठाऊक नाही, पाहिले नाही' वगैरे सांगावे. हे सांगणे शक्य नसेल किंवा सत्यार्थ सांगितल्यावाचून गत्यंतर नसेल तर वेडेपणा किंवा बहिरेपणा दाखवून किंवा मौन धारण करून उत्तर देण्याचे टाळावे.

जे निरभिलाषी व यथार्थिये पुरुष असतील त्यांच्याशी सत्य बोलावे हे ठीक, पण इतराशी अनेकदा असत्य बोलण्यानेच त्यांचे भले होते. म्हणून जे अशक्त, अप्रयत्निये, तामस वगैरे असतील त्यांच्याशी सत्य न बोलले तरी हरकत नाही. पण जे बोलायचे ते सत्यप्राय मात्र असावे. क्वचित् लोकसंग्रहासाठी सुद्धा असत्य बोलावे लागते.

## आर्जवपूर्वक बोलावे

सत्याप्रमाणेच महात्म्यांनी नेहमी आर्जवपूर्वक बोलावे. अभिमानाने किंवा उद्धटपणाने बोलू नये. तसे करणे हा विकार दोष होय. पदार्थ वगैरे मागत असतांना, मनात परमेश्वराची करुणा भाकून पदार्थ मागावा. आणि ज्याच्याजवळ मागायचा असेल त्याच्याजवळ हात उचलून आशीर्वादपूर्वक व गौरवपूर्वक शब्दांनी बोलावे. हेच आर्जव होय.

## इष्टातून काढू नये : अनिष्टात घालू नये

परस्परांच्या सहवासात असतांना साधकांनी आणखी एक गोष्ट लक्षात ठेवावी. त्यांनी इतरांना इष्ट क्रियेतून काढू नये व अनिष्ट क्रियेत

१. 'सत्य ते निराभिलाषिये यथार्थियेसिचि बोलावे : येरासि लटक बोलीजे तैच गुण होय : अप्रयत्नि : अशक्त : वासनेचा · तामस : तेणासि लटके बोलिलेया दोष नाही : लटके परी सत्यासारखे बोलावे' ( आ. स्थ. १८९)

२. 'आर्जव म्हणजे अंतरी भावो : अंगे अनुकरण : म्हणितलेया हात उचलून आशीर्वाद : शब्द गौरव बोलावे' ( आ. वं. १८९ ).

घालू नये. कोणताहि प्राणी इष्ट क्रिया आचरीत असला, धर्म आचरायला तयार होत असला तर त्याच्या आड येऊ नये. ( आइ : प्राणियांचेया इष्टा आड न एइजे की : आ. २३४). परमेश्वराचे किंवा परमेश्वर-संबंधाचे दर्शन घेणे, वेध संचरणे, वेधानंतर बोध होणे, बोधानंतर अनुसरणे, अनुसरणानंतर चर्या करणे, चर्या करतांना स्मरण करणे, याशिवाय शास्त्र, प्रसाद, निमित्तविधि, भजन, सेवादास्य वगैरे या सगळ्या इष्ट क्रिया[1] होत. त्या क्रिया करायला कुणी प्रवृत्त झाला तर आपण त्याला कानवाथर होऊन राहू नये. ( कानवाथराचा दृष्टांत २९; मागे पा. १३ पहा ).

महदाइसा रितपुरला श्रीप्रभूंची सेवा करीत होती. पण दादोसाने तिला तेथून काढून आणले. त्यावेळी श्रीचक्रधरस्वामीहि म्हणाले की दादोसाने असे करायला नको होते. कोणताहि प्राणी अत्यंत आवडपूर्वक इष्ट क्रिया आचरीत असतांना आपण त्याला त्या इष्ट क्रियेतून काढू नये. तसे करणे म्हणजे त्याला धर्मापासून काढणे होय.(ॐ खटे केले : ऐसे कीजे : ऐसा प्राणिया धर्मापासौनि काढीजे : आ. २३३ ). इष्टापासून काढणारा, दुसऱ्याच्या इष्टाआड येणारा, त्याचप्रमाणे लाडाच्या बासीच्या दृष्टांतानुसार दुसऱ्याला आनिष्टात घालणारा पुरुष, हे सर्व प्रतारक होत. एका वासरीला तहान लागली होती. म्हणून पाण्याची ओल पाहून ती अढाभोवती फिरत होती. रस्त्याने एक दीड शहाणा लाड जात होता. बिचारी वासरी तान्हेली आहे, तिला पाणी प्यायला मिळावे म्हणून त्याने तिला चाऱ्ही पायांनी धरून आडात टाकून दिले. तिथे ती मेली. त्या लाडाला अर्थातच नरक झाले. त्याप्रमाणे अनिष्टात घालणाऱ्याला नरक होतात. म्हणून साधकांनी ते नेहमी टाळावे. ( लाडाचीये बासीचा दृष्टांत : १८ ).

## आजाऱ्याची शुश्रूषा

संग-सांघातात असतांना अनेकदा एखादा महात्मा आजारी पडतो. साधकाने त्याची शुश्रूषा केली पाहिजे. ( आपुलेया पडिलेयाची शुश्रूषा कीजे आ. १९४ ). आपला म्हणजे वेधपूर्वक किंवा बोधपूर्वक अनुसरलेला.असा

१. ' धर्म म्हणजे वेध : बोध : त्याग : अनुसरण : चर्या : शास्त्र : प्रसाद नित्य विधि : निमित्त विधि : भजन : सेवा : दास्य ' ( आ. स्थ. २३३ ).

महात्मा जर शारीरिक किंवा मानसिक दुःखाने पीडित असला तर त्याची परिचर्या प्रीतिपूर्वक व मनोधर्मपूर्वक अवश्य करावी. तसे करणे म्हणजे वचनरूप परमेश्वराचे दास्य करणेच होय. ही परिचर्या करीत असतांना 'मी शुश्रूषा करतो, माझ्यामुळे हा बरा होईल' वगैरे अहंभाव मात्र मनात आणता कामा नये. तर शुश्रूषा करणाराने मुकाट्याने पडेल ते काम प्रीतिमनोभावपूर्वक करावे.

## स्वैराचाऱ्याची शुश्रूषा नको

दुःखपीडित महात्म्यापैकी काहींचे रोग सुखसाध्य असतात, काहींचे कष्टसाध्य, तर काहींचे अगदीच असाध्य असतात. या सगळ्यांची शुश्रूषा करणे विहित आहे. पण अनेक दोषांनी व्यापलेल्या पुरुषाची मात्र मुळीच शुश्रूषा करू नये. एखादा वाटोळा दगड ज्याप्रमाणे कुठेहि ठेवला तरी तो घसरत घसरत खाली आल्यावाचून राहत नाही त्याप्रमाणे तो स्वैराचारी पुरुष वाहत–वाटोळा असतो. दुखःमुक्त होऊनहि तो परमेश्वराकडे न लागता स्वैराचरणाकडेच लागणार असल्यामुळे त्याची शुश्रूषा केल्याने शुश्रूषकाला कोणताहि गुण लागत नाही. मग उगीच अशी चेतन शस्त्रे तयार करण्यात काय अर्थ ?

एखाद्या दुःखपीडिताची सेवाशुश्रूषा करणे इष्ट तर आहे, पण तेथे आपणाला प्रवेश नसल्यामुळे उपाय चालत नाही. अशा वेळी शुश्रूषा करायला सापडत नाही म्हणून दुःख करावे. श्रम-निवृत्ति करायला मिळाली नाही तरी दुःख करावे. त्यामुळे थोर गोमटे होते. कष्टसाध्य पीडिताची शुश्रूषा करतांना कधी सानी हिंसा करावी लागते.पण अशा वेळी शुश्रूषकाने कौशल्याने स्वतः हिंसा न करता अनधिकारी, वेडापिसा, लेकरू वगैरेकडून ती करवावी. उदाः औषधासाठी पाने तोडावी लागतात. त्यावेळी हिंसा होते.

१. 'पडिला म्हणजे शारीरे मानसिक अडला··· शुश्रूषा म्हणजे परिचर्या : कीजे म्हणजे प्रीति मनोधर्मे : विहित म्हणौनि : दास्य की : मी करीन : माझेनि होईल ऐसा अहंभावो ना ' ( आ. स्थ. १९४ ).

२. ' व्याप्य दोषी शुश्रुषा न लभे : का जे वाहात वाटोळा असे यातन ' ( आ. बं. १९४ ).

३. ' शुश्रुषे : श्रमनिवृत्ती पवाड नाही : दुःख करावे : थोर गोमटे : हिंसा करणे पडिली तरी कुशलता होआवी ' ( आ. स्थ. १९४ ).

लहानलहान चार पाने तोडण्यापेक्षा एकच मोठे पान तोडावे. त्यामुळे हिंसा तेवढीच कमी होते. वस्तुतः अशा पीडिताची शुश्रूषा करण्यासाठी त्याने स्वतः जरी हिंसा केली तरी तो वचन-विधी पाळत असल्यामुळे त्या हिंसेचा त्याला दोष लागत नाही. तथापि अशा वेळी हिंसा करण्यास हरकत नाही अशी सवलत दिल्यास कदाचित सानी हिंसा करता करता त्याजकडून थोर हिंसा घडण्याचा संभव असतो. म्हणून त्याने स्वतः हिंसा करण्याचे टाळावे.

**आजारी पडलेल्याने—**

हे झाले शुश्रूषकाचे कर्तव्यकर्म. पण आजारी पडलेल्या महात्म्याने कसे वागावे ? त्याने कोणतेहि प्राप्त झालेले दुःख आयाबापो न करता मुकाट्याने सहन केले पाहिजे. तरच तो महात्मा म्हणायचा ! अर्थात् महात्म्याने आयाबापो न करता प्राप्त दुःख सहन केले तर त्याचा त्या दुःखाचा लेप नासून शिवाय तसलेच इतरहि लेप नासतात. आणि आयाबापो करीत करीत दुःख सहन केले तर त्यामुळे नुसताच तो दुःखलेप नासतो. तसेच, कधी कधी काही शारीरिक दुःखे अप्रयत्नाने म्हणजे आपल्या अपराधाने आपण ओढवून घेतो. ती टाळता येण्यासारखी असूनहि आपण टाळत नाही. असे, आपल्या अपराधाने ओढवून घेतलेले दुःख आयाबापो न करता सहन केले तरी त्यामुळे केवळ त्या दुःखाचाच लेप नासतो; इतर लेप नासत नाहीत. आपल्या अपराधाने ओढवलेल्या शारीरिक दुःखामुळे नित्य-नैमित्तिक क्रिया आचरता येत नाहीत. म्हणून विधिभंगाची अयोग्यता लागते. पण ते दुःख आयाबापो न करता सहन केले तर ती अयोग्यता लागत नाही. कारण परमेश्वरवचनानुसार ( आ. १९९ ) ते दुःख भोगाने निमानले जाते.

महात्म्याने सगळी शारीरिक, मानसिक, व रजवासनात्मक दुःखे अशा रीतीने आयाबापो न करता भोगूनच निमानावीत. त्याने काकुळतीला

१. ' **महात्मा म्हणजे आया बापो न करी : दुःख साहून निमानणे बाचि नावे महात्मा** ' ( आ. स्थ. १९२ ).

२. ' मा तरि देहसंबंधिक सुख दुःख प्राप्ति तिये सहाता कायी होय : ना : तो लेप नासे : आन विना औषधे आयाबापो न करिता साहे तरी त्या बराबर आणीकही नासे : **अपराधे तर लेप नासे ना** ' ( आ. बं. १९२ ).

येऊ नये. ( ऐसे आहाचपण न कीजे की गा : आ. १२३ ). हायहाय केल्याने, कसे दुःख झाले, किती कष्ट पडले असे वारंवार म्हटल्याने परमेश्वराला फार वाईट वाटते. उलट, उपाय न करता, औषधपाणी न घेता दुःख भोगीत राहिले तर परमेश्वराला कणव उपजते. त्यामुळे दुःख कमी होते. असे दुःख सहन करता करता ते नाहीसे झाले म्हणजे त्या महात्म्याविषयी ईश्वराच्या ठिकाणी कणव उरते व त्याला योग्यता लागते. त्यामुळे इतर आचार करण्याच्या बाबतीत तो दक्ष होतो. पण दुखण्यावर त्याने उपाय केले तर मात्र दुःख वाढते. आपल्या दुःखाच्या वेळी कुणाच्याहि साह्यांची वाट न पाहणारा उत्तम पुरुष होय. आतल्या आत दुःख थोडेफार तरी सहन करतो तो मध्यम, आणि साह्याची एकसारखी वाट पाहतो तो कनिष्ठ होय.

### औषध-पाणी नको

साधकाने शक्य तोपर्यंत औषधपाणी न घेता रोग नाहीसा होऊ द्यावा. औषधपाणी घेणे म्हणजे एका दृष्टीने देवतेला शरण जाण्यासारखे आहे. आपणाला रोग होतो तो एखाद्या देवतेचे पात्र क्षोभवले गेले असेल तर होतो. अशा वेळी त्याच देवतेचे सामर्थ्य ज्या औषधीत निक्षेपले आहे अशी औषधी, त्याच देवतेचा मनुष्य वैद्य, त्याच देवतेने किंवा तिच्या साधनवंताने निर्मिलेल्या ग्रंथातील सूचनानुरूप औषधी तयार होऊन ती दिली गेली तर तो रोग प्रतिबंधतो. ( मणिमंत्रौषधि प्रतिबंधकत्वे प्रमाण आति : वि. २८०; जोचि रोगु : तेचि औषधि : तेचि देवता : इए तीन्ही मिळेति तरि जिए : आ. मा. २५४ ). यावरून औषधपाणी घेणे म्हणजे देवतेला शरण जाणे कसे ते कळून येईल. हे विकल्पजनक असल्यामुळे साधकाने ते टाळणे अवश्य आहे. रोगनिवारणासाठी त्याने देवतादिकांना नवसहि करू नयेत. करायचेच असतील तर ते परमेश्वराला किंवा परमेश्वराच्या स्थानाला करावेत. हा उत्तम आचारधर्म होय.

### अपवाद

आपणाला दुःख, रोग वगैरे झाल्यास ते आपण आपणहून कुणालाहि सांगू नये. पण कुणी चौकशी केली तर त्याला खरेखरे सांगावे. तसेच,

१. ' आहाचपण म्हणजे कैसे दुःख जाले : ताका गेल्या कैसे कष्टचि जाले ··· ऐसे म्हणता अदृष्टासि खंती ये ' ( आ. स्थ. १२३ ).

आपल्या रोगावर आपण आपणहून औषधोपचार करू नये. पण आपणाला कुणी धर्मबुद्धीने औषधपाणी दिले तर ते नाकारूहि नये. ( कव्हणी एकु हिरडा बेहाडा दे तरी ना न भणीजे : आ. १९३ ). ज्यांना दुःख सहन करवत नाही अशा काच्या पुरुषांनाच औषधपाणी स्वीकारण्याची परवानगी आहे असे नाही, तर दृढ पुरुषांनीहि औषधपाणी नाकारू नये. त्यांच्या मनात हेतु नसतांना त्यांना ते कुणी दिलेच तर परमेश्वराने अनुकूल होऊन ते पाठवले असे समजून स्वीकारावे. त्यामुळे रोग उणा होऊन परमेश्वराज्ञा पालन केल्यासारखेहि होईल.

**स्वतः उपाय करू नये**

आपण स्वतः आपल्या रोगनाशाचा उपाय करू नये हे मात्र खरे. कारण अनेक वेळा कोणत्या औषधाने कोणता रोग नाहीसा होतो हे आपणाला नक्की ठाऊक नसते.[2] पण ते ठाऊक असले तरी नेहमीची अव्यभिचारी, तीव्र नसलेली औषधे अन्नाप्रमाणे प्रमाणशीर घ्यायला हरकत नाही. आणि अशी औषधे इतरांनी दिली तर ती दैवदत्त म्हणून स्वीकारायलाहि हरकत नाही. पण तीव्र औषधे व रसायने, उदा: काचरा, लसूण, जैपाळ वगैरे, ही व्यभिचारी औषधे कधी घेऊ नयेत. याच दृष्टीने परशरामबास स्वतःला डागण्या देऊ देत नसत.[3]

तसेच, शारीरिक रोगामुळे आपणास अशक्तता वगैरे आली तर आपण दुसऱ्याला आपली सेवा करण्यास सांगू नये. त्याने आपणहून केली तर ईश्वरहेतु जाणून ती स्वीकारावी. आपल्या अपराधामुळे रोग ओढवून घेऊन ज्याला दुःख झाले किंवा अशक्तता आली आहे त्याने जर दुसऱ्याकडून आपली सेवा किंवा श्रमनिवृत्ति करवली तर त्याला फार मोठा दोष लागतो. पण अशाहि पुरुषाची सेवा करणाराला मात्र त्यामुळे गुणच होतो. कारण, आजारी पडलेल्या आपल्या माणसाची शुश्रूषा करावी असे वचनच

१. ' कव्हणी एक म्हणजे लोक पुसल्या सांगावे : एरव्ही न सांगीजे ' ( आ. वं. १९३. ).

२. ' आपण विशेष उद्यम न करावा : का जे कव्हणे औषधे कवण रोग जाईल ते नेणीजे ' ( आ. स्थ. १९३ ).

३. ' अव्यभिचारीये सवेचे अन्नवत् ते घ्यावे : तीव्र ना : रस औषधी ना ··· उचित नव्हे : यथा परसरामबा लासो नेदेतीचि ' ( सदर ).

आहे. ( आ. १९४ ). सहेतुक शुश्रूषा केल्याने मात्र योग्यता लागत नाही. औषधपाणी घेण्याविषयी कवीश्वरबासाचे म्हणणे असे आहे की औषध न घेताच गुण येतो. तथापि औषध घेतल्यानेहि दोष लागत नाही.

## अप्रिय बोलणे सोसावे

महात्म्याने इतरांशी प्रिय बोलणे जितके आवश्यक आहे तितकेच त्याने इतरांचे अप्रिय बोलणे सहन करणेहि आवश्यक आहे. आचार करतांना आपण अन्यमार्गाने वागायला लागलो, विधीच्या ठिकाणी अकुशलता दाखविली, आपली शास्त्रचर्चा यथायुक्त न बठली, तसेच आपल्या ठिकाणी काही मलिनत्व आढळले तर आपणाला यथार्थ मार्गावर लावून उजळ-ण्यासाठी, क्वचित् आपला काहीच अन्याय नसतांनाहि परमेश्वर–मार्गातील पुरुष आपणाला बोलत असतात, सासुरवास करीत असतात. मार्गातील आपले गोत्रीय आपणाला बोलतात ते आपण सुधरावे याच हेतूने. म्हणून आपण ते बोलणे, तो सासुरवास मुकाट्याने सहन केला पाहिजे. त्यापासून आपणाला परमेश्वर लौकर प्राप्त होईल. कुणी बोलले तरी त्यामुळे मनात विक्षेप येऊ न देता व आपला विधि आचरण्यात खंड पडू न देता ते सगळे सहन करावे. एकदा श्रीचक्रधरस्वामी एकांकी विदेह स्थितीत अस-तांना एका तेलिणीच्या पाठीमागे जाऊन निजले. तिचा नवरा देवाच्या पूजनात गुंतला होता. लोक त्याला म्हणाले ' अरे, देवता–पूजनात काय गुंतलास ? हा बघ तुझ्या बायकोच्या पाठीशी कोण निजला आहे.' त्याने ते बोलणे ऐकले. पण देवतापूजनास विलंब लागेल म्हणून मनात विक्षेप येऊ न देता ते बोलणे सहन करून तो पूजा करीत राहिलो. तसे आचरत्या पुरुषानेहि आपणाला कुणी बोलले तरी मनात विक्षेप येऊ न देता परमेश्वराचे विधी आचरीत असावे.

१. ' **कवीश्वर पक्ष : औषधे नेघता गुण आथि : घेतल्या दोष नाही** ' (सदर)

२. ' गोसावी स्त्री--पुष्ट--विभागी पहुड स्वीकारिल्यानंतरे लोकीं **तेलियाते बोलावू आदरीले** : अगा ये तु काय देवतापूजन करिताये : तुझीया स्त्रीच्या पाठिशी कोण नेणो दादुला निजेला असे : ऐसे सिक्षापणपूर्वक विक्षेप बोलती : **का मा बोलिता विक्षेप** : परि पूजाविधानी विलंब पडेल यातव **तैसा** विक्षेप **श्रोतया नाही** म्हणजे तैल्यकारा नुपजेचि ' ( आ. बं. २२६ ). ही कथा ली. च. एकांक ११ मधे थोड्या निराळ्या स्वरूपात आलेली आहे.

नवऱ्याच्या घरी एखाद्या मुलीला तिचे दीर, सासू सासरा वगैरे, माहेरी आईबाप, भाऊबहीण, वहिनी वगैरे जसा सासुरवास करतात तसाच हा होय. ती मुलगी आपल्या नवऱ्यासाठी तो सासुरवास सहन करते. तद्वत्, परमेश्वरासाठी आचरल्या पुरुषाने गोत्रियांचा सासुरवास सहन करावा. इतरांचे अप्रिय बोलणेहि त्याने मुकाट्याने सोसावे. ( बाइ : पोरेया एका कारणे सातापाचांचा सासुरेवासु साहीजे : मा विश्वाचा पति परमेश्वरु तेणेसी घरणे मांडिले असे : तरि जगाचा सासुरेवासु साहावा की : आ. २२६ ).

## अहिंसावृत्ति

अहिंसावृत्तीने वागणे हा साधकांचा अत्यंत महत्त्वाचा आचार होय. हिंसा आणि तीमुळे होणारे नरक यांचे विस्तृत वर्णन 'महानुभाव तत्त्वज्ञान' या पुस्तकात केलेलेच आहे.( महा- तत्त्व. पा. ३२८-३३१; व ३४१-३५१ पहा ). त्याची या ठिकाणी पुनरुक्ति करीत नाही. नित्यनरकाला कारणी-भूत होणारी हिंसा टाळून महात्म्यांनी सदासर्वदा अहिंसक वृत्तीने वागले पाहिजे हा त्याचा भावार्थ होय. यासाठी साधकाने हिंसेची स्थाने वसती-साठी, भिक्षेसाठी वगैरे टाळायला पाहिजेत, हेहि आपण पूर्वी पाहिलेचं आहे. ( मागे पा. ११७ पहा ).

## मुंगीचीहि हिंसा नको

साधकाने अत्यंत अहिंसक वृत्तीने वागायचे म्हणजे त्याने कुणालाहि दुखवता कामा नये. ज्याला आत्यंतिक मुक्ति मिळवायची आहे. त्याने सर्वांत क्षुद्र जंतू जी मुंगी तिचीहि हिंसा करू नये. इतकेच नव्हे तर मुंगी-पासून आपणाला उपद्रव झाला, ती आपणाला डसली तरी देखील तिच्याशी वैर करू नये व तिला मारू नये. कारण त्यामुळे हिंसेचा प्रसव वाढतो व तो प्रसव पुढे मुक्तीला अडथळा करतो. श्रीचक्रधरस्वामींनी यतिमुनींचा वेष स्वीकारल्यामुळे तशाच प्रकारचे म्हणजे त्या वेषाला अनुरूप असेच अहिंसेचे साधन त्यांनी साधकासाठी सांगितले आहे. ( मुक्तीची चाड : तेणे

१. ' मुंगिये विरू म्हणजे हा ठावो वेन्ही अहिंसकत्व : शौच्य : अज्ञान : कवण दोष : आवधीचा प्रसव : आन ईश्वरीची खंती वेषानुरूप ' ( आ. स्थ. ६५ ).

मुंगिये वीरु न चिंतावे : आ. ६५).' तुमचेनि मुंगी रांड न होआवी'(आ. ६०) असे स्वामींनी सांगितले आहे तेहि याच अर्थाने. कोणत्याहि लहान-मोठ्या जंतूची हिंसा होऊ नये म्हणून रस्त्याने चालत असतांनाहि त्याने काळजीपूर्वक खाली पाहून चालावे. इतकी काळजी घ्यावी की पायाखाली मुंगी येऊन ती मरता कामा नये. येथे केवळ उदाहरणासाठी मुंगीचा उल्लेख केला पण पायाखाली कोणत्याहि जंतूची हिंसा होता कामा नये.

## आदर्श महात्मा

सर्व साधनात अहिंसेचे साधन हे उत्तम आहे. ' आता सर्व साधनी उत्तम : साधन जे निरूपम : ते अहिंसा सांगू परम : धर्मरूप ' ( ज्ञा. प्र. ८७ ). या अहिंसात्मक वृत्तीमुळे साधक ज्याप्रमाणे आपणाला दुखवीत नाही त्याचप्रमाणे तृणादि कोणत्याहि भूतमात्राला कृतीने काय पण अंतः-करणाने देखील दुखवीत नाही. त्यांना आपल्या दृष्टीच्या पदरात घेऊन कासवीप्रमाणे तो त्यांच्याकडे स्नेहाने पाहतो. ' ऐसीया देखण्याची पालवी : जे ममत्व भरे जीवी : मग स्नेहभरित कासवी : होऊन ठाके ' ( ज्ञा. प्र. ९० ). भूतमात्र दुखवले जाऊ नये म्हणून तो आपली दृष्टि नेहमी स्नेहभरित ठेवतो, बलवत्तर कारणावाचून तो बोलतहि नाही आणि दृष्टिहि उघडत नाही. ' कृपा भरोनि डोळा : दृष्टि सूये पायतळा : थोर लंघिमा चाळा : हातासि दे ॥ तयाचे हळु पाऊल पडे : जडीची आकृति न विघडे : चैतन्याचा रंग न मोडे : हालिचालि ॥ यापरी अवयव समस्त : करूनि घाली नियमस्त : तै निश्चळ होती स्वस्थ : अहिंसा पदी ' ( ज्ञा. प्र. ९३-९५ ).

## भीति दाखवू नये

अहिंसक वृत्ति अंगी बाणवायची असल्यास साधकाने कुणाला भीतीहि दाखवू नये. ( ऐसे भय नुपजवीजे : आ. २३१ ). ज्या शब्दांनी किंवा ज्या क्रियेने इतरांना भीति वाटेल असे शब्द उच्चारता कामा नये व तशा क्रियाहि आचरू नयेत. तसे केल्याने शारीरिक किंवा वाचिक

1. ' जेणे शब्दे : जिया क्रिया पुढिला भय जने ते न करावे ' ( आ. स्थ. २३१ )

हिंसेचे पाप भीति दाखवणाराला लागते. वीररसात्मक वर्णनाने इतरांना स्फूर्ति चढून त्यांनी जर कोणाची हिंसा केली तर त्याचेहि पाप त्या वीररस वर्णन करणारालाच लागते.यासाठी तसे शब्द देखील आचरत्या पुरुषाने उच्चारता कामा नयेत[1].

## इतरांना अभय द्यावे

महात्मा म्हणजे महंत आत्म्याचा; उदार अंतःकरणाचा. अशा उदार अंतःकरणाच्या महात्म्यांनी सगळया प्राणिमात्रांना अभय द्यावे; त्यांचे भीतीपासून संरक्षण करावे.(तुम्ही महात्मे की गा: तुम्ही चतुर्विधा भूतग्रामा अभय देयावें की : आ. २३२ ). त्यासाठी आपल्या शारीरिक क्रियेने व वाचिक शब्दानेच नव्हे तर नुसत्या दर्शनानेहि किडामुंगीला सुद्धा भीति वाटू देऊ नये. सर्व प्राणीमात्रांची शारीरिक, मानसिक व वाचिक हिंसा चुकवावी. यासाठी त्याने जीवमात्राच्या ठिकाणी सर्वात्मक ईश्वर व्यापलेला आहे हे मनात आणावे. आपण कोणालाहि दुखवले तर त्यामुळे जणु काही परमेश्वरच दुखवला जातो असे मानावे[2]. यदाकदाचित् महात्म्याकडून कोणाला अकस्मात् भीति दाखवली गेली, दुसऱ्याला भीति वाटण्यासारखे शब्द त्याच्या मुखावाटे निघाले किंवा तशी क्रिया घडली तर त्याने अनुतापपूर्वक प्रायश्चित्त करावे.

## इतरांनी दिलेले दुःख सोसावे

साधकांनी इतरांचे अप्रिय बोलणे सोसावे, त्याप्रमाणेच त्याने इतरांनी दिलेले शारीरिक दुःखहि सोसावे. दुःख देणारा पुरुष कर्मराहाटीचा असो की दैवराहाटीचा असो. त्याने आचरत्या पुरुषाला झोडपून काढून शारीरिक दुःख दिले किंवा शिवीगाळ करून वाचिक दुःख दिले तरी ते सहन

१. ' ना : विरत्वाचे शद्ब बोलिता वाचिक हिंसा आक्षेपे : आन तेचि शद्ब ऐकौनि तयासि वीरत्व चढे : तेणे जर हिंसा घडली तर ते आपणच घडविली होय म्हणौनि तैसे न करावे ' ( आ. बं. २३१ ).

२. ' हिंसेचा अर्थी जीवमात्राचा ठाइ ईश्वरबुद्धि देखे : जणु काई तोचि दुखवला : का जे सर्वात्मक की म्हणौनि : चतुर्विध भूतग्रामा अभय दे तो महात्मा : येणेचि महंत आत्मा जाला असे ' ( आ. स्थ. २३२ ).

करावे. इतकेच नाही तर त्या शारीरिक दुःखासाठी आपले शरीर त्याच्या समोर करावे. हेच उत्तम आचरण होय; काही न बोलता सहन करणे हे मध्यम आचरण होय व उलट बोलून सहन करणे हे कनिष्ठ आचरण होय. (एथौनि तुम्ही ऐसेया होआवे की हा जनु तुमते डोइये डोइये मारील परी तुम्ही डोइचि ओडवावी की : आ. ६३ ). प्रतिकूल पुरुष शिवीगाळ करून वाचिक दुःख देत असल्यास ती ऐकून न ऐकल्यासारखे करणारा पुरुष श्रेष्ठ होय; त्या शिव्या नीट ऐकून घेणारा पण प्रत्युत्तर न देणारा मध्यम होय; आणि शिव्या ऐकून 'तुला बरे वाटेल तसे बोल बाबा' असे सौम्य प्रत्युत्तर देणारा देखील कनिष्ठ होय.

## सर्वश्रेष्ठ आचार

आपला अपराध असो की नसो पण प्रतिकूल पुरुषांनी दिलेले शारीरिक व वाचिक दुःख सहन करणे, त्यासाठी आपले शरीर पुढे करणे हा सर्वश्रेष्ठ आचार होय. स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक या चतुर्विध नैमित्तिक विधीपेक्षाहि हा निमित्त विधि थोर होय. कारण, स्थानप्रसादादिकांच्या सेवेचा शारीरिक व्यापार कुणालाहि करता येतो; पण सहन करणाऱ्याच्या व शरीर ओढवणाऱ्याच्या ठिकाणी निराळी श्रेष्ठता लागते. हा पुरुषहि सर्वश्रेष्ठ होय. ज्याला दुसऱ्यांनी दिलेले शारीरिक व वाचिक दुःख सहन करता येते त्याचा कर्मनाश, चतुर्विध निमित्तकाने झालेल्या कर्मनाशापेक्षाहि मोठ्या प्रमाणात होतो. त्याला योग्यताहि त्यापेक्षा अधिक लागते.

## मारिता पूजिता समान

अहिंसक महात्म्याने आपणाला दुःख देणारा व आपली पूजा करणारा असे दोन्ही पुरुष सारख्याच योग्यतेचे मानले पाहिजेत. (तुम्हा मारीता पूजीता समानचि होआवा की गा : आ. ६४). ज्याच्या अंगी विरक्ति पूर्णपणे बाणली आहे अशा साधकाने मानापमान, निंदास्तुति, लाभालाभ हे सगळे समान मानले पाहिजेत. कुणी आपल्यावर अपकार केला तरी त्यामुळे

१. 'पुढीलाचे साहावे : डोई ओढवावी हा थोर निमित्त विधि : थोर शरीर व्यापार होववे : ··· डोई ओढवणे ··· ज्यास घडे त्याचा कर्मनाश आन योग्यता चतुर्विधापसी आगळीच होय' (आ. बं. ६३ ).

आपण त्यावर क्षोभू नये, त्याबद्दल दुःख मानू नये. कारण आपण क्षोभल्याने आपल्या देहाभिमानिनीकडून किंवा परमार्गाभिमानिनीकडून त्याला शिक्षा होऊन त्याचा घातहि होण्याचा संभव असतो. त्याच्या निमित्तकारणाचा दोष आपणास लागेल, म्हणून आपण क्षोभू नये किंवा दुःख करू नये. तसेच, आपणावर कुणी उपकार केला तर साधकाने आनंदहि मानू नये.[1] मानल्यास आपणाकडून त्याचे भले चिंतिले जाते. त्याच्या ठिकाणी अन्नवस्त्र दिले गेले तर अन्यभजनाचा दोष होतो. तोच वाढून पुढे धर्महानीला कारण होण्याचा संभव असतो. म्हणून उपकारानेहि आनंद मानू नये. त्याला मानापमान, निंदास्तुति वगैरे सर्व काही समसमान वाटायला पाहिजेत. ' ऐसी ज्ञान लक्षणे जया पायी : तो सुखदुःखाच्या ठायी : लाभालाभ जयाजयी : समचित्त सदा ॥ अपमानाचा अपकारू : न मनी मानाचा आभारू : निंदास्तुतीचा अर्थी मेरू : तैसा न चळे ॥शत्रु अथवा मित्र : उदास आणि आत्र : हीन जाति स्वगोत्र : सरिसे दोन्ही ' ( ज्ञा. प्र. १७० –१७२ ) अशा वृत्तीने त्याने वागायला पाहिजे.

कुणी आपला अपमान केला किंवा आपणाला दुःख दिले तर त्याबद्दल दुःख न मानता महात्म्याने असा विवेककरावा की,आपल्या प्राक्तनातच हे होते. अनंत सृष्टीत आपण इतरांचा अपमान केला असेल, इतरांना दुःख दिले असेल म्हणून आपणावर हा प्रसंग ओढवला. अशा विवेकाने मन शांत करावे. ते होत नसेल तर निदान अमक्याने मला दुःख दिले वगैरे त्याच्या दोषाची वाच्यता तरी करू नये. दोषाची वाच्यता करणे हाहि मोठा दोष आहे. कारण तशी वाच्यता केल्यास त्या निमित्ताने त्याला इतराकडून शासन होण्याचा संभव असतो. त्याला आपण कारणीभूत होऊ नये.

१. ' अपकारे विरोखे ना : अपकारे क्षोभ पा न व्हावा : उपकारे तोषहि का न व्हावा : तयासि निके चिंतील : का करील : तेणे अन्य भजने पुण्य होईल : प्रसवौनि धर्म हानी ते करील ' ( आ. स्थ. ६४ ).

प्रकरण ८ वे

# शास्त्राध्ययन

हे निरूपण न संगावे नास्तिका : न बोलावे दांभिका
आइको नेंदावे निंदका : विशेषता
माझेया शरणागता : निरूपावे भागवता
मुमुक्षु विरक्ता : बहुत करूनि ( उद्ध. गी. ८१९; ८२० ).

## परमेश्वर-शास्त्राचे विशालत्व

साधकाने गुरु ऊर्फ अधिकरणाजवळ राहून शास्त्राध्ययन करावे आणि भेट-प्रसंगी त्यांनी शास्त्रचर्चा करावी हे आपण पूर्वी पाहिले आहे. आता हे शास्त्राध्ययन व ही शास्त्रचर्चा कशी करायची ते पाहू. त्यापूर्वी परमेश्वर-शास्त्राचे विशालत्व व श्रेष्ठत्व अभ्यासकांनी आपल्या मनात ठेवणे मात्र अत्यंत आवश्यक आहे. कारण परमेश्वराचे शास्त्र खरोखरच 'अश्रीत' आहे. ( हे अश्रीत शास्त्र की गा : आ. १४२ ). ते पूर्णपणे धारण करता येणे शक्य नाही इतके ते विशाल आहे.

कारण, परमेश्वराचे हे शास्त्र 'अनंत' आहे. इतके की या शास्त्रातील नुसते देवताचक्र पूर्णपणे सांगायचे मनात आणले तर पृथ्वीची पाटी आणि मेरूचा खडू देखील पुरणार नाही, असे स्वामींनीच म्हटले आहे. ( एथौनि देवताचक्र निरूपिता पृथ्वी एसणे कडीत आणि मेरु एसणी खडी न पुरें : वि. २७० ). चतुर्विध कर्मफळातील नुसते देवताचक्र पहा केवढे मोठे आहे ते. ८१ कोटी सव्वा लक्ष दहा देवतापैकी प्रत्येकीच्या मळाची रचना, ब्रह्मांडस्थांची रचना, पिंडस्थांची रचना, ज्ञानविग्रह व

अज्ञानविग्रह यांची रचना, अवतार-कार्ये; या सगळ्या देवतांची अंतर्यांग–बहिर्यांग साधने, त्या साधनांचे नानाविध भेद, त्या साधनामुळे प्राप्त होणारी साध्ये, त्या साध्यांचे अनेक भेद, देवतासाधनांचे मंत्रतंत्र, त्यांचे प्रकार वगैरे सगळे लिहायचे म्हणजे केवढे प्रचंड काम आहे ! श्रीचक्रधरस्वामींनी केवळ याच ब्रह्मांडातील प्रपंच सांगितला. पण इतरहि ब्रह्मांडे आहेतच ना. ' ये ब्रह्मांडी हा प्रपंचु : आणिकी आणिकु : ऐसी अनंते ब्रह्मांडे : तेथिची व्यवस्था ते अनसारिखी आणिकीचि ' ( वि. मा. १३४ ). नुसत्या देवताप्रपंचाची ही स्थिति तर जीवदेवताप्रपंचपरमेश्वर या चहु पदार्थांचे संपूर्णत्वाने वर्णन करणे शक्य आहे काय ? अर्थात् नाही !

## धारण करणे अशक्य

एवढे हे अनंत शास्त्र कुणालाहि धारण करता येणे शक्य नाही. सगळे शास्त्र वर्णन करणे व धारण करणे अशक्यप्राय असल्यामुळेच श्रीचक्रधरस्वामींनी ' तुम्हा पेंडिया भरु मुद्रिला ' ( वि. १५४ ) या न्यायाने थोडक्यात सगळे काही सांगण्याचा प्रयत्न केला आहे. कडब्याच्या चारपाच मुठी मिळून एक'पेंढी' होते, त्या पेंढीवरून'भरा'ची म्हणजे गाडीवरील पेंढ्यांच्या राशीची जशी कल्पना करून घेता येते त्याप्रमाणे सातपाच वचनांच्या प्रकरणांच्या साह्याने स्वामींनी सर्व शास्त्र सांगितले आहे. अनंत सृष्टीतील, अनंत ब्रह्मांडातील, अनंत युगातील, अनंत अवतारातील चहु पदार्थांची व्यवस्था ' पेंडिया भर ' या न्यायाने प्रस्तुत शास्त्रात निरूपलेली असल्यामुळे हे शास्त्र खरोखरच अनंत आहे. म्हणूनच ते कोणालाहि धारण करता येणे शक्य नाही.

## ' पेंडिया भर ' – कसा ?

' पेंडिया भर ' या न्यायाने सगळे शास्त्र केवळ बारा प्रकरणात सांगितले आहे. ही बारा प्रकरणे एकेका प्रकरणात समाविष्ट होऊ शकतात. एकेक

१. ' एकोचि ब्रह्मांडीचे चक्र : तयांची साध्ये : साधने : मंत्र : अनेक उपाय येथौनि म्हणजे आम्हांही निरोपिता जन्मे ' ( वि. स्थ. २७० ).

२. ' एकचि पेंडी अनंत कैसी : ना अनंती सृष्टी अनंती ब्रह्मांडी : अनंती युगी : अनंती अवतारी : पेंडिया भरू मुद्रिला ' ( आ. स्थ. १४२ ).

प्रकरण एका वाक्यात आणि एकेक वाक्य एकेका वचनात येऊ शकते. म्हणून ही द्वादश प्रकरणेच नव्हत तर एकेक प्रकरण, त्या प्रकरणातील एकेक वाक्य, त्या वाक्यातील एकेक वचन देखील अनंत आहे. आणि तेहि यथार्थत्वाने धारण करता येणे शक्य नाही.

शास्त्राच्या अनंतत्वामुळेच ते धारण करता येत नाही असे नाही तर जीवाच्या ठिकाणी असलेल्या मनोरथमाला, अन्यवार्ता, आलंबन, तम इत्यादि दोषामुळेहि त्याला ते धारण करता येत नाही. तसेच, योग्य काली अनुसरण न केल्याने, श्रवण मनन न केल्याने, त्याचप्रमाणे अन्यकथन, अधिकवृत्ति, अविधि, हिंसा इत्यादि दोष आचरल्यामुळेहि जीवाला परमेश्वर-शास्त्र आत्मसात करता येत नाही.

## मनाची अतृप्ति

हे शास्त्र धारण करता येत नाही हे आणखीहि एका अर्थाने खरे आहे. प्रस्तुत शास्त्र थोडेफार जरी धारण केले तरी त्यामुळे मनाची तृप्ति होत नाही. ते आपणाला अधिकाधिक समजावे अशी उत्कट वासना शास्त्राभ्यास-काच्या मनात नेहमी उरलेलीच असते. एकेका वाक्यातून, एकेका वचना-तून अनेक अर्थ निष्पन्न होत असल्यामुळे प्रत्येक वेळी त्यातून नवनवीन अर्थसौंदर्य बाहेर पडते. तसतशी नवनवीन अर्थग्रहण करण्याची जिज्ञासाहि वाढतच जाते. जसजसे अधिकाधिक ज्ञान होते तसतसे आपले अज्ञान दिसून येऊन ज्ञानग्रहणाची लालसा वाढते. बरे या युगातील सगळ्या शास्त्राचे ज्ञान झाले तर अर्जुनदेवाप्रमाणे द्वापराचे ज्ञान व्हावे, द्वापराचे झाले तर त्रेताचे व्हावे, त्रेताचे ज्ञान झाले तर कृतयुगाचे ज्ञान व्हावे अशी उत्तरोत्तर मनीषा संवर्धित होते. तसेच, एका ब्रह्मांडीचे ज्ञान झाले तर इतर ब्रह्मांडी-चेहि व्हावे असे वाटते; आणि शास्त्राच्या ठिकाणी लोलुपता वाढते. तरीहि

१. ' तरि पेंडी अनंत हे काइ म्हणावे असे परि एकएकचि प्रकरण अनंत : प्रकरण अनंत हे काइ म्हणावे असे परि एकाचि वाक्य अनंत : एकाचि वाक्य अनंत हे काइ म्हणावे असे परि एकचि वचन अनंत ' (आ. स्थ. १४२).

२. ' जीव मनोरथी दाटला असे : अन्यवार्ते भरला असे : आलंबने गुंफला असे : तमे व्यापला असे : इतुला दोषी आखण नाही म्हणौनि न धरे ( सदर ).

मनाची तृप्ति होत नाही. म्हणूनच परमेश्वराचे हे शास्त्र यथार्थतः धारण करण्याला अशक्य आहे.

### आपणहून शास्त्राकडे लक्ष द्यावे

अशा या शास्त्राचा अभ्यास करा असे आपणहून ते 'शास्त्र' आपणाला म्हणणार नाही, आपणच त्याच्याकडे आपले लक्ष लावायला पाहिजे. ( हे होउनि कवणाचे घर न रीगे : आपणचि याचे घर रिगीजे : आ. १४३). एका दीक्षितकन्येला अनिवार विषयवासना उत्पन्न झाल्यामुळे ती कुणाचीच पर्वा न करता खुशाल एका कोळ्याजवळ राहू लागली. बरे ही दीक्षितकन्या आपणाला उपभोगासाठी मिळावी अशी त्या कोळ्याची इच्छा होती असे नाही. त्याची मुळीच इच्छा नसतानाहि स्वतःची कामवासना तृप्त करून घेण्यासाठी ती मुलगीच कोळ्याकडे गेली. ( दीक्षितकन्येचा दृष्टांत : ५२ ). त्याचप्रमाणे ब्रह्मविद्याशास्त्राचा अभ्यास करू इच्छिणाऱ्या पुरुषाने, ज्याला शास्त्र उत्तम रीतीने ठाऊक असेल त्याच्याकडे आपणहून जावे. तो शास्त्रज्ञ आपणाला बोलावील व आपणाला शास्त्राभ्यास करवील अशी अपेक्षाच त्याने करू नये. इतकेच नाही तर त्याचा मनोधर्म असो वा नसो, शास्त्रेच्छूने स्वतःच त्याच्याकडे जाणे आवश्यक आहे.

### लक्षपूर्वक शास्त्राध्ययन

वर निर्दिष्ट केलेले शास्त्राचे अनंतत्व लक्ष्यात घेतले म्हणजे शास्त्राध्ययन अत्यंत लक्षपूर्वक करण्याची आवश्यकता दिसून येईल. पतीच्या सेवेत पतिव्रता ज्याप्रमाणे आपले सर्व लक्ष लावते त्याप्रमाणे शास्त्राभ्यासाकडे साधकाने आपले सर्वस्व वेचले तरच त्याला ते चांगले प्राप्त होऊ शकेल.( एया आपणपे दीजे तरि हे आपणपे दे : आ. १४४ ). अभ्यासाकडे सर्वस्व वेचायचे म्हणजे औवशी पहाटे उठून, निद्रा दूर लोटून, मानसिक

१. 'घर रीगणे : यथा कोळी : तयाचा कैसाही आदिभावो नव्हता' ( आ. स्थ. १४३ ).

२. 'आपणपे देणे जैसी पतिव्रता ⋯ आवसी पहाटे उठणे : निद्रेचा स्वभावो परता ठेवणे : मानसिक निरोध साहणे : चिंतनी मननी : निदिध्यासन : चर्चा संवाद साधके बाधके पाहिजति बिसंवाद ते मथन' (आ. स्थ. १४४ ).

निरोध सहन करून ऐकलेल्या शास्त्राचा अभ्यास करणे, त्याला उजळणी देणे, त्याचे चिंतन, मनन, निदिध्यसन करणे, त्यावर चर्चा व संवाद करणे, एकेका अर्थाला साधक-बाधक प्रमाणे पाहून त्या अर्थाचे मंथन करणे. असे केल्यानेच शास्त्र उत्तम रीतीने अवगत होऊ शकेल.

## प्रसंगी उचित विधीतून मन काढावे

अनुसरलेल्या पुरुषाने शास्त्राभ्यासासाठी इतर सर्व गोष्टींचा परित्याग केलेलाच असतो. तथापि शास्त्रश्रवणासाठी प्रसंगी त्याने उचित विधीपासूनहि मन काढावे व ते शास्त्राभ्यासाकडे लावावे. वासनिकाने प्रसंगी आपला व्यवहारहि सोडून शास्त्रश्रवण करावे. अशा रीतीने ज्याने शास्त्र प्राप्त करून घेतले आहे त्याला त्याचा विसर पडणार नाही. एक वचन आठवल्याने इतर आनुषंगिक वचनेहि भराभर आठवत जातील. वृद्धावस्थेत देखील त्याला शास्त्र स्फुरेल. इतकेच काय, पण पुढील सृष्टीत देखील हा शास्त्राभ्यास त्याच्या उपयोगी पडेल. या शास्त्रामुळे व त्याच्या आचारामुळे त्याला पुन:संबंध होईल, अपरोक्षात चहु पदार्थ यथार्थ प्रगट होऊन त्याचा कर्मनाश होईल, सामान्यात मळक्षाळण होईल, विशेषात तो दैवसृष्टीपासून वेगळा होऊन सर्व शक्ति त्याला मान देतील व शेवटी तो मोक्ष प्राप्त करून घेईल.

## आरंभी शास्त्र घोकून घ्यावे

शास्त्राचा अभ्यास करीत असतांना, कित्येकदा गुरूने किंवा निरूपकाने सांगितलेले अर्थ अभ्यासकाच्या लक्ष्यात येत नाहीत. अशा वेळी त्या अभ्यासकाने गुरूने सांगितलेला अर्थ मुकाट्याने स्वीकारावा. तोच यथार्थ म्हणून त्यावर श्रद्धाबुद्धि ठेवावी व तो चांगला घोकावा. त्याला पुन:पुन्हा आवृत्ति द्यावी म्हणजे आज नाही तर उद्या, केव्हां तरी तो अर्थ त्याला कळेल. ( घेइजे : घोकीजे : मग काळे करौनि उपयोगा जाये : आ. १४५ ). श्रद्धाबुद्धीने घोकल्यामुळे अर्थ कळण्यासाठी ईश्वराचे साह्य होऊन

१ ‘ उचिता विधिपासोन मन काढूनि आठवावे ··· युगधर्म आठवीता महावाक्य आठवे ··· वृद्धापी इंद्रियांचा वाहो सरलेया विसर न पडे ··· पुढील सृष्टीहि उपयोगा जाये ’ ( आ. स्थ. १४४ ).

त्याला अर्थ कळेलच. शिवाय सगळ्या शास्त्राचा अशा रीतीने अभ्यास झाल्यावर सूत्रांचा परस्पर-संबंध लक्षात येऊन पूर्वी न कळलेले अर्थहि कालांतराने स्पष्ट होऊ लागतील.

## कालांतराने अर्थ-प्रतीति

श्रद्धाबुद्धीने अर्थ घोकूनहि त्याची ज्याला प्रतीति येत नाही त्याने त्या अर्थावरील आपली श्रद्धा, प्रतीति येईपर्यंत कायमच ठेवावी. ' श्रद्धावान् लभते ज्ञानं ' ( गीता. अ. ४–३९ ) हा भगवान श्रीकृष्णाचा गीतोपदेश विसरू नये. कारण आज नाही तर काळांतराने तो अर्थ प्रत्यक्ष अनुभवाने ध्यानात आल्यावाचून राहणार नाही. विचारपर वचनांचा अर्थ नित्य मननामुळे किंवा चर्चेमुळे अनुभवाला येईल आणि आचरपर वचनांचा अर्थ प्रत्यक्ष आचार करीत असतांना प्रतीतीला येईल. ( आताचे तथ्र ऐसे घेपे : पाठी अनुभवे जाणाल : आ. १४६ ).

प्राप्तीला पोचलेल्या ज्ञानियालाहि भक्ताच्या साध्याचे अज्ञान असतेच. विशेषज्ञानियालाहि तीन अज्ञाने असतात. ( महा. तत्त्व. पा. ४९२ पहा). अविद्याछेदानंतर त्याला काहींचा अनुभव येतो. अर्थात्, असा अनुभव येईपर्यंत शास्त्रार्थावरील आपली श्रद्धा त्याने सोडता कामा नये. काही अर्थांचा अनुभव, कदाचित् पुनःसंबंधानंतर, अपरोक्षानंतर, सामान्यानंतर, विशेषज्ञानानंतर किंवा परमेश्वरप्राप्तीनंतर येईल. तो काळपर्यंत आचरत्या पुरुषाने आपली त्या अर्थावरील श्रद्धा कायम ठेवणे इष्ट व अवश्य आहे.

## वचन : वचनार्थ

ब्रह्मविद्याशास्त्रात काही ' वचन ' वाक्ये असतात, तर काहीत ' वचनार्थ ' असतो. उदाः ' मातापुरा कोल्हापुरा न वचावे : तिये साभिमानिये स्थाने साधकासी विघ्न करीति ' (आ.२५) या सूत्रात ' मातापुरा कोल्हापुरा न वचावे ' हे वचन होय. तर ' तिये साभिमानिये स्थाने साधकासी विघ्न

१. ' अनुभवे जाणाल म्हणजे आचारपराचा तो तेणेचि अनुभव : विचारपराचा उमटे तेव्हेळी : एक मनने : एक चर्चा ' ( आ. स्थ. १४६ ).

२. ' एक पुनःसंबंधी : एक अपरोक्षी : एक सामान्यी : एक विशेषी उमटे : एकाचा अनुभव प्राप्ती म्हणजे स्वरूप प्राप्त जालेया होय ' ( आ. बं. १४६).

करीति' हा वचनार्थ होय. वचन आणि वचनार्थ ही दोन्ही अभ्यासकाने यथार्थतेने ग्रहण करावीत. क्वचित् वचनार्थ लक्षात न आला तरी वचन मात्र जाऊ देऊ नये. ते चांगले घोकून ठेवावे. कारण त्या वचनाच्या आधारानेच वचनार्थ स्पष्ट होतो. म्हणून वचन विसरू नये. (हे वचन : हा वचनार्थु : वचन जाओं नेदीजे : आ. १४७)

## काकु : कक्षा : भावार्थ : प्रकरण

प्रत्येक वचन यथार्थ रीतीने समजण्यासाठी त्या वचनातील काकु, कक्षा, भावार्थ व प्रकरण ही जाणणे अत्यवश्य आहे. ( काकु : कक्षा : भावार्थु : प्रकरण जाणावे : आ. १४८ ). **काकु**: म्हणजे प्रश्न. कित्यक वचने प्रश्नात्मक स्वरूपाची असतात. त्या प्रश्नातून अपेक्षित उत्तर जे असेल तो त्या वचनातील सत्यार्थ समजायचा. उदा : 'ऐसेया जीवा श्रीप्रभूची सेवा ?' ( वि. २१९ ) या वचनात काकु म्हणजे प्रश्न असल्यामुळे, एवंगुणविशिष्ट पुरुषाला श्रीगोविंदप्रभूंच्या सेवेचे भाग्य वस्तुतः लाभायला नको, असेच सूचित केले आहे. तोच या वचनाचा सत्यार्थ. या सूत्राचा वरवर दिसणारा अर्थ आणि 'काकु' मुळे निष्पन्न होणारा अर्थ वेगवेगळा आहे. हे दिसून येईलच. म्हणून एखाद्या वचनात 'काकु' असल्यास त्या काकुचा अर्थ योग्य रीतीने पाहूनच यथार्थ अर्थ ग्रहण करावा.

**कक्षा** : म्हणजे तिरस्काराने, उपहासाने बोलणे; आक्षेप करणे. एके वेळी स्वामींच्या दर्शनाला काही वेश्या येत होत्या. त्यांना पाहून स्वामींनी म्हटले 'माणुसे आली.' वस्तुतः त्या वेश्याजवळ मनुष्यत्वाचे गुण नसतांना देखील त्यांना 'माणसे' म्हणण्यात स्वामींनी त्यांचा उपहासच केला. ही कक्षा होय. श्रीचक्रधरस्वामीजवळील कुत्रा डांगरेश मेल्यानंतर त्याचे उदाहरण देऊन स्वामींनी आपल्या इतर शिष्यांना अत्यंत तिरस्काराने

१. **'वचन जावों नेदीजे म्हणजे अर्थ न धरेच तरि वचन धरावे ··· विसरावे ना : वचनी अर्थ सापडे'** (आ. स्थ. १४७).

२. 'ज्याच्या ठायी मनुष्यत्वाचे गुण नसती त्या सामान्य स्त्रियाते म्हणितले मानुसे आली : येणे थोर शब्दे त्या नीचाते उपहासिले म्हणौनि ते कक्षा' ( आ. बं. १४८ ).

' मरा मरा : तुम्हापसि वर सुने चांग : जे एथचेया वियोग साहो न सकेची ' ( शो. आ. पा. १३; ली. च. उत्त. ३०५ ) असे जे म्हटले तीहि कक्षाच होय. ही कक्षा आहे हे लक्ष्यात घेऊनच अभ्यासकाने या वचनाचा अर्थ लावावा.

**भावार्थ :** म्हणजे वाच्यार्थाहून भिन्न असलेला अभिप्रेत अर्थ. उदा : ' महारवाडाहौनि धर्मु काढावा ' ( आ. १४९ ) या वचनात ' महारवाडा ' हा शब्द, त्याप्रमाणे अपवित्र, अशुद्ध असलेली ' माणसे ' या भावार्थाने वापरलेला आहे; खराखुरा महारवाडा या अर्थाने नाही. साधाने स्वामींना रिंगणीची फुले वाहिली. ती पाहून स्वामी म्हणाले की ' साधे हो : देनो कायी सुवर्ण पुष्पी पूजियांये ' ( ली. च. उत्त. २८३ ) यात वस्तुतः रिंगणीच्या फुलांना भावार्थाने सुवर्णपुष्पे म्हटले आहे; वास्तव अर्थाने नव्हे. तेव्हां वचन ग्रहण करतांना अभ्यासकाने त्याच्या वाच्यार्थाकडे न पाहता भावार्थ देखील लक्षात घेतला पाहिजे. तरच यथार्थ अर्थाची प्रतीति होऊ शकेल.

**प्रकरण :** म्हणजे प्रसंग; आख्यायिका. वचनाचा योग्य अर्थ कळण्यासाठी त्या वचनाचे ' प्रकरण ' हि लक्ष्यात घेतले पाहिजे. म्हणजे श्रीचक्रधरस्वामींनी कोणत्या वेळी, कोणासमोर, कोणत्या उद्देशाने एखादा विशिष्ट शब्द वापरला आहे किंवा विशिष्ट वचन उच्चारले आहे हे त्या त्या वचनाच्या प्रकरणावरून-प्रासंगिक लीळेवरून निश्चित होऊ शकेल, एरवी नाही. उदा. चहु पदार्थांपैकी एक पदार्थ ' प्रपंच ' हा वस्तुतः नित्य आहे पण स्वामींनी ' प्रपंचु अनित्यो ' ( वि. मा. १६२ ); ' असे ते दिसे : दिसे ते नासे ' ( ली. च. उत्त. २६३ ) या वचनात तो अनित्य म्हटला आहे. पण या वचनांचे प्रकरणवश पाहिले म्हणजे स्वामींनी ही वचने कार्यरूप प्रपंचाला उद्देशून काढली आहेत हे सहज लक्ष्यात येते. याच दृष्टीने स्वामींनी ' अर्थु तो प्रकरणवशे : प्रकरणे अर्थविनियोजकु : अर्थी दृष्टांत दीजे ' ( वि. मा. १३५ ) असे म्हटलेले आहे. वचनाचा अर्थ करायचा तो त्या वचनाचा प्रकरणवश, म्हणजेच वचन ज्या प्रसंगाच्या निमित्ताने उच्चारले तो प्रसंग लक्षात घेऊन करावा. कारण प्रकरण हे

१. ' भावार्थ म्हणजे जैसी साधाची रिंगणीची फुले ' (आ. स्थ. १४८).

अर्थ निश्चित करणारे असते. त्या अर्थालाच दृष्टांत दिलेला असतो. म्हणून दृष्टांताचा अर्थ निश्चित करण्यासाठी देखील प्रकरणवश पाहणे अत्यंत आवश्यक आहे.

प्रकरण न पाहता एका प्रकरणीचे वचन दुसऱ्या प्रकरणी लावणे हे अर्थात्, अशास्त्रीय होय. तसे केल्याने फार तर पूर्वपक्षाच्या दृष्टीने एक व्युत्पत्ती लक्षात येईल. पण तो त्या वचनाचा सिद्धांत मात्र मानता येणार नाही. दृष्टांतस्थळकर्त्याने म्हटले आहे की 'सिद्धांत तो प्रकरणीचा प्रकरणी : वचनीचा वचनी परिसावा : आणिके प्रकरणीचा अर्थ : तथा वचनाचा : आणिके प्रकरणी : तथा निःशेष जरि बोलिला तरि ते पूर्वपक्षे व्युत्पात्ति होए : परि तीये प्रकरणीचा तथा वचनीचा सिद्धांत नव्हे: का जे : अर्थु तो प्रकरणवशे : प्रकरणे आर्थविनियोजक : आर्थी दृष्टांत दीजे : म्हणीतले यातव' यावरून वचनार्थ करतांना प्रकरणवश लक्ष्यात घेण्याचे महत्त्व लक्षात येईल.

## भेटीत शास्त्रचर्चा

अधिकरणाजवळ राहून शास्त्राध्ययन कसे करावे ते आपण पाहिले. आता भेटकाळी होणाऱ्या शास्त्रचर्चेकडे लक्ष देऊ. भेटीमध्ये साजात्य पुरुषांनी शास्त्राचे मंथन अवश्य करावे. चांगल्या रीतीने दधिमंथन केल्या-मुळे त्यातून जसे नवनीत बाहेर पडते त्याप्रमाणे चांगल्या रीतीने, पूर्वोत्तर-पक्षपूर्वक शास्त्रमंथन केल्यास त्यातून सिद्धान्ताचे उत्तम नवनीत–सार बाहेर पडते. ( परस्परे मथन कीजे : मग नूतन होए : आ. १४० ). अर्थात्, त्यासाठी एखाद्याने मुद्दामच पूर्वपक्ष करावा, त्याला साधक प्रमाणे दाखवावी, मग दुसऱ्याने त्याला बाधक प्रमाणे दाखवावी, त्यावर आक्षेप घेण्यात यावेत, त्या आक्षेपांचा परिहार करण्यात यावा आणि अशा रीतीने सिद्धांतनिर्धार करावा. काष्ठावर काष्ठ घासल्याने म्हणजे काष्ठमंथनाने जसा अग्नि प्रज्वलित होतो त्याप्रमाणे शास्त्रमंथनाने सिद्धांताला उजळा मिळून

१. 'या परो मथन केलया मग लोणी निघे : तैसे तेचि नूतन होए अथवा अपूर्व निगे : पक्षांगिकारे साधकी बाधकी आक्षेप परिहार कीजे ते मथन' ( आ. स्थ. १४० ).

मंथनरूप चर्चा करणाराच्या ठिकाणी अपूर्व स्फूर्ति व सिद्धांतनिर्धारण शक्ति येते, त्याला शास्त्राचा यथार्थ अर्थ कळतो, विषयाच्यां ठिकाणची त्याची आसक्ति नष्ट होते, पुढेहि तो विषयाच्या ठिकाणी लोलुपता दाखवीत नाही. कारण त्याच्या ठिकाणी आता शास्त्रमंथनामुळे यथार्थ अर्थाचे बळ आलेले असते.

## चर्चेने मलिन पुरुष उजळतो

अशा मंथनरूप चर्चेमुळे, ज्यांना मलिनत्व आलेले आहे ते देखील उजळले जातात. उदा: तैल्यकार असाच मलीन होता. त्याच्याशी शास्त्रचर्चा केल्यानंतर तो उजळला गेला. त्याचप्रमाणे जो मैळला असेल त्याच्याशी शास्त्रचर्चा करून त्याला उजळणे हाहि साधकांचा आचार होय. अर्थात्, दुसऱ्याचे मलिनत्व नासण्याच्या हेतूने त्याच्याशी शास्त्रचर्चा करतांना त्याचे दोष आपण एकदम त्याच्या लक्षात आणू नयेत. त्याच्या दोषाचा आपण शक्यतोवर उच्चारहि करू नये. तर त्याच्याशी शास्त्रचर्चा अशा युक्तिप्रयुक्तीने करावी की त्याचे दोष आपोआप त्याच्या नजरेला येतील, त्याबद्दल त्याला स्वतःलाच दुःख वाटेल, तो निर्वेद व अनुताप करील. तैल्यकाराचे दोष अशा युक्तिप्रयुक्तीनेच त्याच्या नजरेला आणून दिल्यामुळे तो नंतर उजळला गेला. ( मागे पॉ. २२१पहा ). मैळल्याला उजळण्याचे असे सामर्थ्य शास्त्रचर्चेत आहे. आपली संदेहनिवृत्ति करून घेण्यासाठी एखाद्या उजळलेल्या पुरुषाशी शास्त्रचर्चा करतांना, आपल्या ठिकाणी असलेले दोष त्याच्या नजरेला पडू देऊ नयेत. ते त्याच्या नजरेस पडले तर कदाचित् तो शास्त्रचर्चा करणार नाही, म्हणून ते लपवणेच चांगले. सारांश, असे शास्त्रमंथन वारंवार करीत असावे. वारंवार चर्चा न केल्यास पुरुष मालिन होतो. आणि चर्चा केल्याने मलिन पुरुषहि उजळतो.

१. ' ज्ञानाचे सामर्थ्य कवणे ठायी सांगितले नाही ते चर्चासामर्थ्ये दाखविले : तेलियाचा ठायी ' ( आ. स्थ. १४० ).

२. ' आन ज्यास चर्चा त्याप्रति दोष लपविजती : दोष प्रगटल्या ते न बोलती हे भय : तरी धर्म न साधे ' ( सदर ).

३. ' चर्चेवीण मैळे : ब्रह्मविद्या माउली मळे माखल्याते धुये ' ( आ. स्थ. १४० ).

## शास्त्रचर्चा साजात्यांचीच

अर्थात् असे शास्त्रमंथन करणारे दोन्ही पुरुष साजात्यच पाहिजेत. ते दोघेहि बोधवंत असून अनुसरलेले पाहिजेत; दोघांनीहि शास्त्रश्रवण उत्तम तऱ्हेनें केलेले असावे. आपला आचार आचरण्याच्या बाबतीत ते दोघेहि अटळ प्रकृतीचे असावे. अशा पुरुषांची भेट होऊन पाचसात दिवस त्यांचा सहवास घडेल तरच त्यांच्यात यथोचित शास्त्रमंथन होऊ शकेल. एरवी, ज्यांना चारदोन दिवसहि एकमेकांच्या सहवासात राहता येत नाही अशा वैजात्य पुरुषात शास्त्रमंथन कोठून होणार ? एक बोधवंत तर दुसरा वेधवंत; एक नुसताच ज्ञानी तर दुसरा नुसताच अनुसरलेला; एक सान्निधानीचा तर दुसरा साधिकरण पुरुष अशा वैजात्य पुरुषात शास्त्रचर्चा होऊ शकत नाही. कदाचित् दोन्ही साधिकरण पुरुष असून दोघेहि कोरडे, अतएव साजात्य असतील, पण त्यांनी शास्त्रश्रवण उत्तम रीतीने केलेले नसेल तर त्यांच्यातहि शास्त्रमंथन होणे शक्य नाही. त्यासाठी दोघांच्याहि ठिकाणी शास्त्राचे उत्तम ज्ञान अवश्यमेव पाहिजे.

## शास्त्रचर्चेने सुख, श्रेय व श्रृंगार

सारांश, शास्त्रचर्चा करणे केव्हाहि चांगले. पण ही शास्त्रचर्चा ज्या दोघात व्हायची असेल त्या दोघांनाहि त्यापासून सुख म्हणजे समाधान वाटायला पाहिजे; त्यांच्या कर्मांचा नाश होऊन त्यांना पारलौकिक श्रेय प्राप्त झाले पाहिजे; आणि ती चर्चा चांगल्या रीतीनं उमटून तिच्यामुळे, त्या ज्ञानामुळे ते चर्चक शृंगारले गेले पाहिजेत. ज्या शास्त्रचर्चेमुळे दोघां-नाहि किंवा दोघापैकी एकालाहि सुख-श्रेय-शृंगार होऊ शकत नाही अशा चर्चेचा उपयोग काय ? उलट त्यामुळे चर्चा करणारामधे विसंवाद निर्माण होऊन ती चर्चा अरण्यरुदनाप्रमाणे व्यर्थ होते ! ( सुख : श्रेय : शृंगारु

१. 'दोन्ही ··· साजात्य : ऐशासी पाड : ऐशासी मथन यथोचित घडे ' ( आ. स्थ. १४० ).

२. ' सुख म्हणजे समाधान : श्रेय म्हणजे परत्र : शृंगार म्हणजे दृष्टीसि ये : ये तिन्ही संवादे समयोचित प्राप्तकाळी उचित पुरुषेसी धर्मगोष्टी-तव होती ' ( आ. स्थ. १५२ ).

इये तीनि नाहीं ते काइ गा गोष्टी : ते अरण्यरुदन की : आ. १५२ ). तेंव्हां अशा प्रकारे चर्चा करण्यात काही अर्थ नाही. चर्चाच नव्हे तर ज्या भेटीपासून, श्रमनिवृत्तीपासून, जिज्ञासेपासून, धर्मवार्तेपासून व निरूपणापासून सुखश्रेयशृंगार लाभू शकत नाही ती भेट, ती श्रमनिवृत्ति, ती जिज्ञासा, ती धर्मवार्ता व ते निरूपणहि अरण्यरुदनच होय.

## शास्त्रचर्चेचा काळ मंगळ काळ

ज्या काळी सुखश्रेयशृंगारपर क्रिया घडते तो काळ मंगळ होय. ( तो तेतुला मंगळ काळु जाला : आ. १५३ ). ती भेट, ती धर्मवार्ता, ती शास्त्रचर्चा, तो पूजावसर, सारांश ज्या ज्या क्रियेमुळे सुखश्रेयशृंगार प्राप्त होतात त्या त्या क्रियेचा काळ शुभ, इष्टदायक, अतएव मंगळकाळ होय. सन्निधानी असतांना परमेश्वराला केंव्हांहि डोळयांनी पाहणे हा मंगळकाळ होय यात शंका नाही. पण निरूपण, चर्चा, अपूर्व पूजावसरादिकांचे प्रसंग हे विशेष मंगळकाळ होत. ते कधी चुकू देऊ नयेत. म्हातारी महदाइसा असाच निरूपणाचा अवसर चुकली म्हणून तिचा मंगळकाळ चुकला असे श्रीचक्रधरस्वामींनी म्हटले होते ते याच अर्थाने. असन्निधानी भटोबास आणि तत्समान आधिकरण पुरुष यांच्या दर्शनाचे काळ मंगळ होत. पण शास्त्रचर्चा, निरूपणादिकांचे काळ विशेष मंगळ होत, म्हणून साधकांनी ते कधी चुकू देऊ नयेत. हे काळ मंगळ असण्याचे कारण असे की त्यावेळी ईश्वर आपल्या कृपाशक्तीने युक्त होत्साता तेथे उपस्थित असतो. अर्थात्, त्याचे लक्ष तेथेच असते. ( स्मरण धर्मवार्ताप्रसंगे सर्वत्र आवस्थान : शो. आ. मा. ३०; ली. च. उत्त. ४४९ ) अशी शास्त्रचर्चा, निरूपणे वगैरे चुकवून आचरत्या पुरुषांनी अवसरभ्रष्ट कधी होऊ नये.

१. ' तेतुला म्हणजे भेटी : धर्मवार्ता : पूजाअवसर : निरूपण तो काळ शुभ इष्टदायक म्हणौनि मंगळ काळ ' ( आ. स्थ. १५३ ).

२. ' अवसरी थोर गोमटे : केंची : जे तेंव्हेळी ईश्वर शक्तिमंत ' ( सदर )

## स्वोक्ति : शास्त्रोक्ति : लोकोक्ति यांचा त्याग

चर्चा करीत असतांना चर्चकांनी स्वोक्ति, शास्त्रोक्ति व लोकोक्ति यांचा त्याग करणे अवश्य आहे. त्यांनी जी चर्चा करायची ती केवळ ब्रह्मविद्याशास्त्राची आणि तीहि त्या शास्त्रातील वचनप्रामाण्याच्या दृष्टीनेच करावी ( स्वोक्तिः शास्त्रोक्तिः लोकोक्तिः ह्या तीनी इया परित्यजौनि एथीचिया व्युत्पात्तिव्युत्पन्ना होआवे : आ. १४१ ). या तिन्ही उक्ति एक तर कर्मराहाटीच्या शास्त्रातील असू शकतात किंवा ब्रह्मविद्याशास्त्रातीलहि संभवतात. कशा त्या पाहू.

सर्वसामान्यतः कोणत्याहि जीवाची उक्ति किंवा आपली स्वतःची उक्ति ती ' स्वोक्ति ' होय. ब्रह्मविद्याशास्त्राव्यतिरिक्त इतर देवतानिर्मित शास्त्रातील उक्ति ती ' शास्त्रोक्ति ' होय. आणि शेषशय्याच्या स्थानापासून तो खालील सर्व स्थानात राहणारे जे देवर्षि, राजर्षि व ब्रह्मर्षि त्यांची उक्ति ती ' लोकोक्ति ' होय. उदा : अष्टादश पुराणे ही लोकोक्तीत मोडतात. अष्टादश स्मृतिहि लोकोक्तीच होत. वेद, आगम वगैरे शास्त्रोक्ति होते. भेटकाळी शास्त्रमंथनास प्रवृत्त झालेल्या साधकांनी वर निर्देशिलेल्या या तिन्ही उक्तींचा त्याग केला पाहिजे. हे कर्मराहटीचे उक्तित्रय होय

पण अनुसरलेल्या पुरुषाने कर्मराहाटीच्या वरील उक्तित्रयाचा त्याग केला पाहिजे हे सांगणे व्यर्थ आहे. कारण परमेश्वरापासून बोध होऊन अनुसरण करतांनाच त्याने त्यांचा त्याग केलेला असतो. तो त्याग करूनच तो ब्रह्मविद्येला शरण आलेला असतो. तेव्हां अशा अनुसरलेल्या पुरुषाकडून या तिन्ही उक्तींचा आश्रय घेतला जाईल असे वाटत नाही. तर या अनुसरलेल्या पुरुषाकडून, परमेश्वरवचनांच्या आधारे शास्त्रचर्चा होत असतांना वरील उक्तित्रयाचा निराळयाच अर्थाने आश्रय केला जाणे शक्य असते. शास्त्रचर्चा करतांना त्यांनी जे आक्षेप घ्यायचे, जे पूर्वपक्ष करा-

१. ' तरी स्वोक्ति शब्दे जीव व त्याची उक्ति ते स्वोक्ति हे एक : ना दूसरे तरी स्व शब्दे आपण : आपुली उक्ति ते स्वोक्ति तरी शास्त्रोक्ति म्हणजे इतर शास्त्रे तिये अवघी अन्यथाज्ञानरूप असती म्हणौनि। तरी लोकोक्ति म्हणजे लोकांची उक्ति... त्यातच देव ऋषी राजर्षी ब्रह्मर्षी ऐसे त्रिविध ऋषीवरही असती ' ( आ. बं. १४१ ).

यचे ते सगळे परमेश्वरशास्त्राच्या आधारे करायला पाहिजेत. पण तसे न करता कुणी आपल्या मनानेच एखादा संकेत करील तर ती ' स्वोक्ति ' होईल. शास्त्रचर्चा करतांना प्रमाणावाचून स्वतःच्या मुखाने जो अर्थ केला जातो तो ' स्वोक्ति ' होय. आचाराच्या बाबतीत देखील प्रमाण न देता ' असुक असुक आचार स्वामींनी सांगितला आहे ' असे स्वतःच दडपून देणे व त्याप्रमाणे आचरणे हा स्वोक्तीचा आचार आहे.[1]

आता, परमेश्वरशास्त्रातील वचने प्रमाण म्हणून तर घ्यायची; पण काही वचने व पक्ष प्रश्नार्थक असतात; त्यांची काकु, कक्षा, भावार्थ व प्रकरण ही नीट लक्ष्यात न घेता एखाद्या अर्थाची प्रतिष्ठा करणे ही ' शास्त्रोक्ति ' होय.[2] तसेच अमके अमके महानुभाव असे असे आचरीत होते किंवा एखाद्या जीर्ण पोथीवर अमका अमका अर्थ मांडला आहे तोच प्रमाण मानला पाहिजे असे म्हणणे ही लोकोक्ति होय.[3] दैवराहाटीतील या तिन्ही उक्तिमुळे दोष लागतो. त्या उक्ति अन्यथाज्ञानरूप असून निरयदायक होत. त्यांच्यापासून अयोग्यता, अनधिकार व अविधि लागतात परमेश्वराला खंती येते; त्याचे साह्य तुटते व शेवटी त्यांचा आश्रय करणारा प्रमादी बनतो. म्हणून शास्त्रमंथन करतांना कर्मराहाटीच्याच नव्हे तर दैवराहाटीच्याहि उक्तित्रयाचा पूर्णपणे त्याग केला पाहिजे.

### कर्मराहाटीच्या उक्तित्रयानेहि दोष

कर्मराहाटीच्या उक्तित्रयाने थोर दोष लागतात. अर्थात् कर्मराहाटीच्या उक्तित्रयाप्रमाणे आचार-विचार केल्याने त्यांनाहि दोष लागतातच. देवतानिर्मित शास्त्रानुसार आचार केला असता, अर्थात् देवतासाधनांनी

१. ' चर्चा मथन करीता विनाप्रमाणे जेतुके सुखाधार अर्थ कीजे अथवा अंत:करणे एकादा संकेत कल्पीजे त्याते स्वोक्ति बोलीजे : आचारपर तरी जैसे दायंबा म्हणती शंख तुळसी गोसावीच विहिल्या असती ऐसी ते स्वोक्ति जाणीजे ' ( आ. बं. १४१ ).

२. ' ना जर शास्त्रोक्ति तर बचनपरत्वे काकुआदि चतुष्टय असे ते न कळता : तथा पूर्वपक्षादि चाऱ्ही न सोचता... अर्थ जर केला तर त्याते शास्त्रोक्ति बोलीजे ' ( सदर ).

३. ' असुके तमुके महानुभाव महापात्र ऐसे बोलत आचरत होते...अथवा जीर्ण टीकाटीपणी ऐसा एक अर्थ बोलिला असे....ऐसी ते लोकोक्ति बोलीजे ' ( सदर )

देवतांची फळे प्राप्त झाली तरी त्यात सुखदुःखमिश्र भोग असतो. शिवाय साधन अनुष्ठीत असता हिंसादि दोष घडले तर नरकनिष्पत्ति होतेच. उदा : जगळदेव आणि विंझदेव यांनी एका स्थितिमंत चांभाराला कर्म-राहाटीच्या शास्त्रोक्तीनुसार चुनखड्यात बसवून त्यावर पाणी ओतण्याची शिक्षा दिली. त्यामुळे त्याला फार मोठी अनिष्ट क्रिया घडली. ( ली. च. एकांक १२ ). हा शास्त्रोक्तीमुळे लागलेला दोष होय. स्वोक्तीचा दोष सगळ्यात मोठा, त्याहून कमी दोष शास्त्रोक्तीचा आणि त्याहूनहि कमी दोष लोकोक्तीचा होय[1].

## व्युत्पत्तिव्युत्पन्नता

अनुसरलेल्या पुरुषांनी शास्त्रमंथन करतांना कर्मराहाटीच्याच नव्हे तर दैवराहाटीच्याहि उक्तित्रयाचा पूर्णपणे त्याग करून परमेश्वरशास्त्रात व्युत्पत्तिव्युत्पन्न व्हावे असे स्वामींनी सांगितले आहे. ( आ. १४१ ). त्याने ब्रह्मविद्याशास्त्रातील लीळावचनादिकामधे निष्णात व्हावे; म्हणजे परमेश्वराच्या लीळांचे व वचनांचे निर्वचन करण्यात निपुण व्हावे; परमेश्वर-लीळांचे निर्वचन करणे म्हणजे त्या लीळांचा हेतु अगम्य होय असे सांगणे. बाह्यतः त्या लीळेचा जो हेतु असेल तेवढाच सांगणे, त्याशिवाय अन्य हेतु नाही असे म्हणणे ही स्वोक्ति होईल[2]. परमेश्वराच्या लीळाप्रमाणेच त्याच्या वचनांचेहि निर्वचन त्याला यथार्थ रीतीने करता आले पाहिजे. प्रत्येक वचनातील शब्दाशब्दाचा अर्थ त्याला पारखता आला पाहिजे. त्याचा ऊहापोह त्याला करता आला पाहिजे. हीच व्युत्पत्तिव्युत्पन्नता होय.

व्युत्पत्तिव्युत्पन्न होणे याला दुसराहि एक अर्थ आहे. व्युत्पत्ति म्हणजे मागील निर्वच व प्रस्तुतचा निर्वच जाणणे. मागील निर्वच म्हणजे

१. ' स्वोक्ती थोर दोष : त्या खालुता शास्त्रोक्ती : त्या खालुता लोकोक्ती ' (आ. स्थ. १४१)

२. ' येथीचिया व्युत्पत्ती म्हणजे शास्त्राचेनि लीळा : वचन : ज्ञान.... लीळेचा ठाइं व्युत्पत्तीचेनि आदिकथा तो : म्हणजे आदिकथानायक परमेश्वर; त्याची लीळा अगम्य निर्वचली न वचे ऐसे व्युत्पन्नी व्हावे : का ज तिये लीळेचा ठाइं अनंत हेतू असति ते बोलिले न वचति : वाचौनि लीळेचा हेतु इतुकाचि असे म्हणितले तरी मागील उक्तत्रियात पडेल ' ( आ. बं. १४१ )

अव्यक्त ईश्वरस्वरूपाचा निर्वच. आणि प्रस्तुतचा निर्वच म्हणजे प्रचलित सृष्टीतील परमेश्वराच्या अवताराचा निर्वच. ही दोन्ही यथार्थतेने जाणणे हेच व्युत्पत्तिज्ञान होय. आणि व्युत्पन्नता म्हणजे पुढीलहि जाणणे म्हणजे संहारकाळी व्यक्त अव्यक्तात विलीन होते, हा निर्वच यथार्थ रीतीने ठाऊक असणे ही व्युत्पन्नता होय. ही व्युत्पत्तिव्युत्पन्नता प्रमाणयुक्त सिद्धांतस्वरूपात माहीत असायला पाहिजे. त्यात त्याची स्वोक्ति, शास्त्रोक्ति व लोकोक्ति ब्रिकिंचितहि असता कामा नये.

नागदेवाचार्यांना व्युत्पत्तिज्ञान व्हावे याच हेतूने श्रीचक्रधरस्वामींनी देऊळ पहायला पाठविले होते. तेथे जाऊन तेथील विधिनिषेध त्यांनी आपल्या व्युत्पन्नतेने ओळखला, ही त्यांची व्युत्पन्नता होय. आचाराच्या वचनातील जो केवळ आचार जाणतो त्याला नुसते व्युत्पत्तिज्ञान असते आणि त्या वचनातील विचारपर अर्थ ज्याला कळतो तो व्युत्पन्न होय. विचाराच्या वचनातील अर्थ पक्षपक्षांतरात, गीतश्लोकादिकात दाखवणे हे व्युत्पत्तिज्ञान होय. आणि त्या वचनातून आचारपर अर्थ काढून दाखवणे ही व्युत्पन्नता होय. अशा प्रकारची व्युत्पत्तिव्युत्पन्नता शास्त्रचर्चा करणाऱ्यांच्या ठिकाणी अवश्य पाहिजे.

## फार रममाण होऊ नये

भेटकाळी शास्त्रचर्चा करावी हे खरे, पण त्या चर्चेत आत्यंतिकतेने रममाण होता कामा नये. विषयाच्या ठिकाणी वेच असला म्हणजे विषयी पुरुषाला जसे दुसरे काही स्फुरत नाही, दुसरे उद्योग आठवत नाहीत, त्याप्रमाणे शास्त्राच्या चर्चेत किंवा मंथनात अतिशय वेच असला तर साधकाला दुसऱ्या कोणत्याहि कार्याची आठवण राहत नाही. इतकेच काय पण खुद्द परमेश्वराचीहि आठवण राहत नाही. तो त्या शास्त्रचर्चेच्या

१. व्युत्पत्ती मागीले प्रस्तुतीचे जाणणे : व्युत्पन्नता पुढीलही जाणीजे' (आ. स्थ. १४१)

२. 'आचारीचा विचार देखे तो व्युत्पन्न : केवळ देखे ते व्युत्पत्ति : तथा विचारीचे उपलवण प्रमेय दाखवी तें व्युत्पत्ति : तेथींचा आचार दाखवी तो व्युत्पन्न' (सदर)

३. 'विषयत्वे म्हणजे विषयरूप : होऊनि ठाकले : दुसरे न स्फुरे' (वि. स्थ. २३६).

ठिकाणी प्रत्यक्ष आला तर त्याचा योग्य तो आदरसत्कार करण्याचेहि भान राहत नाही. डोमेग्रामी असतांना नाथोबा आणि नागदेव उंचमठात बसून शास्त्रचर्चा करण्यात एकदा इतके रंगून गेले होते की त्यावेळी तेथे श्रीचक्रधरस्वामी जाऊन पोचले पण त्यांच्या चरणांना अभिवंदन करण्याचेहि त्यांना त्या प्रसंगी स्फुरले नाही. त्याच वेळी स्वामींनी त्यांना म्हटले " हा गा : हे तुम्हा विषयत्वेचि लागौनि ठाकले मा : ' ( वि. २३६ ). तेव्हां शाब्दिक शास्त्रचर्चेच्या ठिकाणी इतका वेच कधी असू देऊ नये. दुसऱ्या उचित अशा नित्यनैमित्तिक कार्यांची आठवण नेहमी अंतःकरणात बाळगून व त्याप्रमाणे उचित क्रिया करीत राहूनच शास्त्रचर्चा करावी.

## ईश्वरस्मरण अधिक महत्त्वाचे

एके दिवशी केसोबास, दामोदर पंडित वगैरे महात्मे विजनात असेच शास्त्रचर्चेत अतिशय रममाण झाले होते. कोण कशा प्रकारचे अनुष्ठान करीत आहे हे पाहण्यासाठी त्यावेळी नागदेवाचार्य तेथे जाऊन पोचले. पण शास्त्रचर्चेत दंग झाल्यामुळे केसोबासादिकांना आचार्य तेथे येऊन उभे राहिल्याचे कळले सुद्धा नाही. त्यावेळी नागदेवाचार्यांनी त्यांना उपदेश केला की " तुम्ही सदासर्वकाळ वादविवाद काय करता ? नेहमी जर अशी चर्चाच करीत रहाल तर ईश्वराचे स्मरण केव्हां कराल ? " अर्थात् शास्त्रचर्चेपेक्षा ईश्वरस्मरण अधिक महत्त्वाचे आहे. नित्यनैमित्तिक विधींचे परिपालन हेहि महत्वाचे आहे. त्याप्रसंगी नागदेवाचार्यांनी त्या सर्वांना " जे काळीचे ते काळी ऐसे अनुष्ठान सांगितले " ( स्मृ. स्थ. १२४ ).

## शास्त्र इतरांना सांगू नये

एवढ्या मोठ्या प्रयासाने प्राप्त करून घेतलेले परमेश्वराचे शास्त्र आचरत्या पुरुषाने परमेश्वरमार्गीयाव्यतिरिक्त इतर कोणाला सांगू नये, याबद्दल श्रीचक्रधरस्वामींचा विशेष कटाक्ष दिसतो. ' हा गा : हे तुमचे रहस्य की : मा आपुले रहस्य ते आणिकाप्रति प्रकाटिजे ना की ' ( आ. १५५ ); ' ऐसे न मणिजे की नाएका : लोकु डाकुली वाये तरि तुम्हा अविधि होए ' ( आ. १५६ ); ' अन्यकथने जाए ' ( आ. १५७ );

'हे शास्त्र कव्हणाप्रति न बोलावे' (आ. मा. २७); 'इतुलिया एका साठी तेणे येसणे रहस्य ते कैसे निरूपावे' (शो. आ. ८७); 'हे ऐसे कोणापुढे न संगिजे हो : लोक ऐके तरी डाकुली वाये' (शो. आ. ८८); 'यथौनि जे तुम्हांसि जाले ते कवणापुढे न सांगावे हो' (शो. आ. ११३); 'आपुले जावो नेदिजे' (शो. आ. ११४); 'साचे हो : हे कोणासी सांगावे ना' (शो. आ. ११५); इत्यादि अनेक वचने, 'अन्य' पुरुषांना शास्त्रकथन न करण्यासंबंधी श्रीचक्रधरस्वामींचा विशेष कटाक्ष कसा आहे याची साक्ष देतील. त्यावरून, आचरत्या पुरुषांनी 'अन्य' पुरुषांना आपले शास्त्र सांगू नये हा सिद्धांत लक्षात आणावा. इतरांना शास्त्र सांगितल्यास 'अन्य' कथनाचा दोष घडतो व शास्त्र 'निर्बीज' होऊन नष्ट होते.

## 'अन्य' पुरुष कोण ?

परमेश्वरमार्गाव्यतिरिक्त इतर मार्गानुयायी पुरुष हे अन्य पुरुष होत. त्याचप्रमाणे प्रत्यक्ष परमेश्वरमार्गातील पुढील पुरुषाहि 'अन्य'च होत. (१) **निचाड :** विशिष्ट अर्थ, शास्त्रार्थ आपण ग्रहण करावा अशी ज्याला इच्छाच नाही तो; (२) प्रमाणोक्त अर्थ न स्वीकारता मुखाधार अर्थावर बुद्धि ठेवून अभिमानपूर्वक तोच अर्थ स्वीकारणारा, **अभिमानिया;** (३) आपण ऐकलेला शास्त्रार्थ बाहेर सांगणारा; (४) पूर्वप्रसवामुळे शास्त्रार्थ ऐकण्याची ज्याला आवड नाही-जो शास्त्रार्थ कधी ऐकत नाही तो; (५) ऐकलेला शास्त्रार्थ ज्याला उमटत नाही तो; (६) ऐकलेला शास्त्रार्थ जो घोकीत नाही तो; (७) ऐकलेल्या शास्त्रार्थाप्रमाणे जो अनुष्ठान करीत नाही तो; (८) आणि वरील सातहि दोष एकसमयावच्छेदेकरून ज्याच्या ठिकाणी आहेत तो. हे सगळे पुरुष 'अन्य' होत. यांना शास्त्र सांगितल्याने ते निर्बीज होऊन नष्ट होते.

१. 'अन्य म्हणजे इतरीचे ते : मग येथीचा निचाड : अभिमानिया : बाहीर घाली : परिसे ना : घे ना : घोके ना : अनुष्ठी ना तो तयातचि' (आ. स्थ. १५७).

## परमेश्वर-मार्गातील ‘ अन्यां ’ ना का सांगू नये ?

परमेश्वरमार्गातील ‘ अन्य ’ पुरुषांना शास्त्र सांगू नये याचे कारण उघड दिसते. मार्गीय अन्य पुरुषांचे दोष लक्षात घेतले म्हणजे ते कारण कळून येईल. ज्यांना शास्त्रज्ञानाची आवड नाही, ते ग्रहण करण्याची प्रज्ञा नाही, सांभाळून ठेवण्याची आस्था नाही, तदनुसार आचार करण्याची वृत्ति नाही असे पुरुष परमेश्वरमार्गानुयायी असले तरी त्यांना शास्त्र सांगणे व्यर्थ आहे, ते निरुपयोगी आहे. त्यांना शास्त्र सांगितले तरी त्याचा कोणताहि चांगला उपयोग होऊ शकत नाही. म्हणून अशा पुरुषांना शास्त्र सांगू नये. सांगितल्यास त्यांच्याकडून शास्त्राची अवज्ञाच होण्याचा संभव असतो. या अवज्ञेला ‘ सांगणारा ’ कारणीभूत होतो व म्हणून तो दोषी ठरून त्याचे शास्त्र निर्बीज होते.

## अन्यमार्गियांना का सांगू नये ?

हे शास्त्र अन्यमार्गियांना सांगू नये याचे मुख्य कारण असे की त्या ज्ञानाला तो अधिकारी नसतो, पात्र नसतो. खुद्द परमेश्वर तरी जीवाला ज्ञान केव्हां देतात ? जीव ज्ञानाला पात्र झाल्यानंतरच. एखादा जीव परमेश्वराच्या सन्निधानी असला तरी तो पात्र अधिकारी होईपर्यंत त्याला ते शास्त्र सांगत नाहीत. जिथे प्रत्यक्ष परमेश्वर देखील अनधिकारियाला शास्त्र सांगत नाहीत तिथे इतर अधिकरणांनी किंवा बोधवंतांनी का सांगावे ? जी गोष्ट परमेश्वर स्वतः करीत नाहीत ती त्याच्या सेवकांनी केल्यास त्याला खंती वाटणे साहजिक आहे; आणि म्हणूनच अनधिकारियाला जो शास्त्र सांगेल त्याविषयी परमेश्वराला खंती येऊन त्याचे शास्त्रज्ञान नष्ट होते. ( अन्यकथने जाए : आ. १५७ ). त्यामुळे पुढे त्याच्याकडून परमेश्वरवचनांचे अनुष्ठान योग्य रीतीने होऊ शकत नाही. कथनदोषामुळे त्याला पुढे अनंत सृष्टीत परमेश्वर स्वमुखाने ज्ञान देत नाहीत. आणि

१. ‘ आपण आपणेयाते प्रकाशीती : बळवडे वास पाहावीती : परी ज्ञान नेदीती : का : पात्रतेवाचूनि : म्हणौनि कथनाचा दोष थोर : आपण जो अर्थ न करीति तो जै करी तै खंती केवढी पा ’ ( आ. स्थ. १५७ )

ज्याने अन्यकथन वारंवार केले असेल त्याला तर पुढील अनेक सृष्टीत हीनाधिकरणाच्या मुखानेच ज्ञान मिळते.

## लोकांचा उपहास टाळण्यासाठी

परमेश्वराचे हे शास्त्ररूप रहस्य मार्गानुयायी पुरुषाव्यतिरिक्त इतराजवळ प्रगट न करण्याचे दुसरे एक कारण आहे. ते असे की, अनधिकारामुळे ते रहस्य अन्य पुरुषांच्या प्रत्ययाला येऊ शकत नाही; आणि म्हणून ते या शास्त्राचा उपहास करण्यास प्रवृत्त होतात. काही अज्ञानामुळे, काही पूर्वप्रसवामुळे, काही विपरीत दोषामुळे, तर काही स्वमार्गाभिमानामुळे या रहस्याचा उपहास करतात. त्यामुळे त्यांना तर पाप लागतेच, पण रहस्य प्रगट करणारालाहि अविधीचा दोष लागतो. म्हणून शास्त्र भलत्या पुरुषाजवळ प्रगट न करणे हेच श्रेयस्कर होय. ( आ. १५६ ). भास्करभट्ट बोरीकरानेहि श्रीकृष्णाच्या तोंडी याच अर्थाच्या ओव्या घातलेल्या आहेत. " तव श्रीकृष्णराओ म्हणे उद्धवदेवा : हा ज्ञानरत्नाचा ठेवा : भलेतेया हाती नेदावा : अधिकारेवीण ॥ हे निरूपण न संगावे नास्तिका : न बोलावे दांभिका : आइको नेदावे निंदका : विशेषता " ( उद्ध. गी. ८१८,८१९ ). अर्थात्, अनधिकारी पुरुष, नास्तिक, दांभिक, निंदक इत्यादिकांना शास्त्राचे रहस्य सांगू नये हाच भावार्थ होय. मग ते सांगावे कोणाला? तर ' माझेया शरणागता : निरूपावे भागवता : मुमुक्षु विरक्ता : बहुतकरूनि ॥ ' ( उद्ध. गी. ८२० ).

## लोभ-कीर्तीसाठीहि रहस्य सांगू नये

कित्येक जीवांना थोडेफार शास्त्र येऊ लागले की लागलीच मान्यतेच्या स्वार्थामुळे ते शास्त्र बाहेर प्रगट करतात. त्यांची कोणी थोडीशी

१. ' कथने विपरीत बुद्धी अक्षरे निर्बीजे : विषयसेवा अविहिति एवमादिक : तेणे चर्या जाये : कथने आणिके सृष्टी भानुभट्ट अधिकरण लाहीजति : कथने अनंता सृष्टी टाकी ' ( आ. स्थ. १५७ ).

२. ' प्रत्यया न ये म्हणौनि डाकुली वाती ''' एक अज्ञानवशे करी : दुसरा पूर्वप्रसवे करी : तिसरा विपरीत दोषे : चवथा स्वपक्षाभिमाने उपहास करील : तेणे तया पाप : आपणेया अविधि ' ( आ. बं. १५६ ).

स्तुति केली की ते चढतात. " बाबा, मला तुमच्या वाचून कोणाचा बरे आसरा आहे ? " अशा शब्दात त्यांची कुणी प्रार्थना केली की ते तात्काळ संतुष्ट होऊन त्याला ईश्वरज्ञानाचे भांडार सांगतात. त्या श्रोत्याचा अधिकार, योग्यता वगैरे काहीहि पाहत नाहीत. त्यामुळे अर्थातच त्या निरूपकांची मानमान्यता वाढून त्यांना पैशाच्या रूपाने भरपूर दक्षिणाहि मिळते. एखाद्या सामान्य जीवाला थोडेसे गाता येऊ लागले, जरा कुठे चांगले वाचताबोलता येऊ लागले की तो आपले ते चातुर्य लोकापुढे प्रगट करून मान्यता व पैसा मिळवतो, तसेच हे झाले. मोठ्या योग्यतेने अतिशय कष्ट करून मिळविलेले ज्ञान अशा रीतीने चुटकीसरशी घालवणे म्हणजे देशदेशांतराला जाऊन कष्टपूर्वक मिळवलेला पैसा जुगारात गमावण्यासारखे होय. म्हणून अभिमानाने, मानमान्यतेच्या अभिलाषाने किंवा विषयलोभाने परमेश्वरशास्त्रातील रहस्यरूप अक्षरे बाहेर टाकणे योग्य नाही. ( पोरा जीवा सामग्री जाली तरि बाहीरि घालिता वेळुचि न लगे : आ. १८१ ).

## अन्यकथन करणारे दहा पुरुष

असे अन्यकथन करणारे दहा पुरुष असतात. (१) काही जण इंद्रियार्थासाठी अन्यकथन करतात. (२) काही लौकिक अभिलाषासाठी. (३) दुसऱ्याच्या स्तुतीने फुगून जाऊन. (४) आपली कीर्ती वाढावी म्हणून (५) इतरांचे खंडन करण्यासाठी. (६) थट्टामस्करी करता सहज. (७) कौतुकाने आपले विद्वत्व दाखविण्यासाठी. (८) वितंडवाद करण्यासाठी (९) प्रमाणोक्त अर्थ उगीचच खोडून काढण्यासाठी बडबड करतांना व (१०) स्वतः अधिकरण नसतांनाहि केवळ ममतेमुळे; अशा प्रकारांनी अन्यकथन करतात. पण आचरत्या पुरुषांनी तसे करता कामा नये. लोखंडावर पडलेले पाणी लोखंड ज्याप्रमाणे बाहेर न टाकता आपल्याच ठिकाणी साठवून ठेवते त्याप्रमाणे प्रत्येकाने आपणाला ठाऊक झालेले परमेश्वराचे शास्त्ररहस्य ' अन्य ' पुरुषाजवळ प्रगट न करता स्वतःजवळच जतन

१. ' यथा देशांतरी द्रव्य जोडले : ते जू खेळौनि धाडीले : बाहिरी घाली अभिलाषे : केवी : मान्यता : विषयो ' ( आ. स्थ. १८१ ).

करून ठेवावे. ( लोहो पाणी गिळीले ऐसे होउनि असावे : आ. १९९ ).

## आर्ताला शास्त्र सांगावे

पण या विवेचनाचा अर्थ, शास्त्र कोणालाच सांगू नये असा नाही. आपणाला शास्त्र केव्हां समजेल अशी उत्कंठा ज्याला लागली आहे, लौकर शास्त्र प्राप्त व्हावे म्हणून परमेश्वराची जो सदैव प्रार्थना करीत असतो, रजतम आपल्या अंतःकरणातून काढून टाकून शास्त्रप्राप्तीसाठी अधिकरणाची जो मनोभावपूर्वक सेवा करतो, अधिकरण जेणेकरून आपणाला शास्त्र सांगेल असे प्रयत्न सर्वतोपरी केल्यावाचून जो राहात नाही तो खराखुरा 'आर्त' असतो. त्याला शास्त्र अवश्य सांगावे. ( आर्तांप्रति बोलावे : आ. १९८ ).

आर्त पुरुषाचीहि योग्यता पाहूनच त्याला शास्त्र सांगावे. अनिष्टजनक जेवढे असेल तेवढे त्याला आपणहून सांगावे. पण इष्टजनक शास्त्रविधि मात्र त्याने विचारल्यावाचून सांगू नयेत. दैवराहाटीतील योग्यताजनक विधि तर विचारले तरीहि सांगू नयेत. अर्थात् , अत्यंत प्रार्थनापूर्वक व नम्रतापूर्वक विचारल्यासच सांगावे. अधिकारी पुरुषाला योग्यतेचे शास्त्र सांगतांना अन्यथाज्ञाननाशक शास्त्र त्याने न विचारले तरी सांगावे. कारण, कोणाचेहि अन्यथाज्ञान राहू देणे चांगले नाही. आधीच असलेल्या अज्ञानावर अन्यथाज्ञान राहू देणे म्हणजे कोडावर डाग देणे होय. दोरावर सर्पबुद्धि निर्माण करण्यासारखे ते महापाप होय. ते नाहीसे केले पाहिजे.

## अडलेल्यांनाहि शास्त्र सांगावे

परमेश्वरमार्गातील अनेक पुरुष धर्मचर्चेवाचून अडलेले असतात. कुणाला शास्त्र चांगले येते पण त्यांना चर्या करता येत नाही. कित्येक निष्ठेने उत्तम चर्या करतात पण त्यांना शास्त्र येत नाही. काहींना शास्त्र

१. '**आर्ति म्हणजे चाड : ज्या अर्थाची ज्यासि : परी योग्य व्हावा : तेव्हेळीसाचि करी तो योग्य : चाड नाही तरी अनुसरल्याहि न बोलावे : तरी किती बोलावे पा : ना अनिष्टजनक ते न पुसताहि : इष्टजनक ते पुसल्या : योग्यताजनक ते पुसल्याहि न बोलावे**' ( आ. स्थ. १९८ ).

व चर्या दोन्ही येत नाहीत. पुष्कळ पुरुष असे असतात की त्यांना शास्त्र व चर्या दोन्ही उत्तम येतात, पण प्रसादावाचून त्यांना सत्त्व येत नाही. अशा अडलेल्या पुरुषांनी संपूर्ण ज्ञातविरक्ताचा किंवा इतर ज्ञात्याचा संग केला तर त्यांनी त्या पुरुषांना अवश्य आधार दिला पाहिजे. ज्याला शास्त्र येत नसेल त्याला त्यांनी शास्त्र शिकवावे, ज्याला चर्या करता येत नसेल त्याला चर्या सांगावी व जे प्रसादावाचून अडले असतील त्यांना प्रसाद द्यावा. ( धर्मा धरु दीजे : आ. १९७ ).

## योग्यता पाहूनच

अर्थात्,अडलेल्या पुरुषांना शास्त्रज्ञान वगैरे सांगून जो आधार द्यायचा तो त्यांची योग्यता पाहूनच.उदा: ज्ञातविरक्ताजवळ येऊनहि सदोष रीतीने इतरांची ( उदा : स्त्रियांची वगैरे ) झाडपूस करणारा जर तो असेल तर ' अडलेला ' असला तरी शास्त्रज्ञानासाठी तो अपात्र होय. त्याचा त्याग करावा. तथापि त्याचा त्याग करण्यापूर्वी कमीत कमी तीन वेळा तरी त्याचा दोष त्याच्या लक्षात आणून द्यावा. त्यावरहि त्याने आपला दोष सोडला नाही तर अधिकरणाने किंवा त्या ज्ञात्याने त्याचा खुशाल त्याग करावा.[२]

## शास्त्र सांगण्यापूर्वी परीक्षा

शास्त्रादिकांच्या अभ्यासासाठी आपणाकडे येणारे अडलेले पुरुष हे अनुसरलेले असले तरी त्यांच्या स्वभावाची आधी परीक्षा पहावी व मग त्यांना शास्त्र वगैरे सांगावे. सात्त्विक प्रकृतीच्या पुरुषाची बारा वर्षे, राजस

१. ' जो जेतुलेनिविन ठेला तया तेतुला आधार : शास्त्र : चर्या:प्रसाद ( आ. स्थ. १९७ ).

२. " धर द्यावी धर्मासि की : धर्म नाही तरी त्यजावा : कवणे गुणे त्यजावा आन कवणे गुणे स्वीकारावा : ना आणिकाची झाडपूस करीत असे : ज्ञान करावे : एक दोनि तीन वेळ म्हणितले न करीचि तरी तो त्यजावा ' ( सदर ).

पुरुषाची ९ वर्षे व तामस पुरुषाची ६ वर्षे परीक्षा पहावी. त्या त्या काळात ते परीक्षेला उतरले तर त्यांना संपूर्ण शास्त्र सांगावे; एरवी ईश्वर-प्राप्तीसाठी आवश्यक तेवढेच त्यांना शिकवावे.

सात्त्विक पुरुषाची १२ वर्षे परीक्षा पाहणारा ज्ञातविरक्त हा श्रेष्ठ होय; ९ वर्षे परीक्षा पाहणारा कनिष्ठ होय; ३ च वर्षे परीक्षा पाहून धर्मशास्त्र सांगणारा हा त्याहीपेक्षा कनिष्ठ होय; आणि तीन वर्षे सुद्धा परीक्षा न पाहता धर्मशास्त्र सांगणारा हा अधम म्हटला पाहिजे. बरीच वर्षे खर्च करून मिळवलेले ईश्वरशास्त्राचे भांडार तो एका क्षणात गमावून बसतो. एखादा पुरुष जर दोनचार दिवसासाठी संग-जवळीक करायला आला तर त्याचीहि बारा क्षणापर्यंत तरी, पण परीक्षा पहावी. तो परीक्षेत उतरला तर त्याला जवळ राहू द्यावे, नाही तर तात्काळ त्याग करावा. त्या बारा क्षणात त्याच्या ठिकाणी रजतमाचा उद्‌भव दिसता कामा नये. जवळीक करायला आलेल्याची बारा घटका परीक्षा पहावी. तो परीक्षेत न उतरल्यास त्याचा त्याग करावा. तो जाऊ इच्छिणार नाही तर त्याची १२ प्रहर परीक्षा पाहून त्यात तो उतरल्यास त्याला ५ दिवस जवळीक द्यावी, नंतर त्याग करावा. त्यावेळी आग्रह करून जर त्याने स्वतःला ठेवून घेतले तर पुन्हा १२ प्रहर परीक्षा घेऊन त्यात त्याला रजतमाची बाधा न आढळल्यास आणखी ५ दिवस जवळीक द्यावी. पुन्हा आग्रह करून त्याने ठेवून घेतले तर पुन्हा तसेच करून आणखी ५ दिवस जवळीक द्यावी. त्याचा उत्तम भाव आढळला तर आणखी ७ दिवस जवळीक द्यायला हरकत नाही. या १२ दिवसात त्याला रजतमाची बाधा झाली नाही तर त्याला दीड महिना सांगात द्यावा, मग त्याग करावा. पण त्याने काकुळती केली तर आणखी १२ दिवस परीक्षा पाहून दीड महिना सांगात द्यावा. त्याने त्यानंतर आणखी काकुळती केली तर आणखी १२ दिवस परीक्षा पाहून दीड महिना सांगत द्यावा. पुन्हा दीड महिना असाच सांगात द्यावा. या काळात तो रजतमापासून दूर राहिल्यास पुढे ६

१. '**बारा वर्षे परीक्षा सात्त्विकाची पहावी : नव वर्षे राजसाची परीक्षा पहावी : सहा वर्षे तामसाची परीक्षा पहावी : अनुसरण न भंगे तरी अवघे बोलावे : ना तरी निस्तरे तेतुकेच बोलावे**' ( आ. स्थ. १९७ ).

महिनेपर्यंत त्याला राहू द्यावे. १२ महिने अशी परीक्षा पाहून त्यात तो उतरल्यास त्याला १२ वर्षांची जवळीक द्यावी आणि त्या बारा वर्षात तो रजतमहीन आढळल्यास मग त्याला शास्त्र संपूर्णतेने सांगावे. पण तो परीक्षेत न उतरता शास्त्र सांगितले तर ते त्याच्या आमटी-भाजीसाठी त्याला शास्त्र विकणे होय, किंवा एखाद्या खाणावळीप्रमाणे शास्त्र–प्रसादादिक त्याला भाड्याने देणे होय.

## कालावधि बारांचाच का ?

बारा क्षण, बारा दिवस, बारा महिने व बारा वर्षे असा परीक्षेचा काळ ठेवण्यात हेतु हा की, परमेश्वर देखील बारावर्षानंतरच, विद्याधिकारियांना विद्या देतात. तसेच प्रेमहि बारा वर्षांच्या अधिकारानंतरच देतात. पुनःसंबंधाला पात्र झालेल्यांना पुनःसंबंध द्यायचा तोहि बारा वर्षांच्या अधिकारानंतरच देतात. म्हणून परीक्षेच्या काळाचीहि संख्या बारा ही ठरवली आहे. एका दिवसाचा संग द्यायचा असल्यास १२ क्षण परीक्षा पहावी; ५ दिवसांची भेट द्यायची असल्यास १२ घडींची परीक्षा; त्याला शुश्रूषा करण्याची परवानगी द्यायची असल्यास १२ प्रहरांची परीक्षा, १२ वर्षे संग द्यायचा असल्यास १२ महिन्यांची परीक्षा व संपूर्ण शास्त्र सांगायचे असल्यास १२ वर्षांची परीक्षा पाहणे अत्यवश्य आहे.

१. ' हो का : तरी ······ ऐसी बारांची संख्या का पा केली असे : ना : **बारा वर्षां विद्या अधिकार्या : बारा वर्षां प्रेमसंचारासि अधिकार्या : बारा वर्षां पुनःसंबंधासि अधिकार्या** ' ( आ. वं. १९७ ).

प्रकरण ९ वे

# स्मरण व प्रसादसेवा

जैसे धर्मश्रवणे विण : न होय दोषनिरसन
ना तरी न फिटे मूर्खपण : शास्त्रहीनांचे
तैसे न करिता गुणकथन : वाचेसी नाही पवित्रपण
न स्मरता श्रीचरण : जीव शुद्ध नव्हे ( ज्ञा. प्र. ४९;५० ).

## प्रास्ताविक

आतापर्यंत विकार--विकल्पशून्यता, स्वभावमात्रा, अटन-विजन, शास्त्राध्ययन इत्यादिसंबंधी जे विधिनिषेधात्मक नियम वर्णन केले ते एका दृष्टीने गौण होत. कारण, केवळ या विधिनिषेधांच्या परिपालनात मनुष्यजीवनाची इतिकर्तव्यता नाही. त्यांच्या पालनामुळे साधकाच्या ठिकाणी विरक्ति बाणून तो शेवटी परमेश्वराधीन झाला पाहिजे ही महत्त्वाची गोष्ट आहे. परमेश्वराच्या अव्यक्त स्वरूपाची प्राप्ति हे साधकाचे मुख्य साध्य होय. ते सिद्ध होण्यासाठी सावयव व साकार झालेल्या परमेश्वराचे दास्य जीवाला घडले पाहिजे. कारण ' ते दास्य मोचक ' ( पूर्वी ). त्या दास्यामुळेच सर्व बंधनातून जीवाची मुक्ति होऊन तो अव्यक्त ईश्वरस्वरूप प्राप्त करून घेऊ शकतो. अर्थात्, परमेश्वराकडे साधकाचे सर्वस्व वेचले जाणे अत्यवश्य आहे. तो पूर्णत्वाने परमेश्वराचा होण्यासाठी परमेश्वराव्यतिरिक्त इतर सर्व जीवदेवताप्रपंचापासून आधी मोकळा झाला पाहिजे. कारण जीव ' जेतुल जेतुला प्रपंची जडे तेतुल तेतुला ईश्वरी उजडे ' आणि ' जेतुल जेतुला प्रपंची उजडे तेतुल तेतुला ईश्वरी जडे ' ( आ. मा. १६९ ) हा तर सामान्य नियम आहे. तेंव्हां साधक परमेश्वराधीन होण्या-

साठी त्याची इतर सर्व आलंबने नष्ट होण्याची आवश्यकता आहे. म्हणूनच श्रीचक्रधरस्वामींनी आपल्या साधकांना ‘ निरालंबी ’ व्हायला सांगितले. ( निरालंबी : अ. प. ३ ).

## निरालंबता

विकार–विकल्पशून्य होऊन स्वभावाला मात्रा देणारा पुरुष ईश्वराचे स्मरण योग्य रीतीने करू शकेलच असे नाही. त्यासाठी त्याने ‘ निरालंबी ’ बनले पाहिजे, म्हणजे अंतर्बाह्य आलंबन सोडून दिले पाहिजे. विकार-विकल्प व स्वभाव याव्यतिरिक्त अंतःकरणाचा जो वेच असतो, जी एक प्रकारची ‘ आसक्ति ’ असते तिला ‘ आलंबन ’ असे म्हणतात. उदा : अमुकच गावाला जावेसे वाटणे हे स्थानवाचक बाह्य आलंबन होय. उगीचच पदार्थसंग्रह करणे हेहि बाह्य आलंबन होय. डोळयांनी एखाद्या पदार्थाकडे एकसारखे पाहात राहावेसे वाटणे हे स्वाभाविक आलंबन असून विकारामुळे एखाद्या पदार्थाकडे पाहत राहणे हे विकारजनित आलंबन होय. आपल्या भविष्यकाळासंबंधी मनोरथ रचीत बसणे, अर्थात् जीव–मनोरथांचा आश्रय करणे हेहि आलंबन होये. ही सर्व अंतर्बाह्य आलंबने सोडून आचरत्या पुरुषाने पूर्णपणे निरालंबी बनावे. तरच त्याला ईश्वरपरायण होता येईल.

विकार–विकल्पाव्यतिरिक्त अंतःकरणात असलेल्या आसक्तीला आलंबन म्हटलेले असले तरी विकारविकल्पादिकांच्या त्यागाने आलंबनाचा त्याग आनुषंगिक रीतीने होतोच यात शंका नाही. विकार–विकल्पशून्य होऊन साधकाने स्वभावांना मात्रा दिली म्हणजे परमेश्वराव्यतिरिक्त इतर आलंबनापासून त्याची अनायासानेच सुटका होते. उदा : विकारशून्यतेसाठी स्वदेशस्वग्रामादिकांचा जो त्याग करायला सांगितला त्यातील हेतु या जड–चेतन पदार्थावरील साधकाची आसक्ति सुटावी, त्यावरील त्याचे

१. ‘ **विकारव्यतिरिक्त** म्हणजे विकारां तथा विकल्पा तथा स्वभावा वेगळा **जो अंतःकरणीचा वेच ते आलंबन** ( ल. बं. अ. प. ४ ).

२. ‘ **आसमंतात लंबनमिति आलंबनम् : जीव मनोरथादि आश्रयो :** म्हणज आपणेयासि भविष्य मनोरथाचि आश्रय धरणे ’ ( सदर )

आलंबन नाहीसे व्हावे याशिवाय दुसरा कोणता आहे ? ' कर्म : धर्म : विधि : विखो : परित्यजौनि परमेश्वरा शरण रिगावे ' ( आ. ५६ ) या वचनात परमेश्वराला शरण जाण्यासाठी कर्मधर्मादिकांचा त्याग सांगितला आहे तोहि कर्मधर्मादिकावरील साधकाचे आलंबन नष्ट करण्यासाठीच नाही का ? ' एका झाडाची सवे न होआवी : एका स्थानाची सवे न होआवी ' ( आ. ३७ ) हे सांगण्यातहि आलंबन सोडविण्याचाच हेतु स्पष्ट आहे. विकार व विकल्प सोडून साधक विजनात एकाच झाडाखाली स्मरणासाठी बसू लागला तर पुढे कदाचित त्या झाडाची त्याला सवय लागेल, त्याच झाडाखाली बसण्यावाचून त्याला नीट रीतीने स्मरण करता यायचे नाही, हे एका दृष्टीने त्या झाडाचे त्याला लागलेले आलंबनच होय. ते नाहीसे करण्यासाठीच ' एका झाडाची सवे न होआवी ' असे म्हटले आहे. याच दृष्टीने साधकाला नित्य अटन–विजनाचे नियम लावून दिलेले आहेत. सारांश, विकार–विकल्पशून्यता, भिक्षा-भोजन, अटन–विजन इत्यादींचे जे नियम आपण आतापर्यंत पाहिले ते सर्व साधकाला निरालंब बनवण्यासाठीच उपदेशिलेले आहेत.

## निराश निराश्रय असावे

साधकाने अंगी निरालंबता बाणवावी म्हणजेच त्याने निराश व निराश्रय होऊन रहावे असे म्हणता येईल. ( नीरसा : निराशा : निराश्रया होउनि असावे : आ. ५३ ). त्याने निराश व्हावे म्हणजे परमेश्वरव्यतिरिक्त इतर कशाचीहि आणि कुणाचीहि आशा आपल्या मनात ठेवता कामा नये. अनुसरलेल्या पुरुषाने देवतांची आशा पूर्वीच सोडलेली असते. आता आचारधर्म आचरतांना त्याने कर्मराहाटीच्या व दैवराहाटीच्या कोणत्याहि जडचेतन पदार्थांची आशा करता कामा नये. स्थान, प्रसाद, भिक्षु, वासनिक यांचीहि त्याने आशा करता कामा नये. स्वतःच्या किंवा आपल्या अविद्यकाच्या ( कर्मराहाटीतील संबंधियांच्या ) शांतिपुष्टीसाठी

१. ' देवता न बोलीजे : का जे त्यांची आशा बोधापूर्वी करीत होता तो बोध जालेया ते आशा तैचि गेली असे : तरी आता अनुसरला कव्हणाची आशा करी ते निराशा करविली असे पा : ना भिक्षु : वासनिक : स्थान : प्रसाद यांची जे करावी तेहि न करावी ' ( आ. बं. ५३ ).

जपजाप्य करणे हे त्यांची आशा करणेच होय. तसेच त्या आचरत्या पुरुषाने मला अमुक पाहिजे, तमुक पाहिजे, अमक्या तमक्या गृहस्थाने मला हे किंवा ते द्यावे, मी या घरी गेलो तर मला सदन्नाची भिक्षा घाल-तील कारण हे सधन पुरुषाचे घर आहे; किंवा अतिथीला नेहमी संतुष्ट करावे हाच ज्याचा विधि आहे त्याच्या घरी गेल्यास आपणाला चांगले अन्न भिक्षेला मिळेल वगैरे वगैरे कोणत्याच प्रकारची आशा साधकाने करता कामा नये. अशी आशा करणे म्हणजे त्या त्या पुरुषावर किंवा पदा-र्थावर अवलंबून राहणेच होय. आणि जो असा अन्य पदार्थावर अवलंबून राहील तो निरालंबतेने केवळ परमेश्वराधीन होणे शक्य आहे काय ?

## निराश्रयता

निराश्रयता म्हणजे कोणाचाहि आश्रय न घेता राहणे; अवलंबून न राहणे. आचरत्या पुरुषाने धर्मव्यतिरिक्त कोणत्याहि जडचेतन पदार्थावर अवलंबून राहू नये. एखाद्या घरी चांगली भिक्षा मिळते म्हणून दररोज त्याच घरावर अवलंबून राहणे हे आलंबन होय. ते विकल्परूप आहे. त्यामुळे परमेश्वराचा आश्रय तोडल्यासारखे होते. साध्या सुईपासून तो मनु-ष्यापर्यंत-ठिगळापर्यंत अनुचित पदार्थांचे आलंबन करणे हाहि एक प्रकारचा विकल्पच होय. उदा : भिक्षूने एकाद्या पुरुषाच्या आश्रयाने राहणे म्हणजे प्रसंगविशेषी त्या पुरुषाचा आपणाला उपयोग होईल अशी आशा करणे होय. सुई-ठिगळ जमवणे हेहि प्रसंगी त्यांचा उपयोग व्हावा या आशेनेच. या सर्व गोष्टी विकल्परूप, अर्थात् परमेश्वरापासून साधकाला दूर नेणाऱ्या आहेत.

## धर्मरूप पदार्थांचीहि आशा नको

साधकाने सर्वसामान्य जडचेतन पदार्थांची आशा व आश्रय करू नये, इतकेच नाही तर उचित अशा धर्मरूप पदार्थांची देखील आशा करू

१. 'आशा म्हणजे अमुके होआवे : येणे मज द्यावे : एया घरा जावों मग काही सूती : व्यवास्थित सूति तयाचि जाइजे' (आ. स्थ. ५३)

२. 'आश्रयो म्हणजे आलंबन : धर्मव्यतिरिक्त मनुष्याचिये ठाऊनि सुई ठिगळ पर्यंत अनुचित पदार्थांची आशा अथवा संग्रहो हाहि विकल्पचि' (सदर).

नये. उदा : धर्मशास्त्र शिकण्यास महारवाड्यात जावे, अनीतिमंत पुरुषाकडेहि जावे वगैरे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे खरे; पण त्याचा अर्थ इतकाच की त्या त्या पुरुषांच्या गुणावगुणाकडे न पाहता आपण शास्त्र तेवढे त्याजपासून शिकावे. पण, मला शास्त्र देणारा हाच आहे, इतर कोणीच नाही, हा नसला तर मला शास्त्र कोण सांगेल, अशी त्याच्या आलंबनाची भाषा त्याने कधी करू नये. साधकाने शास्त्रासाठी अशा पुरुषांची सेवाहि करावी, पण ती निराश्रयतेने-आलंबनाची कल्पनाहि मनाला स्पर्शू न देता. ज्याच्याजवळ ज्ञान आहे, धर्म आहे, त्या ज्ञानियाची किंवा धार्मिकाची पूजा अवश्य करावी, त्याच्याजवळ रहावे, तो सांगेल तो उपाय करावा, त्याचे मनहि सांभाळावे. असे करणे म्हणजे आश्रय करणे नव्हे. पण हाच मला सांगेल, इतर कोणी नाही असे मानले म्हणजे तो आश्रय झाला. ते आलंबन झाले. प्रत्यक्ष अधिकरणाविषयींहि असे आलंबन साधकाने मनात बाळगता कामा नये. अनुसरत्या पुरुषाला आलंबन एकच, आणि ते म्हणजे परमेश्वर.

## प्रसादाचेहि आलंबन नको

ज्याच्याजवळ परमेश्वराचा प्रसाद असेल त्याजजवळून तो आपणाला मिळेल अशीहि आशा करू नये. कारण प्रसाद देण्यात मायेचे साह्य असते. प्रसादाचा किंवा तो ज्याच्याजवळ असेल त्याचा आश्रय घेणे म्हणजे मायेचा, अर्थात् एका देवतेचा आश्रय करणे होय. म्हणून प्रसादप्राप्तीविषयी जी प्रार्थना करायची ती एका परमेश्वराचीच. खास त्या प्रसादाची करू नये. शिवाय दुसरे असे की परमेश्वराची उत्कंठा ज्याला लागली आहे तो नुसत्या प्रसादाची आशा व आश्रय कधीच करणार नाही.

संग करावा असा विधि स्वामींनी सांगितलेला आहे. त्या संगासाठी—विधिपालनासाठी फार झाले तर भिक्षूची एकवेळ प्रार्थना करावी. पण

१. 'ना विहित वचने धर्मियाची जवळीक करावी परी यापरता मज आणिक कव्हणीच नाही ऐसी वासना जर धरिली तर तो आश्रयो बोलिजे' (आ. बं. ५३)

२. 'परी उचित धर्म प्रसाद' (आ. स्थ. ५३).

त्याजवर नेहमी अवलंबून राहू नये. एकवेळ प्रार्थना करायची तीहि विधि-भंगाचा दोष टाळण्यासाठी. तसेंच प्रसंगविशेषी ज्या देशात, गावात किंवा घरात रहावे लागेल तेथेहि निराश्रय भावनेने रहावे; म्हणजे त्याजवर अवलंबून राहू नये. 'मी या ठिकाणी इतके दिवस राहीन' असे म्हणणे म्हणजे त्यावर अवलंबून राहणे होय.तरी तसे म्हणू नये. ती भावनाहि मनात येऊ देऊ नये. क्वाचित्, अवचित पाऊस वगैरे आला तर जवळच्या घराचा आश्रय घ्यावा लागतो. तोहि 'निराश्रय' होऊन घ्यावा. पावसाची बाधा नाहीशी होताच्च तो आश्रय ताबडतोब सोडावा. आपल्या जवळची कंथा, झोळी वगैरेंचाहि आश्रय नसावा. ही झोळी माझी आहे, असे कधीच मनात आणू नये. ती परमेश्वराची आहे असेच मानावे.

सारांश, अशा रीतीने विकार, विकल्प व स्वभाव यांचा आश्रय सोडून आचरत्या पुरुषाने पूर्णपणे निरालंब होऊन रहावे. 'वायो हिंडे चराचरी : परि आश्रो केहि न करी : निराश्रया तिया परी : यती होआवे' (उद्ध. २७९) किंवा, 'पात्रादि आलंबन : नाही हुताशना : स्वीकारावया अन्ना : उदरचि पात्र' (उद्ध. २८६). यातील वायूप्रमाणे व अग्नीप्रमाणे साधकाने निराश्रय व निरालंब होऊन असावे. त्याने आलंबन करावे ते फक्त एका परमेश्वराचेच. कारण तेच त्याचे अंतिम साध्य आहे. साधकाने 'आपण कव्हणाअधीनु व्हावे नाही : आपणया अधीन कव्हणाते करावे नाही : जीवे परमेश्वराधीन होआवे' (आ. ६७) या आदेशाप्रमाणे वागावे.

## दास्य मोचक

पण साधकाने इतर सर्व आलंबने सोडून परमेश्वराधीन व्हायचे म्हणजे काय करायचे ? तर त्याची सर्वस्वाने सेवा करायची; दास्य[३] करायचे.

१. 'संगा लागौनि भिक्षूते प्रार्थणे हेहि तेचि म्हणजे आशा आश्रयात पडत असे' (आ. बं. ५३).

२. 'मग उचित देश : गाव : घर याचाही आश्रयोचि : येथ मी असुका काळ प्रहर एक : असके दिवस एक दोन पर्यंत असेन ऐसे न म्हणावे' (आ. स्थ. ५३).

३. 'दासधर्म भलतेयाते व्यापिता :··· देवताजीवांचा दास : दासोहं हे सर्वत्र' (आ. स्थ. २०७).

'ते दास्य मोचक' ( पूर्वी ) असे स्वामींनीच सांगितलेले आहे. अव्यक्त ईश्वरस्वरूपाची प्राप्ति करून घ्यायची असेल तर 'अंशवेधे संपूर्णाची प्राप्ति' ( वि. २९ ) या न्यायाने, त्या अव्यक्त स्वरूपाच्या साकार अवताराचे दास्य करणे, त्याचा वेध लागणे अवश्य आहे. म्हणूनच 'परमेश्वर भज्य' ( आ. १८५ ) परमेश्वराचे भजन करणे, दास्य करणे इष्ट आहे असे म्हटले आहे. परमेश्वराचे आपण दास आहोत या भावनेने अनन्यतेने जर त्याची सेवा केली तर काय ती ईश्वरप्राप्तीला पुरेशी होणार नाही ? अर्थात् होईल ! सामान्यतः कोणालाहि काय, दास्यावाचून सुख मिळत नाही. जीवाचे दास्य केले तर त्यापासूनहि सुख मिळते. स्त्री-पुत्रांचे दास्य केले तर त्यांचेहि सुख अनुभवावयाला सापडते. देवतांच्या दास्याने देवतांची सुखे प्राप्त होतात. मग परमेश्वराच्या दास्याने काय परमेश्वराचे सुख–निरतिशय आनंद प्राप्त होणार नाही की काय ? अर्थात् होईल ! इतकेच नाही तर जीवदेवतादिकांच्या दास्यापेक्षा परमेश्वराचे दास्य हे आत्यंतिक सुख प्राप्त करून देणारे आहे. ज्ञानी, अज्ञानी, वेधवंत वगैरे सगळयांना परमेश्वराचे दास्य करता येते. बाइसांनी केवळ आवडीने परमेश्वराचे दास्य केले. भटोबासांनी ज्ञानपूर्वक तर नाथोबांनी अज्ञानपूर्वक दास्य केले. साधिकरणी पुरुषांनाहि वचनरूप परमेश्वराचे दास्य करता येते. तेवढ्याने परमेश्वर संतुष्ट होतो व त्या पुरुषाचा स्वीकार करून शेवटी त्याला आपल्या अव्यक्त स्वरूपाची प्राप्ति करून देतो. ( दासोऽहं न पुरे नायका : आ. २०७ ). म्हणूनच आचरत्या पुरुषाने अनन्यचित्ताने परमेश्वराचे व्हावे.

### परमेश्वराचाच आश्रय का ?

इतर कुणापेक्षाहि अनन्याचित्ताने परमेश्वराचाच आश्रय करण्याचे कारण असे की, तो सर्वांपेक्षा अत्यंत थोर आहे. देवता ह्या परमेश्वराचीच सेवा करीत असतात. अव्यक्त देवता, त्यांच्या ब्रह्मांडस्था, लीळाविग्रह, पाषाण-प्रतिमा इत्यादि परमेश्वरासमोर हीन, क्षुद्र आहेत. कोणत्याहि देवतेच्या प्रतिमेच्या ठाइ वेचलेल्याला अंतराळापलीकडील फळ मिळू शकत नाही. ( महा. तत्व. पा. ३४५; मागे पान १६४ पहा. ) आणि ते देखील त्या देवतेच्या ठिकाणी क्रिया पूर्णत्वाने घडली तरच. एरवी अपूर्ण क्रियेतील हिंसेचे फळ आधी भोगावे लागून नंतर क्रिया पूर्ण झाल्या-

वर तिचे सुखदुःखसंमिश्र फळ भोगायला सांपडते. अंतराळापलीकडील स्वर्गादि देवतांच्या फळांचीहि तीच स्थिति. त्यांची च्युतिमंत फळे प्राप्त होण्याला कष्ट तरी किती पडतात ! उदाः पंडु राजाने ९९ यज्ञ केले, पण अखेरीस तो स्वर्गाच्या पायरीवरच राहिला. कारण १०० यज्ञांची क्रिया पूर्ण झाल्यावाचून स्वर्गीचे फळ होत नाही. त्यातहि, क्रिया पूर्ण झाल्यावर फळ मिळते हे खरे; पण तेहि परवडी आली तर, आणि त्यावेळी फळ रिकामे असले तर ! आड रिगण्याचाहि प्रतिबंध फळोपभोगाला असतोच. इतकेहि करून फळ प्राप्त झालेच तर तेथे दैत्यांची धाडी, खेद, आल्हाद, वरील देवतांचा शाप वगैरे दुःखे भोगावी लागतातच. इंद्रादिकावरील ब्रह्मादिक देवतांच्या फळाचीहि स्थिती तीच. हिवज कोळी झालेल्या महेशाची भक्ति बळी याने अत्यंत आत्मसमर्पणयुक्त केली, पण त्या भक्तीनुसार महेशाकडून त्याला फळ मिळाले काय ? मुळीच नाही. ( ली. च. भाग ३. पा. ९५ ). उलट सर्वसमर्थ परमेश्वराचे दानदातृत्व पहा. तो आपल्या अज्ञान भक्तालाहि कितीतरी दाने देतो. उदा : सहस्रार्जुनाने शरीरकष्टपूर्वक श्रीदत्तात्रेयप्रभूची सेवा केली. त्याला कुष्ट रोग होता. त्याच्या हाताची बोटे गळून पडली होती. तरी दत्तात्रेयप्रभूचे केश वाळवण्यासाठी त्याने आपल्या थोट्या हाताच्या थापावर विस्तव घेतला. इतके कष्ट सहन करून भक्ति केल्यामुळे श्रीदत्तात्रेयप्रभूंनी सुप्रसन्न होऊन त्याला हजार बाहु दिले, चक्रवर्तीपद दिले, लोकांचे इष्ट मनोरथ पूर्ण करण्याचे सामर्थ्य दिले, आणि हे सगळे त्याला प्रत्यक्ष दर्शन देऊन ! अज्ञान भक्ताला जर परमेश्वर इतकी दाने देतो तर ज्ञानी भक्ताला, त्याने शारीरिक व मानसिक कष्ट करून परमेश्वराचे दास्य केल्यास त्याला अनंत दाने मिळतील हे काय सांगायला पाहिजे ? म्हणून अनुसरलेल्या आचरत्या पुरुषाने

१. ' तया प्रतिमा जे होती तेही अंतराळापरौते नव्हे : आन जरी प्राक्तन तरिच करी ' ( आ. स्थ. २०६ ).

२. ' तो भक्त होय परी देव नव्हे : का भक्ते आवडीपूर्वक आपणपे बळीपे दिधले तैसेया सारीखे महादेवा न देववेचि ' ( सदर ).

३. ' तैसा ईश्वर नव्हे : सहस्रार्जुने भक्ति केली : केशकळाप वाळती म्हणौनि थापा इंगळ घेतले : इतुले शरीरदुःखें साहिले : साचोकार देवो प्रसन्न जाला···' ( सदर ).

अशा कैवल्यदात्या परमेश्वराच्याच पूर्णपणे आधीन होऊन त्याचेच सेवादास्य करावे. त्यात त्याच्या जीविताचे सार्थक आहे. ( मा तो एसना परमेश्वरु : तेयाचेया होइजो की देमती : आ. २०६ ).

## परमेश्वराची अंतर्बाह्य सेवा

अनुसरणानंतर साधकाने परमेश्वराचे जे सेवादास्य करायचे ते अंतर्बाह्यतेने व अहेतुकपणाने करायचे. असे करणे म्हणजे त्याने आपले, अनुसरणानंतरचे सर्व आयुष्य परमेश्वराला पूर्णत्वाने समर्पण करणे होय. ( जन्मजीवित परमेश्वरा देयावे : आ. ६८ ). अनुसरणानंतर सामान्यतः सर्वच साधक परमेश्वराची सेवा अंतर्बाह्यतेने करण्याचा प्रयत्न करीत असतात. त्यापैकी कित्येकांना आपल्या भूतभजनाच्या संस्काराप्रमाणे अंतर्बाह्य सेवा करता येते तर कित्येकांना येत नाही. म्हणून ते नुसती बाह्य सेवा किंवा कोरडी सेवा करीत असतात. पहिल्या प्रकारचे पुरुष हे वस्तुभजनीये असून ओल्या संस्काराचे असतात, तर दुसऱ्या प्रकारचे पुरुष हे सामान्यतः जीवदेवताभजनी असून ते कोरडे असतात.

ओले पुरुष हे पतिव्रतेच्या दृष्टांतानुसार ( दृष्टांत ६३ ) परमेराची अंतर्बाह्य सेवा करतात, तर कोरडे पुरुष दासीच्या दृष्टांताप्रमाणे नुसती बाह्य सेवा करतात. धनिणीने सांगितलेले काम आपले कर्तव्यकर्म आहे म्हणून दासी करते. मालकीण आपल्याला खायला-प्यायला, ल्यायला-नेसायला देते म्हणून काम करायचे अशी भावना तिच्या मनात नसते. तर तिची सेवा करणे हे आपले कर्तव्यकर्म आहे ही तिची भावना असते. त्याच भावनेने ती तिची सेवा करते. त्यामुळे तिची घरधनीण देखील त्या दासीला विसरत नाही. आपल्या बरोबर ती तिला जेऊ खाऊ घालते. ती स्वतः जेवायला बसते त्यावेळी अर्धे अन्न दासीला देते व अर्धे आपण घेते. ती तिची कोणत्याहि प्रकारे वंचना करीत नाही. तथापि आपल्या पतीची ' रति ' मात्र ती तिला कधीच देत नाही. ( दासीचा दृष्टांत ६२). त्याप्रमाणे अनुसरलेला कोरडा पुरुष परमेश्वराची सेवा करतो ती कोणत्याहि

१. ' जन्म ते बाह्य : जीवित ते आंतर : यथा दासी पतिव्रता : कोरडा विधि आचरे तो पहिला : अंतरसहित तो दुसरा ' ( आ. स्थ. ६८ ).

हेतूने करीत नाही, तर निर्हेतुकतेने पण कर्तव्यबुद्धीने करतो. त्याबद्दल परमेश्वर पुढे त्याला ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून देतात. त्याची वंचना करीत नाहीत. पण ते त्याला आपले प्रेम व मग आपली म्हणजे ईश्वर-स्वरूपाची प्राप्ति मात्र देत नाहीत.

उलट, ओले पुरुष परमेश्वराची जी सेवा करतात ती पतिव्रतेप्रमाणे अंतर्बाह्यतेने करतात. पतिव्रता आपल्या पतीची सेवा करते, आज्ञा पाळते, मुलांना जेऊ घालते. हे सर्व त्याचे म्हणजे पतीचे आहे या भावनेने करते. ती स्वतः शृंगार करते तोहि त्याच्यासाठी. पतीची कामे ती आपलीच कामे आहेत म्हणून ती करीत असते. दासीप्रमाणे अमुक कर, तमुक करू नकोस असे तिला सांगावे लागत नाही. आपणहून आंतरभावनेने ती सगळी कामे अर्थात् सेवादास्य करते. म्हणून तो पतीहि आपली सर्व मिळकत तिच्या स्वाधीन करतो. इतकेच नव्हे तर तिला तो आपले 'सर्वस्व' अर्पण करतो. तो तिला आपली 'रति' देतो. त्याप्रमाणे ओले पुरुष परमेश्वराची अंतर्बाह्य सेवा करतात. त्यामुळे कालांतराने परमेश्वर त्यांना आपले प्रेम व मग अनुभूति–रति देतात. ईश्वरस्वरुपांत त्याला ते पावन करतात.

सारांश, केवळ ओले पुरुषच परमेश्वराला आपले जन्मजीवित देऊ शकतात, त्याची अंतर्बाह्य सेवा करू शकतात. कोरडा पुरुषहि आपल्या विहिताचाराप्रमाणे सेवा करतो, पण ती कोरडेपणाने करतो. त्याला त्याचा इलाज नसतो. कारण त्याच्या भूतभजनाचा संस्कारच तसा असतो. अनु-सरलेल्या पुरुषांनी आपल्याला साधेल त्याप्रमाणे परमेश्वराचे अंतर्बाह्य सेवादास्य करण्याचा प्रयत्न करावा म्हणजे झाले.

## सर्वांची सेवा अहेतुक

ओले, कोरडे वगैरे सर्व साधक अनुसरणानंतर परमेश्वराची जी सेवा करतात ती अहेतुकपणे करतात. नित्यनैमित्तिक विधि आचरतांना 'या सेवेमुळे परमेश्वर मला अपरोक्ष ज्ञान देतील, पुनःसंबंध देऊन मग सन्नि-धान घडवतील - म्हणून मी ही सेवा करतो' असा हेतु कोणाच्याच ठिकाणी नसतो. दासी मालकिणीची जी सेवा करते ती तिच्याकडून आपणाला पैसे मिळतात म्हणून करीत नाही. तसेच कोरडे पुरुष देखील कोणत्याहि प्रका-रचा हेतु मनात न बाळगता अहेतुकपणानेच परमेश्वराची सेवा करतात.

ओला पुरुष सेवा करतांना 'मला परमेश्वर व्हावा, तो मला भेटावा' अशी आर्त बाळगतो हे खरे, पण परमेश्वराविषयी अशी आर्त किंवा उत्कंठा बाळगणे ही सहेतुकता नव्हे. त्यांची ती इच्छा अहेतुकातच पडते. अशा अहेतुकपणाने केलेले परमेश्वराचे दास्य साधकांना मोक्ष प्राप्त करून देते यात शंका नाही.

## परमेश्वरदास्याचे भाग्य कुणाला ?

परमेश्वरावताराचे दास्य 'मोचक' खरे, पण ते करण्याचे भाग्य सगळयांनाच लाभते असे नाही. यथार्थतेने परमेश्वराचे दास्य करता येण्यासाठी साधकाला एखाद्या अवताराचे सन्निधान लाभून त्याच्या मुखाने बोध झाला पाहिजे. पण सर्वांनाच परमेश्वराच्या मुखाने बोध होतो असे नाही. काहींना अधिकरणाच्या मुखाने बोध होतो. कारण तेवढे त्यांचे भाग्य नसते, परमेश्वराची तेवढी कणव त्यांनी जोडलेली नसते, म्हणून त्यांना परमेश्वरावताराचे सान्निधान व त्याच्या मुखाने बोध होत नाही. अर्थात् त्याच्या सेवेचेहि भाग्य त्यांना लाभत नाही. ( बाईं : जीव जीवार्चन घडे : परी ईश्वरार्चन ते काहींचि न घडे : वि. २२८ )

हे भाग्य फार थोड्यांना लाभते. ज्याने पूर्व सृष्टीत आर्तांची आर्त पुरवून अन्यकथन केले नसेल त्यालाच या सृष्टीत परमेश्वर स्वतःच्या मुखाने बोध देतात.अशा सन्निधानास्थित बोधवंत पुरुषालाच ईश्वरावताराचे दास्य करण्याचे भाग्य लाभते. पण पूर्व सृष्टीत ज्याने शास्त्र सांगून आर्तांची आर्त पुरवली पण तिथे असलेल्या अनार्तांला चुकवले नाही आणि म्हणून ज्याला अन्यकथनाचा दोष घडला त्याला या सृष्टीत परमेश्वराच्या मुखाने बोध होण्याचे भाग्य न लाभता त्याच्या नशिबी नागदेवाचार्या सारखा उत्तम अधिकरण येतो. प्रत्येक सृष्टीत त्याला अधिकरणाकडूनच बोध होतो. मानमान्यतेसाठी किंवा इंद्रियार्शाकारणे अपात्राला शास्त्र सांगणाऱ्याच्या

१. 'अहेतुक चर्या करी : कैसेनि पा : ईश्वरवासना करी तेतुले अहेतुक ईश्वरवासना हा हेतु नव्हे : त्यात सन्निधान देती : अपरोक्ष देती हे हेतु न व्हावे' ( आ. स्थ. २०६ ).

२. 'आपुलेनि मुखे जयासी बोध देती तयासि अर्चन : हे कव्हणा एका सदैवा : एरव्ही प्रतिसृष्टी अधिकरणाचि' ( वि. स्थ. २२८ ).

नशिबी प्रतिसृष्टीत हीनाधिकरणाकडून बोध असतो.त्याला हीनाधिकरणाचाच योग घडतो. याहिपेक्षा स्वोक्ति वापरून विपरीत रीत्या ज्याने अन्यकथन केले असेल त्याला परमेश्वराचे भजन-पूजन तर दूरच राहिले पण प्रतारणेमुळे नरक मात्र भोगावे लागतात. अशा मनुष्याने पुढे उपरति करून दोषत्याग केला तर हळूहळू तो निर्बळाचा सबळ होतो. आपली नित्य-नैमित्तिक क्रिया तो ईश्वरार्पण करतो. त्यामुळे पुढे त्याला कणवेमुळे श्रीमुखाने बोध होऊन ईश्वरार्चनहि घडू शकते. पण ते पुढील सृष्टीत; या सृष्टीत मात्र त्याला ईश्वरसेवेचे भाग्य लाभत नाही.

## वचनरूप परमेश्वराचे दास्य

अशा असन्निधानस्थित पुरुषांनी ईश्वरदास्य कसे करायचे ? की त्यांना 'दास्या'चा योगच नाही ? परमेश्वराच्या सन्निधानात असून त्याच्या सेवादास्याचा यथार्थ योग त्यांना नसतो हे खरे. पण असन्निधानीच्या पुरुषासाठी श्रीचक्रधरस्वामींनी वचनरूप परमेश्वराचे दास्य करायला सांगितले आहे. (वचनरूप परमेश्वर तो आपणापासी आसतची असे : शो. आ. मा. २३). त्याचे स्थान, प्रसाद, भिक्षु, वासनिक हे देखील परमेश्वरा-प्रमाणेच होत. परमेश्वराच्या अविद्यमानी, त्याने निरूपिलेल्या शास्त्रातील वचनाप्रमाणे आचार करीत राहणे हेच त्याचे सान्निधान किंवा 'असान्निधानी सन्निधान' (वि. १४२) होय. तेव्हां सन्निधानस्थित पुरुषाने जसे व्यक्त परमेश्वरावताराचे सेवादास्य करावयाचे तसे असन्निधानस्थित पुरुषाने वचनरूप परमेश्वराचे व त्याच्या स्थानप्रसादादिकांचे सेवादास्य करायचे. (महा. तत्त्व. पा. ४४५). कालांतराने ते त्याला मुक्तिप्रद होईलच. म्हणजे असे की परमेश्वराने सांगितलेले विधिनिषेध पाळून योग्य रीतीने त्याने असतीपरी आचरली म्हणजे पुढील देहात परमेश्वर त्याला पुनःसंबंध देतात. (तेयासि परमेश्वरु पुनरपि आपुला संबंधु देति : अ. प. ६). त्या पुनःसंबंधानंतर त्याचे शाब्दज्ञान चरित झाल्यावर क्रमाक्रमाने त्याला त्याच देही इतर ज्ञाने देऊन परमेश्वर त्याला ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून देतात.

## मुख्य विधि : स्मरण

पण वचनरूप परमेश्वराचे सेवादास्य करायचे म्हणजे काय करायचे ?

सन्निधानस्थित पुरुषाला व्यक्त परमेश्वरावताराची जवळीक लाभून त्याचे हातपाय दाबणे वगैरे ही अंगलग 'सेवा' व त्याचे अंगण झाडणे, त्याची व्यवस्था ठेवणे, त्याचे बाह्य व्यापार करणे वगैरे 'दास्य' जसे लाभते तसे वचनरूप परमेश्वराचे दास्य तर करता येणे शक्य नाही. ते दास्य करणे म्हणजे ती वचने पाळणे, त्याप्रमाणे वागणे, आचार करणे. आता, परमेश्वराने सांगितलेल्या असान्निधानधर्माच्या वचनात परमेश्वराच्या सेवादास्यात अंतर्भूत होणारा विधि म्हणजे परमेश्वराचे स्मरण करीत करीत जन्म क्षेपणे हा होय. असतीपरीतहि 'विकारविकल्पशून्य' होऊन 'स्वभावांना' मात्रा देऊन व 'निरालंबी' बनून अनुसरलेल्या पुरुषाने काय करावे म्हणून मुख्यतः सांगितले आहे ? तर 'देवतास्मरणे : जो जन्म क्षेपी' म्हणजे देवता (= परमेश्वर) स्मरण करीत करीत त्याने जन्म क्षेपावा. अर्थात्, वचनरूप परमेश्वराच्या सेवादास्यातील मुख्य विधि परमेश्वराचे स्मरण करणे, निरंतर स्मरण करणे हा होय.

## वैराग्य स्मरणासाठी

म्हणूनच पूर्वी असे म्हटले आहे की, विकारविकल्पशून्य होण्यासाठी जे विधिनिषेध सांगितले आहेत ते सर्व परमेश्वराचे सेवादास्य साधकाला उत्तम रीतीने करता यावे म्हणून, अर्थात्, परमेश्वराचे स्मरण त्याला नीट करता यावे म्हणून. असतीपरीतील वचनावरून ही गोष्ट अगदी स्पष्ट दिसते. सुवर्णाला तापवायचे वगैरे, ते शुद्ध करून चक्रवर्तीच्या अलंकारपदाला योग्य करण्यासाठी 'जेवी कीड भांगार पुटी : घातलेया होय तुका तुटी : मळांशू खंडी मीठ आटी : तै ते अनर्घ्या योग्य ॥ मग जे चक्रवर्ती राजे : तया अलंकारपणे भुजे' (ज्ञा. प्र. ८४४, ८४५) त्याप्रमाणे ज्ञानाग्नि, अभ्यास, वैराग्य वगैरे सगळे अनुसरलेल्या पुरुषाला शुद्ध करून ईश्वरभजनाला लावण्यासाठी होय. 'तैसे ज्ञानाग्निचा डाही : अभ्यास वैराग्य कर्मे देही : तेणे शुद्ध होत सांता देही : भक्ती भजे' (ज्ञा. प्र. १४६). आणि अनन्य मूर्तिस्मरण हे सर्व भक्तीचे मूळ कारण होय. 'असिकीये भक्तीचे कारण : अनन्य मूर्ति-स्मरण' आणि 'येर शमदमादि इंद्रिये धारण : ध्यान साधावया.' म्हणजे शमदमादि साधनांनी इंद्रिये ताब्यात ठेवायची ती केवळ परमेश्वराचे ध्यान उत्तम रीतीने करता यावे म्हणून, असे पंडित

विश्वनाथबासांनी स्पष्टच म्हटले आहे. 'तैसा संग दोष रहित : बाळवत आत्मरत : सर्वारंभयुक्त : होत सातां ॥ आस्तारहित उदास : रसशून्य निराश : निलाग अनियत वास : यकांकिया ॥ यापरी सर्व काळी ' आचरता पुरुष ' जन्म क्षेपी निराळी ' पण हे सगळे कशाकरिता ? तर 'चिंतन ध्यानाची टाळी : न भंगावया ' ( ज्ञा. प्र. ८५४-५६ ). यावरून स्मरणाचा विधि हा सर्व विधींत श्रेष्ठ असल्याचे दिसून येईल.

तेव्हां, आचरत्या पुरुषांनी प्रामुख्याने, निरंतर परमेश्वर-स्मरण करीत राहणे हा त्याचा मुख्य आचारधर्म होय. ' ज्ञानेविण वैराग्य ते काइ करावे बापेया ' ( आ. २२१. ). यावरून नुसते वैराग्य उपयोगी नाही हे दिसेल. ते वैराग्य ज्ञानपूर्वक पाहिजे. आणि परमेश्वरशास्त्रातील ज्ञान कोणते ? तर जीवदेवताप्रपंच ही अमोचक असल्यामुळे त्यांच्या भजनी न लागता कैवल्यदात्या परमेश्वराचे सेवादास्य करीत राहणे, अर्थात् त्याचे स्मरण करीत राहणे. वैराग्य करायचे ते त्या ईश्वरस्मरणासाठी ! परमेश्वराने साधकांना शास्त्रचर्चा करायला सांगितली आहे, हे खरे. पण नुसती चर्चा करणे हे साध्य नाही, तर ईश्वरप्राप्ति हे साध्य आहे. त्यासाठी स्मरण करणे आवश्यक आहे, हे विसरता कामा नये. केसोबासादिकांना आचार्यांनी केलेल्या उपदेशावरूनहि (मागे पा. २७० पहा ) मुख्य विधि स्मरणाचा असल्याचे दिसून येईल. भिंगुरटीला ' ऐसे तियेते चिंतिता : कीटकीए जाली सरूपता : तैसे परमेश्वरू स्मरता मुक्ती होए ' ( उद्ध. ५०२ ) असे भास्करभट्ट बोरीकराने म्हटले आहे तेहि याच अर्थाने.

## श्रुत : दृष्ट स्मरण

सन्निधानपर आणि असन्निधानपर साधकांच्या दृष्टीने परमेश्वरस्मरणाचे प्रामुख्याने दोन प्रकार होतात. (१) दृष्ट स्मरण; आणि (२) श्रुत स्मरण. स्मरणाचा विधि सांगतांना श्रीचक्रधरस्वामींनी ' हे देखिले तैसे आठवीजे ' ( आ. २७) या वचनात ' दृष्ट ' स्मरणाचाच विधि सांगितला आहे. परमेश्वराला जसे पाहिले तसे त्याचे स्मरण करावे हे खरे, पण ते फक्त सन्निधानपर ज्ञानिया भक्तांनाच शक्य आहे. प्रेमसंचार झाल्यानंतर आपल्या साधनदात्या श्रीमूर्तीतील ईश्वरस्वरूप भक्ताला दिसते. त्या स्वरूपाच्या स्मरणात तो निरंतर मग्न असतो. श्रीमुखाने बोध झालेल्या

सन्निधानपर ज्ञानियाला मूर्तीतील 'स्वरूप' दिसत नाही; त्याला फक्त श्रीमूर्तीच दिसते. तिचेच त्याने स्मरण करायचे असते. अशा ज्ञानिया-भक्तांना, त्याचप्रमाणे आरंभी परमेश्वराचे सन्निधान लाभून नंतर श्रीमूर्तीने बीजे केल्यामुळे जे असन्निधानी आले त्यांनाहि हे 'दृष्ट' स्मरण करता येऊ शकते.

पण असन्निधानपर ज्ञानियांना 'दृष्ट' स्मरण करता येणे शक्य नाही. त्यांच्यासाठी 'श्रुत' स्मरणाचा विधि सांगितलेला आहे. सन्निधानपर ज्ञानिया-भक्तांनी श्रीमूर्तीचे लिहून ठेवलेले वर्णन वाचून वा ऐकून त्या मूर्तीचे तसे स्मरण करावे. श्रीमूर्तीची भावना करावी व ती आठवावी. ( देखिली श्रीमूर्ति आठवीजे ते मूर्तिस्मरण : आइकिली श्रीमूर्ति आठवीजे ते भावना : आ. मा. २४६ ). मायापुरात घटाकारे आकारलेले परमेश्वर-स्वरूप व त्याचे सर्वशक्तियुक्तत्व महावाक्य प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे मनश्चक्षूसमोर आणून त्याचे त्यांनी निरंतर स्मरण करावे. हेच श्रुत स्मरण होय. ( हे तुम्हा श्रुत की दृष्ट : श्रुत भणीजे आइकीले : दृष्ट भणीजे देखीले : मूर्तिज्ञान ). हे श्रुतस्मरणच आपणाला आता विस्ताराने पहायचे.

### चतुर्विध स्मरण : व्यक्तावताराचे

पण 'परमेश्वराचे' स्मरण ( मग ते श्रुत असो की दृष्ट असो ) करायचे म्हणजे 'कशाकशाचे' स्मरण करायचे ? केवळ त्याच्या श्रीमूर्तीचे स्मरण करायचे, की त्याने केलेली चरित्रे आठवायची ? या दृष्टीने परमेश्वराचे स्मरण चार प्रकारचे आहे. 'नाम : लीळा : मूर्ति : चेष्टा :' ( आ. २८ ) हे ते चतुर्विध स्मरण होय. 'ऐसा परमेश्वरु तयाचे नाम : लीळा : मूर्ति : चेष्टा : देहपर्यंत आठवीजे : ध्याइजे : तैं या संवसारा पासौनि सुंचीजे' ( मूर्तिज्ञान ) असे म्हटले आहे.

तेव्हां साधकाने स्मरण करायचे म्हणजे परमेश्वराचे नाम, लीळा, मूर्ति व चेष्टा यांचे स्मरण करायचे. ह्या नाम-लीळा अर्थात् व्यक्त परमेश्वरावताराच्या त्याच आठवाव्या. अव्यक्त परमेश्वरस्वरूपाची देखील एक लीळा आहे. उदा : सृष्टीची रचना, उद्धरण व संहार या प्रवृत्ति स्वीकारणे ही अव्यक्त परमेश्वराची लीळाच होय. उद्धरणासाठी कोणती मूर्ति स्वीकारायची व कोणते नाम स्वीकारायचे हे ठरवणे ही देखील अव्य-

क्ताची लीळा[1] होय. कारण व्यक्तावतार धारण करण्यापूर्वी मूर्तीच्या आणि नामाच्या स्वीकाराची प्रवृत्ति अव्यक्त परमेश्वरापासूनच होते. त्याप्रमाणे पुढे सृष्टिरचना होऊन व्यक्तावतार मूर्ति धारण करतो व नाम स्वीकारतो. तिन्ही प्रवृत्ति, मूर्तिस्वीकार व नामस्वीकार या अव्यक्त स्वरूपाच्या लीळा असल्या तरी साधकाने त्यांचे स्मरण ते काय करायचे ? फार झाले तर अव्यक्ताच्या या लीळा मनात आणून त्याचे श्रेष्ठत्व चिंतिता येईल. तथापि काष्ठात अग्नि सर्वत्र व्यापून असला तरी ज्याप्रमाणे तो प्रगट झाल्यावाचून सामान्य प्राण्यांना उपकारक होत नाही त्याप्रमाणे ' तैसा परमेस्वरू : सर्वात्मा निराकारू : परि जिवासी साकारू : उपकारकु ' ( उद्ध २९१ ) साकार व्यक्त परमेश्वरावतारच साधकांना उपकारच होतो. म्हणून त्याने ज्या लीळादिकांचे स्मरण करायचे त्या व्यक्तावताराच्याच.

## नामस्मरण सर्वश्रेष्ठ

या चतुर्विध स्मरणात देखील ' नाम ' हे सर्वश्रेष्ठ होय. म्हणून साधकाने निरंतर नामस्मरण करणे हेच अत्यंत महत्त्वाचे आहे. याचे एक कारण असे की परमेश्वराने नामाचा विशेष अभिमान घेतलेला असतो. ' नामस्मरण कीजे : नामी अभिमानु आति ' ( आ. मा. ४६ ) असे म्हटले आहे. परमेश्वराचे ' वस्तुस्मरण ( = केवळ श्रीमूर्तीचे म्हणजे इश्वर-स्वरूपाचे स्मरण ) तेहि एक स्मरणचि की गा ' ( आ. ४७ ) असे सांगण्यात वस्तुस्मरणाचे कनिष्ठत्व सूचित केलेले आहे. ' मूर्तिस्मरण ' आणि ' नामस्मरण ' यातील फरक सांगतांना ' मूर्तिस्मरण ते वस्तुस्मरण होए : नामस्मरण ते वस्तुस्मरण होए आणि नामस्मरणही होए ' ( आ. मा. १८६ ). अर्थात्, मूर्तिस्मरणात नामस्मरण येत नाही; पण नामस्मरणात मात्र मूर्तिस्मरणाचाहि अंतर्भाव होतो; त्यामुळे मूर्तिस्मरणाचेहि श्रेय लाभते असे स्पष्टपणे म्हटले आहे. यावरून नामस्मरण सर्वश्रेष्ठ असल्याचे दिसून येईल. ' साकारापासौनि नाम : मूर्ति : नीराकारापासौनि

१. ' प्रथम जीवोद्धरण हेतु : मग तद्रूप प्रवृत्ती उल्लेख जो उपजे त्यासच अव्यक्ताची लीळा बोलीजे''' ना : अव्यक्त स्वरूपी असुके नाम आन मूर्ति धरावी ऐसी जे प्रवृत्ति तियेते अव्यक्ताची लीळा बोलीजे ' ( आ. बं. २८ ).

लीळा : चेष्टा : भणौनि साकारानीराकारा नामचि कारण ' यातहि तेच सूचित झाले आहे. म्हणूनच " नाम आठवीजे : स्मरीजे : ध्याइजे : तैचि या सवंसारा पासौनि मूंचिजे " ( नामाचे दहाठाय ) असे सांगितले आहे.

## अभिमान घेतलेल्या नामाचे स्मरण

परमेश्वराच्या नावाचे स्मरण करायचे खरे; पण कोणत्या नावाचे ? परमेश्वराला अनेक नावे असतात. त्यापैकी स्मरणीय नाव कोणते समजावे ? याला उत्तर असे की, परमेश्वरावताराने ज्या नावाचा स्वीकार करून अभिमान घेतला असेल तेच नाव स्मरणीय होय. अव्यक्त ईश्वरापासून अनंत अवतार होतात व त्याच वेळी ते अनेक नावे स्वीकारतात; तसेच व्यक्तावतारापासूनहि अनेक अवतार विभागतात. अवतार विभागत असतांना त्यांनीहि नामस्वीकार केलेला असतो. या सगळ्या नावात ज्या अवताराने ज्या नावाचा विशेष अभिमानपूर्वक स्वीकार केलेला असेल, त्या अवताराच्या विद्यमानी त्याच्या त्या नावाचेच स्मरण विहित आहे. ' नामी अभिमान आति '( आ. मा. ४६ ) या वचनावरूनहि परमेश्वरावताराने अभिमानपूर्वक स्वीकारलेल्या नावाचेच स्मरण विहित असल्याचे दिसून येईल.

उदाः श्रीकृष्णावताराला हरि, गोविंद, दामोदर इत्यादि प्रसंगप्राप्त अशी अनेक नावे होती. परमेश्वरावताराने ' श्रीकृष्ण ' या नावाचाच अभिमानपूर्वक स्वीकार केलेला असल्यामुळे द्वापरयुगात तेच नाव विशेष स्मरणीय होते. कलियुगात श्रीचक्रधरस्वामींचा अवतार हा परमेश्वरावतार होय. त्यांना इतर लोक ' गोमटदेव ' (ली. च. भा. २. पा. २३); ' मौन्यदेव ' ( ली. च. भा. २ पा. २ ); ' नग्नदेव ' ( ली. च. उत्त. पा. १९ ) वगैरे अनेक नावांनी आळवीत. आणि परमेश्वरहि त्या नावाचा तात्पुरता स्वीकार करीत. पण ऋद्धिपुर येथे श्रीगोविंदप्रभूंनी त्यांचे नाव ' चक्रधर ' असे ठेवले व ते त्यांनी अभिमानपूर्वक स्वीकारले. बाइसाला प्रेम दिल्यावर प्रतिष्ठानी पांड्याला

१. ' नाम म्हणजे एक नियत स्वीकार ' ( आ. स्थ. २८ ).

२. ' त्या सकळ नामामधे ज्या नामाचा ज्या अवतारासी अंगीकार अभिमान असे तेणेच नामे साधनवंताचे चरीत होती ' ( आ. बं. २८ ).

पडलेल्या स्वप्नाच्या वृत्तांतावरून 'चांगदेव राऊळ' या नावाचाहि श्रीचक्रधरस्वामींनी अभिमानपूर्वक स्वीकार केला होता असे निश्चितपणे समजते. (ली. च. भाग २ पा. ३). अर्थात्, 'श्रीचक्रधर' या नावाप्रमाणेच 'श्रीचांगदेव राऊळ' हेहि नाव स्मरणीय होय. कलियुगात श्रीचक्रपाणी, श्रीगोविंदप्रभु हेहि परमेश्वरावतारच होते. पण उभयदृश्यत्वाच्या स्वीकारामुळे 'श्रीचक्रधर' व 'श्रीचांगदेव राऊळ' ही दोन नावे विशेष स्मरणीय व प्राप्तीला पोचवणारी आहेत. साधकाने प्रामुख्याने ह्याच नावांचे अंतःकरणपूर्वक स्मरण करावे.

## श्रीचक्रधरावताराचे सर्वश्रेष्ठत्व

कलियुगातील उभयदृश्यावतार म्हणून तर श्रीचक्रधरावताराचे श्रेष्ठत्व आहेच, पण इतर दृष्टींनीहि श्रीचक्रधरावताराचे सर्वश्रेष्ठत्व दिसून येते. श्रीदत्तात्रेय प्रभु, श्रीकृष्ण व श्रीचक्रधरस्वामी हे तिघेहि उभयदृश्यावतार होत. म्हणून जीवोद्धरणाच्या दृष्टीने ते सर्व उपकारक आहेत यात शंका नाही. पण त्या सर्वांत श्रीचक्रधराचा अवतार श्रेष्ठ होय. याचे कारण असे की श्रीचक्रधराला जीवोद्धरणाचेच काय ते व्यसन होते. ( कव्हणा कव्हणी व्येसनु : कव्हणा कव्हणी व्येसनु : एथ जीव उद्धरीजेति हेचि व्येसनु : वि. ११८ ). उदा : श्रीदत्तात्रेय प्रभूंना पारधीचे व्यसन होते. श्रीकृष्णाला राज्योपभोगाचे व बाणांनी जीवांना उतटण्याचे म्हणजे लीळा व संबंध दाने देण्याचेच व्यसन होते. पण श्रीचक्रधरस्वामींना कैवल्यदान देऊन जीवांचा उद्धार करण्याचेच काय ते व्यसन होते. अधिकारी पुरुष भेटला तर, त्याच्या अर्जिताप्रमाणे त्याला ज्ञान किंवा प्रेम द्यावे असे इतर अवतारांना वाटायचे, पण श्रीचक्रधरांना वाटायचे की आपण सगळ्यांना ज्ञान द्यावे. म्हणून ते जीवाकडून काही क्रिया घडवून त्याला मुद्दाम ज्ञानाला किंवा प्रेमाला पात्र करीत. त्यासाठी त्यांनी आपले राज्य सोडले, संपत्तीचा त्याग केला, महादेवरायहि त्यांना राज्य अर्पण करणार होता, पण ते घेण्याचे त्यांनी टाळले. यतिमुनीचा वेष घेऊन आर्तांचा शोध करीत करीत ते दारोदारी, घरोघरी, खेड्यापाड्यातून भटकले. याचे कारण आपण जीवांचा उद्धार करावा, त्यांना ज्ञानाप्रेमाला पात्र करावे अशी आत्यंतिक तळमळ त्यांच्या ठिकाणी होती. म्हणून उभयदृश्यातहि श्रीचक्रधराचाच अवतार

सर्वश्रेष्ठ होय. आज कलियुगात त्यांच्याच नावाने जीवाचा उद्धार होऊ शकतो. कारण त्यांचा अवतार अजून विद्यमान आहे. 'श्रीदत्तात्रेय प्रभूंचा चतुर्युगी अवतार' ( वि. २८२ ) असल्यामुळे ते कलियुगीहि विद्यमान आहेत हे खरे; पण त्यांचे दर्शन सहसा होत नाही. शिवाय ते आपल्या पारधीच्या व्यसनातच मग्न असतात. श्रीकृष्णावताराने तर द्वापरातच कर्पूरकज्जलिकावत् पुरत्याग ( वि. ९३ ) केलेला असल्यामुळे आज त्यांचा अवतार विद्यमान नाही. पण जीवोद्धरणव्यसनी उभयदृश्या श्रीचक्रधरावतार अजूनहि उत्तरापंथी विद्यमान असल्यामुळे तोच उद्धरणाला विशेष उपकारक होऊ शकतो. म्हणूनच ' एणे अवतारे जो नुघरे तो कहीचि नुघरे' असे नागदेवाचार्यांनी म्हटले आहे. ( नामाचे दहा ठाय ). अशा श्रीचक्रधरावताराचे नामस्मरण हेच सर्व साधकांनी निरंतर करावे.

## नामस्मरणाचे फायदे

परमेश्वराचे नामस्मरण केल्याने जीवांना सर्व काही मिळू शकते. राजवाड्यात प्रातःकाळी भाटचारण राजाचे गुणानुमोदनपूर्वक नाव उच्चारतात. ते ऐकून राजा प्रसन्न होतो. या भाटांना आपण काही द्यावे असे त्याच्या मनात येते व तो त्यांना दाने देतो. त्याप्रमाणे परमेश्वराचे नाव उच्चारले म्हणजेहि नामोच्चरण करणाराला आपण दाने द्यावी असे त्याच्या मनात येते व तो त्यांना दाने देतो. नामस्मरण केल्याने साधकाला वेध होतो, बोध होतो, अनुसरण घडते, स्मरण उत्तम रीतीने करता येते, त्याचे सगळे निरोध नाहीसे केले जातात, त्याच्या वरचा ' वाजत वारा ' आणि ' पडते आकाश ' थोपवून धरली जातात, त्याच्यावर येणारे विघ्न निवारले जाते, त्याला त्याच्या आचारधर्मात साह्य मिळते आणि शेवटी ईश्वरप्राप्ति होते. हेच नामाचे दहा ठाय म्हणून प्रसिद्ध आहेत. नामस्मरण करतांना ज्या ज्या साधकांना, ज्या ज्या प्रसंगी वेध, बोध, अनुसरण वगैरे घडले त्या त्या साधकांच्या बाबतीत घडलेले ते ते प्रसंग आठवावे, म्हणजे नामस्मरण अधिक फलदायी होते. ( नामाचे दहा ठाय पहा ).

## मूर्ति-स्मरण

चतुर्विध स्मरणात नामस्मरण सर्वश्रेष्ठ आहे हे आपण पूर्वी पाहिले. दुसऱ्या एका दृष्टीने विचार केला तर चतुर्विध स्मरणात मूर्तिस्मरण श्रेष्ठ आहे असेहि म्हणता येईल. कारण असे पहा की नाम, लीळा व चेष्टा या सर्वांना आधार कुणाचा ? अर्थात् श्रीमूर्तीचा. श्रीमूर्तीच नसली तर तिने स्वीकारलेले नाव कुठले आणि तिच्या लीळा चेष्टा कुठल्या ? तेव्हां इतर सर्वांना आधारभूत असल्यामुळे श्रीमूर्ति आणि म्हणून त्या श्रीमूर्तीचे स्मरण हेंच सर्वश्रेष्ठ ठरत नाही काय ? तथापि ,बहुधा परमेश्वरावताराने मूर्ति स्वीकारण्यापूर्वी अव्यक्ताहूनच नामाचा स्वीकार आधी केलेला असतो आणि म्हणून मूर्तीपेक्षा नाव हेच अधिक श्रेष्ठ होय. या नामस्मरणाने श्रीमूर्तीच काय पण ईश्वराचे अव्यक्त स्वरूपहि प्राप्त होते. म्हणून चतुर्विध स्मरणात नामस्मरणच श्रेष्ठ होय यात शंका नाही.

## मूर्तिस्मरण कसे करावे ?

परमेश्वराच्या मूर्तीचे स्मरण करायचे म्हणजे ती मूर्ति साधकांनी जशी पाहिली किंवा ऐकली असेल तशी आठवायची. श्रीचक्रधराची ती सुंदर मूर्ति, त्या मूर्तीचे ते चापेगौर रूप, पंचविसा सत्ताविसा एवढे असलेले ते वय, मनुष्यदेहीचे, कृपांगीकाराचे वगैरे गुण, सोन्याला तुच्छ करणारे ते लावण्य, यथायुक्त असलेले त्याचे ते अतिसुशोभित अवयव, त्या अवयवांचे अनुकार, विशिष्ट प्रसंगीचे त्या परमेश्वरमूर्तीचे अवसर, तिची वस्त्रे, अलंकार, प्रसंगानुसार पाहिलेली त्या मूर्तीची प्रसन्नता ही सगळी स्मरणाच्या वेळी जशीची तशी आठवावी.[३]

१. '**ऐसे चतुर्विध स्मरण एकापसी एक सामान्य विशेष ...**ना : नाम लीळा चेष्टा या तिहीस श्रीमूर्ति आधार यातव श्रीमूर्तीची आठवण तो विशेष' (आ. वं. २८)

२. '**अमुके नाम धरावे हा स्वरूपौनि स्वीकार : नाम जाणितलेया ईश्वरू वश होय**' ( आ. स्थ. २८ ).

३. '**मूर्ति म्हणजे रूप वय गुण जो जैसा अवयव : खुतीखावनी : जीये काळी जैसा अवसर : वस्त्रे : अलंकार : उदास : प्रसन्न आठवीजे**' (सदर)

या निरनिराळ्या अवयवांचे वगैरे स्मरण करतांना त्या त्या अवयवांशी संबंध असलेल्या परमेश्वराच्या लीळा व चेष्टा ह्याहि आठवणे अवश्य आहे. उदा : श्रीचक्रधरस्वामींच्या श्रीचरणांचे स्मरण कसे करायचे ? ' मूर्तिज्ञान'कार सांगतात ' श्रीचरण ऐसे भावीजति : ध्याइजति : जे यकांकी डावेनि श्रीचरणे सीळातळावरि उदक घालीति ॥१॥ आणि महदाइसांचे आंग चुरणे ॥२॥ आणि भटा क्षेउर ॥३॥ आणि लाहामाइसा ज्वरी पडिताळणे ॥४॥ आणि पुरुषोत्तम देवी पागडे ओळगवणे ॥५॥ आणि गोसावी पस्यात पाहारी परीश्रया बीजे करीति ॥६॥' असे श्रीचरणांचे स्मरण करावे. अशाच प्रकारे प्रत्येक अवयवाचे स्मरण करतांना त्याशी निगडित असलेली परमेश्वराची चरित्रेहि आठवणे आवश्यक आहे.

## लीळा : चेष्टा : स्मरण

परमेश्वरावताराने चेतनाबरोबर ज्या सहेतुक क्रीडा केल्या त्यांना ' लीळा ' म्हणतात, तर त्याने जडाबरोबर केलेल्या अहेतुक क्रीडांना ' चेष्टा ' असे नाव आहे. उदा : श्रीचक्रधरस्वामी नागदेवाचार्यांच्या वक्षस्थळावर नेहमी पाय ठेवीत असत, ही त्यांची लीळा होय; तर श्रीचक्रधरस्वामी एकदा वज्री घडत होते ( ली. च. उत्त. ५०१ ) ही त्यांची चेष्टा होय. एकांकीच्या भक्ताबरोबर, त्याच्या बहिणीबरोबर, हंसावेबरोबर, नंतर सर्व भक्तिजनाबरोबर स्वामींनी ज्या ज्या क्रीडा केल्या त्या सर्व लीळा होत. अशा लीळांचे व चेष्टांचेहि साधकाने निरंतर स्मरण करणे अवश्य आहे.

वर वर्णन केलेले चतुर्विध स्मरण होय. याच्या खालोखाल स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक यांचे सेवादास्य करणे हेहि स्मरणातच मोडते. कारण या स्थानप्रसादादिकांच्या ठिकाणी परमेश्वराने अभिमान घेतलेला असतो. यांचे सेवादास्य कसे करायचे ते आपण पुढे विस्ताराने पाहू.

## अष्टौप्रहर स्मरण

यापैकी एका किंवा अनेक रीतींनी साधकाने परमेश्वराचे स्मरण करीत असावे; आणि तेहि अष्टौप्रहर. स्मरणावाचून साधकाच्या आयु-

१. ' लीळा म्हणजे चेतनेसी आन सहेतुका ··· चेष्टा म्हणजे जडेसी आन निरहेतुका ' ( आ. स्थ. २८ ).

ध्याचा एकहि क्षण वाया जाता कामा नये. त्याचे लक्ष निरंतर स्मरण विधीत लागलेले असले पाहिजे. अखंड स्मरण न करता मनाला इतर आलंबने मिळू दिली तर साधकाला मोक्ष कसा प्राप्त होणार ? ' तैसे मन स्मरणी दक्ष : नव्हे; संग्रहीचि लक्ष : म्हणौनि फळा न ये मोक्ष : साधन तया।" ( उद्ध. गी. ३६९ ); ' तैसा वस्तु सेविता भिक्षु : स्मरणी नव्हे दक्षु : गोडी घेता, मोक्षु : दुरावे तया ' ( उद्ध.गी. ३७५ ) हे उद्गार काय सुचवितात ? एका राजधानीत बाण तयार करणारा एक ' शरकार ' ऊर्फ सेलार राहत होता. एके दिवशी एक बाण सरळ करण्यामधे तो इतका गुंगून गेला होता की त्यावेळी राजाची स्वारी सहपरिवार वाजत गाजत त्याच्या दारावरून गेली, पण ते याच्या लक्ष्यातहि आले नाही. आपल्या कार्यांत तो सेलार जसा दंग झाला होता तसेच साधकाने अष्टौप्रहर परमेश्वराच्या स्मरणात दंग राहिले पाहिजे. ' म्हणौनि शयनासनभोजनीः परमेश्वरु स्मरावा मनी : लक्ष न खंडावे मुनी : सेलारेयाचेया परी ' ( उद्ध. गी. ४८७ ).

## शयनासनी भोजनी स्मरण

श्रीचक्रधरस्वामींनीहि ' तुम्हा शयनासनी भोजनी परमेश्वरु होआवा ' ( आ. ३० ) असा स्मरण विधि सांगितला आहे. एरवी साधकाकडून ईश्वरस्मरण होते; पण शयनाच्या, आसनाच्या व भोजनाच्या वेळी त्याला त्याचे विस्मरण होण्याचा संभव असतो. म्हणून या तिन्ही वेळी सुद्धा परमेश्वराचे स्मरण केले पाहिजे असे स्वामींनी मुद्दामहून सांगितले आहे. हेतु हा की, साधकाकडून परमेश्वराच्या अखंड स्मरणात यत्किंचितहि न्यून राहता कामा नये.

अनुसरलेला पुरुष ज्याप्रमाणे मरतांना देखील परमेश्वराचे स्मरण करतो, म्हणजे स्मरण करताकरताच मरतो; किंवा एखादा व्यापारी गृहस्थ आपल्या व्यापारधंद्याचा ध्यास घेतघेत निजतो व त्या ध्यासासरशीच उठतो, त्याचप्रमाणे साधकाने परमेश्वराच्या ठिकाणी मनाचा लय लावून

१. ' निद्रा करीता लयंगता होआवे यथा अनुसरल्याचे मरण अथवा व्यापारी ( आ. स्थ. ३० ).

त्याचे स्मरण करीत करीतच झोपी जावे व स्मरण करीत करीतच उठावे. चर्याभेदाप्रमाणे झोपेला जितकी मात्रा द्यायची तितकीच दिली, तितकाच काळ जर निद्रा केली आणि निद्रा घेतांना तसेच उठतांना परमेश्वर-स्मरण करीत झोपले व उठले तर स्मरणाच्या दृष्टीने मधला निद्रेचा काळ देखील लेखी लागतो. कारण परमेश्वरस्मरण करीत झोपी गेल्याने मनात त्याचाच ध्यास कायम असतो. म्हणजे एका दृष्टीने मानसिक स्मरण चालूच असते. पण झोपी जातांना परमेश्वराचे स्मरण केले नाही, त्याचे विस्मरण पडू दिले तर साधकाने जिवंत असतांनाच परमेश्वराचा त्याग केल्यासारखे होईल. म्हणून काही झाले तरी शयन करतांना देखील साधकाने परमेश्वराचे विस्मरण होऊ देऊ नये.

## आसनाच्या वेळी स्मरण

आसनाच्या वेळी म्हणजे अटन करून आल्यावर, भिक्षा मागून आल्यानंतर श्रम घालविण्यासाठी किंवा विश्रांतीसाठी खाली बसतांनाहि परमेश्वराचे विस्मरण पडण्याचा संभव असतो. म्हणून कोणत्याहि विश्रांति-काळी सुद्धा परमेश्वराचे विस्मरण पडू देता कामा नये. त्याचे स्मरण खंडू देता कामा नये. त्याचे स्मरण त्यावेळीहि चालूच ठेवावे. आपण जे भिक्षाटन केले ते बराबर परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणे केले असे समाधान त्याने कधीच मानू नये. उलट, परमेश्वराची आज्ञा लक्षात घेता आपणाकडून योग्य ती क्रिया घडली नाही असेच मानावे व आदर्श क्रिया आचरण्याचा प्रयत्न करावा. असे केल्याने त्याला परमेश्वराचा विसर केव्हांच पडणार नाही. तसेच भिक्षाटन करीत असतांना इतर नव्या पुरुषांना वगैरे श्रम वाटत असले तर 'आपणाला भिक्षाटनाने श्रम वाटत नाहीत, याला का वाटावे' असाहि[3] विचार त्याने मनात आणू नये. त्यामुळे आपली थोरवी

१. 'मग तेणेसीच उठावे ते आत्मलब्धि ... तो माझारी म्हणजे परमेश्वर निद्रेमधे तुटो नेदीचि म्हणजे स्मरण खंडो नेदी' (आ. वं. ३०).

२. 'स्वभावो न भरता ईश्वर सोडिला तेणे जीताच सोडिला' (सदर).

३.' बैसण्याचा ठायी : श्रमला आला : ग्रामांतरी भिक्षा करीता : का जे त्यासि तेतुकेचि बहुत की : आपुल्या दृष्टी न पहावे ' (आ. स्थ. ३०)

आपणाला वाटून परमेश्वराचे विस्मरण होण्याचा संभव असतो. तो त्याने टाळावा.

भोजनाच्या वेळी पदार्थांची गोडी लागली तर दुश्चित होऊन विस्मरण पडण्याचा संभव असतो. म्हणून भिक्षान्न सेवन करीत असतांना गोडी मानू नये व परमेश्वराचे विस्मरण पडू देऊ नये.

### खेळ खेळतांनाहि—

एकदा चांगदेवभट या नावाचा मुलगा खेळ खेळत असतांना त्याने रेतीत दोन घरे केली. 'हे घर श्रीचांगदेवराउळाचे व हे घर श्री गोविंदप्रभूचे' असे म्हणत म्हणत तो खेळत होता. ( ली. च. भा. २. पा. ३१ ). त्यावेळी श्रीचक्रधरस्वामी म्हणाले 'ऐसे होए : ऐसे भणिजे हो' (आ. ३१) म्हणजे, 'होय असेच आहे, असेच नेहमी म्हणावे हो.' याचा अर्थ असा की, साधकाने परमेश्वराचे अखंड नामस्मरण चालू ठेवावे. त्याने आपले सर्व व्यवहार नामस्मरणपूर्वक करावे.

### एकदोन वेळा तरी स्मरण केलेच पाहिजे

अशक्त, अक्षम, अनाधिकारी, आळशी, उदास, इंद्रियार्थांचे, अन्यवार्ता करणारे वगैरे अनेक पुरुषांना परमेश्वराचे विहित स्मरण संपूर्णत्वाने करता येत नाही. त्यांनी दिवसातून एकदोन वेळ तरी परमेश्वराचे स्मरण करावे. काही झाले तरी परमेश्वरस्मरणावाचून दिवस वांझ जाऊ देऊ नये. ( एक दोनि वेळा याते आठवीजे : परि वंध्यु दिवसु जावो नेदिजे : आ. ३२ ). एकदोन वेळा तरी स्मरण केल्याने परमेश्वराशी सोयरिकेचा सांधा तुटत नाही, व विधिभंगाचा दोष लागत नाही. व्यवहारात सोयरीक संबंधाने नाती जुळतात. पुढे दुर्दैवाने नात्याचा मनुष्य मेला तरी सोयरिकेचा सांधा मात्र कायम राहतो. त्यामुळे ती माणसे एकमेकाची खुशाली विचारतात, चौकशी करतात, वगैरे. त्याचप्रमाणे परमेश्वराचे निरंतर स्मरण करणे हे त्याच्याशी संबंध ठेवण्यासारखे होय. पण ज्यांना यथायुक्त स्मरण करून तो संबंध कायम ठेवता येत नाही त्यांनी

१. 'एकदोन वेळ आठविल्या अवज्ञा चुके आन प्रसव होय' (आ. स्थ. ३२)

एकदोन वेळा तरी परमेश्वरस्मरण करून त्याच्या सोयरिकेचा सांधा कायम ठेवावा; तो तोडू नये. असे केल्याने हळूहळू त्यांना परमेश्वरस्मरणाचा प्रसव वाढेल. क्रमाक्रमाने तो पुरुष परमेश्वरस्मरणात अधिक दक्ष होईल. या एक दोन वेळच्या स्मरणामुळे त्या पुरुषाविषयी परमेश्वराची कणव राहील. म्हणून ज्यांना अखंड परमेश्वरस्मरण करता येत नसेल त्यांनी दिवसातून निदान एकदोन वेळा तरी त्याचे स्मरण जरूर करीत असावे.

### अखंड स्मरणाचा हेतु

साधकाने अष्टौप्रहर स्मरण करण्याचे कारण असे की, साधक परमेश्वराचे जेव्हां स्मरण करतो तेव्हां त्याच्या अंतःकरणात परमेश्वर सामावतो, साठून राहतो. तो अष्टौप्रहर स्मरण करील तर परमेश्वर अष्टौप्रहर त्याच्या अंतःकरणात राहील. परमेश्वरावाचून त्याचे अंतःकरण केव्हांहि रिते राहणार नाही. कारण, जेथे-ज्या अंतःकरणात परमेश्वर सामावलेला असतो तेथे त्या अंतःकरणात इतरांना वाव नसतो. म्हणजे जीवधर्म, मनोधर्म वगैरे त्या अंतःकरणात प्रवेशू करूच शकत नाहीत. पण परमेश्वरावाचून अंतःकरण रिते असले म्हणजे जीवधर्मादि सर्व त्या ठिकाणी राहतात. हेच निराळ्या शब्दात सांगायचे झाले तर असे म्हणता येईल की, ज्या ज्या अंतःकरणात जीवधर्म, मनोधर्म आदिकरून इतर धर्म असतात तेथे तेथे परमेश्वर असत नाही. ( अनंतु सामाये तेथु आणिकु न सामाये : आणिकू सामाये तेथ अनंतु न सामाये : का अनंतु तो अनंतु की : आ. ३३ ). म्हणून साधकाने अष्टौप्रहर स्मरण करून परमेश्वर आपल्या अंतःकरणात साठवावा.

### विस्मरण म्हणजे अधर्म : व्यभिचार

क्षणभर का होईना पण परमेश्वराचा विसर पडणे हा व्यभिचार होय.

१. 'एकदोन वेळ आठवण तेणे ईश्वरेसी सोयरिकेचा सांधा तुटो नेदावा' (आ. स्थ. ३२)

२. 'अनंत सामाये म्हणजे ईश्वरू जयाचा हृदयी असे तेथ आणिक म्हणजे जीवधर्म : मनोधर्म : रजस्तमांचे मनोरथ न सामाति : याचिपरी तद्वैपरीत्ये : का तो अनंत : तेथ दुसरेया आवड : दुसरेनि तया आवड' (आ. स्थ. ३३ )

पतिव्रतेच्या मनात आपल्या पतीवाचून आणखी कुणीच नसतो. तशी साधकाची परमेश्वराशी अनन्यभक्ति पाहिजे. 'पतिव्रते आपला पती : वाचोनि आन तसे चित्ती : तेवि अव्याभिचार भक्ती : वर्ते अनन्य योगे ' (ज्ञा. प्र. १८८). असे आहे तर मग स्मरणाचा विसर पडणे हा व्याभिचारच नव्हे काय ? ' ऐसा आठवणे पडे विसरू : तेणे होय अन्यांचा एंचारू : या नाव व्यभिचारू : बोलिजे तो ' (ज्ञा. प्र. १९२). कारण पुरुषाचे वीर्य विकरल्यामुळे त्याच्या शरीरात व्याधि संचरतात; त्याने नीति सोडली म्हणजे त्याच्य मनात कुबुद्धि प्रवेश करते; आणि स्वधर्म उल्लंघन केल्यास अविधि संचरतो; त्याप्रमाणे 'स्मरणेशी पडे वियोगु : सवेचि संकल्प–विकल्पाचा रिगु : यापरी मनोरथी अनुरागु : उपजो लागे ॥ एतुलेनि अभिलाष द्वारा : स्वधर्म पडे बाहिरा : तेथ अन्यधर्मांचा थारा : प्रसव द्वारे ' (ज्ञा. प्र. १९३–१९५). याचसाठी साधकाने अष्टौप्रहर स्मरण करणे हेच श्रेयस्कर होय. त्यालाच अव्यभिचारी भक्ति असे म्हणतात.

**स्मरण : अनुस्मरण : सकृत् स्मरण**

आचारशील साधक परमेश्वराचे स्मरण अष्टौप्रहर करण्याचा प्रयत्न करीत असतात. पण त्या सगळयाच साधकांचे आठहि प्रहर लेखी लागतातच असे नाही. कित्येक चंचल मनाचे असतात. त्यांचे मन एखादे वेळी कुठे तरी भटकायला लागते. ते प्रयत्नाने ठिकाणावर आणून स्मरणाकडे जुंपावे लागते. कित्येकांना इतर कामे उपस्थित झाली तर स्मरण थांबवावे लागते; वगैरे. मनाच्या या जा–ये मधे त्यांचा बराच काळ जातो. म्हणून त्यांच्या अष्टौप्रहरीच्या स्मरणातील फार थोडा काळ लेखी लागतो. या दृष्टीने स्मरणाचे तीन प्रकार होतात. (१) स्मरण, (२) अनुस्मरण; आणि (३) सकृत् स्मरण. (आ. २९). आठप्रहर लेखी लागणे हे स्मरण; ४ प्रहर लेखी लागणे हे अनुस्मरण आणि २ प्रहर लेखी लागणे हे सकृत् स्मरण होय. दिवसाचे एकूण ८ प्रहर = २० विसवा = ६० घटका. (१ घटका = २४ मिनिटे). अर्थात् एक प्रहर = २॥ विसवा = ७॥ घटका हे कोष्टक ध्यानात ठेवून स्मरणाच्या या तिन्ही प्रकारांचे पोटविभाग लक्ष्यात घेऊ या.

१. तरि मुख्य स्मरणाची संख्या किती असे पा : ना तियेचे वीस विसवा : [पुढे

**सकृत् स्मरण :** 'सकृत् स्मरण' लेखी लागायला कमीत कमी १ प्रहर आणि अर्धा विसवा तरी लेखी लागायलाच पाहिजे. म्हणजेच ते सकृत् स्मरण होईल. अर्थात्, १ प्रहर + अर्धा विसवा = ३ विसवे = ९ घटिकांचे स्मरण लेखी लागणे हे सकृत् स्मरण होय. जास्तीत जास्त २ प्रहर = ५ विसवे = १५ घटकांचे स्मरण लेखी लागणे हेहि सकृत् स्मरण होय.

**अनुस्मरण :** २ प्रहरापेक्षा एक विसवा = ३ घटका ज्यास्त लेखी लागल्या तर ते 'अनुस्मरण' होते. कमीत कमी २ प्रहर + ३ घटका = ६ विसवे = १८ घटका लेखी लागणे हे अनुस्मरण होय. आणि जास्तीत जास्त ४ प्रहर=१० विसवे=३० घटका लेखी लागणे हेहि अनुस्मरण होय.

**स्मरण :** अनुस्मरणापेक्षा म्हणजे ४ प्रहरापेक्षा एक विसवा = ३ घटका जर जास्त लेखी लागल्या तर ते 'स्मरण' होय. अर्थात् कमीत कमी ४ प्रहर + ३ घटका = ११ विसवे = ३३ घटका लेखी लागणे हे स्मरण होय. आणि जास्तीत जास्ती ८ प्रहर = २० विसवा = ६० घटका लेखी लागणे हेहि स्मरण होय.

## स्मरण करणारांचे भेद

आचरते पुरुष आपापल्या परी सर्वच जण मनोभावाने अष्टौप्रहर स्मरण करण्याचा प्रयत्न करीत असतात. पण सगळयांनाच ते संपूर्णत्वाने साधते व लेखी लागते असे नाही. कोणत्या आचरत्या पुरुषाच्या लेखी

चालू] आन विसवा तो तीन घटिकांचा : तरी वीस त्रिक साठ : एवं विसा विसवांचिया घटका साठ:त्यांचे आठ प्रहर : मा तरि अनुस्मरण तेच कैसे? ना : ते चौ प्रहरांचे : मग सकृत् दोन प्रहरांचे' ( आ. बं. २९ ); '**अकरा विसवाचिये ठाउनि वीस पर्यंत ते उत्तम : पाचावरौते दहापर्यंत मध्यम : एर कनीयस** म्हणितले असे : एवं अनुस्मरण दहा विसवेंचे : त्याचिया तीस घटका ते अनुस्मरण : चौ प्रहराचे होऊन एक विसवा म्हणजे तीन घटका अधिक स्मरण ज्यास घडे तो पुरुष मुख्य स्मरणियाचि बोलीजे : याचि परी दोन तीन चार विसवे पर्यंत मुख्य स्मरणियेच तितुकेहि पुरुष बोलिजेति : तैसेचि सकृत् स्मरण पाचा विसवांचे : तयाच्यिा पंधरा घाटिका : इतुके सकृत् स्मरण घडून अधिक एक विसवा स्मरण घडे : मग दोन तीन दहा विसवेपर्यंत स्मरण घडे त्याते अनुस्मरणचि बोलिजे : तैसेच सकृत् पंधरा घटिका : तियेस एक दोन साडेसात घटकापर्यंत उणे होत आले तरी तेतुके पुरुष सकृत् स्मरणीयेच बोलिजेति' ( आ. बं. २९ )

किती स्मरण लागते हे पाहणे उद्बोधक होईल. पण त्यापूर्वी स्मरणाच्या अनुषंगाने आचरत्या पुरुषाचे होणारे प्रकार लक्ष्यात घेणे अवश्य आहे.

काही पुरुष परमेश्वराचे स्मरण इतक्या तन्मयतेने, प्रेमळपणाने आणि उत्कट भावनेने करीत असतात की त्यावेळी त्यांचे हृदय भरून येऊन त्यांच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा वाहू लागतात. त्यांच्या स्मरणाला 'ओले स्मरण' असे म्हणतात व त्यांना 'ओले पुरुष' म्हणून संबोधतात. उलट इतर काही असे असतात की त्यांनी कितीहि उत्कटतेने स्मरण केले तरी त्यांच्या डोळयातून अश्रू वाहत नाहीत. त्यांच्या डोळयांची पाती ओलसर देखील होत नाहीत. त्यांच्या स्मरणाला 'कोरडे स्मरण' आणि त्यांना 'कोरडे पुरुष' असे नाव आहे. ओल्या पुरुषात (१) जरठ विरही; (२) कोमळ विरही; (३) आर्त; (४) भावाळु-प्रेमळ; आणि (५) निपुण प्रयत्नीये असे पाच पोटभेद आहेत. कोरड्या पुरुषातहि (१) परमेश्वराच्या सन्निधानी असलेले पण नंतर असन्निधानी आलेले, आणि (२) असन्निधानीचे साधिकरण पुरुष असे दोन भेद आहेत. त्यांचे स्मरणभेद आता क्रमाने पाहू.

## जरठ विरही

नुसत्या अवरदश्या (आच्छादनीचा अवरदश्या नव्हे) ईश्वरावताराच्या ठिकाणी पूर्वी ज्याला निर्हेतुक भोजन घडले असेल असा पुरुष पुढे जरठ-विरही होतो. परमेश्वराच्या विरहाचे दुःख त्याला अतिशय होते. म्हणून डोळयातून अश्रुप्रवाह वाहत वाहत त्याचे परमेश्वरस्मरण अत्यंत उत्कटतेने व आर्ततेने चाललेले असते. सामान्यतः या जरठविरही पुरुषाचे ८ प्रहर स्मरण लेखी लागते. अर्थात्, त्याचा निद्रावस्थेतील काळ देखील स्मरणाच्या दृष्टीने लेखी लागतो.

## कोमळ-विरही

देवामध्ये अवतरलेल्या ईश्वरावताराच्या ठिकाणी ज्याला भोजन घडले असेल तो पुढे कोमळविरही होतो. शेषशय्या पासून तो यक्षापर्यंतच्या

१. '**अष्टौ प्रहर स्मरण जरठ आन विरहिया :** जरठ म्हणजे अवरदशीयाचीये भजनीचा' (ल. वं. अ. प. ५)

कोणत्याहि पुरुष देवतात परमेश्वर देवावतार स्वीकारतात. अर्थात् त्या पुरुषदेवता इतकेच देवावतारांचेहि भेद आहेत. आणि त्यांच्या श्रेष्ठ-कनिष्ठतेप्रमाणे त्यांच्या ठिकाणी भजन घालणाऱ्याचे स्मरण कमी अधिक होते. तथापि ते सर्व कोमळ-विरही, ओल्या स्मरणाचे पुरुष होत.

कोमळ-विरहियाची यथास्थिति ४ प्रहरांची आहे. म्हणजे नेहमी त्याचे ४ प्रहर लेखी लागतात. पण चढत्या गुणाने त्याने स्मरण केल्यास ४ प्रहरापेक्षा जास्त काळ लेखी लागून तो जरठ-विरहियात पडतो व त्याचे स्मरण हे अनुस्मरण न राहता ते स्मरणीत मोडते.

## आर्त

शक्तिस्वीकाररहित असलेल्या नुसत्या मनुष्यावताराच्या ठिकाणी ज्याला अहेतुक भोजन घडले असेल तो पुढे 'आर्त' होतो. 'आपणाला परमेश्वर भेटावा, तोच प्राप्त व्हावा' अशी आर्त त्याला उत्पन्न होते. हाहि ओल्या स्मरणाचा पुरुष असून त्याची यथास्थिति २ प्रहराची आहे. अर्थात् नेहमी तो सकृत् स्मरणात पडतो. पण त्याने चढत्या गुणाने स्मरण केले तर तो अनुस्मरणात पडू शकतो.

## भावाळू व प्रेमळ

पशुतिर्यंचामधील ईश्वरावताराच्या ठिकाणी ज्यांना अहेतुक भजन घडले असेल ते पुढे भावाळू किंवा प्रेमळ होतात. हेहि ओल्या स्मरणाचे पुरुष असून त्यांची यथास्थिति १ प्रहराची आहे. अर्थात् ते अति सकृत् स्मरणातच पडतात. चढत्या गुणाने स्मरण केल्यास ते सकृत् स्मरणात पडतात.

१. 'विरहिया म्हणजे शेषशय्याचे भजनीचा तो कोमळ : याचे स्मरण यथास्थिति चार प्रहर : तर जरठेसी कैसी गाठ घातली : ना चढलेनि गुणे एकदोन घटिका अधिक म्हणौनि : **ते गेलेया अनुस्मरण** एवं यथास्थिति चार प्रहर' (ल.बं.अ.प.५)

२. 'आन मनुष्यावतारभजनीयाचे स्मरण सकृत् म्हणजे दोन प्रहर : आन चढलेनि गुणे एकदोन घटिका अधिक : म्हणजे अनुस्मरणामधे पडला : **ते गेलेया सकृत्** म्हणजे यथास्थिति दोन प्रहर' (सदर)

## निपुण प्रयत्नी

परमेश्वराचे ज्ञानी व प्रेमी भक्त यांच्या ठिकाणी ज्यांना अहेतुक भजन घडले असेल ते पुढे निपुणप्रयत्नी होतात. ज्ञानियाचेहि ४ भेद आहेत. (१) कर्मराहाटीचा बोधवंत; (२) वासनिक; (३) अनुसरलेला ज्ञानी; आणि (४) सगुण प्रमादी; म्हणजे पश्चात्तापदग्ध प्रमादी. या चारहि प्रकारापैकी एखाद्या ज्ञान्याला किंवा भक्ताला ज्याने निर्हेतुक भोजन घातले असेल तो निपुणप्रयत्नी होतो. हा सामान्यतः कोरड्या स्मरणाचा पुरुष असतो. पण निपुण प्रयत्नांनी परमेश्वराचा विरह भावून जेव्हां त्याचे हा स्मरण करतो तव्हां याच्या डोळयाची पाती किंचित् ओलसर होतात. हा प्रयत्नाने ओले स्मरण करतो म्हणून त्याला निपुणप्रयत्नी असे म्हणतात. १ प्रहराचे स्मरण लेखी लागणे ही याची यथास्थिति होय. अर्थात् तोहि सकृत् स्मरणात पडतो. या निपुण प्रयत्नियाला असतीपरीच्या ९ पुरुषापैकी ( मागे पा. १४३ पहा ) कोणताहि पुरुष भेटला तर तो त्याच्या इतका आचार म्हणजे भोजन, स्मरण वगैरे करतो.

## कोरड्या पुरुषाचे भेद

हे ओल्या पुरुषांचे स्मरण भेद झाले. आता जीवदेवताभजनीये जे कोरडे पुरुष त्यांच्या स्मरणाचे भेद पाहू. दैवराहाटीचे ज्ञानी व भक्त आणि कर्मराहाटीचे जीव म्हणजे देवतांचे अंतर्यागिये, बहिर्यागिये व नुसते मनुष्यप्राणी; तसेच देवता म्हणजे देवतांच्या ब्रह्मांडस्था, ज्ञानविग्रह, अज्ञानविग्रह आणि शापदग्ध यांच्या ठिकाणी ज्यांना निर्हेतुक भजन-क्रिया घडते ते पुढे कोरडे पुरुष होतात. त्या सर्वांचे स्मरण कोरडे असते. ( फक्त ज्ञानीभक्तभजनीयांना निपुण प्रयत्नाने ओले स्मरण घडू शकते हे आपण वर पाहिले ). या कोरड्या पुरुषांच्या ठिकाणी जरठविरहियाप्रमाणे अनुराग नसतो, कोमळ पुरुषाप्रमाणे साद्रवता नसते, आर्तासारखी उत्कंठा नसते, आणि प्रेमळासारखे पोळलेपण नसते. ते कोरडेच स्मरण करीत असतात.

१. 'मग निपुणप्रयत्निये...ज्ञानिया अथवा भक्ताचिये भजनाचे...याचे ओले स्मरण एका प्रहरावरुते एकदोन घटिका : हे प्रयत्ने म्हणूनि' ( ल. वं. अ. प. ५ )

या सर्व कोरड्या पुरुषांचे स्मरण एक प्रहर लेखी लागते. यातील आभाराचे पुरुष, त्यांच्या ठिकाणी ज्या परमेश्वरावताराचा आभार असेल त्याच्या भजनीच्या पुरुषाएवढे तेहि स्मरण करतात. उदाः आचार्य हे अवरदृश्यावताराचे आभारी होते. म्हणून ते अवरदृश्याभजनीया जरठ-विरहियांप्रमाणे अष्टौप्रहर स्मरण करीत होते.

## स्मरणापासून फायदे

कोरडे पुरुष मुखाने नुसते स्मरण करीत राहिले तरी पुढे कालांतराने परमेश्वरमूर्ति त्यांच्या अंतःकरणात ठसते; आणि ते जर अनुसरले नसतील तर अनुसरणाची बुद्धि त्यांना स्मरणाने होते. ते त्यागाला येतात. आणि अशा स्मरणामुळे त्यांच्याविषयी ईश्वराच्या ठिकाणी कणव उपजते. या कणवेमुळे हा कोरडा पुरुष जे चिंतील ते त्याला मिळते. विशेषतः त्या कोरड्या पुरुषाचे अविद्यक म्हणजे त्याचे कर्मराहाटीचे आप्तसंबंधी, यांना काही भूतबाधा, जारणमारण किंवा रोग वगैरे झाले असतील तर ते याच्या स्मरणामुळे व परमेश्वराच्या कणवेमुळे नाहीसे होतात तसेच, याचा अविद्यक दुसऱ्या एखाद्या आप्ताच्या रोगामुळे दुःखी झाला असेल तर तो रोग बरा होऊन याचा तो अविद्यक सुखी होतो. त्यामुळे या कोरड्या पुरुषाला बरे वाटते. अंतरी ठसणे, त्यागाला येणे, अविद्यकाचे चिंतिले होणे याशिवाय आणखीहि काही फायदे होतात. रसरूप उल्लेख झाले तरी प्रतिकूल देवता त्याला अनिष्ट संपादू शकत नाहीत. स्मरणाच्या सामर्थ्यामुळे त्याला सौभाग्य प्राप्त होते; त्याच्या चेहेऱ्यावर एक प्रकारचा तेजःपुंजपणा येतो; त्याला मानमान्यता मिळते; क्वचित्,यथार्थ वक्त्या भिक्षूची जवळीक त्याला लाभते. सारांश, ईश्वरस्मरणामुळे अनेक लाभ होतात. ते सगळे वर्णन करता येणे कसे बरे शक्य आहे !

**१. 'स्मरणे काइ होये पा : तोंडे करीता भीतरासि ये : त्यागास ये : ईश्वरी कणव उपजे : अभिचारीक आविद्येचे अथवा अविद्यात्मकाचे चिंती ते होय**' ( आ. स्थ. २९ ).

**२. 'बोधापूर्वी घडली जिये कर्मे तिये नाशति अप्राप्तीचेनि न्याये : संपादके थोर वोखटे संपादू न सकती : त्यासीचि सौभाग्य ये : मान्यता ये : एकाधा निमित्त विधि घडे : का बोलत्या भिक्षूची जवळीक होय**' ( सदर )

पण साधकाने स्मरण जर केले नाही तर ईश्वराला खंती येते. त्यामुळे त्या साधकाकडून अविधि घडतात. एका अविधीपासून पुढे अनेक अविधि होतात. म्हणून साधकाने नामस्मरण कधीहि सोडू नये. मुखावाटे परमेश्वराच्या नावाचा उच्चार, तोहि आपल्याच कानांना ऐकू येईल अशा रीतीने नेहमी करीत असावे. तथापि हे नामस्मरण कदाचित् इतरांच्या कानी गेले तर अन्यकथनाचा दोष लागतो असेहि नाही. कारण नामोच्चारण करावे असा प्रत्यक्ष विधिच परमेश्वराने सांगितलेला आहे.

## स्मरणापेक्षा स्थानप्रसाद-सेवा श्रेष्ठ

परमेश्वराचे सेवादास्य करणे हा साधकाचा मुख्य विधि असून त्यासाठी नाम, लीळा, मूर्ति व चेष्टा यांचे अखंड स्मरण करणे जसे इष्ट आहे तसेच परमेश्वराचे स्थान, प्रसाद, भिक्षू व वासनिक यांची सेवा करणे हेहि इष्ट आहे. ही सेवा स्मरणात अंतर्भूत होतेच. म्हणजे असे की ती करीत असतांना अनुषंगाने स्मरण घडत असतेच. आणि म्हणून एका दृष्टीने स्मरणाच्या विधिपेक्षा स्थानप्रसादादि परमेश्वरसंबंधाच्या सेवेचा विधि हा अधिक श्रेष्ठ ठरतो. कारण स्थानप्रसाद यांची सेवा करीत असतांना साधकाला मुखाने नामस्मरण घडते किंवा त्याचवेळी त्याच्याकडून ते होऊ शकते असे म्हणा. शिवाय काही कारणामुळे यांची सेवा करीत असतांना नामस्मरण घडले नाही तरी केवळ त्या सेवेमुळेच नामस्मरणाची योग्यता जीवस्वरूपी लागते. तशी नुसत्या स्मरणामुळे कोणतीहि क्रिया आनुषंगिक रीत्या लेखी लागत नाही. म्हणून स्मरणापेक्षा स्थानप्रसादांची व भिक्षु-वासनिकांची सेवा श्रेष्ठ ठरते. ही सेवा कशी करायची ते पाहू.

## परमेश्वर-संबंधाचे प्रकार

श्रीचक्रधरस्वामींनी 'परमेश्वरु मज्य: संबंधु वंद्य' (आ. १८५) म्हणून सांगितले आहे. पण व्यक्त परमेश्वरावताराची सेवा सर्वांनाच करायला सापडते असे नाही. अशा असन्निधानीच्या सेवकांना परमेश्वराचा 'संबंध' हा वंद्य होय. स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक हे सर्व एका दृष्टीने

१. न स्मरे तरि ईश्वरी खंती ये: तेणे थोर वोखटे.... नामोच्चारे कथन नव्हे: करावे म्हणितले म्हणौनि ' (आ. २४. २९)

परमेश्वरसंबंधीयेच होत. परमेश्वराचा संबंध एकूण पाच प्रकारांनी होतो. (१) **ज्ञानलक्षण संबंध** : म्हणजे परमेश्वराकडून किंवा अधिकरणद्वारे ज्याला ज्ञान झालेले असेल असा साधनवंत. हा विशेष नमस्करणीय होय. (२) **समवायलक्षण संबंध** : परमेश्वराचे शरीरांगभूत असल्यामुळे ज्यांना त्याचा संबंध लाभला असे पदार्थ. उदा : दाढ, नख, केस वगैरे. (३) **सेवालक्षण संबंध** : परमेश्वराच्या सेवेला उपयोगी पडलेले आणि संबंध पावलेले पदार्थ. उदा: फुटा, दुटी, मंचक, आरती वगैरे. (४) **संयोगलक्षण संबंध** : वायूच्या योगाने परमाणूंना झालेला श्रीमूर्तिंचा स्पर्श. आणि (५) **विघातलक्षण संबंध** : म्हणजे ज्या संबंधामुळे परमेश्वराला दुःख झाले, त्यांचा विघात झाला असे पदार्थ. उदा: श्रीगोविंदप्रभूंना मोडलेला काटा.

## त्यांची श्रेष्ठकनिष्ठता

यापैकी ज्ञानलक्षण संबंध हा सर्वश्रेष्ठ होय. तो नमस्करणीय आहे. कारण त्या ज्ञानिया व भक्ताच्या ठिकाणी ज्ञानाचा व प्रेमाचा वियोग कधीच होत नाही. समवायित्वाने उपयोगाला गेलेल्या पदार्थांचा समवायलक्षण संबंध हा मध्यम होय. कारण, तो समवायभूत असतो व तो प्रसन्नतेने दिलेला असतो. सेवालक्षण संबंध हा कनिष्ठ असून तो स्मरणीय व वंदनीय होय. संयोगलक्षण संबंध स्मरणीय व वंदनीय होय. आणि शेवटचा विघातलक्षण संबंध स्मरणीयहि नाही व वंदनीयहि नाही. ( महा. तत्त्व. पा. २३२ ). स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक यापैकी भिक्षु व वासनिक हे ज्ञानलक्षण संबंधिये असून स्थान व प्रसाद हे समवायलक्षण संबंधात व सेवालक्षण संबंधात अंतर्भूत होतात. हे सर्व संबंध परमेश्वराने वंद्य म्हणून सांगितलेले आहेत. पैकी प्रथम साधकाने स्थानाची सेवा कशी करायची ते पाहू.

## ओटे गोटे नमस्करणीय

परमेश्वरावताराचा-वस्तूचा संबंध ज्यांना ज्यांना झालेला आहे ते ओटे गोटे वंद्य होत. अर्थात्, हा संबंध संयोगलक्षण संबंध होय. एखादा प्रापंचिक पदार्थ परमेश्वराच्या सेवेला उपयोगी पडलेला असेल तर तो

संबंधी असतोच असे नाही. त्यासाठी त्या वस्तूचा व प्रपंचाचा प्रत्यक्ष संयोग व्हावा लागतो. परमेश्वराने ज्या आरशात आपले प्रतिबिंब पाहिले असेल तो आरसा परमेश्वराच्या उपयोगी पडला म्हणून श्रेष्ठ खरा, पण तो काही वंदनीय नव्हे. तोच आरसा जर त्यांनी हातात धरला असेल, त्याला त्यांचा संबंध झाला असेल तर मात्र तो वंदनीय होय. नुसता सेवारूप संबंध वंद्य नव्हे. परमेश्वराची स्थाने, म्हणजे त्यांनी जिथे आसन केले, ज्या ठिकाणी ते राहिले, बसले, झोपले ती स्थाने, ते ओटे गोटे सर्व वंदनीय होत. ( एथीचेया संबंधा गेले तेतुले ओटे गोटे आदिकरौनि तुम्हा नमस्करणीये की गा : आ. १८६ ). कारण ते परमेश्वराच्या सेवेला उपयोगी पडलेले असतात; इतकेच नाही तर त्यांना परमेश्वराच्या श्रीमूर्तीचा प्रत्यक्ष संयोग-संबंध झालेला असतो.

## प्रपंच संबंध हाच प्रसादरूप

परमेश्वरस्वरूपाचा–वस्तूचा–ज्या प्रपंचाला संयोग झालेला असतो तोच संबंध होय. तोच प्रसादरूप अतएव वंदनीय होय. तथापि या प्रपंच संबंधात जीवाला झालेला संबंध किंवा देवतांना झालेला संबंध मात्र अंतर्भूत होत नाही. कारण जीवाला झालेल्या संबंधामुळे त्याला निराळे फळ होते, म्हणून तो प्रसादरूप नव्हे. त्याचप्रमाणे जीवाच्या ठिकाणी असलेल्या मळांना झालेला संबंधहि प्रसादरूप नाही. कारण, मळ हा सूक्ष्म प्रपंच असला तरी त्याचा बांधा परमाणूहूनहि कमी असतो. त्यामुळे परमेश्वराच्या कृपाशक्तीचा तेथे निक्षेप नसतो. कारण कृपाशक्ति परमाणूंच्या भेंडांच्या संदोसंदीतच व्यापून असते. परमाणूच्या संदीत व परमाणूच्या आत तिचा व्याप असतो. तेव्हां अर्थात्, जीवाच्या स्थूल शरीराला, स्थूल प्रपंचाला

१. ' **संबंध म्हणजे संयोगलक्षण : ओटे म्हणिजेति उपयोगा गेले जेतुले : अवस्थाने : स्थाने : शयन : आसन : मग पाचा इंद्रियांची सेवा** ' (आ. स्थ. १८६ ).

२. ' **संबंध** म्हणजे प्रपंचेसीं वस्तूचा योग होय **तो प्रसाद : येर नव्हे :** म्हणीतल्या जीवाचा ठाइ सूक्ष्म तो नव्हे : का जे **: जीवासी संबंध जालां तो फळासी नेला :** आन देवताच्या मूर्ति तरी सृष्टिपर्यंत : **प्रपंच असे तव देवता असे :** परि तो प्रसाद नव्हे : प्रसाद तो प्रपंचरूप पदार्थच जाणावा' ( आ. बं. १८५ ).

झालेला संबंध हाच काय तो वंद्य ठरतो.

तेव्हां प्रपंचाला झालेला संबंध तोच प्रसादरूप होय. त्या ठिकाणी माया व कृपाशक्तींचा, म्हणजेच सामर्थ्याचा निक्षेप असतो. अपरोक्ष ज्ञानिये ते सामर्थ्य पाहू शकतात. पण म्हणून कांही ते श्रीमूर्ति सोडून नुसत्या प्रसादाला वंदन करीत नाहीत[1]. संबंध पावलेल्या प्रसादाच्या ठिकाणी जोपर्यंत व्यक्त पदार्थत्व आहे तोपर्यंतच तो प्रसाद होय. उदाः फुटा, दुटी वगैरे जळून गेल्यानंतर तो शिल्लक प्रपंच प्रसाद नव्हे. कारण त्याची व्यक्ति नष्ट झालेली असते व तेथील कृपाशक्ति गेलेली असते. पदार्थ असून तो व्यक्त आहे तोपर्यंतच तो प्रसाद होय. त्या पदार्थाच्या ठिकाणी विवर्णता आली तरी त्याची प्रसादरूपता कायम असते. तो प्रसाद जळत असतांनाहि त्याचे प्रसादत्व कायम असते. पण जळाल्यानंतर मात्र ते नाहीसे होते. तो पवित्र अतएव फक्त वंदनीय होय[2].

## प्रसन्नतापूर्वक संयोग संबंध

परमेश्वराचे संयोगसंबंधी ओटे गोटे वगैरे पदार्थ वंद्य खरे, पण तो संयोग-संबंध प्रसन्नतापूर्वक मात्र झालेला असला पाहिजे. रस्त्याने चालतांना त्यांच्या चरणाचा स्पर्श अनेक पाषाणांना होत असतो, त्यामुळे ते पाषाण वंद्य होत. तो एक प्रकारचा संयोगसंबंधच होय[3]. तेथे प्रसन्नतापूर्वक कृपा-निक्षेप मात्र झालेला असला पाहिजे. एखाद्या ठिकाणी औदास्य स्वीकारून ते गेलेले असले तर ते स्थान वंद्य नव्हे. कारण संयोगसंबंध वंद्य होण्या-साठी तेथे त्यांच्या प्रसन्नतेचा व कृपाशक्तीचा निक्षेप अवश्य आहे. ' संबंध व्यक्त : व्यक्ते संबंधी अव्यक्त प्रसन्नता परमेश्वरु निक्षेपीति : मग आपुला संबंधु देती : भणौनि संबंधु वंद्य ' ( आ. मा. १३० ). संबंध होतो तो व्यक्त, मूर्त, प्रापंचिक पदार्थांनाच होतो. त्या ठिकाणी परमेश्वर आधी

१. ' **अपरोक्षज्ञानिये देखती**··· परी श्रीमूर्ति सांडून त्याते वंदितील हे न घडे ' ( आ. बं. १८५ ).

२. ' **पदार्थाची व्यक्ती न भंगे तव प्रसाद : जळीनले व्यक्ती सरली : पदार्थ असून व्यक्ती असे विवर्णता ये ऐसाही प्रसादत्व** ' ( आ. थ. १८५ ).

३. ' **गोटे म्हणिजेति चालता श्रीचरणे श्रीकरे स्पर्श मात्र : तेथहि एकी परीची सेवा** ··· तो संयोग संबंधच जाणावा ' ( आ. बं. १८५ ).

अव्यक्त अशा प्रसन्नतेचा निक्षेप करतात व मग संबंध देतात म्हणजे कृपाशक्तीचा निक्षेप करतात. म्हणून संबंध वंदनीय आहे असे श्रीचक्रधरस्वामींनी स्पष्टच सांगितले आहे. अर्थात्, जेथे परमेश्वर औदास्य स्वीकारून गेले तेथे त्यांनी प्रसन्नतेचा निक्षेप केला असणे कसे शक्य आहे ? आणि प्रसन्नतेचा निक्षेप नाही तर अर्थातच कृपाशक्तीचाहि निक्षेप नसणारच. असा संबंध वंद्य ठरत नाही. अर्थात्, ज्या प्रापंचिक पदार्थांना प्रसन्नतापूर्वक संयोग संबंध दिलेला असेल तेच पदार्थ संबंधी होत. असेच संबंधी ओटे गोटे साधकांना वंदनीय होत.

## स्वरूपाचा निक्षेप नाही

संबंधी पदार्थांच्या ठिकाणी प्रसन्नतापूर्वक कृपाशक्तीचा निक्षेप असतो, म्हणून त्यांना पवित्रता आलेली असते. या संबंधी पदार्थांना वस्तूचा म्हणजे परमेश्वर–स्वरूपाचा संबंध होत असला तरी तेथे परमेश्वराचे 'स्वरूप' निक्षेपले जाते असे मात्र नाही. तर स्वरूपाश्रित जी कृपाशक्ति ती निक्षेपली जाते. स्वरूपाश्रित असलेली कृपाशक्ति स्वरूपा वेगळी कशी निक्षेपली जाते असा प्रश्न पडण्याचे कारण नाही. फुलाच्या आश्रयाने असलेला परिमळ हा जसा फुलावेगळा इतरत्र व्यापून राहू शकतो तशीच कृपाशक्तिहि, तिच्याबरोबर परमेश्वरस्वरूप न येता, संबंधी पदार्थांच्या ठिकाणी निक्षेपली जाऊ शकते. ज्या ठिकाणी परमेश्वर--स्वरूपाचा संयोग संबंध होऊन कृपाशक्ति निक्षेपली जाते त्या ठिकाणी माया आलिंगून राहते; ती देखील आपल्या सामर्थ्याचा निक्षेप तेथे करते. सर्वच स्थान प्रसादांच्या ठिकाणी परमेश्वराचे कृपासामर्थ्य व मायेचे सामर्थ्य ही दोन्ही निक्षेपली जातात.

## कृपाशक्ति-वंदनाचा मनोधर्म

प्रसादाच्या ठिकाणी प्राधान्याने कृपाशक्तीचा व अनुषंगाने मायासामर्थ्याचा निक्षेप असतो तर स्थानाच्या ठिकाणी प्राधान्याने मायासामर्थ्याचा व अनुषंगाने परमेश्वराच्या कृपाशक्तीचा निक्षेप असतो.

१. 'माया कृपा उभय शक्तींचा निक्षेप जेथ प्रसन्नता तो प्रसाद विशेषः तैसा विशेष नाही ते स्थान : तेथ स्थानि माया प्रधान आनुषंगिक कृपा : याचेनि पालटे प्रसादीं जाणावींया' (आ. वं. १८५).

या दोन्हींचा निक्षेप संबंधाच्या ठिकाणी असल्यामुळे संबंधाला नमस्कार करतांना परमेश्वराच्या कृपाशक्तीला वंदन करण्याचा मनोधर्म ठेवूनच नमस्कार करावा. तरच त्यापासून गोमटे होऊ शकेल. कृपाशक्तीलाच वंदन करण्याचा मनोधर्म न ठेवला तर मायासामर्थ्यालाहि वंदन केल्या-सारखे होईल. तो विकल्प होय; कारण माया ही देवता आहे. यासाठी संबंधाला नमस्कार करतांना त्या ठिकाणी घडलेल्या परमेश्वराच्या लीळा-चेष्टा आठवाव्या. तरच वंदन यथायोग्य ठरेल व त्यापासून गोमटे होईल. 'संबंधस्थान नमस्करणी लीळास्मरणानुवाद' या स्मृतीत नागदेवाचार्यांनी म्हटले आहे की 'जया तीर्थी जाइजे तेथचीया लीळा आठविजति : तेथ ते स्मरण' (स्मृ.स्थ. ३९) यातील हेतु हाच आहे.

## स्थाने डावलू नयेत

परमेश्वराची संबंधी स्थाने वंदनीय असल्यामुळे रस्त्याने जात अस-तांना, अटन वगैरे करीत असतांना ती डावलणे योग्य नाही. एकदा भटोबास, पंचाळेश्वराला डावलून श्रीचक्रधरस्वामींकडे चालले होते. येथे मात्र त्यांनी पंचाळेश्वराला डावलले हा दोष नाही. कारण, त्यांना त्यावेळी प्रत्यक्ष परमेश्वरावताराच्या भेटीची उत्कंठा विशेष होती. पण त्यांचा दोष हा की पंचाळेश्वराजवळून जातांना त्यांना त्या स्थानाची आठवणहि झाली नाही. स्थान जवळ असूनहि, आपण ते डावलून जाऊ नये, असा विचार देखील त्यांच्या मनात आला नाही. सारांश, साधकाने अटनविजन प्रसंगी केव्हाहि स्थान डावलून जाऊ नये. रस्त्याने जातांना स्थानाला दुरून तरी दंडवत घातलेच पाहिजे. त्यामुळे स्थानाची मानमान्यता घडते, साधकाच्या ठिकाणी भाव उपजतो. स्थानाजवळ जाऊन दंडवत घातल्याने ओल्या पुरुषाला अनुराग उत्पन्न होतो. कोरड्या पुरुषालाहि अनुराग उत्पन्न होतो पण तोहि कोरडाच.

स्थानादिकांच्या ठिकाणी जाऊन तेथे घडलेली परमेश्वराची लीळा-चरित्रे आठवल्याने साधकाला तुष्टीपुष्टी होते. त्यामुळे अव्हेरणहि चुकते.

१. भट्ट पंचाळेश्वर डावलणे तो दोष नाही : परि स्फूर्ति नाही हा दोषः स्थाना दुरोनि दंडवत घालीजे: भावो आन मान्यता नसता अनुरागचि उपजे' (आ. स्थ. १८५).

कारण, परमेश्वराची स्थाने साधकाकडून जर डावलली गेली तर त्याला अव्हेरणाचा दोष घडतो आणि त्यामुळे योग्यता कमी लागते. म्हणून साधकाने प्रत्येक स्थान पाहणे, त्याला दंडवत घालणे, जवळ जाऊन शक्य नसेल तर दुरून तरी दंडवत घालणे अत्यंत आवश्यक व इष्ट आहे.

परमेश्वराच्या चरणाने झगटलेले पदार्थ हेहि डावलणे योग्य नाही. एकवेळ, परमेश्वर-नेत्राच्या सेवासंबंधाला गेलेले पदार्थ डावलले गेले तरी हरकत नाही. कारण त्यांना तितकेसे महत्त्व नसते. परमेश्वर आपल्या डोळयांनी जीवाचा अधिकार, अनधिकार वगैरे पाहून काय द्यायचे ते देतात. पण श्रीचरण तर काहीच न पाहता आपला संयोगसंबंध देतात. चरणाने दिलेल्या संयोग-संबंधाचे फळ तात्काळ, नक्की मिळतेच. उलट डोळयांनी दिलेल्या सेवासंबंधाचे फळ रोकडे मिळतेच असे नाही. उदा: डोळयांनी दिलेल्या विद्येचे फळ तात्काळ न होता काळांतराने म्हणजे विद्या चारित झाल्यानंतर होते.

## प्रसाद म्हणजे काय ?

परमेश्वराच्या स्थानाप्रमाणे परमेश्वराचा प्रसादहि वंदनीय आहे. कारण स्थानाप्रमाणेच तोहि 'संबंध' होय. प्रसन्नतापूर्वक कृपाशक्तीचा निक्षेप असल्यामुळे एका दृष्टीने 'स्थान' हाहि 'प्रसाद'च आहे यात शंका नाही. तथापि, रूढार्थाने, ज्या स्थावर ठिकाणांना परमेश्वराचा संयोगसंबंध प्रसन्नतापूर्वक झालेला आहे त्यांनाच स्थान असे म्हणतात. असा प्रसन्नतापूर्वक संबंध ज्या जंगम प्रापंचिक पदार्थांना झालेला आहे ते परमेश्वराने प्रसन्न होऊन इतरांना दिले म्हणजे 'प्रसाद' होतात. (प्रसाद तो काई ऐसा : यथौनि प्रसन्न होऊनि दीजे तो प्रसाद की : शो. आ. ७५). तथापि, ज्यांना प्रसन्नतापूर्वक संयोगसंबंध झालेला आहे असे जंगम पदार्थ इतरांना प्रसाद म्हणून दिलेले नसले तरी ते प्रसादात अंतर्भूत होतातच. उदा : प्रसादात 'डोंबेग्रामाचेया राजमठीचा उंबरवट्ट

१. 'तै तेथचिया गोष्टी कीजति : तै तुष्टी पुष्टी होती : आन अव्हेरण चुके : हे एक नांतर्यंक' (आ. स्थ. १८५).

२. 'डोळे अधिकार अनधिकार पातात : चरण न पात देताति : चरणाचे दिधले रोकडे : नेत्राचे दिधले अंतरावो होत असे' (सदर).

"... राजमठीचे कवाड : स्रीपुरुषमठीचे ' कवाड '..." वगैरे काष्ठे आणि ' ... छीनस्थळी : माहाद्वारीचा उंबरवटु : सोपान : भींति : भांडेभेदन ' वगैरे पाषाण ( प्रसादसेवा ) यांचाहि अंतर्भाव झालेला आहे. हे इतरांना मुद्दामहून दिलेले पदार्थ नव्हत. तथापि त्यांना परमेश्वराचा प्रसन्नतापूर्वक संबंध मात्र झालेला होता. तसेच, उंबरवट, खांब वगैरे प्रापंचिक पदार्थ हे स्थानरूप नाहीत. ते जंगम ( होऊ शकतात. ) पदार्थ आहेत. तथापि आसन, छिन्नस्थळी, डोमेग्रामचा ओटा, पिवळतळौली, क्षेत्रखाज आणि गुढा ही पाच स्थाने मात्र प्रसादवत् मानली गेली आहेत. कारण तेथे महत्त्वाच्या लीळा झालेल्या आहेत. प्रसादाच्या ठिकाणी प्राधान्याने कृपा-शक्तीचा निक्षेप असल्यामुळे स्थानापेक्षा प्रसाद हा केव्हांहि अधिक श्रेष्ठ ठरतो.

## प्रसादाचे पदार्थ

परमेश्वराच्या प्रसादात नखे, दाढ, केशकलाप, अनुलेपन इत्यादि त्याचे मूर्तिनिष्ठ पदार्थ; आंगी--टोपरे, बहिर्वास, फुटा, दुटी वगैरे कापसाची वस्त्रे, म्हाइभटाची मेघवर्णी दुटी, जगळदरणेयाची दुटी वगैरे रेशमी वस्त्रे व पंचवर्णी जाडी, सोरटी जाडी, घोंगडे, सकळादी टोपरे वगैरे लोकरी वस्त्रे; चरणगादी, पाटगादी, दांडीचे बोखारणे, पराळा, पोहरा, उपानह वगैरे चामड्याचे पदार्थ; त्राकी, साखळी, कांब, पालमांडे, आरती, थाळी वगैरे धातुपदार्थ; कापराची सेंद, फणी, करंडा वगैरे हस्तिदंती पदार्थ; नव्या जुन्या मापाचे पाट, पात्र, खांब, उंबरवट वगैरे काष्ठ पदार्थ आणि जाळी, छिन्नस्थळी, सोपान, भिंत, भांडेभेदन वगैरे पाषाण पदार्थ यांचा समावेश होतो.

## प्रसादसेवा

या सर्व प्रसादांना ( आणि स्थानांनाहि ) साष्टांग दंडवत करणे ही त्यांची उत्तम सेवा होय. ( तुम्हा साष्टांग लांदे की : शो. आ. ७७ ). त्यांना फुले वहायलाहि सांगितली आहेत. ( पुष्प एक वहावे : शो. आ. ७६ ). तथापि नुसते एखादे फूल वाहणे हे वंदन नाही, तो वरवरचा भाव होय. वंदनासाठी साष्टांग दंडवत घालणे हेच आवश्यक आहे.

स्थानाला वंदन करतांना त्या ठिकाणी घडलेल्या परमेश्वराच्या लीळा-चेष्टा आठवणे, त्यांचे भावपूर्वक स्मरण करणे जसे आवश्यक आहे तसे ते प्रसादाला नमस्कार करतांनाहि आवश्यक आहे. त्यांना वंदन करतांना तत्संबंधीची परमेश्वरचरित्रे स्मरण केली पाहिजेत. तरच वंदन यथायोग्य घडेल व त्याचे गोमटे लागेल. एरवी, इंद्रभटाला श्रीचक्रधरस्वामींनी एक फुटा दिला होता. ( ली. च. उत्त. १५ ).त्या फुट्याला आधी फुले वाहून तो नमस्कार करीत असे. पण प्रसादाच्या ठिकाणी असलेल्या कृपासामर्थ्याचे व मायासामर्थ्याचे ज्ञान नसल्यामुळे, म्हणजे प्रसादाचा महिमा त्याला ठाऊक नसल्यामुळे त्याचे वंदन हे मनोधर्मविहीन होत असे. म्हणून त्या वंदनामुळे त्याच्या ठिकाणी नुसता भाव उपजत असे. अर्थात् त्या वंदनामुळे व्हायचे तितके गोमटे त्याला झाले नाही. पण त्या प्रसादाचा महिमा आठवून त्याने वंदन केले असते तर त्याला कितीतरी गोमटे झाले असते. म्हणून प्रसादाला नमस्कार करतांना त्याची लीळा आठवणे महत्त्वाचे होय.

## प्रसादाची प्रार्थना

प्रसादवंदनानंतर त्याची पुढीलप्रमाणे प्रार्थना करावी. “ ईश्वरा तुझा जयजयकार असो. सच्चिदानंदस्वरूप देवा श्रीचक्रधरा, मी अनादिकालापासून अपवित्र आहे. अज्ञान आणि अन्यथाज्ञान यांनी मी अपवित्र झालो आहे. स्वोक्ति, शास्त्रोक्ति आणि लोकोक्ति यांच्यामुळे मी अपवित्र आहे. माझ्या ठिकाणी अभिलाष, अहंता, ममता, कामक्रोध, मदमत्सर, रागद्वेष वगैरे असल्यामुळे मी अपवित्र आहे. इतकेच नाही तर मी अनंत सृष्टीचा प्रमादी आहे. श्रीचक्रधरा देवा, आता या सृष्टीत तुझ्या एकट्या वाचून आणखी कशानेहि मी पवित्र होणे शक्य नाही. म्हणून श्रीचक्रधरा देवा, आपले दर्शन देऊन, मला स्पर्श करून, माझ्याशी बोलून, किंवा माझ्याकडे कृपादृष्टीने पाहून, निदान मला अंतःकरणात आठवून तरी माझ्यासारख्या अपवित्राला आता तू पवित्र कर रे परमेश्वरा.तुझे नाम, लीळा, मूर्ति, चेष्टा, अवस्थान, प्रसाद, वासनिक व भिक्षु यांचे सेवादास्य माझ्याकडून घडव आणि मला अपवित्राला पवित्र कर. तुझे स्थान, प्रसाद वासनिक व भिक्षु यांना माझे दंडवत असो. परिश्रयाच्या स्थानापासून तो जिथे तू आसन केलेस, वसति केलीस, अवस्थान केलेस, आणि वर

दिलास त्या सर्व स्थानांना माझे दंडवत असो. शाब्दज्ञानी, अपरोक्षज्ञानी, सामान्यज्ञानी, विशेषज्ञानी या ज्ञानियांना माझे दंडवत असो. पुरभजनी, विषयप्रेमी, आग्रही, तळमळणारा, आत्महननी, अवस्था प्रगट करणारा आणि तुझी वियोगवार्ता ऐकताच प्राण सोडणारा अशा आठहि प्रकारच्या भक्तांना माझे दंडवत असो. सर्व गुरुकुळाला माझे दंडवत असो'(प्रसादसेवा).

## प्रसादसेवेचा मथितार्थ

सारांश, परमेश्वराचा प्रसाद नेहमी नमस्करावा. त्या प्रसादाच्या ठिकाणी परमेश्वराच्या ज्या सालंकृत श्रीमूर्तीने लीळा केल्या असतील, ज्या क्रिया आचरल्या असतील त्या जशाच्या तशा आठवाव्या. अर्थात् ज्या अवताराचा प्रसाद असेल त्याच अवताराच्या मूर्तीचे व लीळांचे त्या वेळी स्मरण करावे. प्रसाद एकाचा व स्मरण दुसऱ्या अवताराचे असे करू नये. अर्थात् अशी प्रसादसेवा करतांना त्या अवताराची मूर्ति व तिच्या लीळा निश्चळ होऊन आठवाव्या. मग त्या प्रसादाला दंडवतापासून तो जयजयकार करण्यापर्यंत सर्व रीतींनी नमस्कार घालावे. थोडावेळ तरी त्या प्रसादाची सेवा करावी. त्यासाठी आपल्या उत्तमांगाने-निढळाने त्याला स्पर्श करावा. आपले कपाळ त्यावर ठेवावे. आणि तेथलि म्हणजे त्या प्रसादस्थानी असलेले कृपाकार्य आठवून त्या ठिकाणी रममाण व्हावे.

## प्रसादाची जपणूक

तो प्रसाद कुचंबू नये, त्याला उपद्रव होऊ नये म्हणून त्याची अतिशय काळजी घ्यावी. तीन दिवसांनी एकवेळ तरी प्रसादावर कपाळ ठेवावे. अशा रीतीने नमस्कार करीत असतांना डोक्याचे किंवा भिवयाचे केस वगैरे त्याला स्पर्शू देऊ नयेत. धोंगड्या वस्त्रात तो प्रसाद कधी ठेवू

१. '**हे म्हणजे आणीक अवतार निराकरीले** ... एका अवताराचा प्रसाद नमस्करीता आणिका अवताराची आठवण न करावी हा हेतु :' (आ. वं. २८० ).

२. '**आठवण म्हणजे निश्चळ होऊनि सारीजे : येथ म्हणजे प्रसादस्थानी नमस्कार म्हणजे साष्टांग दंडवताचिये ठाउनि जय पर्यंत : सकृत् म्हणजे तोकडाचि काळ : सेवा म्हणजे अंगानिडळाचा संबंध दीजे : तेथ रमिजे ते सेवा**' (आ. स्थ. २८० ).

नये, किंवा राठ दोरीने तो बांधू नये. उशीच्या खाली तो कधी घालू नये. भिंतीच्या खुंटीलाहि तो टांगून ठेवू नये. मार्ग आक्रमण करीत असतांना भिक्षूंनी प्रसाद आपल्या काखेंतील झोळीत ठेवायला हरकत नाही. अशा भिक्षुकाला नमस्कार केल्याने त्या प्रसादालाहि नमस्कार केल्यासारखे होते.

## सर्वांना प्रसादसेवा अवश्य

तीव्र वैराग्य करणारे काही पुरुष ( उदा : मुंगीचे पुरुष, करणीय पुरुष, सुकवणे, रांगोळी व कडेचे पुरुष ) हे अरण्यात राहून निःस्पृहतेने चर्या करतात. तेव्हां त्यांना तेथे आपल्याजवळ प्रसाद बाळगून तो योग्य रीतीने जतन करून ठेवणे साधत नाही. म्हणून त्यांनी तो जवळ न बाळगला तरी चालेल. पण वरील पुरुषाव्यतिरिक्त इतरांनी म्हणजे बोधपूर्वक व वेधपूर्वक अनुसरलेल्यांनी, तसेच सवेतव, भीतीने किंवा संसाराला कंटाळून जे अनुसरले असतील त्यांनी सगळयांनी प्रयत्नपूर्वक प्रसादसेवा करावी. मैळून उजळलेले व धर्माचरणाला लागलेले त्यांनीहि प्रसादासमोर अनुतापपूर्वक आर्त करावी. अनुसरलेल्या बायांना विजन निराकरले असल्यामुळे त्यांना तर प्रसादसेवेवाचून गत्यंतरच नाही. या सगळयांनी नित्यविधि व नैमित्तिक विधि आचरतांना त्यांच्याकडून जे अविधि होतील त्यांचे प्रसव मोडण्यासाठी तावडतोब प्रसाद नमस्करावे.

## प्रसादाचा महिमा

अशा रीतीने स्थानप्रसादाची सेवा केल्याने काय होते याचे श्रीचक्रधरस्वामींनीच महात्म्य सांगितले आहे की “प्रसादसेवेतव पुरुषु धर्मी दक्ष होय : ईश्वरी आर्ति उपजे : अविधि परिहरे : वीघ्ना उपशांति होय : विधी सबीजे होय : दैव साह्याते करी : अविधि अनिष्टाचा नाशु करी : तामसे काळी सत्त्वा ए : गेले सत्त्व ए : सान्निधान देयावयाची प्रवृत्ति उपजे’ (प्र. सेवा). तेव्हां प्रसादसेवेमुळे धर्माच्या ठिकाणी दक्षता निर्माण होऊन क्रमाक्रमाने शेवटी परमेश्वराच्या ठिकाणी सेवकाला आपले सन्निधान देण्याची प्रवृत्ति

१. ‘अतियत्न म्हणजे अतिशयेसि यत्नता कीजे : कुंचवेना : उपद्रवे ना : ती दिवसा एक वेळा प्रसाद निडळी लावीजे : नमस्करिता केस लागू नेदीजे : धोंगडे वस्त्र निबर दोरी ना : आधारिये न घालिजे ( आ.स्थ.२८०).

निर्माण होते हा काय सामान्य फायदा आहे ? त्यासाठी साधकांनी स्थान-प्रसादाची सेवा करणे अवश्य आहे.

## भिक्षु वासनिक वंद्य

स्थानप्रसादादि जड संबंधी पदार्थ वंद्य आहेत यात शंका नाही. पण त्यापेक्षाहि संबंधी चेतन पदार्थ अधिक वंद्य आहेत. कारण जडापेक्षा चेतन पदार्थच ईश्वरप्रवृत्तीला वश होतो. तसा जड पदार्थ होत नाही. आणि दुसरे असे की चेतनाच्या ठिकाणी ईश्वरी ज्ञानाचा संबंध असतो.परमेश्वराच्या संबंधात ज्ञानलक्षण संबंध सर्वात श्रेष्ठ असल्याचे आपण पाहिलेच आहे. त्यामुळे, हा ज्ञानलक्षण संबंध ज्यांना झालेला आहे असे भिक्षु-वासनिक अधिक वंद्य ठरतात यात शंका नाही. अशा चेतन संबंधाला डावलणे देखील योग्य नाही. भटोबास देमतीची भेट न घेता, तिला डावलून आले होते. त्यावेळी श्रीचक्रधरस्वामींनी त्यांना म्हटले की, 'परमेश्वराचे संबंधी ओटे गोटे आदिकरून सर्व काही तुम्हाला नमस्करणीय आहेत. मग तू देमतीला का डावललेस' ( आ. १८६ ). याचा अर्थच असा की जिथे संबंधी जड पदार्थ वंद्य ठरतात तिथे संबंधी चेतन पदार्थ हे अधिक वंद्य आहेत. म्हणून साधकांनी त्यांना डावलू नये. त्यांची भेट घ्यावी व सेवा-शुश्रूषाहि करावी.

## परमेश्वराचे संबंधी कोण ?

इतकेच नाही तर 'आपुले सकळहि निरोध परिहरौनि येथीचेया संबंधीयाचेया संबंधा जाइजे : मग तो म्हणे ते कीजे' ( आ. १८७ ) असा स्पष्ट विधि श्रीचक्रधरस्वामींनी सांगितलेला आहे. तेव्हां प्रश्न असा की परमेश्वराचे संबंधी कोण ? ते पुढील प्रमाणे सांगता येतील. (१) परमेश्वराच्या शरीरसंबंधापासून झालेले; किंवा (२) परमेश्वराने आपले संबंधी—नातेवाईक म्हणून ज्यांचा स्वीकार केलेला आहे असे. उदा: श्रीगोविंदप्रभूंनी सावळा-पुरच्या मुलीला आपली लेक मानले होते; ती. (३) परमेश्वराचे ज्ञानसंबंधी. हे ज्ञानसंबंधीये तीन प्रकारचे आहेत. (अ) वासनिक; (आ)

१. ' देमती कैसेनि डावलीली म्हणजे थोरी सांगितली : तेचि कैसी ? ना : तिये एक संबंध संयोग आन दुसरा ज्ञान संबंधहि असे यातव'(आ.बं.१८६).

ज्ञानिया; आणि(इ) बोधवंत. याशिवाय ईश्वराविषयी भाव ठेवणारा वेधवंत तोहि परमेश्वर-संबंधीच होय. यापैकी परमेश्वराचे प्रत्यक्ष शरीरसंबंधी व मानीव आप्त यांची भेट घेणे हे फक्त सन्निधानीच्या पुरुषांनाच शक्य होते. साविकरण पुरुषांनी परमेश्वरसंबंधियांची भेट घ्यायची-त्यांच्या संबंधाला जायचे म्हणजे वासनिक, ज्ञानी, बोधवंत व वेधवंत या चौघांच्या भेटीला जाणे अवश्य आहे.

प्रकरण १० वे

# जन्म क्षेपणे

संसारत्रस्त अनुतापी : जो एकला जन्म क्षेपी
तो मोक्षाचा निक्षेपी : संपन्नु होए (उद्ध. गी. ४८३).

## जन्म क्षेपणाचे महत्त्व

विकारविकल्पशून्य होऊन, स्वभावांना मात्रा देऊन, निरालंब राहून देवतास्मरण करीत 'जो जन्म क्षेपी' (अ. प. ५) त्याला परमेश्वर आपला पुनःसंबंध देतात; आणि मग तो कालांतराने मुक्तीला निश्चित पोचतो. हा अस्तीपरीचा मुद्रितार्थ आपण यापूर्वी अनेकदा पाहिलेला आहे. देवतास्मरण करीत जन्म क्षेपणे हा त्यातील अत्यंत महत्त्वाचा आचारधर्म आहे. 'संसार त्रस्तु अनुतापी : जो एकला जन्म क्षेपी : तो मोक्षाचा निक्षेपी : संपन्नु होए' (उद्ध. गी. ४८३). अर्थात्, हे जन्म क्षेपणे, शेवटी मोक्ष प्राप्त करून देणारे आहे यात शंका नाही. मागील प्रकरणात साधकाने परमेश्वराचे सेवादास्य व स्मरण कसे करावे ते आपण पाहिले. आता त्याने जन्म कसा क्षेपावा या गोष्टीकडे लक्ष देऊ.

## जन्म म्हणजे काय ?

'चैतन्यमहं जीवा जन्म बोलिजे' (संस. ६) ही जन्माची एक व्याख्या आहे. 'तमोमायेच्या स्वरूपातून बाहेर पडता पडता जीवाला आद्यमळ लागणे व मायादत्तसामर्थ्यासहित जीव इरित मायास्वरूपात येऊन पडणे हाच जीवाचा जन्म होय' (महा. तत्त्व. पा. १५७) असा तिचा अर्थ आहे. 'जन्म म्हणजे (मातेच्या) गर्भात सात महिन्यांचा

संपूर्ण पिंड तयार होऊन तेथे सर्व देवतांची अधिष्ठाने आली--पिंडस्था आल्या म्हणजे जन्म झाला असे म्हणायचे.' (महा. तत्त्व. पा. ३३४) हा जन्म शब्दाचा दुसरा एक अर्थ आहे. मातेच्या 'उदरातून बाहेर' पडणे म्हणजे जन्म, या अर्थाने तर आपण हा शब्द नेहमीच वापरतो. याशिवाय जन्माचे आणखीहि काही प्रकार आहेत. द्वापरयुगात जन्मलेला माणूस मृत्यु पावण्यापूर्वी द्वापरयुग संपून कलियुग सुरू झाले तर तो कलियुगात येतो. म्हणजे त्याचा कलियुगात जणु 'जन्म' होतो... त्याच-प्रमाणे भोगभूमीचा मनुष्य... कर्मभूमीत आला तर त्याचा पिंड युक्त होतो. हाहि त्याचा 'जन्म' च होय' (महा. तत्त्व. पा. ३३४). जन्म या शब्दाचे असे अनेक अर्थ करण्यात येतात. पण यापैकी कोणत्याच अर्थाने हा शब्द प्रस्तुत ठिकाणी वापरलेला नाही.

'जन्म' म्हणजे अनुसरणानंतरचा काळ, हा अर्थ या ठिकाणी अभिप्रेत आहे. तसे म्हटले तर जीवाला 'बोध' होणे हाहि त्याचा 'जन्म' च होय. कारण बोध झाल्यावर मनुष्य अज्ञान-योनीतून निघून ज्ञान-योनीत जन्म घेतो; आणि त्या अर्थाने तो शब्द वापरलाहि जातो. पण केवळ 'बोधा' च्या जन्मानंतर अनुसरणाच्या अभावी त्याला 'क्षेपणे' करता येत नाही. तेव्हां आचरत्या पुरुषाच्या दृष्टीने त्याचे अनुसरण हाच त्याचा खराखुरा जन्म होय. कारण अनुसरणानंतर तो कर्मराहाटीतून निघून दैवराहाटीत जणु 'जन्म' घेत असतो; त्यानंतरच त्याला 'क्षेपणे' करता येते. आणि म्हणून त्याच्या दृष्टीने अनुसरणानंतरचा काळ हाच त्याचा जन्म होय. तो त्याने क्षेपावा.

**क्षेपणे म्हणजे काय ?**

पण क्षेपणे म्हणजे तरी काय ? क्षेपणे म्हणजे कंठणे, कसे तरी दिवस काढणे, हा लौकिकार्थ प्रसिद्धच आहे- त्या अर्थाने आचरत्या पुरु-

१. '**जन्म शब्द ज्ञानकाळी वर्ते** : एवं बोधोचि जन्म : परि क्षेपणे न घडे : तरि कवण... **अनुसरणकाळी वर्ते** ते : का : पा : कर्मराहाटी आतौनि काढौनि दैव राहाटीशी जन्माला : **म्हणौनि जन्म देणे**' (ल. वं. अ. प. ६.) '**जैथौनि अनुसरला ते जन्म : नसुधेनि बोधे ते जन्ममात्र चि : संपूर्ण नव्हे**' (आ. स्थ. २६).

धाने विकार—विकल्पादि सोडून देऊन परमेश्वरस्मरण करीत करीत आपले उरलेले दिवस कसे तरी कंठायचे, म्हणजे कसे तरी लोटायचे की काय ? मुळीच नाही. या जन्म 'क्षेपण्या'चा देखील निश्चित विधि आहे. 'शारीर कष्ट : मानसिक दुःख याते जन्म क्षेपणे बोलिजे' ( शो, आ. मा. ४१ ) अशी श्रीचक्रधरस्वामींनीच जन्म क्षेपण्याची व्याख्या सांगितलेली आहे. तेव्हां शारीरिक कष्ट व मानसिक दुःख करीत आपले अनुसरणानंतरचे सर्व आयुष्य परमेश्वरार्पण करावे हा जन्म क्षेपण्याचा खरा अर्थ होय.

## सुखसाधनांनी देव मिळत नाही

अनुसरणानंतरचे सगळे आयुष्य साधकाने 'कष्ट' व 'दुःख' करीत घालवायचे हा विधि तापदायक आहे यात शंका नाही. पण त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचेहि कारण नाही. परमेश्वर हा काही सुखाच्या साधनांनी प्राप्त होऊ शकत नाही. ( सुखसाधने देवो न पवीजे नाएका : आ. ७९ ). आयुष्यात एखादी साधी वस्तु मिळवायची असली तरी आपणाला कितीतरी कष्ट करावे लागतात, कितीतरी दुःखे सोसावी लागतात. एका आचार्याजवळ पुष्कळ विद्यार्थी शस्त्रास्त्रांचे शिक्षण घेत होते. शस्त्र मारायचे कसे व त्यापासून आपला बचाव करायचा कसा याचा अभ्यास आपल्या शिष्याकडून करून घेत असतांना जो शिष्य चुकेल त्याला तो एकदम रागावून छडी मारायचा किंवा शिव्या द्यायचा. त्याचा तो मार शरीराने सहन करून व त्याने दिलेल्या शिव्यांनी होणारे मानसिक दुःख सोसून ज्या शिष्यांनी त्याच्याजवळ अभ्यास केला त्यांना शस्त्रास्त्रे उत्तम रीतीने वापरता येऊ लागली. पण त्या माराला व शिव्यांना कंटाळून जे निघून गेले त्यांना अर्थात् काहीच प्राप्त झाले नाही. ( कोलाचा दृष्टांत ५८ ). साधे शस्त्रास्त्रांचे शिक्षण घेतांना जर शारीरिक कष्ट व मानसिक दुःख सोसावे लागते तर मग सर्वश्रेष्ठ जो परमेश्वर त्याच्या प्राप्तीसाठी दुःख सोसावे लागते यात काय आश्चर्य आहे ?

१. 'तेही देवो न पवीजे हे काथी म्हणावे असे : परी व्यवहारीचीही क्रिया दुःखावाचौनि न पवीजे' (आ. स्थ. ७९).

म्हणूनच परमेश्वरप्राप्तीसाठी परमेश्वरावतार श्रीचक्रधरस्वामी यांनी सांगितलेला विधि दुःखरूप आहे. शारीरिक किंवा मानसिक कोणत्याहि प्रकारचे दुःख न सोसता सुखासमाधानाने आचारधर्म आचरून परमेश्वर मिळत नाही; तसेच परमेश्वर आपणाला पुनःसंबंध देऊन पुढे सुख देतील या 'भावनेने' विधि आचरले तरी परमेश्वर मिळत नाही. त्याचप्रमाणे परमेश्वरप्राप्तीसाठी जे विधि आचरायचे त्यातील सुखरूप विधि तेवढेच आचरल्यानेहि परमेश्वर मिळत नाही. उदा: अटन करायचे पण तें दुःख न वाटेल अशा वेळी; विजनात रहायचे पण झाडाच्या दाट सावलीचा आश्रय घेऊन;स्मरण करायचे पण ते दिवसातून एक दोन वेळा आणि तेहि आपल्याला सोयीस्कर होईल अशा रीतीने. असे केल्याने ईश्वर प्राप्त होणे कसे शक्य आहे ?

## दुःखाकष्टांच्या विधींचा हेतु

परमेश्वरप्राप्तीसाठी असा दुःखाकष्टांचा विधि सांगण्यात परमेश्वराचा असा हेतु आहे की अनंत सृष्टीत जीवाने दुःखांचे जे अनंत लेप जोडलेले असतात ते नाहीसे होण्यासाठी त्याने परमेश्वराप्रीत्यर्थ पुष्कळ दुःख सोसले पाहिजे. तो परमेश्वरासाठी जितके जितके ज्यास्त दुःख सहन करील तितकी तितकी त्याची जन्मजन्मांतरीची अनंत दुःखफळांची कर्मे नासतील. ती नासण्यासाठीच हा दुःखमय आचार सांगितलेला आहे.

दुःखमय विधि आचरूनहि साधकाने त्याविषयी अहंता बाळगू नये व इतरांच्या जवळ आपल्या या दुःखांचे वर्णनहि करीत बसू नये. 'परमेश्वरासाठी मी इतके कष्ट सोसले, अशा रीतीने मी भिक्षा मागितली, असे असे मी अटन केले, इतके दिवस मला उपवास पडले' वगैरे सारखे वर्णन त्याने इतराजवळ करू नये. तसे केल्याने, परमेश्वरानिमित्त ते दुःख सोसले असे होत नाही. आणि म्हणून ते साधकाच्या लेखी

१. 'दुःख उपजे ऐसेच साधन दिधले : दुःखावेगळे करावेया : दुःखे दुःख नाशावे हा हेतु... येणे साधने अनंता सृष्टीची जीवे जोडिली जिये दुःखे त्या वेगळा करावा म्हणौनि' ( आ. बे. ७९ ).

लागत नाही. अर्थात् त्याचे फळहि त्याला मिळत नाही.

## शरीर कष्ट व मानसिक दुःखे

काटेरी झाडाखाली राहिल्याने साधकाला शारीरिक कष्ट विशेष होतात. म्हणूनच झाडाखाली राहण्याचा विधि मुद्दामहून सांगितला आहे.[1] (देशाचा सेवटी झाडातळी जन्म क्षेपावे : आ. २६ ). त्या ठिकाणी नित्य-नैमित्तिक क्रिया आचरीत असतांना शरीराला अत्यंत कष्ट होतात. या शारीरकष्टामध्ये अटन, विजन, भिक्षा, भोजन, स्मरण इत्यादींच्या निमित्ताने उठणे बसणे याहि क्रिया अंतर्भूत होतात.[2] देशाच्या शेवटी जाऊन झाडाखाली राहून साधकाने या क्रिया आचरून कष्ट उपशीत रहावे आणि त्याचबरोबर निर्वेद, अनुताप, अनुशोच व आर्त करीत करीत मानसिक[3] दुःख करावे.

## ओले व कोरडे दुःख

बहुतेक सर्व प्रकारच्या साधकाकडून शारीरिक कष्ट सारखेच होऊ शकतात. पण सर्वांच्याकडून मानसिक दुःख मात्र सारख्या प्रमाणात होऊ शकत नाही. परमेश्वरस्मरण करण्याच्या बाबतीत जसे काही पुरुष ओले स्मरण करतात तर काही कोरडे स्मरण करतात, त्याप्रमाणे ते ओले व कोरडे दुःखहि करतात. वस्तुभजनीये विरही पुरुष जन्म क्षेपीत असतांना मानसिक दुःख करण्यासाठी निर्वेद, अनुताप इत्यादि दुःखे जेव्हां करतात तेव्हां त्यांचे डोळे अश्रूंनी भरून येतात. ज्ञानी आणि भक्त यांना भजन घालणारे पुरुष प्रयत्नी असतात. त्यांचे मानसिक दुःख कोरडेच असते. पण प्रयत्नपूर्वक त्यांनी दुःख केले तर त्यांच्या डोळ्यांची पाती किंचित् ओलसर होतात. अणि ज्ञानिभक्तभजनीयाव्यतिरिक्त इतर जीवदेवताभजनी पुरु-

१. ' **चर्येतव जे दुःख होय ते आणिका सांगो बैसे: ऐसे तिमलो : ऐसे कष्टलो : भिक्षा न मिळे** ' (आ. स्थ. ७९ ).

२. ' शारीर कष्टामधे अटन विजन भिक्षा भोजन स्मरण मनन्नादिक जेतुले उठणे बैसणे तेतुलेहि '— (आ. बं. २६ ).

३. ' मानासिक दुःख म्हणजे निर्वेदादि चतुर्विध दुःख '...(ल. बं. अ. प. ५).

षांचे मानसिक दुःख नेहमी कोरडे असते. वस्तुभजनी पुरुषांच्या सामान्यतः सगळयाच क्रिया ओल्या = अश्रूपात होत असतांना घडतात; अर्थात् त्यांचे स्मरणहि ओले असते हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. क्वचित्, नैमित्तिक क्रिया करीत असतांना त्यांचे स्मरण ठाकले तरी त्यांच्याकडून होणाऱ्या शारीरिक कष्टातच त्यांची स्मरणाची क्रिया अंतर्भूत होते. अर्थात् नैमित्तिक क्रिया करतांना त्यांचे स्मरण किंचित्काळ ठाकलेले असले तरीहि ते लेखी लागते. जीवदेवताभजनीयांच्या शारीरिक, मानसिक, नित्यनैमित्तिक वगैरे सगळयाच क्रिया कोरडपणाने होतात. त्यांच्या नैमित्तिक क्रियात कोरडे स्मरण अंतर्भूत होते.

## स्मरणापेक्षा शारीरिक कष्ट थोर

स्मरणाचा विधि हा अत्यंत महत्त्वाचा यात शंकाच नाही. तथापि आचरत्या पुरुषाने परमेश्वराप्रीत्यर्थ केलेल्या शारीरिक कष्टाच्या क्रिया ह्या स्मरणापेक्षाहि अधिक थोर व म्हणून अधिक महत्त्वाच्या ठरतात. कारण स्वतःसाठी आणि इतरासाठी म्हणजे स्वनिष्ठ आणि परनिष्ठ असे शारीरिक कष्ट करतांना 'हाती काम मुखी नाम' या न्यायाने साधकाला स्मरणहि करता येते. क्वचित् ते स्मरण ठाकले तर ते त्याच्या शारीरिक क्रियात अंतर्भूत होते. पण स्मरणात शारीरिक क्रिया मात्र अंतर्भूत होत नाहीत. कारण, शारीरिक क्रिया करतांना अनुषंगाने स्मरण होतेच. पण नुसते स्मरण करीत असता त्यात शारीरिक क्रिया अनुषंगाने येत नाही. स्मरणापेक्षा शारीरिक कष्टाच्या क्रिया थोर मानण्याचे दुसरे कारण असे की स्मरण केवळ आपल्यासाठी, आपले आपण करीत असतो. पण शारीरिक क्रिया

१. 'जीवदेवताभजनाचे कोरडे पुरुष ... आन अवरदृश्यापासौनि देवमनुष्य-तिर्यंच वस्तुभजनाचे तेहि वोलेपणे...क्षेपावे : आन ज्ञानिया भक्ताचे भजनाचे तें प्रयत्नियें पुरुष : तेहि वस्तुभजनियासारिखा प्रयत्ने दुःख उपजवून जेतुली क्रिया तेतुलीहि आवडपूर्वक करावी' (आ. बं. २६).

२. '**क्रिये आत स्मरण : स्मरणात क्रिया नाही** : का जे क्रिया करीता स्मरण ठाकले तरी त्याची योग्यता क्रियेतच होय : तियेमध्ये स्मरण आनुषंगिक घडे: परि स्मरणाचीये योग्यतेमध्ये क्रियेची योग्यता आनुषंगिक न घडे' (आ. बं. २६).

इतरांच्या निमित्तानेहि होतात. म्हणून स्मरण हा नित्यविधि तर परनिष्ठ क्रिया हा नैमित्तिक विधि होय. याच दृष्टीने स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक यांच्या सेवेची क्रिया ही स्मरणापेक्षा थोर ठरते हे आपण मागील प्रकरणात पाहिलेलेच आहे.

सारांश, परमेश्वरविषयक कोणतीहि शारीरिक कष्टाची क्रिया केली आणि त्यावेळी नामस्मरण घडले नसले तरी ते घडले असे मानून परमेश्वर त्या क्रियेचा स्वीकार करतो व त्याचे फळ = योग्यता स्मरण केल्याप्रमाणेच, किंबहुना त्यापेक्षाहि अधिक प्रमाणात त्याला देतो. ज्ञानीभक्तभजनींया असलेला प्रयत्नी पुरुष हा प्रयत्नपूर्वक आत्यंतिक कष्ट व दुःख करतो. ते त्याचे दुःख व कष्ट परमेश्वराला पाहवत नाहीत. म्हणून त्या कष्टांचे त्याला जे दुःख होते त्या दुःखामुळे त्या प्रयत्निया पुरुषाला योग्यता, तुष्टि (=समाधान) व पुष्टि (=मोठेपणा) प्राप्त होतात. परमेश्वर त्याला आपल्या जवळ लौकर नेतात. या दृष्टीने परमेश्वराप्रीत्यर्थ केलेले शारीरिक कष्ट अधिक महत्त्वाचे ठरतात. कष्ट सहन करून शरीरयंत्र पवित्र केल्याने परमेश्वराचे प्रेमहि मिळेल असा भावार्थ ' याचिया अवस्था : विषयभोगु सांडिजे सर्वथा : साहिजे आंगव्यथा : देहदमनाची ॥ ऐसेया चर्या पवीत्राः करावे शरीरयंत्र : मग होईल प्रेमपात्र : तो चैतन्यनाथु ' ( उद्ध. गी. ४१०, ४११ ) या ओव्यात भास्करभट्ट बोरीकराने सूचित केला आहे.

## शारीरिक कष्ट कोणते ?

शारीरिक कष्टामधे अटन, विजन, भिक्षा, भोजन, इतर स्वभावांना मात्रा देणे इत्यादि गोष्टींचा अंतर्भाव होतो हे आपण पूर्वी पाहिले आहे. त्यांचाच आता थोडा अधिक विस्ताराने विचार करू या. शारीरिक कष्टांच्या क्रिया कशा करायच्या, याचा भावार्थ एवढाच सांगता येईल की आचरत्या पुरुषाने आपल्या स्वभावांना मात्रा देऊन शरीर आत्यंतिक प्रमाणात सुकवावे. इतके की तो केवळ परमेश्वरस्मरणासाठीच जिवंत

१. ' नसुद्धी क्रियाच स्वीकारिली असे : प्रयत्निया तयाचे दुःख देखो न सकती : लवकरी नेति : दुःखेचि योग्यता तुष्टि पुष्टि ' (आ. स्थ. २६ ).

असावा. कारण स्मरण हाच त्याच्या जीविताचा मुख्य हेतु आहे. त्याने पूर्णपणे प्रेतवत् होऊन रहावे.

स्वभावांना, विशेषतः आहाराला मात्रा दिल्यामुळे साधकाची पाठ व पोट एकवटून जाऊन त्यावरच्या शिरा स्पष्ट दिसल्या पाहिजेत. 'आहाराचेनि संकटे : पाठिपोट एकवटे : वरि शिराजाळ उमटे : वाणेलग' पोटातील भुकेची आग तर पेटलेली असते पण अन्न खायला न दिल्यामुळे मेदमांसाचाच आहार होतो, तीच जणु शोषून घेतली जातात. 'जठराग्निचा उबाळा : उकडे मेदमांसाचा गोळा' आणि त्यामुळे 'ठावो न लगे डोळा : खोलपणे'—डोळे इतके खोल जातात की ते आहेत की नाहीत हे दिसत देखील नाही. शरीरातील हाडांचा सापळा खिळखिळा होतो, त्यांचे सांधे उखडले जातात आणि चालतांना पावले गडबडतात. 'अस्तियंत्र कीडिकीडी : संधि कळासु कडकडी : चालता गडबडी : चरण-द्वय.' इतकेच नाही तर त्यांचे दोन्ही बाहु ओढल्यासारखे दिसतात व गाल खोल जातात. 'काढति भुजा युगुळे : जिरति कपोळे.' सारांश, त्याची 'सर्वांगे होति निवळे : विकळपणे' इतकी की त्याच्यावर प्रेतछाया पसरते आणि तो विकराळ दिसायला लागतो. 'तया प्रेतसायाचा पाखाळु : रंकपणाचा उजाळु : तो दिसे विकराळु : निहाळिता.' त्याने जणु मृत्यूच्या दारी धरणे धरलेले असते, दुःखाशी मैत्री केलेली असते, आपले शरीर सोडायला जणु तो सिद्ध झालेला असतो. 'तया मरणेसी धरणे : दुःखेशी साजणे : तो देयावेया उठी मेल्हवणे : या कळेवरासि' त्याला विरक्तीचे जणु डोहाळे लागलेले असतात, अधिकाधिक ताप सहन करणे हा त्याला सोहळा वाटतो; आचरत्या पुरुषांनी अशाच रीतीने 'दमनशील' व्हावे. 'तया विरक्तीचे डोहळे : माहातापाचे सोहळे : म्हणौनि तुवाहि दमनशीळे : तैसेयाचि होआवे' (उद्ध. गी. २०२–२०८). शारीरिक कष्टांची ही परमावधीच नव्हे तर काय ?

## मानसिक दुःख

शरीरकष्टाप्रमाणे आचरत्या पुरुषानें मानसिक दुःखहि केले पाहिजे. पण हे दुःख परमेश्वराप्रीत्यर्थ पाहिजे; जीवदेवताप्रपंचाबद्दल नको. इतरांच्याबद्दल दुःख करणे म्हणजे त्यांचे आलंबन करण्यासारखेच होय. ते परमेश्वराला

सोडण्यासारखे आहे. म्हणून परमेश्वराव्यतिरिक्त किंवा परमेश्वरधर्माव्यतिरिक्त इतराबद्दल साधकाने दुःख करू नये. 'जीवाकारणे दुःख केलिया नित्यनरक होती' (शो. आ. मा. १९) असे स्वामींनी सांगिलेले आहे. 'बाई : दुःख न करा : दुःख म्हणजे पाप : दुःखातव नरक होती' (शो. आ. २८) हे वचन तरी काय सुचवित ? परसनायकाला 'स्थिति' झाल्यामुळे तो मेला आहे असे समजून ज्यावेळी दायंबा वगैरे दुःख करू लागले त्यावेळीहि स्वामींनी 'दुःख न करा गा: संसारू हा अनित्य : देह नाशिवंत : असे ते दीसे : दीसे ते नाशे : दुःख न करा' (ली. च. उत्त २६२) असा उपदेश केला. त्यांत नाशिवंत प्रपंचाबद्दल दुःख करणे इष्ट नाही असे सांगितले आहे. सारांश, जीवदेवताप्रपंचासाठी दुःख करणे अयोग्य होय. ती क्रिया पापरूप अतएव नरक प्राप्त करून देणारी आहे.

## दुःख परमेश्वरासाठीच

तेव्हां साधकाने जे मानसिक दुःख करायचे ते फक्त परमेश्वरासाठी किंवा परमेश्वराचा आचारधर्म आचरीत असतांनाच करायचे. असे दुःख केल्याने जीवाची पूर्वसंचित पापे नासतात. (किंचित् दुःखे पाप नासे : आ. मा. ५७). 'बाइ : ऐसा एकला पळपळीत निगे : जो दुःखपूर्वक आपुलेया देवाते आठवीत वर्ते' (आ. मा. २१६); 'अप्राप्तिनिमित्तके दुःखे कर्माचीया राशी नासती' (आ. ७१) इत्यादि वचनेहि साधकाने ईश्वरासाठी मानसिक दुःख करणे कसे आवश्यक आहे ते स्पष्ट करतात.

तथापि, ईश्वरासाठी नुसतेच दुःख करीत राहिल्याने ईश्वर प्राप्त होतो असे मात्र नाही. असे दुःख नित्यनैमित्तिक विधींचे आचरण करीत असतांना केले पाहिजे. पण ते विधी न आचरता, आचारविचारांचे अनुष्ठान न करता नुसतेच दुःख करीत राहणे म्हणजे नुसते खडकावर आपले कपाळ आपटून घेण्यासारखे होय. त्यामुळे 'कपाळ मोक्ष' होईल, परमेश्वराचा 'मोक्ष' मात्र मिळणार नाही. नागदेवाचार्य एकवेळ असे नुसतेच दुःख करीत बसले त्यावेळी स्वामींनी त्यांना सांगितले की 'हा गां: रडिनलेया काइ होइल : एणे खडकेसी कपाळ घेया पा : जरी होए : तो जेयापरी होआवा तेयाचि परी होईल की' (आ. २०९). तेव्हां परमेश्वरासाठी

दुःख करायचे ते आचारविचारपूर्वक करायचे; नुसते दुःख करायचे नाही. 'यालागी वैराग्याचिये कासे : लागौनि दुःखाचे पुरी प्रवेशे : तो परतीर अनायासे : भक्तीचे पावे' ( ज्ञा. प्र. ८६१ )असे पंडित विश्वनाथबासानेहि म्हटले आहे. काजळी पडल्याने ज्याप्रमाणे दिव्याचा प्रकाश मंद होतो त्याप्रमाणे नुसतेच दुःख केल्याने साधकाची बुद्धि जाते, परमेश्वराची आवड नाहीशी होते, इतकेच नाही तर तो शास्त्र देखील विसरतो. ( रडिजे ना की गा : रडिनलेया काजळी पडे : आ. २६५ ).

## चतुर्विध दुःख

परमेश्वराप्रीत्यर्थ जे दुःख करायचे ते चार प्रकारचे. आर्त, निर्वेद, अनुताप आणि अनुशोच असे ते चार प्रकार आहेत.

**(१) आर्त** : म्हणजे मला परमेश्वर भेटावा आणि तोहि अतिशय लौकर भेटावा अशी दुःखपूर्वक मानसिक उत्कंठा नेहमी धारण करणे. या उत्कंठेने तो ठिकठिकाणी परमेश्वराचा शोध करतो. 'गावोगावींचिया नदी : मढमंडपे देउळे इत्यादि : ऐशी रम्ये विजने शोधी : निरंतर ॥ गव्हारे कपाटे : पाहे दरे दरकुटे : पुळिने वाळवंटे : शिळातळे' पण तेथे परमेश्वरमूर्ति न आढळल्यामुळे तो हिंपुटी होतो. त्यामुळे 'गहींवर दाटूनि कंठी : हृदय उले' ( ज्ञा. प्र. ९८५-९८७ ). श्रीचक्रधरस्वामींनी ज्या मार्गाने व ज्या दिशेकडे बीजे केले तिकडे हा आशाळभूत नजरेने पाहात असतो. तिकडून कोणी आलेला दिसला तर त्याच्याजवळ जाऊन तो परमेश्वराचा शोध विचारतो. त्या मार्गस्थाने सांगितलेली खूण जर पटली नाही तर 'खून पुसिलिया न बाणे : तेथ दुःख करी' ( ज्ञा. प्र. ९९३ ) हा पुन्हा दुःख करू लागतो. असा रात्रंदिवस परमेश्वराच्या भेटीचा त्याला अध्यास लागतो. परमेश्वराची वाट पाहून पाहून 'तया शिनाचेनि दुःखे : कुहिजति डोळे ॥ सडती नेत्रांची पाती : स्रवती आतौनि

१. 'नसुद्धेनि दुःखे परमेश्वर नव्हे' ( आ. स्थ. २०९ ).

२. 'काजळी म्हणजे दिव्याची उपपत्ति : काजळीया प्रकाश माळवे : तैसे उमट प्रज्ञा मेधा जाये : आवड सरे : स्फूर्ती जाये : मनन जाये : शास्त्र विसरे' ( आ. स्थ. २६५ ).

सुख नाही चित्ती' म्हणून तो जिकडे पाहतो तिकडे तो 'शून्य देखे' ( ज्ञा. प्र. ९९४, ९९५ ). परमेश्वरासारखे कुणी दिसले तर मोठ्या आशेने तो त्याच्याकडे निरखून पाहतो. पण तो परमेश्वर नाही हे कळले म्हणजे झालेल्या निराशेने 'तेथ जिव्हार : होय दोभागी'—त्याचे हृदय विदीर्ण होते. चुकलेले मूल आईला शोधण्यासाठी जसे टाहो फोडून रडते तसा हा परमेश्वराला हाक मारीत मारीत रडत सुटतो. वस्तुतः त्याला या गोष्टी कळत नाहीत असे नाही. पण ईश्वराच्या आर्ततेने तो देहभान विसरलेला असल्यामुळे त्याची अशी स्थिति होते. आपल्या अपराधाची क्षमा करून परमेश्वराने आपणाला लौकर भेट द्यावी म्हणून त्याची तो दुःखपूर्वक प्रार्थना करीत राहतो. ही आर्त होय. ती साधकाच्या ठिकाणी निरंतर असावी.

साधक 'आर्तो दुःखत्रसाच्चितो' — ( आ. मा. १५३ ) असावा; त्याला 'देवाची आर्ति होआवी' ( आ. मा. १३९); 'देमती : दानी असे : परी जीवासी आर्ति होआवी की :' ( आ. मा. ९४ ); 'बाइ आर्ति करौनि एथीची दसीचि धरिली पुरे' ( आ. २१२ ); आर्तीते परमेश्वरू वाडोवाडी गिवसतां' ( आ. २१८ ); इत्यादि अनेक वचनात श्रीचक्रधरस्वामींनी साधकाच्या ठिकाणी अशी आर्त असण्याची आवश्यकता व तिचे महत्त्व सांगितलेले आहे. चतुर्विध दुःखात आर्ततेचे दुःख सर्वश्रेष्ठ होय.

(२) **निर्वेद** : 'निर्वेद' म्हणजे जन्मजन्मांतरी केलेल्या पापाबद्दल दुःख. नुसत्या पापाबद्दलच नाही तर पुण्यकृत्याबद्दलहि, म्हणजे देवता-निमित्ताने केलेल्या संत कर्माबद्दलहि दुःख केले पाहिजे. कारण त्या क्रिया कर्मराहाटीच्या संत क्रिया असल्या तरी दैवराहाटीत त्या ईश्वरप्राप्तीच्या आड येतात. या संतक्रियांचे क्षाळण अपरोक्ष ज्ञानात करावेच लागते. अशा या क्रियाबद्दल सुद्धा साधकाने निर्वेद केला पाहिजे. परमेश्वराने पूर्वी प्रत्येक सृष्टीत त्या साधकाला ज्ञान दिलेले असते, पण त्याने ते घालवलेले असते. अनंत सृष्टीत त्याने असे ( ज्ञान घालविण्याचे ) दोष अनेकदा केलेले असतात. 'प्रतिभवी आपुलेनि कडे : ज्ञानपीयूष देसी फुडे : की मी तोंड करूनि कानवडे : उगळौनि घाली ॥ स्नेहवशे कणवा : निज

प्रातीचा ठेवा : साधिसी मज निर्दैवा : अमंगळाप्रती ॥ ते जेणे आतुडे निधान : देशी सेवादास्य साधन : की ते सांडुनि निधान : प्रमादांगवी ' ( ज्ञा. प्र. ९६४-९६७ ) असे असंख्य दोष पूर्वी केलेले असतात. त्या सर्व मागील अपराधाबद्दल दुःख करणे व त्याबद्दल परमेश्वराची क्षमा मागणे हाच निर्वेद होय. ' अवघया वोखटयाची सीमा : करी तुझा पात्री पुरुषोत्तमा : तया मागिला दोषा क्षमा : करिशी पुढती '( ज्ञा. प्र. ९६९ ).

पिंगळेने केलेल्या निर्वेदावरूनहि याची कल्पना येईल. परमेश्वराला पति करून त्यांचा आनंद उपभोगण्याऐवजी आपण विषयासक्त होऊन हाडामासाचे पुतळे उपभोगले या आपल्या पूर्व अपराधाबद्दल तिने दुःख करून आपले उरलेले आयुष्य परमेश्वराला अर्पण केले हा तिचा निर्वेद होय. ' मग म्हणे ते पींगळा : मज कैसा पाडिला मोहाचा उघळा : जो आनंदाचा पुतळा : कांतु मी करीचि ना ' ( उद्ध गी. ३८८ ) ' तो सांडुनि सुखसागरू : मी पति वरीत असे गवारू : जयाचेया आंगउबा विटे श्रृंघारू : कामिनी जनाचा ' ( उद्ध गी. ३९३ ) वगैरे ओंव्यात हा निर्वेद स्पष्ट झाला आहे. अशा या निर्वेदाने संसाराचे मूळच नाहीसे होते ही गोष्ट ' तेंव्हाळि पै एदु : तिये उपनला निर्वेदु : जेणे तुटे अज्ञान कंदु : या संसाराचा ' ( उद्ध. गी. ३८७ ) या ओवीवरून उघड होईल.

**(३) अनुताप** अनंत सृष्टीतील व जन्मजन्मांतरीच्या दोषाबद्दल दुःख करणे हा ' निर्वेद ' होय तर याच जन्मीच्या अपराधाबद्दल दुःख करणे हा 'अनुताप' होय. 'ऐसे मागील अपराधु : देखोनि बोले विविधु ' हा निर्वेद; तर 'तर मी प्रस्तुती दोषी जात्यंधु : अज्ञान वशे ॥ येचि जन्मीचे लेख : करावया नाही मुख : जे जे आचरते दोख : जाणिवे माजी ' ( ज्ञा. प्र. ९७२-९७३ ) हा अनुताप होय.

जीवाकडून शारीरिक, वाचिक किंवा मानसिक असंत क्रिया जशा रीतीने घडून आली असेल तशा रीतीने,त्या क्रियेला साजात्य म्हणजे शोभून दिसेल अशा रीतीने अनुताप अर्थात्, पश्चात्ताप केला पाहिजे. तसे केल्याने त्या असंत क्रियेचे पुरश्चरण घडते. ( बाई : क्रियेसि अनुतापु पुरश्चरण :

१. ' क्रिया म्हणजे मानासिक : वाचिक : कायिक : ऐसी त्रिविध : परी संत न बोलिजे : असतच ' ( आ. स्थ. १७६ ).

आ. १७६ ). म्हणजे, परशरामबासांच्या मताने त्या असंत क्रियेच्या प्रसवाची पुढील चाल मोडते. (पुरः = पुढील; चर=चाल; न=राहत नाही); पण त्या क्रियेमुळे लागलेला दोष मात्र कायमच राहतो. उलट, रामेश्वरबासांचे मत असे आहे की अनुतापाने असंत क्रियेचे पुरश्चरण होते म्हणजे त्या असंत क्रियेमुळे पूर्वी लागलेला दोष देखील नाहीसा होतो. ( पुरः =पूर्वील; चर= चाल; पुरश्चर = पूर्वील चाल अर्थात् क्रिया, न = नाहीशी होते ). ती क्रिया पुसली जाते.

## पुरश्चरणाची ऊर

जीवाकडून जे दोष होतात त्यांचे स्थूल मानाने दोन विभाग पडतात. एक 'क्रियावधी'चे दोष व दुसरा 'देहावधी'चे दोष. जे दोष एकच वेळ केल्यानेहि साधक प्रमादी होतो ते क्रियावधीचे दोष होत; तर जे दोष अनेक वेळा आचरल्यानेहि प्रमाद घडत नाही, मृत्युपूर्वी त्याबद्दल पुरश्चरण केले म्हणजे झाले, पण पुरश्चरण न करताच जर साधकाला मृत्यु आला तर मात्र ज्यामुळे प्रमाद घडतो ते देहावधीचे दोष होत.

विकार, विकल्प व हिंसा हे तीन दोष क्रियावधीचे आहेत. पैकी विकल्पदोषामुळे तर परमेश्वराला थोर खंती येते. त्यामुळे, एखादा घाव लागल्याबरोबर पुरुषाची वरील कवळी उडून फक्त खालील शिल्लक राहावी त्याप्रमाणे विकल्पप्रमादियाला, एरवी पुढे जे गोमटे झाले असते ते उडून जाते. ते गोमटे त्याला होत नाही. पण पूर्वील गोमटे मात्र शिल्लक राहते.

१. '**अनुनित देखौनि पोळे : दुःख करी··· तरी पुरश्चरण म्हणजे प्रसवाची चाल मोडे : क्रियेतव लागले ते न पुसे हे परसरामबा : लागले ते पुसे हे रामेश्वरबा** : पुरस् म्हणजे पुढे : चर म्हणजे त्या दोषाचे चालणे : न म्हणजे नव्हे : येणे अर्थे प्रसवाची चाल मोडे परी लागे ते न पुसे : ते परसरामबा वासना : आन पुर म्हणजे पूर्वील जे क्रिया घडली तियेचे चर म्हणजे वर्तन : न म्हणजे घडले ते नाहीच होय : एवं लागले तेही पुसे हे रामेश्वरबा वासना' ( आ. बं. १७६ ).

२. 'सकळ दोषांचिया दोन जाति : एक दोष देहावधी आन एक क्रियावधी :... क्रियावधीचे : एक वेळ क्रिया घडली तो प्रमादिया होय, ··· देहावधीचे दोष त्यांचे प्रायश्चित्त केल्या स्वीकारात पडे' ( सदर ).

परमेश्वर त्या गोमस्याचे फळ त्याला कुठे तरी भोगवतात. त्याच्या प्रस्तुतच्या विकल्पप्रमादाला प्रायश्चित्ताची मात्र ऊर नसते ' स्त्रीचे इतर सर्व दोष क्षम्य समजले जातात. पण तिने पतिव्यतिरिक्त इतर पुरुषाकडे पति म्हणून पाहणे हा व्यभिचाराचा दोष मात्र अक्षम्य होय. त्यामुळे पति तिचा तात्काळ त्याग करतो. त्याप्रमाणे अनुसरलेल्या पुरुषाचे सगळे दोष परमेश्वर पोटात घालतात. पण त्याच्या विकल्पदोषाबद्दल मात्र त्याला क्षमा न करता परमेश्वर त्याचा तात्काळ त्याग करतात ' (महा. तत्त्व. पा. ४३९). उलट, विकार आणि हिंसा आचरणारे प्रमादिये यांनी जर अनुतापपूर्वक पुरश्चरण केले तर ते स्वीकारात पडतात. त्यांच्या दोषाच्या पुढील प्रसवाची चाल मोडते, पण लागलेला दोष मात्र पुसला जात नाही. त्यातहि त्यांनी परमेश्वराला आलेली खंती विशेष आचरणाने परिहरण केली तर त्यांना देहविद्या होऊ शकते.

देहावधीच्या दोषांना पुरश्चरणाची–अनुतापाची नेहमीच ऊर असते. अन्यकथन, द्रव्यसेवा, वर्मस्पर्श, जायबाविसीतील दोष वगैरे बहुतेक देहावधीचे दोष होत. मृत्युपूर्वी केव्हांहि त्या दोषाबद्दल अनुतापपूर्वक पुरश्चरण केल्याने परमेश्वर खंती सोडतात. पुरुषाने ओखटी क्रिया केल्याने परमेश्वर खंती घेतात. पण पुढे त्याने गोमटी क्रिया केल्यास त्याची ती खंती जाते. उदा : नाथोबा अपराध करून आले. पण ते परमेश्वरपुराला जाण्याची गोमटी क्रिया करीत असल्यामुळे त्यांचे दोष स्वामींनी पोटात घातले. सारांश, नंतर केलेल्या गोमस्यामुळे दोषाचा अर्धा प्रसव पारखतो आणि जीवाने, त्या दोषाबद्दल अंतःकरणपूर्वक अनुताप केला तर सगळाच प्रसव पारखतो.

## अनुताप किती व कसा

ज्या प्रमाणात लहानमोठा दोष घडला असेल त्याच प्रमाणात कमीअधिक प्रायश्चित्त केले पाहिजे. ते अधिक असेल तर चालेल पण कमी असता कामा नये. समजा, वर्मस्पर्श करून एखाद्याला साधकाने दुखवले तर त्याबद्दल त्याने इतका अनुताप करावा की जेणेकरून त्या दुखवलेल्या पुरुषाची खंती नाहीशी होईल. कधी कधी असे होते की पुरेसे प्रायश्चित्त करूनहि दुसऱ्याची खंती नाहीशी होत नाही. त्याला इलाज नाही. त्या प्रायश्चित्तामुळे तो दोषी पुरुष मात्र दोषमुक्त होतो.

प्रायाश्चित्त करायचे, अनुताप करायचा म्हणजे असे की जो दोष मी केला तो करायला नको होता, मी फार वाईट केले, परमेश्वराचा मी महान अपराधी आहे असे दुःख त्या दोषी पुरुषाने ज्याला दुखवले असेल त्याच्या समोर करावे. हा प्रायश्चित्ताचा विधि स्वामींनी पद्मनाभीला परमाणुभव-- देवाची क्षमा मागायला सांगतांना केलेल्या आज्ञेत आलेला आहे. 'सेणे मातीया आंग माखौनि तयाते आड पडो: तयाते म्हणो : आमचा होंता : आपणयापासि असो दीयावा : तरि असो दीजैल' ही आज्ञा होताच पद्म-नाभी गेला आणि 'तेयासि सेणे मातिया आंग माखौनि आड पाडिले' (ली. च. भा. ३. पा. ३२). यावरून आपले अंग शेणामातीने लिंपून ज्याचा अपराध केला असेल त्याच्या समोर अपराध्याने उभे राहावे; आपल्या अपराधाची कबुली द्यावी व त्याची क्षमा मागावी असा हा प्रायश्चित्ताचा विधि असल्याचे दिसून येते. (ली. च. उत्त. २२५ लीळा पहा).

असन्निधानात परमेश्वराजवळ अनुताप करतांना मात्र हा विधि करण्याची गरज नाही. आचरत्या पुरुषाने अंतःकरणपूर्वक परमेश्वराजवळ आपल्या अपराधाचा उच्चार करून त्याबद्दल दुःख प्रदर्शित केले म्हणजे पुरे. त्या पुरुषाने पूर्वी कधीकाळी ईश्वराची कणव जोडली असेल तर परमेश्वरच त्याला तसा अनुताप करण्याची बुद्धि देतात. तसे नसले तरीहि त्या पुरुषाचा अनुताप पाहून त्यांना कणव उपजते. म्हणून ते त्या पुरुषाचा स्वीकार करतात. त्याच्या दोषाची त्याला क्षमा करतात. उदा: महदाइसा वाराणसीहून आली. मग त्या ओखट्याबद्दल अनुतापपूर्वक दुःख करू लागली. त्यामुळे स्वामींना तिच्याबद्दल कणव उत्पन्न होऊन ते तिच्यावर प्रसन्न झाले. सारांश, अशा रीतीने प्रस्तुत जन्मी आपण केलेल्या दोषांचा साधकाने दुःखपूर्वक अनुताप करीत असावे. परमेश्वरा मी 'तुज स्वामीचा आज्ञाभंग करी : मग अविहित अविद्येते वरी : ऐसा पापिया नाना परी : दुःखी तूते ॥ तू बंधुत्वे वेठसी मज कारणे : की मी लागे दायादपणे : काइ

१. 'आपुले अनुचित देखौनि दुःख करी तरी ईश्वरी कणव उपजे : स्वीकरीती : महदाइसे वाराणसीहून आली : दुःख करी ते साउमे न रीगती : मग मानले' (आ. स्थ. १७६).

काज अनुतापे येणे : वायाचेनि ' ( ज्ञा. प्र. ९७७, ९७८ ) असे अनुताप-पूर्वक दुःख नेहमी करणे अवश्य आहे.

(४) **अनुशोच** : आपल्या कृतकर्माबद्दल पश्चात्ताप करून 'माझ्या हातून दोष तर घडला, आता मी जिवंत तरी कसा राहीन ? हा माझा दोष कसा बरे फिटेल ?' असे 'पुढील अपराधाबद्दल' दुःखपूर्वक शोक करीत राहणे तो 'अनुशोच' होय. 'ऐसिया अपराधियाचे : विपाये उजू जन्म पडे खाचे : रात्रीदीस शोचीत जाचे : दोषा आगंतुका ॥ मागा बहुते जन्मे : निर्फळे गेली अर्थकामे : तेणे प्रतिभवीचेनि श्रमे : पुढील शोची' ( ज्ञा. प्र. ९७९, ९८० ). त्यामुळे 'प्रस्तुत वर्तता गुण उरे : दोष नसता देह सरे : निकेयातु आयुष्य पुरे : हान्नि लाभु' ( ज्ञा. प्र. ९८१ ). आणि अनुशोचामुळे होणारा हा लाभ तरी काय लहान आहे ?

वर सांगितल्याप्रमाणे मानसिक दुःख करण्यासाठी साधकाने आर्त, निर्वेद, अनुताप व अनुशोच करीत रहावे. ज्या अनुसरलेल्या पुरुषाला कोणत्याच प्रकारे निर्वेद उत्पन्न होत नाही, आपल्या अनुचित कर्माबद्दल जो कधीहि अनुताप करीत नाही, किंवा पुढील दोषाबद्दल अनुशोच करीत नाही तो साधक काय कामाचा ? किंबहुना त्याला भिक्षुक असे म्हणायचे तरी कसे ?

## विरह दुःख

आर्त, निर्वेद, अनुताप व अनुशोच या चतुर्विध दुःखाप्रमाणे परमेश्वराच्या विरहाचे दुःख करणे हाहि मानसिक दुःख करण्याचा एक महत्त्वाचा विधि आहे. म्हणूनच 'निरंतर परमेश्वराचा विरहो भावावा' ( आ. मा. ४९ ) असे श्रीचक्रधरस्वामींनी सांगितले आहे. परमेश्वराचे निरंतर सन्निधान लाभणे हे भक्ताचे आणि त्याच्या भक्तिप्रेमरूप साधनाचे वैशिष्ट्य आहे. ( भक्ताचे सकळही सन्निधानी चरितार्थ होए : उद्ध. १६ ). ज्ञानियाला सहसा परमेश्वराचे निरंतर सन्निधान लाभत नाही. परमेश्वरापासून बोध होऊन ज्याचे शाब्दज्ञान याच देही चरित होते त्यालाच काय ते प्राप्तीपर्यंत परमेश्वराचे सन्निधान लाभू शकते. पण तेहि भक्तासारखे नसते. ( महा. तत्त्व. ५१०–५१६ पहा ). त्या व्यतिरिक्त इतरांपैकी काही सन्निधानीचे पुरुष परमेश्वराने बीजे केल्यावर असन्निधानी येतात आणि

काही तर साधिकरणच पुरुष असतात. त्यांनी परमेश्वराचा निरंतर विरह भावून दुःख करणे अवश्य आहे.

## विरह भावना मोक्षदायक

परमेश्वराचा विरह होताच ज्यांचा प्राण जातो किंवा जे प्राण देतात ते साधक ( भक्त व प्रयत्नीये पुरुष ) लौकर मुक्तीला पोचतात. ' माझेया विरहाग्निचेनि पुटे : जिवाचे भांगार आटे : तरि मुक्तिचा मोळा उमटे : अंतरात्मेयासि ॥ कळेबरांचिया कावलासाठी : लाहिजे कैवल्याची सोनेवाटी तरि विरहवेथेचा हाटी : पालटु किजे ' ( उद्ध. गी. १७०, १७१ ) असे भास्करभट्ट बोरीकराने म्हटले आहे. पण ' वियोगी उरलेल्यांनी ' काय करावे ? ' पुण माझेनि विरहविखे : न जळे शरीराचे चोळाखे ' म्हणजे परमेश्वराच्या विरहाने ज्यांचे शरीर जळणार नाही, ज्यांचे प्राण जाणार नाहीत त्यांनी ' तऱ्ही अवस्थेचेनि कडलेखे : वरील दी लोटावे ' ( उद्ध. गी. १७२ ) परमेश्वराचा विरह भावीत, त्या विरहाबद्दल दुःख करीत करीत आपले राहिलेले आयुष्य किंवा ' जन्म जीवित' कंठावे. 'तैसे माझेनि वीरहज्वरे : नावडे भोगाचे सावरे : रसभावांचेनि तुषारे : सुसावे तो ॥ तया विषये सुख तीडिकाय : स्वर्गसुख चुडुफाय : ब्रह्मादि सुखें कोमाये : ज्ञानिया तो ' ( उद्ध. गी. १७५ ) अशी परमेश्वरविरही ज्ञानियाची स्थिति होते. अर्थात्, इतर सर्व सुखभोगादिकावरून आपले मन काढून आचरत्या पुरुषाने नेहमी वरीलप्रमाणे परमेश्वराचे विरहदुःख करीत असावे.

## पोळलेल्या कुत्र्याप्रमाणे असावे

कुत्र्याला शारीरिक व मानसिक दुःख फार असते. तो नेहमी पोळलेला असतो, तो आपल्या दुःखातच सदासर्वदा चूर असतो. कोठेहि त्याला यत्किंचितहि सुख वाटत नाही. सुख व्हावे म्हणून तो वळचणी खाली जातो. पण तेथे त्याला सुख वाटत नाही. एखाद्या झोपडीत तो शिरतो. पण तेथेहि त्याचे दुःख कमी होत नाही. तो अखंड जळतच असतो. ( पोळलेया सुनेयाचा दृष्टांत. ८६ ). त्याप्रमाणे परमेश्वरविरहाने साधकाने अखंड जळत असले पाहिजे. त्याला इतरत्र कोणत्याहि ठिकाणी सुख वाटता कामा नये. स्थान पाहिल्याने, प्रसादाला नमस्कार केल्याने, भिक्षुवासनिक

भेटल्याने किंवा शास्त्राचे स्मरण केल्याने कशानेहि सुख वाटता कामा नये. इतके परमेश्वराच्या दुःखात त्याने मग्न व्हावे. सारांश, साधकाने 'पोळलेया सुनेयाचेया परी असावे' ( आ. २१९ ) असे स्वामींनी सांगितलेच आहे.

## विरही पुरुषांचे प्रकार

परमेश्वराच्या विरहाचे दुःख करणाऱ्या साधकांचे स्थूल मानाने तीन प्रकार आहेत. (१) साधन विरही; (२) कोमळ विरही; आणि (३) जरठ विरही. यांच्या विरहदुःखाची कल्पना येण्यासाठी श्रीचक्रधरस्वामींनी तीन विरहिणींचे दृष्टांत दिलेले आहेत. कोणी एक स्त्री होती. तिचा पति देशांतराला गेल्यामुळे ती 'विरहिणी' झाली होती. पतीच्या वियोगात तिला इतर कशानेहि सुख होत नसे. फक्त त्याचे अंगी, टोपरे, पुड, वाटवा (पुड=विड्याच्या पानांची करंडी; वाटवा = चंची, बटवा ) इत्यादि वस्तु पाहून किंवा त्याच्याकडून देशांतराहून निरोप वगैरे घेऊन आलेल्या पुरुषाला पाहून मात्र तिचे विरहदुःख कमी होत असे, तिला सुख वाटत असे. त्याप्रमाणे काही साधकांना परमेश्वराच्या विरहाने इतके दुःख होते की त्यांना इतर कशानेच सुख वाटत नाही. फक्त परमेश्वराचे संबंधी पदार्थ म्हणजे स्थान, प्रसाद, भिक्षु व वासनिक आणि परमेश्वराचे शास्त्र ही भेटली म्हणजे मात्र सुख वाटते. हे पहिल्या विरहिणीचे पुरुष किंवा 'साधन' विरही होत. ( विरहिणीचा दृष्टांत.८७ ).

दुसरी एक 'कोमळ' विरहिणी अशी होती की पतीच्या वियोगामुळे तिला झालेले दुःख कशानेच कमी होईना. पतीचे अंगी, टोपरे वगैरे पदार्थ पाहून देखील तिला सुख वाटेना. उलट ते पदार्थ दिसताच ती त्यांची आदळआपट करीत असे. वियोगाने ती इतकी दीन झालेली होती. त्याप्रमाणे काही परमेश्वरविरहियांना परमेश्वरसंबंधी जे स्थानप्रसादादि पदार्थ त्यांच्यामुळेहि, त्यांच्या भेटीगाठीमुळे सुद्धा सुख वाटत नाही. असे पुरुष हे दुसऱ्या

१. 'सुनेयाचेया परी म्हणजे जैसे त्यास कवणी ठायी सुख नाही तैसे सकळ चर्ये स्थानी : प्रसादी : भिक्षुवासनिकाचिये भेटी सुख न व्हावे : सुनेचि का : ना ये जाती अंगीचे दुःख असह्य तैसे येरी नाही' ( आ.स्थ.२१९).

विरहिणीचे अथवा 'कोमळ' विरही होत. (विरहीणीचा दृष्टांत.द्वितीय ८८). आणि तिसरी 'जरठ' विरहिणी तर अशी होती की पतीच्या विरह-दुःखाने भोवतालच्या पदार्थांवरील तिची पदार्थबुद्धीच नष्ट झाली होती. पहिल्या 'साधन' विरहिणीला पतीच्या पदार्थांनी सुख होत असे; दुसऱ्या 'कोमळ' विरहिणीला त्या पदार्थांवर पदार्थबुद्धि होती पण त्या पदार्थांचा उपभोग घ्यावासा वाटत नसे, आणि तिसऱ्या 'जरठ' विरहिणीला तर त्या पदार्थांवर मुळी पदार्थबुद्धीच नव्हती, मग ती त्यांचे सेवन तरी काय करणार? समोर असलेले सर्व पदार्थ तिला सारखेच वाटत होते. तिच्या दृष्टीने चंदन काय आणि चिखल काय ही सारखीच होती. त्याप्रमाणे काही विरही पुरुषांना परमेश्वरविरहामुळे त्याच्या स्थानप्रसादादि संबंधी पदार्थांवर पदार्थबुद्धीच राहत नाही. त्यांच्या भेटीगाठीमुळे त्यांना सुख कसे होणार ! ते नेहमी परमेश्वराच्या विरहदुःखात चूर झालेले असतात. त्यांना तिसऱ्या जरठ विरहिणीचे पुरुष म्हणतात. जरठ विरही हा परमेश्वराविषयी विरहदुःख करणारा सर्वश्रेष्ठ पुरुष होय. यापैकी साधेल त्या विरही पुरुषा-प्रमाणे आचरत्या पुरुषांनी विरहाचे दुःख करून आपला 'जन्म क्षेपावा'

याशिवाय परमेश्वरप्राप्तीबद्दल तळमळ करीत राहणे, तो अद्याप आपणाला प्राप्त झालेला नाही म्हणून 'अप्राप्तिनिमित्तक दुःख' करणे वगैरे आणखीहि काही मानसिक दुःख करण्याचे प्रकार आहेत ते अनुषंगाने पुढे वर्णन करण्यात येतीलच. आचरत्या पुरुषांनी जे शारीरिक कष्ट आणि जी मानसिक दुःखे करावी म्हणून आतापर्यंत सांगण्यात आले ते कष्ट आणि ती दुःखे सर्वच साधकांना करता येतात असे नाही. पूर्व सृष्टीतील आपापल्या भूतभजनाच्या क्रियापाकाप्रमाणे काही विशिष्ट रीतीने कष्ट व दुःखे करण्याचा गुण प्रत्येकाच्या ठिकाणी निपालेला असतो. उदा : जीवदेवताभजनीये पुरुष हे आपल्या सगळया शारीरिक व मानसिक क्रिया कोरडेपणाने करतात तर वस्तुभजनीये पुरुष ओल्या गुणाने करतात हे आपण यापूर्वी अनेकदा पाहिले. या ओल्या–कोरड्या गुणांच्या अनुषंगाने क्रिया आचरणारांचे अनेक प्रकार होतात. ते आता पाहू.

**मृताचे धर्म : दुःखात पोवलेला**

सगळ्याच आचरत्या पुरुषांनी जिवंत असूनहि मृताच्या धर्मानुसार

वर्तन करावे. ( जीतेनि मृताचा धर्मी वर्तावे : आ. ७४ ). 'मृत' म्हणजे जीव निघून गेलेले जड अचेतन प्रेत नव्हे; किंवा देहातून निघून गेलेला जीव, त्याचा प्रेतदेहहि नव्हे; तर 'मृत' म्हणजे मरणाला टेकलेला अगदी अंतिकाचे दुःख भोगत असलेला जीव, त्याच्या धर्मानुसार साधकाचा आचार असावा.

अंतिक दुःख भोगताना जीव त्या दुःखात ओवला पोवलेला असतो. तद्वत् आचरत्या पुरुषाने नेहमी परमेश्वराच्या वियोगदुःखात अत्यंत वेंचलेपणाने असावे. मृतावस्थेतील पुरुषाचा कुणी मान केला किंवा अपमान केला तरी त्याचे त्याकडे यत्किंचित सुद्धा लक्ष नसते; त्याप्रमाणे आचरत्या पुरुषाने इतरांनी केलेल्या मानापमानाकडे कधीच लक्ष देऊ नये. खरा साधक मानापमानाची पर्वाच करीत नाही. तो देहावर उदास झालेला असल्यामुळे त्याला त्याविषयी अहंता किंवा ममता मुळीच वाटत नाही.

मृतावस्थेतील जीवाचे राजसतामस गुण लोपलेले असतात. तसेच ईश्वराच्या ठिकाणी वेंचलेल्या साधकाचे राजस व तामस गुण लोपलेले असावे. ज्यांचा परमेश्वराच्या ठिकाणी तितका आत्यंतिक वेंच नाही त्यांनी 'मृताच्या धर्मी' वर्तावे म्हणजे आपल्या शरीरातील राजस व तामस गुणांचे नियमन करावे. त्याला रजतमाचे उल्लेख उपजले तर त्याने ते रसरूप होऊ देता कामा नयेत. 'अमक्याने मला मूर्ख म्हटले, तमक्याने माझा मान केला नाही, त्याने माझी अवज्ञा केली, मी अमक्या अमक्या गोमाजी कापशाचा मुलगा असूनीह माझ्यापेक्षा हलक्या लोकांचा मात्र मान होतो, पण माझा होत नाही, वगैरे सगळे रजतमाचे उल्लेख असल्यामुळे साधकाच्या मनात ते कधीच येता कामा नयेत. एखादेवेळी रजोरूप उल्लेख उद्भवलाच तर त्याचे नियमन करावे.

## दैन्याभिभूत होऊन रहावें

सर्वावयवी बरवेपण असणे, शरीरसौंदर्य असणे, चेहेऱ्यावर लावण्य असणे, सगळ्या बाबतीत कौशल्य अंगी असणे, ही जिवंतपणाची लक्षणे

१. 'जीवंत रजस्तमी : मृत नित्राण : मृताचे धर्म म्हणिजेति तामसा गुणाचा नियम' ( आ.स्थ. ७४ ).

होत. उलट कुरूपता, निस्तेजता, वेंधळेपणा, मलिनत्व, कुचैलत्व वगैरे ही मृत असल्यासारख्याची लक्षणे होत. साधकाने ती अंगी बाणवली पाहिजेत. जो साधक सहजसुंदर असेल त्याने मृताच्या धर्मी वागायचे म्हणजे देहाची 'लीसपूस' न करता शरीराच्या ठिकाणी मलिनत्व आणून, घाणेरडी वस्त्रे नेसून इतक्या किळसवाण्या स्थितीत रहावे की त्याला पाहताच पाहणाऱ्याला शिसारी यावी. त्याने आपले सौंदर्य लोपवून कुरूपता धारण करावी. त्याने वेड्यासारखे चालावे. वेड्यासारखे उठावे, वेड्यासारखे बसावे व वेड्यासारखेच रहावे. तो शहाणा असेल तर आपला शहाणपणा लोपवून त्याने लौकिक दृष्ट्या मूर्खपणा धारण करावा. ( मनुष्यमात्र होउनि असावे आ. ४३ ). हेच त्याचे मृताच्या धर्मी वर्तणे होय.

आउसा भिक्षेला जातांना स्वच्छ धुतलेले वस्त्र नेसून धुतलेल्या तलम वस्त्राची ओढणी वर घेत असे. तोंड व हातपाय स्वच्छ धुवून कपाळावर त्रिपुंड्र रेखीत असे आणि मग स्वामींची परवानगी मागून भिक्षेला जात असे. एके दिवशी ती अशा रीतीने स्वच्छ वस्त्रप्रावर्ण नेसून भिक्षेला जाण्यासाठी स्वामींची परवानगी मागण्याला आली. त्यावेळी त्यांनी तिला म्हटले की लीसपूस करणे म्हणजे शरीर वारंवार धुवून स्वच्छ करणे व शृंगारणे ही वेश्यांची कामे आहेत, जोग्याची नाहीत. ( हे काय नायका : तापसाचे ऐसे धर्म तरी सामान्य स्त्रीया काय करावे : शो. आ. ४५). जोग्यांनी, अर्थात् विरक्त महात्म्यांनी अशी लीसपूस करू नये. तो कसा तरी, काळ्या घाणीने लिडबिडलेला असावा. (आ. ४४; मागे पा. १५१ व १५२ पहा ). यावरूनहि ही गोष्ट स्पष्ट होईल.

## स्वनिष्ठ क्रियांच्या बाबतीत

साधकाने वर सांगितल्याप्रमाणे सदासर्वदा दैन्याभिभूत होऊन मृताच्या

१. ' जीता म्हणजे सर्वावयवसंपूर्ण ··· आन बरवा बत्तीस लक्षण : अवलक्षण नव्हे तो जीता : कुरूप : अवयवहीन : अवलक्षण तो जीतेयात नव्हे : तो मृतात ' ( आ. स्थ. ७४ ).

२. ' पुढीलास आपुली विकृती उपजे ऐसे नेसिजे ··· ऐसे चालीजे··· वेडे ऐसे बेसीजे : वेडे ऐसे उठीजे : ऐसे जेवीजे ··· ' ( आ. स्थ. ७४ ).

धर्मी वागावे हे खरे; पण ते फक्त स्वनिष्ठ क्रियांच्या बाबतीत. परनिष्ठ असे नैमित्तिक विधि आचरतांना मात्र योग्य तो पुरुषार्थ अंगी बाळगूनच त्याने ते विधि आचरावे. उदाः श्रीचक्रधरस्वामीवर हेमाडपंताचे लोक चालून आले त्यावेळी भटोबास अशा पराक्रमाने लढले की जणु हा आता सृष्टी-संहार करतो की काय असे वाटले. हजारो लोकांना हरवण्याचे शौर्य त्यांच्या ठिकाणी दिसले. हे यशरूप जिणे होय. परनिष्ठ क्रियांच्या वेळीं असे यश-रूप जिणेच साधकाने कंठावे. एरवी स्वनिष्ठ क्रियांच्या बाबतीत मात्र अशा रीतीने वागावे की चालतांना आपल्या पायाखालील मुंगी मरू नये. इतके दुबळेपण त्याने आपल्या अंगी बाणवावे.

## सुखदुःखपराङ्मुखता

सुखरूप क्रियेमुळे मानसिक देखील सुख न मानणे आणि दुःखरूप क्रियेमुळे मानसिक दुःख न होऊ देणे हेहि मृताच्या धर्मीच वर्तणे होय. साधकाने सुखदुःखामुळे मनात अन्यथात्व येऊ देता कामा नये. ही दोन्ही त्याने सारखीच मानली पाहिजेत. जो साधक निसर्गतःच दुबळा असेल त्याने तर अगदी मेल्यासारखे होऊन रहावे. तसे न राहिल्यास दैवराहा-टीच्या दृष्टीने तो अपयशी समजला जाईल. त्याला शारीरिक व मानसिक दुःखे प्राप्त होण्याचा संभव असतो. तोच प्रसव वाढला तर त्याच्याकडून क्वचित् इतरांचा देहघातहि होतो. हा सगळा अनर्थ टळावा म्हणून साध-कांनी मृताप्रमाणे राहणे हेच योग्य होय.

परमेश्वराच्या वियोगात साधकाने जिवंतपणा दाखवणे, व्यवहारात, आहाराविहारात दक्षता बाळगणे यासारखे त्याला दुसरे अपयश कोणते ? परमेश्वराबाचून त्याला जिणे भूमिभाराप्रमाणे वाटले पाहिजे. अशा स्थितीत त्याच्या ठिकाणी अहंवृत्ति, राजस–तामसादि गुणांचा गर्व कशाला पाहिजे ? तो त्याने दाखवणे हे महापाप आहे. इतकेच काय पण आपल्या अंगी

१. ‘ आता स्वनिष्ट धर्मी जैसे मृतरूप होऊन असावे तैसेच परनिष्ठ धर्मी मृतवत् होऊन असावे ऐसे नाही : तेथ जीतेपणे वर्तावे…तेंचि कैसे : ना : **यशरूप जिणे तो जितयात : जैसे भट्ट थोरा पराक्रमाचे** ’ ( आ. बं. ७४ ).

**२. ‘ आन सुखरूपे क्रिये आन दुःखरूप क्रिये मानसिक अन्यथात्व उपजो नेदावे : मेलयाचेया परी असावे** ’ ( आ. स्थ. ७४ ).

असलेल्या आचार गुणांचे वर्णन त्याने इतराजवळ करणे हेहि महापाप आहे. तशात ते गुण अंगी नसतांना जर तो त्यांचा गर्व वाहील तर ते कोडावर डाग दिल्यासारखे होईल[1] !

## परमेश्वराला मनानेहि सोडू नये

देशाच्या शेवटी जाऊन काटेरी झाडाखाली आचार करीत असतांना साधकाने काय वाटेल ते संकट आले तरी परमेश्वराला मनानेहि सोडता कामा नये. दुष्काळ, हेर, चोर, बिगार, शत्रूचे हल्ले वगैरे आले तरी त्याने हिंसा, विकल्प व विषय यांचे सेवन करू नये व परमेश्वराला सोडू नये. आधीच साधकाने देहशोषण केलेले असल्यामुळे तो रोडावलेला असतो. तशात वरील प्रकारची संकटे येणे म्हणजे त्याचे धड तुटणेच होयं. पण अशा आत्यंतिक संकटाच्या वेळीहि त्याने परमेश्वराला अंतःकरणाने दृढ धरून ठेवावे; त्यालाच त्याने चिकटून बसावे.

माकोडा आपले जीवन शोधत भटकतो; आणि एकदा त्याला ते सापडले म्हणजे काय वाटेल ते झाले तरी ते तो सोडीत नाही. अनेकदा माणसाच्या शरीराला किंवा गुळाला माकोडा चिकटून बसतो. तेथून त्याला ओढून काढण्याचा प्रयत्न करीत असतांना त्याचे धड तुटून पडते, पण तो त्या माणसाला किंवा गुळाला सोडीत नाही; हे आपण पाहतोच. ( माकोडे-याचा दृष्टांत. ५६. ). त्याप्रमाणे साधकाने देखील आपल्यावर कोणतेहि आणि केवढेहि मोठे संकट आले, शारीरिक व मानसिक दुःखे कितीहि सहन करावी लागली तरी परमेश्वराला सोडू नये. ( धड तुटलेयाही जीवें परमेश्वराते न सोडावे : आ. ७५ ). 'जरी देहांत मांडले : तरी साधन ते आपुले : आपदी न शके काही केले : जीवे सोडू ' ( ज्ञा. प्र. १२० ). साधकाने निरंतर परमेश्वर–चिंतनात व त्याच्या सेवादास्यातच रममाण व्हावे.

१. ' गोसावियावीण जीणे हेच तव भूमिभार जाले असे : मग अहंकार गर्व मठारा तो कायीसा : हे सावेया महापाप : कोडावर दादु'( आ.स्थ.७४)

२. ' धड तुटले म्हणजे काळ : दुष्काळ : अशक्ति : हेरचोर : धाडी : बिगारी : इतुले धड तुटले : देहमात्र उरे ' ( आ. स्थ. ७५ ).

३. ' ...म्हणौनि शारीर मानसिक दुःख पावलेया ईश्वरी विसर पडो नेदावा ऐसा हेत येथ असे ' ( दृष्टांत स्थळ ५६ )

## देवतांना शरण जाऊ नये

वरील प्रकारच्या संकटातून सुटण्यासाठी त्याने आपली पूर्वीची सामुग्रीहि उपयोगात आणू नये. पूर्वीची सामुग्री म्हणजे, साधक कर्मराहाटीत असतांना त्याच्या ठिकाणी असलेले वैद्यकीचे किंवा ज्योतिषादिकाचे ज्ञान. ते वापरून त्याने स्वसंरक्षण करू नये. तसे करणे म्हणजे देवतांना शरण जाणे व परमेश्वराला सोडणे होय. कारण ब्रह्मविद्येव्यतिरिक्त इतर सर्व शास्त्रे जीवदेवतानिर्मित आहेत. आपल्या संबंधियासाठी जो साधक असे उपद्रव सहन करतो तो तर नरकाचेच साधन जोडतो. त्याने ईश्वरा-निमित्त सगळे उपद्रव सहन केले तर त्या जातीचे अनंत जन्मीचे सदृश कर्मलेप पुसले जातात[1]. अशा रीतीने घड तुटले तरी परमेश्वराला न सोडणारेच पुरुष मुक्तीला पोचतात.

## खळाळी मोकलावे

' खळाळ ' म्हणजे ज्या ठिकाणी वाघ, साप, तसेच चोर वगैरे असण्याचा संभव आहे असे भयंकर स्थान. साधकाने नेहमी अशाच ठिकाणी जाऊन रहावे म्हणून स्वामींनी सांगितलेले आहे. ( खळाळी मोकलावे : आ. ७६ ). अशा खळाळाच्या स्थानी जाऊन त्याने स्वतःला ' मोकलावे ' म्हणजे सोडून द्यावे. अर्थात् तेथे शरीराच्या योगक्षेमाची, तसेच वारा, झड, ऊन वगैरे पासून आपल्या शरीराचे संरक्षण करण्याची काळजी त्याने पूर्णपणे सोडून द्यावी[2].

तथापि ज्या ठिकाणी खरोखरच व्याघ्रसर्पादि आहेत हे निश्चितपणे ठाऊक आहे तेथे मात्र साधकाने जाऊ नये. तेथे जाणूनबुजून जाणे म्हणजे आत्मघात करणे होय. तर व्याघ्रसर्पादिकांची ठिकाणे जशी भयंकर असतात तशा भयंकर ठिकाणी त्याने जाऊन रहाणे व योगक्षेमाची काळजी न करता

१. ' काहीचि सामग्री प्रकाशी ना : सामग्री प्रकाशली तर देवतेस शरण गेला : ईश्वरु सोडिला : ईश्वरालागूनि साहे तरि तिये जातीचेया अनंता कर्माची ली पुसती ' ( आ. स्थ. ७५ ).

२. ' मोकलणे म्हणजे योगक्षेम भावी या देहाचा : वारा झड पाषाण एवमादिक प्रयत्न करणे : खळाळ म्हणजे वाघासापांची संभावना : चोराचा कुरूठा ऐसी स्थाने सेवी : भयाते न गणौनि ' ( आ. स्थ. ७४ ).

परमेश्वरचिंतनात काळ घालवणे हे 'खळाळी मोकलणे' होय. देहावर उदास होऊन त्याने कोणत्याहि प्रकारच्या सुखाची अपेक्षा करता कामा नये. नाही तर भिक्षेला जायचे पण कमरेला चारदोन पैसे घालून जायचे याप्रमाणे ते हास्यास्पद होईल. वेळीप्रसंगी उपयोगी पडेल म्हणून त्याने पैसा-अडका देखील जवळ बाळगू नये. तसेच, पुढे कदाचित् मिळणार नाही म्हणून एखादी लंगोटी, झोळी वगैरे अधिक संग्रही ठेवणे हेहि मोकलणे नव्हे. तर अन्न, वस्त्र, उदक इत्यादिकांची काळजी त्याने समूळ सोडून देऊन, स्वभावाला मात्रा देऊन रहावे.

## मुंगीचा पुरुष

जन्म क्षेपत असतांना साधकाकडून रस्त्याने चालतांना किंवा एरवीहि, कोणत्याहि लहान मोठ्या जंतूची हिंसा होता कामा नये. त्याच्या पायाखालील मुंगी देखील मरता कामा नये. ( तुमचेनि मुंगी रांड न होआवी : आ. ६० ). यासाठी त्याने काळजीपूर्वक खाली पाहून चालावे, हा तर उपाय आहेच पण त्याहिपेक्षा महत्त्वाचा उपाय असा की त्याने आपले स्वतःचे शरीरच इतके निःसत्त्व, दुबळे व हलके करून सोडावे की त्याचा पाय एखाद्या मुंगीवर पडला तरी ती मरू नये. अनुसरलेला पुरुष देहावर पूर्णपणे उदास झाल्यास तो याप्रमाणे निर्बल होऊ शकेल. तसेच मनाने देखील त्याच्या ठिकाणी कोणतेहि सामर्थ्य असता कामा नये. कोणीकडून तरी आपले परमेश्वरसाधन पूर्ण व्हावे या एकाच गोष्टीकडे त्याचे लक्ष असले तर त्याचे आंतरिक सामर्थ्य देखील कमी होईल.

'कड्याचा पुरुष' व 'मुंगीचा पुरुष' हे दोघेहि चतुर्थाश्री असून त्यांच्या स्वभावाला मात्रा सारखीच असते. पण कड्याचा पुरुष ज्याप्रमाणे ओलेपणाने निर्वेदादि दुःख करीत असतो तसे निर्वेदादि दुःख मुंगीच्या पुरुषाला ओलेपणाने करता येत नाही एवढेच. तथापि तो

१. 'देहावरी उदास : आस्था सांडिली ···सुख नाशंसी याते मोकलणे बोलीजे' ( आ. स्थ. ७६ ).

२. 'मुंगी रांड म्हणजे तिये परते साने नाही : परि हा ठावो वेन्ही नित्राण : बळ सामर्थ्य हारविले जे पायाखाली मुंगी पडलेया सरे ना··· येणे करूनि देहाची निर्वळता आन मनाचे आलस्य' ( आ. स्थ. ६० ).

दुःख करीत असतोच, नाही असे नाही. कारण, कोरडेपणाने का होईना पण त्याने मुळीच दुःख न केले तर तो 'जीतची प्रमादिया' म्हणजे जिवंत असून देखील प्रमादी बनेल.

## मुंगीच्या पुरुषाचे साध्य

साधकाने एखाद्या पदार्थाची वासना केली, तो आपणाला मिळावा असे मनात आणले तरी तो त्याला मिळू नये. (तुम्हा पडिलेया धुळी न लागावी : आ. ६१). 'धूळ लागणे' म्हणजे एखाद्या पदार्थाची इच्छा केल्यास तो मिळणे. सामान्यतः जो धष्टपुष्ट व सतेज मनुष्य आहे त्याच्या अंगावर धूळ चिपकून बसू शकते तशी ती हाडक्या–रोडक्या माणसाच्या अंगावर बसू शकत नाही. त्याचप्रमाणे, चांगल्या धष्टपुष्ट व चिकणचोपड्या माणसाने एखाद्या पदार्थाची इच्छा केली तर तो त्याला मिळू शकतो. म्हणजे असे की, तो त्या पदार्थाच्या वासनेने आपणाकडे आल्यास त्याच्याकडे पाहूनच तो पदार्थ आपण त्याला द्यावा अशी इच्छा आपल्या मनात उत्पन्न होते. पण अनुसरलेल्या पुरुषाने आपला देह इतका शोच्य, रंक, मलिन व कुचैलयुक्त करावा की त्याला पाहताच आपणाजवळ असलेला पदार्थ त्याला देण्याची इच्छा कुणालाहि होऊ नये. पाहणाराला त्याची इतकी किळस यावी की एकवेळ आपल्या जवळचा पदार्थ उकीड्यावर फेकून द्यावा पण याला देऊ नये असे त्याला वाटले पाहिजे. म्हणजेच अनुसरलेल्या पुरुषाच्या मनात पदार्थाची वासना जरी उद्‌भवली तरी त्याच्या शोच्यत्वामुळे, रंकत्वामुळे व मलिनत्वामुळे तो पदार्थ कोणाकडूनहि त्याला प्राप्त होऊ नये.

## प्रयत्नशीलता

जन्म क्षेपीत असतांना आचरत्या पुरुषाने उत्तम चर्या करण्यासंबंधी नेहमी प्रयत्नशील असावे. ही प्रयत्नशीलता सर्वच पुरुषांच्या

१. 'पडिला म्हणजे पदार्थविषयी वासना नेमली होती तिये वरौनि लोटला : म्हणजे पदार्थ सेवावया आपजवो टकला···धूळि म्हणजे सर्वत्र संभव : विदेशी पदार्थ बिदी सांडिती : परि सूतया सुवावे ऐसे प्राक्तनचि नाही : वरि देहचि तैसे जे आपजविलेया न लभे' (आ. वं. ६१).

ठिकाणी असते असे नाही. क्रियापाकाच्या नियमानुसार ज्ञानिया-भक्त-भजनीया पुरुष हा ' प्रयत्नीया ' होय. हा वस्तुतः जीवभजनीया असल्यामुळे ' कोरडा पुरुष ' असतो; दोषापासूनहि तो अलिप्त असतो, इतर कोणत्याच गुणाचा त्याला आश्रय नसतो, अधिकरण किंवा हाळिया-पाळिया यांचाहि तो आश्रय करीत नाही. प्रेमळ, भावाळू, आर्त या पुरुषांचेहि गुण त्याच्या ठिकाणी नसतात. पण प्रयत्नाने तो या पुरुषापेक्षा देखील अधिक चर्या करू शकतो. ' प्रयत्न ' हा त्याचा महत्त्वाचा विशेष होय. या विशेषामुळे तो कोणत्या वेळी, कोणत्या स्थळी, कोणत्या पुरुषाच्या बाबतीत कोणता आचार करायचा हे पूर्णपणे जाणतो. इतकेच नव्हे तर तो आचार प्रयत्नपूर्वक कसा करावा हेहि तो जाणतो. अर्थात्, ज्यावेळी जो विधि उपस्थित होईल तो संपूर्णत्वाने प्रयत्नपूर्वक आचरायला प्रयात्निया पुरुष तयारच असतो. आणि ज्यावेळी एखादा विधि उपस्थित नसेल त्यावेळी, त्याचप्रमाणे इतर वेळीहि ' आता माझे कर्तव्यकर्म काय ' याचा विचार करून त्याप्रमाणे तो आचरणहि करतो.

### जन्म कसा क्षेपतो

असा हा प्रयात्निया पुरुष बहुधा देशाच्या शेवटी जाऊन रजस्तमहीन, फळपुष्पविरहित म्हणजे आपल्या फुलाफळांनी साधकाचे मन न आपलवणारी झाडे किंवा रजतम झाडून टाकणारा असा एखादा अधिकरण यांचा प्रासंगिक आश्रय घेऊन तेथे आपला जन्म म्हणजे अनुसरणानंतरचे सगळे आयुष्य वरील प्रकारचा कोणताहि विधि प्रयत्नपूर्वक आचरीत, काढतो. ( एवं पर्यंत प्रयात्निया एकु आति : जो आपुले करणीये करौनि देशाचा सेवटी झाडातळी जन्माते घाडी : आ. ७२ ).

हा प्रयात्निया पुरुष ज्ञानिया-भक्त-भजनीया अतएव कोरडा असला तरी प्रयत्नपूर्वक ओले स्मरण करू शकतो. इतकेच काय पण तो सन्निधा—

१. ' प्रयत्निया म्हणजे कोरडा: निढाळ : साधिकरण पाळीया काहीचि आश्रयो नाही··· आपुले म्हणजे जिये काळी जिये स्थानी ज्या पुरुषा जेणेसि जे : का मनुष्याप्रति अनारिसा विधी : मग प्रतिक्षणी मज काइ करणीय ऐसे विचारावे ' ( आ. स्थ. ७२ ).

नीचा असला तर परमेश्वराची वियोगवार्ता ऐकताच प्रयत्नाने सुरी, पाटी, विष किंवा वाघवळ यांचा उपयोग करून प्राणत्याग देखील करतो. अर्थात् प्रयत्निया पुरुष आपल्या प्रयत्नाने पुरुषपरत्वे आपली चर्या पालटू शकतो. शेवटी तो आपल्या प्रयत्नाने एका कळिकेच्या भक्ताच्या योग्यतेचा होऊन परमेश्वराचे प्रेमहि मिळवू शकतो हा त्याचा महत्त्वाचा विशेष होय. या पुरुषाप्रमाणे साधकाने नेहमी प्रयत्नशील असले पाहिजे.

## आर्त ऊर्फ वटोवटोचा पुरुष

जन्म क्षेपणाऱ्या साधकाच्या ठिकाणी ईश्वरप्राप्तीची, त्याच्या भेटीची निरंतर आर्त असली पाहिजे. वेडे, पिसे, मुके व युक्त अशा मनुष्यावताराच्या ठिकाणी ज्यांना निर्हेतुक भजन घडले आहे असे पुरुष 'आर्त' होत. 'आपणाला ईश्वर मिळावा, तोच भेटावा' अशी आर्त किंवा उत्कंठा त्यांना सदासर्वदा लागलेली असते, म्हणून त्यांना आर्त पुरुष असे म्हणतात. ही आर्त ते नेहमी अधिकाधिक वाढवीत असतात. म्हणजे शेवटी आर्तदानी परमेश्वर त्यांची आर्त पुरवितो. जीवदेवताभजनी कोरड्या पुरुषांना अशा आर्ततेचा संस्कार नसतो.

हा आर्त पुरुष दोषाविषयी कोरडा असतो पण आंतरिक गुणाविषयी ओला असतो. ओलेपणाने परमेश्वराच्या प्राप्तीविषयी आर्त करीत असतांना आपल्या सगळया क्रिया तो ईश्वरी लावतो. पदार्थ-संयोगाने त्याला प्रथमोल्लेख उपजतात, नाही असे नाही. पण ते उल्लेख तो मोडून काढतो; रसरूप होऊ देत नाही. ईश्वराने दिलेले उचित पदार्थ मात्र तो सेवन करतो. इतर पदार्थांकडे तो ढुंकूनहि पाहत नाही. चातक ज्याप्रमाणे गावोगावी आणि देशोदेशी असलेल्या नद्यांचे किंवा पुष्करिणीचे पाणी न पिता मेघोदकाची वाट वर चोच करून पाहत राहतो आणि मेघाने वर्षाव केल्यावर तेच पाणी स्वीकारतो ( चातकाचा दृष्टांत ७१ ) त्याप्रमाणे हा आर्त पुरुष

१. 'जन्मजीवितपूर्वक सकळही दास्य करावे म्हणीतले : तेच दास्य कैसे करावें : ना : आर्तिपूर्वक निरंतर परमेश्वराते शोचितचि असावे : तरि ऐसा कवण असे.... वेडे पिसे मुके युक्त ऐसा मनुष्य अवताराच्या भजनाचे आर्त जाणावे' (आ. वं. ६९).

२. '**वटो कोरडा : ईश्वरी लावीत असे : मिष पातु असे : जैसा चातक**' (आ. स्थ. ६९).

इतर पदार्थ न स्वीकारता परमेश्वरदत्त तेवढे पदार्थ स्वीकारतो. तो ईश्वराने सांगितल्याप्रमाणे आचरण करीत असतो. अन्यथात्व होऊ देत नाही. ईश्वराची आर्त करताकरताच आपला देह जाईल तर बरे होईल अशी तो जणु वाटच पाहात असतो. आर्ताच्या सर्व क्रिया परमेश्वरविषयक असल्या-मुळे त्या निर्हेतुक असतात हे सांगायलाच नको. मनुष्यावतारभजनीया पुरुषाला बोधानंतर एकदा आर्त उत्पन्न झाली म्हणजे त्यानंतरचे सगळे दिवस तो परमेश्वराकडे उत्कंठेने लावतो, त्याच्या ठिकाणी आर्त-बाहुल्य आणि परमेश्वराला त्याच्याविषयी कणव-बाहुल्य असल्यामुळे परमेश्वर त्याला लौकर आपणाकडे नेतात. परमेश्वराकडे जायला आर्ताला फार दिवस लागत नाहीत.

ज्याची आई त्याला सोडून गेलेली आहे असे लहान मूल ज्याप्रमाणे आर्ततेने वटवट करीत रडते व आई ज्या दिशेकडे गेली असेल तिकडे दृष्टि लावून पुढे चालते त्याप्रमाणे जणु ईश्वराने सांडलेला हा आर्त पुरुष ईश्व-राकडे डोळे लावून आर्ततेने वटवट करीत आपले दिवस अतिशय उत्कंठेने कंठीत असतो. ‘ मला ईश्वर कधी भेटेल, त्याच्या विरहात मी जिवंत कसा राहू, माझे देहधर्म, जीवधर्म इंद्रियधर्म व मनोधर्म यांचे मी नियमन केले आहे खरे पण शेवटपर्यंत मला ते साधेल की नाही, या स्थितीतून मी कसा निस्तरून जाईन ’ वगैरे प्रकारे त्याची वटवट आर्ततेने एकसारखी चालूच असते. म्हणूनच त्याला आर्त किंवा वटोवटोचा पुरुष असे नांव आहे. ( ऐसा असे वटोवटो करीतु आपुले चारही दीस कडे घाली : मग एकु दिसु नव्हे रे म्हणौनि जाओ लागे : आ. ६९ ).

आर्त पुरुष आपले ‘ चारहि ’ दिवस कडेला लावतो याचा अर्थ त्याला आर्त निपजल्यावर ईश्वराकडे जाण्यासाठी चारच दिवस लागतात असे नाही. दोनचार दिवस असे आपण ज्या अर्थाने म्हणतो त्याच अर्थाने तो आपले ‘ चार ’ दिवस कडेला लावतो. याचा भावार्थ इतकाच की

१. ‘ ऐसा म्हणजे देह शेष उरवूनि : वटोवटो म्हणजे निढाळ : रात्री दीसी सोचीत असे : कैसा जीन : कैसा निस्तरैन : ऐसे पुढीलीया जिण्याचे शोची : जैसे माया सांडिले अपत्य वटोवटो करी ’ ( आ. स्थ. ६९ ).

आर्त उपजल्यावर परमेश्वराकडे जायला त्याला फारसे दिवस लागत नाहीत.[1] चुकलेल्या मुलाचे रडणे ऐकून गहिवरून जाऊन माता ज्याप्रमाणे स्वतः धावत येते त्याप्रमाणे आर्त पुरुषाची वटवट ऐकून परमेश्वर गहिवरून जातात व त्याला लौकर आपल्या दर्शनाला घेऊन जातात, म्हणजे तो 'ईश्वरदर्शनाला' लौकर जातो एवढाच त्याचा अर्थ घ्यायचा. तथापि तत्पूर्वी त्याला प्रत्यक्ष परमेश्वर दर्शन देतातच.

या आर्ततेने प्रसन्न होऊन ज्या दिवशी त्याला न्यावयाची प्रवृत्ति त्यांना होते त्यादिवशी परमेश्वर 'जीवा-प्रपंचाचा' विभाग करून त्या प्रपंचातून म्हणजे प्रापंचिक देहातून त्याला काढून नेतात. त्या दिवशी, देह, इंद्रिये, मन, कर्मे, प्रतिकूल देवता या सगळयांना आपण जिंकले असे त्याला साभिमान समाधान वाटते. 'ज्याला तुम्ही आपल्या ताब्यात ठेवू पाहत होता तो मी आता तुमचा नाही. हा पहा, मी तुम्हाला जिंकून परमेश्वरदर्शनाला जात आहे' असे जणु तो आवेशपूर्वक देह, इंद्रिये, इत्यादींना सांगत असतो. अशा आर्त स्थितीत तो मृत्यु पावत असल्या-मुळे आर्त पुरुष परमेश्वरदर्शनाला जातो असे म्हटले जाते.

## अप्राप्तिविषयक दुःख करावे

जन्म क्षेपीत असतांना साधकाने निरंतर अप्राप्तिविषयक दुःख करणेहि अवश्य असते. 'मला परमेश्वर व्हावा, मला तोच भेटावा आणि तोहि लौकर भेटावा' अशी उत्कंठा असणे ही 'आर्त' होय. 'मला परमेश्वर अजून झाला नाही, मला तो अजून भेटला नाही, मला पाप्याला स्थानप्रसादादिकाविषयी काहीच आवड नाही, मी तसाच दिवस कंठीत असतो, मला यांच्याविषयी आवड कशी लागेल, ते मला प्राप्त कसे होतील' अशा रीतीने दुःख करणे हे 'अप्राप्तिविषयक दुःख' होय.[2] हे अप्राप्तीचे दुःख कोणताहि वस्तुभजनीया व प्रयत्नीया पुरुष करू शकतो.

१ 'च्यान्ही दीस म्हणजे आर्ताते बहुतर काळ न लगे …'(आ.स्थ.६९).

२. 'तरि अप्राप्तीसी काइ लक्षण : ना : असुके नव्हेचि : ते मज कैसेनि होईल : अपराधीया पापियासि : जे मी करीत असे यातवः असुके ते व्हावेचि याते आर्ति बोलिजे' (आ. बं. ७१).

(पण आर्ततेचा संस्कार मात्र मनुष्यावतारभजनीयावाचून कुणालाच होत नाही. अप्राप्तीच्या पुरुषापेक्षा आर्त श्रेष्ठ व आर्तापेक्षाहि तळमळीचा पुरुष श्रेष्ठ होय ).

**अप्राप्ति कशाविषयी ?**

साधकाने अप्राप्तिविषयक दुःख करायचे ते फक्त सात पदार्थांविषयी. (१) स्थान; (२) प्रसाद; (३) वासनिक; (४) भिक्षु; (५) शास्त्र; (६) ईश्वर; आणि (७) प्रेम. साधकाने या सातहि पदार्थांची अप्राप्ति करावी. ज्याला कशाचीच आवड नाही त्याने प्रथम स्थानाची अप्राप्ति करावी. त्यामुळे प्रसादाची अप्राप्ति करण्याचा संस्कार निघतो. प्रसादाची अप्राप्ति केल्याने वासनिकाची अप्राप्ति केल्याचा संस्कार निघतो. अशा क्रमाक्रमाने त्याला या सातहि पदार्थांची अप्राप्ति करता येते. अर्थात् ,तिर्यंचभजनीया आपल्या गुणाप्रमाणे या सातहि पदार्थांची अप्राप्ति करतोच; पण जो जीवदेवताभजनीया आहे त्याने वर सांगितल्याप्रमाणे प्रयत्न करावा. या सात पदार्थांत प्रेमाची अप्राप्ति करणे हे सर्वांत चांगले. ईश्वरापेक्षाहि प्रेमाच्या अप्राप्तीचे दुःख अधिक फलदायक आहे. ईश्वराची अप्राप्ति केल्याने फार झाले तर ईश्वर मिळेल म्हणजे परमेश्वरावताराचे सन्निधान लाभेल, पण त्याचे प्रेम मिळेलच असे नाही. कारण ज्यांना ईश्वर भेटला आहे अशा सन्निधानीच्या पुरुषांपैकी अनेकांना प्रेम झालेले नसल्याचे आपणास दिसून येते. पण ज्यांनी प्रेमाची अप्राप्ति केली त्यांना प्रेम आणि ईश्वर दोन्ही होतात. प्रामुख्याने त्यांना प्रेम होते आणि ते देण्यासाठी ईश्वर होतोच. म्हणून प्रेमाची अप्राप्ति करणे (अप्राप्ति–करणे = अप्राप्तिविषयक दुःख करणे) हे सगळ्यात चांगले. ज्यांना ते साधत नसेल त्यांनी ईश्वराची अप्राप्ति करावी. तेहि ज्याला शक्य नसेल त्याने शास्त्राची अप्राप्ति करावी. शेवटी निदान स्थानाची तरी अप्राप्ति

१. '**अप्राप्ति ते साताचि पदार्थांची : स्थान प्रसाद वासनीक : भिक्षु शास्त्र ईश्वरु प्रेम** ..... साता पदार्थांमध्ये प्रेमाचीच अप्राप्ति उत्तम .... सातेया पदार्थांची अप्राप्ति केल्या थोर पदार्थांची करावी ऐसे उपजे : तरि तेचि कैसे : ना : प्रथम स्थानाची अप्राप्ति करिता प्रसादाची करावी ऐसे उपजे ... ' (आ. वं. ७१)

करावी. म्हणजे क्रमाक्रमाने त्यांचा संस्कार वाढून कालांतराने त्यांना प्रेमाचीहि अप्राप्ति करता येईल. जो पुरुष या सातापैकी ज्या पदार्थाची अप्राप्ति करील त्याला सामान्यतः तोच पदार्थ प्राप्त होईल.

## अप्राप्ति आणि अपरितोष

या साताशिवाय इतरांच्या विषयी ' अप्राप्तीचे दुःख ' होऊन्न शकत नाही. साधकाला आपल्या आचरणाविषयी—चर्येविषयी ' अपरितोष ' करावा लागतो; ' अप्राप्ति ' नव्हे. कारण चर्या हा काही एखादा पदार्थ नाही. मला अमुक अमुक चर्या साधत नाही, किंवा मी अमुक अमुक आचाराचे अनुष्ठान करीत नाही, ते माझ्याकडून होऊ शकत नाही असे जे दुःख करायचे ते ' अपरितोषाचे ' दुःख होय; 'अप्राप्ती' चे नव्हे. अप्राप्तीच्या दुःखाने तो पदार्थ तर प्राप्त होतोच पण शिवाय कर्मांच्या राशी नासतात; तसे अपरितोषाच्या दुःखाने होत नाही. त्या दुःखामुळे फक्त चांगली चर्या अनुष्ठिता येते एवढेच.

## कर्मांच्या राशींचा नाश

अप्राप्तीच्या दुःखाने साधकाच्या ज्या कर्मांच्या राशी नासतात त्या कोणत्या? जीवाकडून नेहमी तेरा प्रकारची कर्मे होतात. (१) शारीरिक. (२) वाचिक. ( ३ ) मानसिक. ( ४ ) शारीरिक-वाचिक-मानसिक. ( ५ ) शारीर प्रधान, वाचिक—मानसिक आनुषंगिक. (६) वाचिक प्रधान, शारीरिक-मानसिक आनुषंगिक, (७) मानसिक प्रधान, शारीरिक-वाचिक आनुषंगिक ( ८ ) शारीर प्रधान, वाचिक-आनुषंगिक ( ९ ) शारीर प्रधान, मानसिक आनुषंगिक ( १० ) वाचिक प्रधान, शारीर आनुषंगिक ( ११ ) वाचिक प्रधान, मानसिक आनुषंगिक (१२) मानसिक प्रधान, शारीर आनुषंगिक; आणि ( १३ ) मानसिक प्रधान, वाचिक आनुषंगिक. अशा तेरा प्रकारांनी जीवाकडून अनंत संतासंत कर्मे होत असतात व पूर्वी झालेली

१. ' मग चर्येचा अपरितोष तोही करावा : तरि तोचि कैसा : ना : **अमुके नानुष्ठीचि : चर्येचा अपरितोष : अप्राप्ति नाही : का जे पदार्थ नव्हे** ' ( आ. बं. ७१ ).

असतात. त्यापैकी साजात्य कर्मांचा नाश अप्राप्तीच्या दुःखाने होतो. म्हणजे अप्राप्तीचे दुःख ज्या प्रकाराने केले असेल त्या प्रकारची अनंत संतासंत कर्मे नासतात. ( अप्राप्तिनिमित्तके दुःखे कर्माचीया राशी नासति : आ. ७१ ).

## कर्मांचा नाश कसा होतो

वस्तुतः परमेश्वराचे प्रेम व ईश्वर यांच्याविषयी अप्राप्तीचे दुःख केल्यानेच कर्मांच्या राशी नासतात. स्थान, प्रसाद, वासनिक, भिक्षु व शास्त्र यांच्या अप्राप्ति-दुःखाने अक्षरशः कर्मांच्या राशींचा नाश होत नाही, तर त्या त्या पदार्थांच्या प्राप्तीच्या आड आलेल्या कर्मांचाच तेवढा नाश होतो आणि त्या जन्मात त्या पदार्थाची प्राप्ति होते, एवढेच. उदा: शास्त्रविषयक अप्राप्तीच्या दुःखाने, शास्त्रप्राप्तीच्या आड आलेली कर्मे नासून शेवटी शास्त्र प्राप्त होईल, इतकेच. उलट, प्रेमाची अप्राप्ति केली तर पुनःसंबंधानंतर प्रेम होऊन आनुषंगिक रीत्या शास्त्र होईलच.

भजनक्रियेच्या वेळी पात्राच्या ठिकाणी भजन घालतांना जी सूक्ष्म जंतूंची हिंसा होते त्या हिंसेमुळे जीवाच्या ठिकाणी 'अनधिकार' बाणतात. या अनधिकारामुळे 'अदक्षता' आणि अदक्षतेमुळे 'अयोग्यता' लागते. त्या पात्राच्या ठिकाणी भजन घडल्यामुळे त्याला ज्ञान होते हे खरे; पण त्याबरोबरच वर निर्देशिलेली अनधिकाराची अदक्षताहि लागलेली असते. ही अदक्षता अप्राप्तीच्या दुःखाने नष्ट होते. त्यामुळे आपण अप्राप्ताचे दुःख अधिक करावे अशी दक्षता साधकाच्या ठिकाणी येते. त्यामुळे तो अप्राप्तीचे दुःख अधिक करतो. त्याने त्याची अयोग्यता नाहीशी होते. दुसऱ्या कोणत्या तरी पुरुषाच्या विधीला आड आल्याने किंवा प्रतिबंधक झाल्याने जीवाच्या ठिकाणी अयोग्यता लागते. त्या अयोग्यतेमुळे पुढे त्याच्याकडून तो विधि आचरला जात नाही. त्या विधीच्या आड ती अयोग्यता येते. पूर्वी तो कुणाच्या तरी अप्राप्तिविषयक दुःखालाच प्रतिबंधक झाला होता म्हणून त्याला जी अयोग्यता लागली होती ती या आरं-

१. 'येथ साजात्य क्रियेतव साजात्य कर्माचाच नाश जाणावा :.... संतासंते : तेहि नानाविध विचित्रे नासती ' ( आ. वं. ७१ ).

भीच्या अप्राप्तिविषयक दुःखाने नाहीशी होऊन अप्राप्तीचे दुःख पूर्णपणे करण्याची योग्यता त्याला येते. ती योग्यता आल्यावर तो संपूर्णत्वाने म्हणजे विशेष भराने जे अप्राप्तीचे दुःख करतो त्यामुळे त्याची संतासंत कर्मे नासतात[1].

## तीन प्रकारच्या अयोग्यता

अप्राप्तीच्या दुःखाने 'कर्मांच्या' राशी नासतात असे म्हटले आहे. यातच अयोग्यता नासते हाहि अर्थ अंतर्भूत होतोच. कारण कर्मांचा नाश होण्याला अप्राप्तीचे जे विशेष दुःख करावे लागते ते करता येण्यासाठीच त्याला प्रत्यवायभूत झालेली अयोग्यता नष्ट झालीच पाहिजे. तरच संपूर्णत्वाने अप्राप्तीचे दुःख होऊन कर्मांच्या राशी नासू शकतील. दुसरे असे की, वस्तुतः अयोग्यता दोन प्रकारच्या आहेत. एक अयोग्यता, अनुसरणानंतर पात्राच्या ठिकाणी भजन घालतांना होणाऱ्या सूक्ष्म जंतूंच्या हिंसेमुळे लागते; आणि दुसरी इतरांच्या निमित्तविधीला आड आल्यामुळे लागते. या दोन्ही अयोग्यता अप्राप्तीच्या दुःखामुळे नासतात.

## तळमळ करीत जन्म क्षेपावा

अनुसरणानंतर साधकाने आपला जन्म क्षेपायचा तो अत्यंत तळमळीने क्षेपला पाहिजे. आपणाला ईश्वर लौकर भेटावा अशी तळमळ त्याला नेहमी असावी[2]. अवरदृश्यावताराला भजन घालणाऱ्याच्याच ठिकाणी हा तळमळीचा संस्कार निपजतो व त्यामुळे तोच साधक आपला जन्म तळमळत क्षेपतो. तो जरठ विरही असतो. (कोमळविरही देखील विरह वाढवीत तळमळीला येतो). त्याची स्थिति अर्थातच तिसऱ्या विरहिणी प्रमाणे असते. ( मागे पा.३४१ पहा ). तिच्याप्रमाणेच तळमळीच्या पुरुषालाहि परमेश्वरावाचून इतर कशावरहि पदार्थबुद्धि मुळीच नसते[3]. अशा रीतीने

१. '**आधी अदक्षता : मग अयोग्यता : मग कर्मे**' ( आ. स्थ. ७१ ).

२. '**ईश्वरु व्हावा : तोचि भेटावा ऐसी जे चाड केली** म्हणजे आर्त वाढवली **ते ईश्वरे** पुनःसंबंधी **पुरविली**' ( आ. बं. ७० ).

३. '**तळमळी तो जरठविरहीया** म्हणजे तिसरीये विराहिणीचा : **अथवा कोमळ** म्हणजे प्रयत्ने कोमळ विरहो वाढवीता तळमळीस ये' ( सदर ).

तळमळत जन्म क्षेपणाराला पुनःसंबंधानंतर ( त्याच्याकडून पुरभजन घडवून मग ) परमेश्वर प्रेम देतात. ( तळमळीत जन्माते धाडी तेयासि परमेश्वरु आपुले प्रेम देती : आ. ७० ). मग हा पुनःसंबंध साधनदात्या मूर्तीने दिलेला असो की इतर अवताराने दिलेला असो. ते परमेश्वराचेच प्रेम होय. तथापि 'आपुले प्रेम' म्हणजे विषयप्रेम मात्र नव्हे.

## सुकवणारा पुरुष

इंद्रादिकापासून खालील देवतामधील परमेश्वरावताराच्या ठिकाणी ज्याला भजन घडले असेल तो पुरुष 'सुकवणारा' निघतो. ( काटिये एकी तळी सुकौनि पाडी ऐसाही एकु आति : आ. ७३ ). परमेश्वराच्या विरहाने सगळ्या अंतर्बाह्य व नित्यनैमित्तिक दुःखरूप साधनांचे आचरण करून, आपल्या स्वभावांना मात्रा देऊन तो आपले शरीर हळूहळू पण पूर्णपणे सुकवतो. इतके की त्याचे अस्थिचर्म एक होतात, मांस आटून जाते, शरीराच्या नुसत्या शिरा घवघवीतपणे दिसतात, त्याची गति इतकी डिगडिग हलणारी होते की हा आता पडतो की काय असे पाहणाराला प्रत्येक क्षणाला भासते. सारांश, त्याच्या शरीरावर नुसती प्रेतकळा पसरते. भास्करभट्ट बोरीकराने केलेले दमनशील आचरत्या पुरुषाचे वर्णन ( मागे पा. ३३० पहा ) हे सुकवणाऱ्या पुरुषाचेच आहे.

ज्ञानप्रबोधकार पंडित विश्वनाथबासानेहि या सुकवणाऱ्या पुरुषाचे वर्णन अतिशय योग्य शब्दात केलेले आहे. आचरता पुरुष आधी विचाराने आपल्या मनावर आणि मग आचाराने इंद्रियावर विजय मिळवितो आणि मग 'संयमे स्वभावाते दमिजे : देह सुकौनि ॥' आणि हे कोणत्या रीतीने ? तर 'तोचि जे अनुक्रमे अन्न तोडी : तेणे भीतरी जठराग्नि उकडी : मग आटौनि जाये कुडी : सुकोनिया ॥ भीतरील आगीचिया उकटी : मेदमांसाते घाटी : रसा रुधिराते आटी : तयामाजी ॥ त्वचा करपौनि कोरडी : होय देहइंद्रियाची पुडी : आवघ्या धातुची सापडी : बैसोनि जाये ॥' अशा रीतीने शरीर सुकवल्यामुळे तो दिसतो कसा

१. 'आपुले प्रेम कां : जे विषय प्रेम निराकरीले' ( आ. स्थ. ७० ).

२. 'सुकवणे म्हणजे अस्थिचर्म एक जाले : मांस आटौन गेले : नसुद्धिया शिरा : डींगडीगति पासोळिया ते सुकवणे' ( आ. स्थ. ७३ ).

म्हणून विचाराल तर विश्वनाथबास सांगतात ' डिगाडिगिती पासोळिया : दीसती शिरा नसुद्धिया : आंगावरी प्रेतच्छाया : बाणौनि ठाके ॥ आंगी चित्तीचे काले : दात भासती सेवाळले : मुख दुःखाग्नी झळंबैले : अखंड बाटे ॥ वारेया उष्णाचेनि ताये : मुख निन्हा कोमाये : शीतकाळी हीमे होये : ठिकरिया त्वचा ॥... तो दृष्टि पाहे वेंभळ : आंग न न्हाय निढाळ : उठिता बैसता जाय विकळ : नित्राणपणे ॥ तो वारेनि जाय चाचरी : पाऊल न पडे हारी : पाय ठेवीत दृष्टी वरी : चाले ऐसा ' वगैरे वगैरे. ( ज्ञा. प्र. ८१६–८२७ ). सुकवणारचे शरीर हे असे होते.

## सुकवणाराचा आचार

अशा रीतीने शरीर सुकवून तो साधक जिथे पुरेशी छायाहि मिळत नाही अशा काटेरी झुडुपाखाली पडून आपले नित्यनैमित्तिक विधि आचरीत असतो. शरीर सुकवण्यासाठी तो पूर्णपणे उपवास करतो असे नाही, तर हळूहळू आपल्या स्वभावाला मात्रा देत असतो. पुढेपुढे तशी मात्रा देणे त्याच्या अगदी पचनी पडते. असे शरीर सुकवून काटेरी झाडाखाली चर्या करणारे पुरुष फार विरळ आढळतात. ईश्वराच्या विरहामुळे काटेरी झाडाखाली उपवास करीत राहणे हा मात्र यांचा विधि नाही. तर त्यांनी स्वभावाला मात्रा देऊनच आपले नित्यनैमित्तिक विधि केले पाहिजेत. तसें न केले तर विधिभंगाचा दोष लागेल. तो लागू नये म्हणून हे सुकवणारे पुरुष स्वभावाला मात्रा देऊनच काट्याखाली राहून चर्या करीत असतात.

## त्याची योग्यता

' अप्राप्तीचे दुःख ' करणारापेक्षा 'प्रयत्नीया पुरुष' हीन होय; आणि ' सुकवणारा ' तर त्याहूनहि हीन होये. वस्तुतः हा सुकवून पाडणारा पुरुष वस्तुभजनीया ( देवावतारभजनीया ) असतो आणि प्रयत्निया

**१. ' सुकविले ते कायी उपवासच केले : म्हणे ना : हळूहळू संयमे सुकवी : मात्रा न लंघीती : पाडे म्हणजे आपुलेनि उत्कर्षे पुरुषार्थ केले म्हणौनि पाडी '** ( आ. स्थ. ७३ ).

**२. ' हा पाहिला ..... एवं पर्यंत हा उत्तम : अप्राप्तिनिमित्तके दुःखे हा याहीपासौनि उत्तम..... आर्त तो तयाही पासि उत्तम** ( आ. स्थ. ७३ ).

पुरुष नुसता ज्ञानियाभक्तभजनीया, अर्थात् जीवभजनीया असतो. या दृष्टीने प्रयत्निया हा कोरडा तर सुकवणारा ओला पुरुष असतो. म्हणून सुकवणारा श्रेष्ठ होय. तथापि, प्रयत्निया पुरुष आपल्या प्रयत्नाने पुरुष-परत्वे चर्या पालटू शकतो. ते सामर्थ्य या सुकवणाऱ्या पुरुषात नसते. तसेच प्रयत्निया पुरुषाच्या ठिकाणी जशी बोधाची दृढता असते तशी ती सुकवणाराच्या ठिकाणी नसते. यामुळे सुकवणारा हा वस्तुभजनीया ओला पुरुष असूनहि त्याच्यापेक्षा प्रयत्निया पुरुषच श्रेष्ठ ठरतो.

## कर्मनाशाच्या दृष्टीने सुकवणारा सर्वश्रेष्ठ

काही आचरते पुरुष प्रयत्नपूर्वक परिच्छेद करीत असतात. त्यांच्या शरीरात त्या परिच्छेदामुळे उपद्रव होत नाहीत. होण्याचा संभव असला तर दैवाच्या साह्याने त्यांचा निरोध केला जातो. या परिच्छेदामुळे त्या परिच्छेदी पुरुषाची पुष्कळ कर्मे नासतात. पण ती फार थोड्या प्रमाणात. त्यापेक्षा प्रयत्निया पुरुषांचा कर्मनाश अधिक होतो. कारण ते विधिपरत्वे आपली चर्या पालटू शकतात व ज्ञानानेहि परिपूर्ण असतात. त्याहिपेक्षा अप्राप्तीचे दुःख करणाऱ्या पुरुषाची कर्मे अधिक प्रमाणात नासतात तथापि अप्राप्तीच्या दुःखाने मानसिक व वाचिक कर्मांचाच नाश होतो. अप्राप्तीचे दुःख करणाऱ्यापेक्षा आर्त पुरुषाचा कर्मनाश अधिक प्रमाणात होतो. कारण तो आपल्या दोषाकडे पाहून मला ईश्वर कसा मिळेल याचे निरंतर थोर दुःख करीत असतो. त्यामुळे त्याची कर्मेहि फार नासतात. तळमळीचा पुरुष तर आर्तापेक्षाहि श्रेष्ठ असल्यामुळे त्या आर्तापेक्षाहि तळमळीच्या पुरुषाचा कर्मनाश त्याहिपेक्षा अधिक होतो. आणि या तळमळीच्या पुरुषापेक्षाहि सुकवून पाडणारा पुरुष दुःखरूप साधन आचरून, काटेरी झाडाखाली राहून, विधि परिपालन करून अधिक काळपर्यंत सदासर्वदा दुःख भोगत असल्यामुळे त्याचा कर्मनाश तर तळमळीच्या पुरुषाच्या पेक्षाहि अधिक होतो. ( कारण तळमळीचा पुरुष फार थोडा काळ वाचतो. म्हणून त्याजकडून तळमळीचे दुःखहि फार थोडा काळ होते आणि म्हणून त्याचा कर्मनाश थोडा होतो ). अर्थात्, कर्मनाशाच्या दृष्टीने देह सुकवून काटेरी झाडाखाली आपले नित्यनैमित्तिक विधि आचरणारा पुरुष सर्वश्रेष्ठ होय.

## रांगोळीचा पुरुष

हाडांची रांगोळी करणे म्हणजे शारीरिक व मानसिक दुःख जसेचे तसे सहन करून शरीर इतके अस्थिपंजर करून सोडायचे की तो पुरुष जर मातीवर किंवा रेतीवर निजला तर त्याच्या हाडांचा सापळा जमिनीवर उठावा व रांगोळी काढल्यासारखे दिसावे. देवतेच्या अंगणात रंगांनी जशा रांगोळ्या काढतात त्याप्रमाणे परमेश्वराप्रीत्यर्थ आचार करतांना साधकाने वरील प्रमाणे आपल्या शरीराची रांगोळी करून घ्यावी. त्यासाठी सृष्टि-व्यवस्थेची वगैरे सगळी शारीरिक व मानसिक दुःखं सहन करावी. त्यांना यत्किंचित् प्रतिबंध करता कामा नये. दुसरा एखादा साधक आपल्या हाडांची रांगोळी करीत असेल तर त्यालाहि त्याने प्रतिबंध करू नये. ( हाडांची रांगवळी करावी नायका : आ. ७७ ).

'रांगोळीचा पुरुष' म्हणजे हरिहरब्रह्मादिक आणि शेषशय्या यांच्यातील देवावतारभजनीया पुरुष होय. 'मुंगीच्या पुरुषा' पेक्षा रांगोळीच्या पुरुषाच्या ठिकाणी शारीरिक व मानसिक निर्बलता ज्यास्त असते. पण त्याहिपेक्षा अधिक निर्बलता 'कड्याच्या पुरुषा' च्या ठिकाणी असते. हा कड्याचा पुरुष म्हणजे ओल्या पुरुषातील देवतावरभजनीया-मधील सर्व श्रेष्ठ पुरुष होय.

## कड्याचा पुरुष

'कड्याच्या पुरुषाला' कटंकटीचा पुरुष असेहि नाव आहे. तो मुख्य शेषशायी नारायण देवावतार भजनीया होय. 'कटंकटी' म्हणजे पोलादी पातळ तुकडा वाजवला म्हणजे होणारा कडकड असा आवाज. साधकाने त्या पोलादी पातळ तुकड्याप्रमाणे होऊन रहावे. ( कटंकटिये-मान होऔनि असावे : आ. ७८ ). म्हणजे तो साधक वाऱ्याने हलला किंवा हलवला गेला तरी तो कडकड वाजत खाली पडतो की काय असे वाटावे. कोणी एक बालविधवा होती तिने कृच्छ्र, मासोपवास वगैरे अनेक

१. 'रांगवळी म्हणजे शारीर मानसिक दुःखे वाटणे : त्यासि प्रतिबंध न करावा' (आ. स्थ. ७७).

२. 'कटंकटिये म्हणजे देह शेष उरूनि असे : जैसा का वारेनि पडैल : बळ पुष्टी पराक्रम तो काहीच नाही : देह शेष असे' (आ. स्थ. ७८).

व्रते करून आपल्या इंद्रियधर्मांवर विजय मिळवला होता. त्यामुळे तिचा जन्म कृतार्थ झाला होता. त्या बालविधवेप्रमाणे, अनुसरलेल्या पुरुषाने देहदमन करून आत्यंतिक शरीर शोषण केले तर त्याचाहि जन्म कृतार्थ होऊ शकेल. ( बालविधवेचा दृष्टांत १७ ).

'मुंगीचा पुरुष' आणि 'कडाचा पुरुष' यातील फरक असा की देहदमन व इंद्रियदमन करून 'मुंगीचा पुरुष' मनुष्यमात्र होऊन उरलेला असतो. आणि 'कडाचा पुरुष' हा 'मनुष्यमात्र' असून शिवाय त्याने चतुर्विध दुःख करून शरीराची हाडे न् हाडे जणु एकमेकापासून निर-निराळी करून ठेवल्यासारखी भासतात. आचरत्या पुरुषाच्या चर्येची ही कमाल मर्यादा होय. ही चर्या अंगवळणी पडली तरीहि यापेक्षा अधिक वृत्तीने आचरण कुणीच करता कामा नये. केल्यास त्यामुळे आत्माविषयक हिंसा केल्याचा दोष पदरी येईल.

## मसणाच्या लाकडाहून हीन जिणे

सारांश, परमेश्वराकडे सर्वस्व अर्पण करता येण्यासाठी साधकाने आपले आयुष्य लौकिकाच्या दृष्टीने अत्यंत हीनपणे, शोच्यपणे कंठले पाहिजे हे लक्षात येईल. त्याने प्रेतवत् असावे हे आपण मागे पाहिले. एका दृष्टीने त्याने मसणातील लाकडापेक्षाहि हीन जिणे जगले पाहिजे असे म्हणता येईल. मसणातील लाकूड हे प्रेतासारखेच बाटलेले असते. कुणी त्याला स्पर्श सुद्धा करीत नाही. पण तेंहि अघोरपंथियांना, अभिचारकांना म्हणजे कूड मांत्रिकांना उपयोगी पडते. परमेश्वरसाधकाने लोकांच्या तित-केहि उपयोगी पडू नये. ( मसणीचे लाकूड तेही वरी एका उपयोगा जाए : परि आपण कवणाचेयाही उपयोगा न वचावे : आ. ५९ ).

उदा : अनुसरलेला पुरुष आपला आचार करीत असतांना त्याला कोणी रस्ता विचारला तर तोहि त्याने सांगू नये. तिकडे त्याचे लक्षच असता कामा नये. कारण रस्ता विचारणारा गृहस्थ आपण सांगितलेल्या

१. 'मसनीचे लाकूड ते आधींच विकल्पी प्रेतासमान असता कवणा उपयोगा जात असे पा : ना **काष्ठ निर्विकल्पी** अघोरपंथी **आन अभिचारिका....** उपयोगा **जाये** : त्या काष्ठाहीपासि आपण अनुपयोगी व्हावे' ( आ. बं. ५९ ).

रस्त्याने जाऊन एखाद्या माणसाची हिंसा जर करील तर, किंवा त्या रस्यात सर्पव्याघ्रादिकांनी तो मारला गेला तर त्या हिंसेला निमित्त–कारण तो साधकच होणार. तो हिंसाप्रमाद त्याच्या कपाळी पडेल व परमेश्वर त्याला अंतरेल. कुणी त्या साधकाला एखादी वस्तु राखायला सांगितली तर तेहि त्याने करू नये. कारण, कल्पना करा की एखाद्या शेतकऱ्याने 'अहो बुवा-साहेब, मी घरी जाऊन येतो तोपर्यंत माझे हे शेत तुम्ही राखा' असे म्हटले. साधकाने ते कबूल केले. शेतकरी घरी गेल्यावर तेथे त्याने कुणाशी भांडून त्याचा खून केला किंवा त्याला इतर काही अपाय केला तर त्या हिंसेला निमित्तकारण तो साधकच समजला जाईल. त्याच्यावर त्या हिंसेचा दोष येऊन तो परमेश्वराला अंतरेल. त्या साधकाने शेत राखण्याचे कबूल केले नसते तर शेतकऱ्याला घरी जाता आले नसते व पुढील सर्व अनर्थ टळला असता. याचसाठी त्याने दुसऱ्याच्या भानगडीत, सद्धेतूनेहि पडू नये हे चांगले.

## एकांतावर प्रीति

जीव अज्ञान व मातित्रयाने युक्त असल्यामुळे त्याच्या हातून कोणत्या वेळी कोणते दुष्कर्म घडेल काही सांगता येत नाही. म्हणूनच अनुसरलेल्या जीवाने लौकिकदृष्ट्या कर्मराहाटीच्या जिवांच्या संबंधात येऊच नये. याच-साठी तर श्रीचक्रधरस्वामींनी साधकाला सर्वसंगपरित्याग करून अटनविजन करीत देशाच्या शेवटी जाऊन काटेरी झाडाखाली परमेश्वरस्मरण करायला सांगितले आहे. भगवान श्रीकृष्णानेहि गीतेत 'विविक्तदेशसेवित्वमर-तिर्जनसंसदि' (गीता. १३ १) ठेवायला सांगितले आहे. त्यावर ज्ञान-देवांनी टीका लिहिली ती अशी. 'बहु एकांतावरी प्रीती : जया जनपदाची खंती : जाण मनुष्याकारे मूर्ति : ज्ञानाची तो.' (ज्ञाने. १३. १४). ही जनपदाची खंती बाळगायला सांगण्यातील हेतु वर दर्शविलेल्या हेतुवाचून दुसरा कोणता आहे बरे ? मसणात असलेल्या लाकडाहूनहि हीन जिणे जगायला व इतरांच्या उपयोगी न पडायला सांगण्यात श्रीचक्रधरस्वामीं-चाहि तोच हेतु स्पष्ट आहे.

१. 'वाट पुसणेया आपुला पदार्थ दाखवणे हे सानेही न करावे' (आ. स्थ. ५९).

## देहाची अनास्था

तथापि एकांतासाठी लोकांना साधकाने टाळणे हे तर अवश्य आहेच. पण ते अनायासे साधण्यासाठी स्वतःचा देहच त्याने इतका कोरडा, तुटका-फाटका, मलिन, घाण करून ठेवावा की कुणाला त्याच्याकडे जावेसेच वाटणार नाही. आपले शरीर धष्टपुष्ट असले तर साहजिकच लोक आपल्याकडे ओढले जाणारच. तेव्हां स्वाभाविक रीतीने लोकांना टाळून ईश्वरध्यानासाठी व आचारासाठी एकांत मिळवायचा असेल तर आपले शरीर तुष्टपुष्ट न ठेवता ते शुष्क करून सोडावे. रांगोळीच्या पुरुषाच्या किंवा कड्याच्या पुरुषाच्या शरीराचा आदर्श सांगितला आहे तो याचसाठी. शरीर सुकवावे इतकेच नाही तर मसणीच्या लाकडाप्रमाणे ते अपवित्र अतएव अस्पृश्य करून ठेवावे. त्यासाठीच साधकाने मसणातील वस्त्र किंवा इतर कुचैळे वापरावी.

अनुसरलेल्या पुरुषाने आपण जिवंत असतांना इतरांच्या उपयोगी पडू नये; इतकेच नाही तर मेल्यानंतरहि कुणाच्या उपयोगी पडू नये. मेल्यानंतर आपल्या देहाला किडामुंगी लागली तर त्यांना तो खायला मिळेल. हेहि उपयोगी पडणेच होय. त्यामुळे त्यांच्या देहाभिमानिनी देवतांचे संत आर्जिले जाईल व ती संत कर्मे पुढे अपरोक्ष ज्ञानात क्षाळावी लागतील. 'प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरं' या न्यायाने अनुसरलेल्या पुरुषाने आधीच आपला देह इतका सुकवून ठेवावा की किडामुंगींना सुद्धा त्यावर मास सापडू नये.[२] इतकी शरीराची अनास्था करणे व ते शुष्क करून ठेवणे अवश्य आहे.

१. 'हे तै होए जै तैसे तुटके देह : जवळी परिग्रहो काइच नसे : जो पुढीलाचेया उपयोगा जाए' (आ. स्थ. ५९).

२. 'जीतु न वचे हे काइ पा : परि सरलेयाही न वचे : जे जंतु न लगती' (सदर).

# सामान्य सूची

# व्यक्तींची सूची

# स्थळांची सूची

# शुद्धिपत्र



| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ११ | मुळविद्येचा | मूळाविद्येचा |
| ३ | २० | ह्मस्वरूपी | ब्रह्मस्वरूपी |
| ४ | २५ | त्याला ज्ञान नव्हते | त्याला ईश्वरीय शक्ति-संचाररूप ज्ञान नव्हते |
| ५ | ६ | निर्यण | निर्णय |
| ७ | २६ | काढीजैल | काढीजाल |
| ५ | २ | प्तो | तो |
| ७ | २६ | आश्रमर्धम | आमधर्म |
| ९ | २६ | उत्पन्न | उत्पन्न |
| १३ | ११ | घठ | घट्ट |
| १६ | २१ | परमेश्रर | परमेश्वर |
| १७ | २५ | नित्या | नित्य |
| २० | ४ | ाविधि | विधि |
| २२ | २३ | सावकाने | साधकाने |
| २६ | ५ | प्रात्यर्थ | प्रीत्यर्थ |
| २७ | ८ | पुन्ह | पुन्हा |
| २७ | १९ | विरोध | निरोध |
| २८ | ६ | भातीच्या | भीतीच्या |
| २८ | ८ | भिंती- | भीती- |
| ३० | ९ | स्विकारतो | स्वीकारतो |
| ३१ | १६ | अति | आति |
| ३१ | १७ | या | मा |
| ३७ | ११ | उतन्न | उत्पन्न |

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ४४ | १ | त्याला | त्यांना |
| ४५ | ८ | उतन्न | उत्पन्न |
| ५१ | १ | उतन्न | उत्पन्न |
| ५४ | १५ | ,, | ,, |
| ५४ | २१ | ,, | ,, |
| ५७ | २२ | ओहत | आहेत |
| ६० | १८ | उतन्न | उत्पन्न |
| ६४ | १३ | पयत | पर्यंत |
| ७२ | २४ | पाया | पायी |
| ७८ | १९ | चतनांचा | चेतनांचा |
| ८४ | ५ | अनिष्टत्यागी | कुष्टिवासनेचा |
| ९७ | मथळा | विकार– | विकल्प– |
| १०६ | २५ | यस्ज | यस्य |
| १४८ | १० | उष्ण | ऊष्ण |
| ,, | १७ | पाचू | पोचू |
| १९२ | ३ | आणित्येची | अणित्येची |
| ,, | ८ | पाडण्या | पडण्या |
| १९३ | १५ | त्यांच | त्यांचे |
| १९८ | १७ | लागलाच | लागलीच |
| ,, | २४ | उर्ध्व | ऊर्ध्व |
| १९९ | १६ | घृत्ति | वृत्ति |
| २०० | १५ | असते | नसते |
| २०४ | १ | हतुे | हेतु |
| २०९ | २२ | पढियते | पढियंते |
| २१५ | १ | फाळ कीपालटावी | फाळकी पालटावी |
| २१६ | ९ | आधि | आधी |
| २१७ | ५ | विधान | विधाने |
| २१९ | २ | पुर्वोत्तर | पूर्वोत्तर |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २२० | ६ | वाटत ता | वाटते तो |
| २२५ | ७ | अन्य वार्ता | अन्यवार्ता |
| २३३ | ११ | बोधवंत | वेधवंत |
| २३४ | १६ | पुरुषाशा | पुरुषाशी |
| २३७ | २ | ईश्वरादि भावाने | ईश्वरादिभावाने |
| २४४ | १३ | दुखः | दुःख |
| २४६ | १६ | देवतचा | देवतेचा |
| २५२ | २५ | कला | केला |
| २६६ | ५ | ह्या तीनी इया | इया तीनी उक्ति |
| २८३ | १६ | त्याजजवळून | त्याच्याच जवळून |
| २९७ | १४ | पूवर्क | पूर्वक |
| २९९ | १८ | भक्ति° | भक्त° |
| ३०६ | १७ | इश्वरा | ईश्वरा |
| ३०७ | ६ | पण | पण शेषशय्या-भजनीच्या कोमळ पुरुषाने चढल्या गुणाने स्मरण केल्यास- |
| ३०८ | २४ | नसता | नसतो |
| ३१० | १५ | ठरता | ठरतो |
| ३१४ | ११ | ।पूर्वक | पूर्वक |
| ३२८ | २ | अश्रूपात | अश्रुपात |
| ३३३ | १२ | ब्वितो | ब्वित्तो |

# प्रा. कोलते यांचे काही ग्रंथ

१. **उद्धवगीता :** शिशुपालवधकर्त्या भास्करभट्ट बोरीकरांचा, काव्य व तत्त्वज्ञान यांचा सुंदर मेळ घालणारा उत्कृष्ट काव्यग्रंथ. प्राचीन मराठी भाषेच्या अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त. किंमत २ रुपये.

२. **भास्करभट्ट बोरीकर :** ( चरित्र आणि काव्यविवेचन ) महानुभाव वाङ्मयाच्या संशोधनक्षेत्रांत अपूर्व खळबळ उडवून देणारा हा चरित्रात्मक प्रबंध प्राचीन काव्यांचा टीकात्मक ग्रंथ म्हणूनहि विद्वानांना व रसिकांना सारखाच मान्य झालेला आहे. किंमत २ रुपये.

३. **रुक्मिणी स्वयंवर :** ज्ञानेश्वरकालीन नरेंद्रकवीने लिहिलेले हे सर्वांग-सुंदर काव्य विस्तृत प्रस्तावना, अर्थनिर्णायक टीपा, शब्दकोश, सूची इत्यादींनी सजवून संपादलेले आहे. नागपूर, मुंबई, आग्रा, उस्मानिया, व महिला या विद्यापीठातील एम. ए; बी, ए; व जी. ए. परीक्षांच्या अभ्यासक्रमात समाविष्ट झालेले. किंमत २॥ रुपये. ( शिल्लक नाही )

४. **श्रीगोविंदप्रभुचरित्र :** ज्ञानेश्वरकालीन प्राचीन मराठी गद्याचा सुंदर आदर्श यात पहावयास सापडेल. आधुनिक दृष्टीने संपादून प्रसिद्ध केलेला हा ग्रंथ नागपूर विद्यापीठाने एम. ए. च्या अभ्यासक्रमात सूक्ष्म अभ्यासासाठी नेमलेला आहे. किंमत २॥ रुपये.

५. **महानुभाव तत्त्वज्ञान :** महानुभाव तत्त्वज्ञानाची अधिकृत ओळख करून देणारा विस्तृत प्रबंध. महाराष्ट्रातील सर्व नियतकालीकांनी व विद्वानांनी प्रशंसिलेला आणि महानुभाव महंतांच्या मान्यतेस पात्र झालेला असा हा अतिशय सुबोध व सुंदर ग्रंथ आहे. महानुभाव पंथाचे तात्त्विक रहस्य समजून घेणारास अत्यंत आवश्यक व उपयुक्त. पृष्ठसंख्या ६०० किंमत ६॥ रुपये.

६. **महानुभावांचा आचारधर्म :** सूत्रपाठातील असतिपरी, आचार व आचारमाळिका या प्रकरणावरील स्थळ, बंद, प्रमेये इत्यादि ग्रंथांच्या आधारे लिहिलेला हा प्रबंध, महानुभाव तत्त्वज्ञान या ग्रंथाप्रमाणेच अधिकृत झालेला आहे. पृष्ठसंख्या २६२. किंमत ६ रुपये.

## पुढील पुस्तके लौकरच प्रसिद्ध होतील.

**श्रीचक्रधरचरित्र :** महानुभावपंथाचे संस्थापक श्रीचक्रधरस्वामी यांचे सरळ व सुबोध मराठीत आधुनिक पद्धतीने लिहिलेले हे पहिलेच विस्तृत चरित्र होय. सर्व महानुभाव पंथीयांनी हे पुस्तक आपल्या संग्रही अवश्य ठेवले पाहिजे. पृष्ठसंख्या सुमारे ३०० किंमत ५ रुपये.

**सह्याद्रिवर्णन :** साती ग्रंथांपैकी अजून प्रसिद्ध न झालेले एवढेच काव्य आहे. पाठभेद, टीपा, प्रस्तावना इत्यादि आधुनिक संस्कारांसहित संपादन केलेला हा ग्रंथ छापत आहे.